ओंकार ट्रस्ट

# कल्याणी

२००७



## परमपूज्य गुरूदेव स्वामी चिन्मयानंद विशेषांक



॥ हरि ॐ ॥



उज्वल भवितव्यासाठी

# ओंकार ट्रस्ट

स्थापना २६ जुलै १९९१


'विसावा' अनिकेत सोसायटी नं. १,
बिबवेवाडी, पुणे - ४११ ०३७.
दूरध्वनी क्रमांक : २४२१ ००४७




॥ श्रीराम ॥

सप्रेम नमस्कार

श्री समर्थ रामदास स्वामी व स्वामी विवेकानंद आदि थोर सत्पुरुषांच्या शिकवणी व तत्वज्ञानापासून प्रेरित होऊन 'ओंकार ट्रस्ट' या संस्थेची स्थापना गुरुपौर्णिमा या शुभदिनी - दिनांक २६ जुलै १९९१ रोजी करण्यात आली. (रजि. क्र. इ. १५०५, दि. १०-१०-१९९१)

देणगीदारांना ८० ग अन्वये प्राप्तीकरांत सूट मिळते.

आमच्या न्यासाच्या उद्दिष्टाप्रमाणे - सामाजिक बांधिलकीस्तव विविध उपक्रम ''विनामूल्य'' राबविले जातात, त्यापैकी महत्वाचे काही उपक्रम पुढील प्रमाणे -

१) गुजरवाडी - निंबाळकरवाडी (कात्रजपासून पुढे ५ कि.मी. अंतरावर ग्रामीण भागात) येथे न्यासातर्फे मुले-मुलींसाठी संस्कार वर्ग घेण्यात येतो.

२) मांगडेवाडी ( कात्रजपासून सुमारे ३ कि.मी.) येथे जिल्हा परिषद शाळेतील मुला-मुलींसाठी संस्कार वर्ग आयोजित केला जातो.

३) कर्वे स्त्री शिक्षण संस्था येथील इयत्ता आठवीतील निवासी मुलींसाठी (सुमारे १८० मुली) संस्कार वर्ग घेतला जातो.

४) डॉ. पारस शहा यांचे नेतृत्वाखाली आतापर्यंत निरनिराळ्या वर्षी आठ नेत्र चिकित्सा शिबिरे गरीब व गरजू व्यक्तींसाठी घेण्यात येवून गरजूंना औषधे व चष्मे मोफत देण्यात आली.

५) तसेच न्यासाने कॅन्सर चिकित्सा शिबीर - मांगडेवाडी येथे, मधुमेह चिकित्सा शिबीर - बिबवेवाडी पुणे येथे व सर्वसाधारण रोगनिदान शिबीर - गुजरवाडी-निंबाळकरवाडी येथे आयोजित केली आहेत.

६) उत्कृष्ट सामाजिक कार्य करणाऱ्या व्यक्तिला अथवा संस्थेला ''वसुंधरा कृतज्ञता'' (न्यासाच्या संस्थापिकेच्या नांवाने) पुरस्कार गेली १२ वर्षे देण्यात येत आहे. या पुरस्काराचे स्वरुप मानपत्र, स्मृतिचिन्ह व रोख रक्कम रु.५०००/- असे आहे. पुरस्कार देण्यात आलेल्या व्यक्ति-संस्था - १) डॉ. स्वर्णलता भिशीकर-सोलापूर २) प्रा. डॉ. अशोक कामत-पुणे ३) समर्थ भक्त सुनीलजी चिंचोलकर-पुणे ४) द्वा. वा. केळकर - पुणे ५) डॉ. सुनीलकुमार लवटे - कोल्हापूर ६) सौ. सिंधूताई सपकाळ - ता. पुरंधर (जि. पुणे) ७) डॉ. पारस शहा - पुणे ८) श्री. श्रीकांत मुंदडा - पुणे ९) श्री. गिरीष यशवंत प्रभुणे - चिंचवड १०) मानव्य संस्था - (संस्थापिका - कै. विजयाताई लवाटे) पुणे ११) डॉ. राजा व सौ. वेणूताई दांडेकर - ता. दापोली (जि. रत्नागिरी) १२) आपले घर (संस्थापक - श्री. विजयजी व सौ. साधनाताई फळणिकर)

७) न्यासाने मराठी व इंग्रजी हस्ताक्षर सुधार प्रकल्प श्री. नानासाहेब लाभे, नागपूर यांचे मार्गदर्शनाखाली ६ वर्षांच्या कालावधीत सुमारे ३५ शाळांमधून

घेतला व त्याचा फायदा सुमारे १०,००० पेक्षा जास्त विद्यार्थ्यांना झाला.

८) न्यास वेळोवेळी आध्यात्म, संतविचार इ. करिता थोरामोठ्यांची प्रवचने / व्याख्याने आयोजित करते. समर्थ भक्त श्री. सुनीलजी चिंचोलकर यांची श्री. एकनाथ महाराज यांचे चिरंजीव काव्य या विषयावर ३ प्रवचने आयोजित करण्यात आली होती.

तसेच यावर्षी ''यांनी घडविला महाराष्ट्र'' या विषयांवर अधिकारी व्यक्तिंची व्याख्याने आयोजित केली होती.

क्रांतीकारक – श्री. निनाद बेडेकर

समाजसुधारक – डॉ. सदानंद मोरे

संतांचे कार्य – डॉ. यशवंत पाठक

याशिवाय डॉ. यशवंत पाठक, प्रमुख – ज्ञानदेव अध्यासन, पुणे विद्यापीठ, पुणे यांनी १) येणे वाग्यज्ञे तोषावे – श्री ज्ञानेश्वर महाराज २) एका जनार्दनी शरण – श्री एकनाथ महाराज ३) उत्कट भव्य तेचि घ्यावे – श्री समर्थ रामदास स्वामी या विषयांवर ३ दिवसांची प्रवचन माला गुंफली.

९) न्यास दरवर्षी खालील शिष्यवृत्या -पारितोषिके देत आहे –

१) हुशार व गरीब विद्यार्थीनीला उच्च शिक्षणासाठी रु. ५०००/– ची शिष्यवृत्ती कै. नलिनी विष्णू जोगळेकर यांचे नावाने, त्यांचे बंधु श्री. गजानन विष्णू जोगळेकर यांनी दिलेल्या देणगीतून देण्यांत येते.

२) श्रीमती मृणालिनी अशोक जोगळेकर यांनी त्यांचे पती कै. श्री. अशोक विष्णू जोगळेकर यांचे स्मरणार्थ दिलेल्या देणगीतून गुजरवाडी – निंबाळकरवाडी येथील एक विद्यार्थी व एक विद्यार्थीनीस प्रत्येकी रु. ७००/– ची शिष्यवृत्ती देण्यांत येते.

३) श्री. विष्णू काशिनाथ आठल्ये यांनी दिलेल्या देणगीतून शालांत परिक्षा, पुणे विभागांत संस्कृत व मराठी विषयांत प्रथम येणाऱ्या विद्यार्थ्यांना कै. श्री. काशिनाथ लक्ष्मण आठल्ये व कै. सौ. विजया काशिनाथ आठल्ये या नावांने पारितोषिके देण्यांत येतात.

१०) ओंकार न्यास गेली १० वर्षे गरीब मुले-मुली दत्तक घेत असून त्यांचा पालन-पोषण, शिक्षण इ. खर्च करत आहे. त्यांचे निवासासाठी गुजरवाडी – निंबाळकरवाडी येथे रु. ६,००,०००/– खर्च करून १६०० चौरस फूट इमारत बांधकाम केले आहे. सध्या ६ मुले-मुली दत्तक घेतली आहेत. त्यांच्या व वाडीतील मुलांच्या विकासासाठी खालील कार्यक्रम राबविले जातात.

दररोज २ तास इंग्रजी व हिंदीचा वर्ग घेतला जातो व त्यालाही मुलांची उपस्थिती चांगली असते आणि त्यांना त्याचा छान उपयोग होत आहे.

संस्कार वर्गात नेहमीच्या उपक्रमाशिवाय गीतापाठ चालू केला आहे. गीता शिकविण्यास कसबा पेठ, पुणे येथून श्री. किशोर वैद्य सर विना मानधन नियमीत येतात. त्यांनी स्वत: मुलांसाठी पुस्तके, सीडी इ. सर्व साहित्य आणले आहे. त्यांच्या सुलभ रीतीने शिकविण्याच्या पद्धतीमुळे मुलांना सुद्धा गीतापाठाची गोडी लागली आहे.

याशिवाय विश्वस्त श्रीमती मालती निमोणकर यांनी यावर्षी नवीन उपक्रम चालू केला आहे. वाडीतील इयत्ता १०वी मध्ये असणाऱ्या काही मुलींना घरी अडचणी असतात, अभ्यासाचे वातावरण नसते, मार्गदर्शन करणारे कोणी नसते. श्रीमती निमोणकर अशा मुलींना न्यासाच्या वाडीतील जागेत अभ्यासाला बोलावून त्यांचेकडून योग्य रीतीने अभ्यास करून घेतात, त्यांच्या अडचणी समजावून घेऊन त्यांना आर्थिक व मानसिक आधार देतात. खरेतर मुलींना मनापासून शिकायचे असते परंतु घरातील वातावरण, अडचणी इ. मुळे त्या नापास होतात व नंतर शिक्षण बंद होते ह्यावर मात करण्याच्या दृष्टीने श्रीमती निमोणकर हा प्रयत्न करत आहेत.

१२) ओंकार न्यास दरवर्षी कल्याणी विशेषांक वेगवेगळ्या संतांवर प्रकाशित करत असते. आतापावेतो न्यासाने एकूण १७ अंक प्रकाशित केले आहेत. त्यातील काही संतांची नांवे अशी – श्री ज्ञानेश्वर महाराज, श्री गुरुदेव रानडे, श्री टेंबे स्वामी, श्री स्वरुपानंद, पावस, श्री स्वामी चिन्मयानंद, श्री गोंदवलेकर महाराज, श्री समर्थ रामदास स्वामी इ. यापैकी कल्याणींच्या २००० साली प्रकाशित झालेल्या स्वामी श्री स्वरुपानंद विशेषांकास मराठी वृत्तपत्र लेखक संघाचा उत्कृष्ट आध्यात्मिक अंक म्हणून पांडुरंग भाटकर स्मृति पुरस्कार मिळाला आहे.

न्यासाने प्रकाशित केलेल्या सर्व कल्याणी विशेषांकास साधक / वाचक यांचेकडून फारच उत्तम प्रतिसाद मिळाला आहे. मागील कल्याणी विशेषांक एप्रिल २००८ मध्ये समर्थ रामदास स्वामी यांचेवर श्री. चंद्रशेखर महाराज आठवले (पंढरपूर) यांचे शुभहस्ते प्रकाशित करण्यांत आला असून पुढील कल्याणी विशेषांक आद्य श्री शंकराचार्य यांचेवर एप्रिल २००९ मध्ये प्रकाशित करण्यात येत आहे. तसेच समाजासाठी अतुलनीय कार्य केल्याबद्दल वसुंधरा पुरस्कार देण्यांत येणार आहे.

सुसंस्कृत समाज बनण्यासाठी बालांचे मन सुसंस्कृत होणे आवश्यक आहे. ट्रस्टच्या या कार्यात समाजातील विविध स्तरांतून सक्रिय पाठिंबा व सहभाग मिळत आहे.

आपण आमच्या कार्यास

१) देणगी रुपाने २) वस्तु रुपाने

३) न्यासात कार्यरुपाने भाग घेऊन

मदत करु शकता.



उज्ज्वल भवितव्यासाठी

# ओंकार ट्रस्ट

(स्थापना २६ जुलै १९९१)

'विसावा' अनिकेत सोसायटी नं. १,

बिबवेवाडी,

पुणे ४११ ०३७.

टेलिफोन क्रमांक : २४२१००४७

मुंबई सार्वजनिक विश्वस्त कायदा १९५० अन्वये

नोंदणीकृत संस्था नोंदणी क्रमांक -

ई १५०५ दिनांक १० ऑक्टोबर १९९१

कलम ८०ग खाली आयकर सवलत




ओंकार ट्रस्ट २००७ चा **"प. पू. गुरुदेव स्वामी चिन्मयानंद"** विशेषांक, संपादक सौ. रजनी गोपाळ काळे, ट्रस्टी यांनी प्रतिमा ऑफसेट, पुणे २९. येथे छापून, श्री. भालचंद्र वा. सातवळेकर, ट्रस्टी, यांनी 'विसावा' अनिकेत सोसायटी क्र. १, बिबवेवाडी, पुणे ४११ ०३७ येथे प्रकाशित केला.


टीप : (१) सदरचा विशेषांक **फक्त खाजगी वितरणासाठी** आहे.
(२) या अंकात प्रसिद्ध झालेल्या लेखनाशी संपादक सहमत असतीलच असे नाही.


**मुखपृष्ठ संकल्पना**

श्री. अभय व सौ. अंजली पुरंदरे

**प्रोसेसिंग**

**चित्रभारती प्रोसेसर**, सदाशिव पेठ, पुणे.

**अक्षरजुळणी**

प्रतिमा ऑफसेट, पुणे २९.

**छपाई**

प्रतिमा ऑफसेट, पुणे २९. फोन : २५४६०२१६

# वाटचाल २००६-२००७

श्रीसमर्थरामदास स्वामी व स्वामी विवेकानंद आदि थोर सत्पुरुषांच्या शिकवणी व तत्त्वज्ञानापासून प्रेरित होऊन **'ओंकार ट्रस्ट'** या संस्थेची स्थापना गुरुपौर्णिमा दि. २६ जुलै १९९१ रोजी करण्यात आली. संस्था सार्वजनिक न्यास म्हणून नोंदविण्यात आली आहे. (रजि. क्र. इ. १५०५ दि. १०-१०-१९९१)

**● संस्थेची मुख्य उद्दिष्टे ●**

१) संस्कार वर्ग व बालवाचनालय, २) दवाखाना व प्रसूतिगृह ३) अध्यात्मिक जनजागरण

ट्रस्टने गुजरवाडी-निंबाळकरवाडी येथे १ एकर जागा घेतली असून त्या ठिकाणी ऑपरेशन थिएटरसह ६ खाटांचे इस्पितळ **'राधाबाई हर्डीकर प्रसुतिगृह'** या नावाने सुरू करण्यात आले आहे. या ठिकाणी **दवाखाना** देखील चालू आहे. **डॉ. पारस शहा** यांचे नेतृत्वाखाली ८ **नेत्र चिकित्सा शिबीर** आयोजित केली असून गरजूंना मोफत चष्मे व औषधे देण्यात आली. दीनदयाळ हॉस्पिटल मार्फत एक **कॅन्सर चिकित्सा शिबीर** घेण्यात आले.

उत्कृष्ट, अतुलनीय सामाजिक कार्य करणाऱ्या व्यक्तीला किंवा संस्थेला १९९७ पासून दर वर्षी **"वसुंधरा पुरस्कार"** देण्यात येतो. मराठी-इंग्रजी हस्ताक्षर सुधार प्रकल्प गेले सहा वर्षे **श्री. नानासाहेब लाभे** यांच्या मार्गदर्शनाखाली ३५ शाळांतून राबविण्यात आला. ओंकार न्यासाने १ मुलगा व २ मुली दत्तक घेतली असून त्यांच्याबरोबर २ महिला गुजरवाडी-निंबाळकरवाडी येथे रहात आहेत. त्यांच्या रहाण्यासाठी रु. ६/- लाख खर्च करून १६०० स्क्वे. फुटांचे घर बांधण्यात आले.

कल्याणीच्या २००० साली प्रकाशित झालेल्या **स्वामी स्वरूपानंद विशेषांकाला** मराठी वृत्तपत्र लेखक संघाचा उत्कृष्ट अध्यात्मिक अंक म्हणून **पांडुरंग भाटकर स्मृति पुरस्कार** मिळाला. इंजिनिअरींग, मेडिकल किंवा आर्किटेक्टला प्रवेश घेणाऱ्या विद्यार्थीनीस **'कै. नलिनी विष्णू जोगळेकर'** या नावाची रु. ५०००/- ची **शिष्यवृत्ती** गेली ७ वर्षे देण्यात येत आहे.

**श्रीमती मृणालिनी अशोक जोगळेकर** यांनी आपले पती **कै. श्री. अशोक विष्णू जोगळेकर** यांच्या स्मरणार्थ दिलेल्या देणगीतून सुमती बालवन या शाळेतील एक मुलगा व एक मुलगी यांना दर वर्षी प्रत्येकी रु. ७००/- शिष्यवृत्ती देण्यात येत आहे.

कल्याणीच्या २००६ सालच्या प. पू. **श्रीधरस्वामी महाराज** विशेषांकाचे प्रकाशन **डॉ. श्री. गुरुनाथ महाराज कोटणीस** यांचे शुभहस्ते दिनांक १५ एप्रिल २००६ रोजी करण्यात आले.

याच वेळी कै. सौ. विजयाताई लवटे यांच्या **'मानव्य'** संस्थेला **'वसुंधरा कृतज्ञता पुरस्कारा'ने** सन्मानित करण्यात आले.

**ट्रस्टने राबविलेले काही उपक्रम पुढीलप्रमाणे :**

१. **श्री. ज्ञानेश पुरंदरे** यांचे **'अध्यात्म'** या विषयावर भाषण आयोजित करण्यात आले.

**श्री. शिरीष मोने** यांच्या सुश्राव्य **अभंग गायनाचा** कार्यक्रम आयोजित केला होता.

२. **डॉ. डेरे** यांच्या नेतृत्वाखाली **'मधुमेह शिबीर'** भरविण्यात आले होते. शिबिरात एकूण ६५ जणांची तपासणी करण्यात आली.

३. मांगडेवाडी येथे **चित्रकला स्पर्धा** आणि **निबंध स्पर्धा** आयोजित करण्यात आली होती. यात एकूण अनुक्रमे १२० आणि ८२ मुलांचा सहभाग होता.

४. ट्रस्टच्या मालकीच्या जागेत लहान मुलांसाठी **संस्कार वर्ग** चालविण्यात येत आहे. त्याशिवाय मांगडेवाडी, कर्वे स्त्री शिक्षण संस्था निवासी मुलींसाठी **संस्कार वर्ग** घेण्यात आला.

५. २४.१.२००७ श्रीमती कुलकर्णी यांचे जीवन व संगीत यावर प्रवचन. डी.एड. शिक्षणासाठी शिष्यवृत्ती. कर्वे स्त्री शिक्षण संस्थेद्वारा हिंदी माध्यमिक विद्यालय १० वी च्या विद्यार्थ्यांच्या निवासी मुलांसाठी मदत. स. म. सुनीलजी चिंचोलकर प्रवचन – स्वामी विवेकानंदांचा कर्मयोग.

६. ज्येष्ठ नागरिकांसाठी **अध्यात्मिक** विषयावर प्रवचने दिली जातात.

ओंकार न्यासाने प्रकाशित केलेल्या आतापर्यंतच्या विशेषांकास साधक / वाचक यांजकडून फारच उत्तम प्रतिसाद मिळाला आहे.

सुसंस्कृत समाज बनण्यासाठी बालांचे मन सुसंस्कृत होणे आवश्यक आहे. ट्रस्टच्या या कार्यात समाजातील विविध स्तरांतून सक्रिय पाठिंबा व सहभाग मिळत आहे.





# SWAMI TEJOMAYANANDA

ॐ

## संदेश

परमपूज्य श्री गुरुदेव स्वामी चिन्मयानंदांचे जीवन म्हणजे अलौकिक आध्यात्मिक शक्तीची, प्रेममय करुणेची, अविरत श्रमांची व अखंड सेवेची एक अमर गाथाच होय. त्यांच्या जीवनाचे मुख्य ध्येय एकच होते की, सर्व सामान्य जनांना त्यांच्यातील शाश्वत दिव्यत्वाची जाणीव करून देणे की ज्यायोगे त्यांचे जीवन सुखी, सफल, मंगलमय व परिपूर्ण होईल. ह्या ध्येयपूर्तीसाठी पूज्य गुरुदेवांनी उपनिषदे व श्रीमद् भगवद्गीतेचा प्रचार ज्ञानयज्ञाच्या माध्यमांतून प्रभावीपणे केला. आत्मोन्नतीसाठी अशा प्रकारचे विशेष कार्य इतक्या मोठ्या प्रमाणात सहसा कोणी केलेले आढळत नाही. पूज्य स्वामीजींनी हाती घेतलेले प्रत्येक कार्य उत्कट, भव्य व दिव्य होते. त्यांच्याविषयीं इतकेच म्हणता येईल की स्वामी चिन्मयानंदासारखे स्वामी चिन्मयानंदचं !

'कल्याणी' विशेषंकाद्वारे समाज प्रबोधनाचे कार्य संतांच्या मार्गदर्शनातून करण्याचा ॐकार ट्रस्टचा उद्देश अतिशय स्तुत्य आहे. गुरुदेव स्वामी चिन्मयानंदजीचा आदर्शवत् जीवन पट समस्त जनकल्याणासाठी उलगडून आम्हा चिन्मय प्रेमिकांचा आनंद आपण व्दिगुणीत केला आहे. गुरुदेवांच्या चरणीं ही भावसुमनांजली अर्पिल्याबद्दल आपले आभार व हार्दिक अभिनंदन !

**हरिः ॐ**

१२ मार्च २००७

प्रभु सेवेत,

तेजोमयानंद

CENTRAL CHINMAYA MISSION TRUST, SANDEEPANY SADHANALAYA, SAKI VIHAR ROAD, MUMBAI - 400 072. INDIA.
Tel.: 91-22-2857 2367, 2857 5806, 2857 2828 • Fax: 91-22-2857 3065 • E-mail: ccmt@vsnl.com • Website: www.chinmayamission.com






# Swami Purushottamananda

## संदेश

ॐ श्री चिन्मय सद्गुरुवे नमः ।

ओंकार ट्रस्ट पुणे या संस्थेद्वारा दरवर्षी संतांवरील विशेषांक प्रकाशित होत असतात. या वर्षी प. पू. श्रीगुरुदेव स्वामी चिन्मयानंद महाराजांचे दिव्य जीवनाबाबत आपल्या आंतरिक तळमळीने इच्छिल्यानुसार विशेषांक प्रकाशित होत आहे, हे समजून मला अतिशय आनंद झाला.

संतश्रेष्ठ ज्ञानेश्वर माऊलींच्या ज्ञानेश्वरीतील 'व्यासांचा मागोवा घेतु । भाष्यकारते वाट पुसतु ।' या वचनामृताप्रमाणे प. पू. श्री गुरूदेव स्वामी चिन्मयानंद महाराजांचे दिव्य चरित्र व भगवान विष्णुरूप व्यासांप्रमाणे विशाल दृष्टी अनुभवून, तत्त्वज्ञानानुरूप आधुनिक जगतात काळाची गरज लक्षात घेऊन प्रकटलेली त्यांची विश्वव्यापक दृष्टी (Vision) व कार्य (Mission) त्यांच्या तपश्चर्येची व सर्वात्म दृष्टीची ग्वाही देणारे आहे. आजच्या युगात भगवान शंकराचार्यांचे अवतार कार्यानुसार विशेषतः तरुणांना व इतर आबालवृद्धांना जीवन विकासात्मक प्रेरणा देणारे व स्वामी विवेकानंदांप्रमाणे जीवन जागृती करणारे श्रीगुरूदेवांचे चिन्मय मिशन हे जागतिक स्तरावरील कार्य आहे, यात शंका नाही.

ज्या 'युगपुरुषा'ने आधुनिक विज्ञानयुगात, वेदान्त तत्त्वज्ञान आजच्या विचारवंतांना पटेल अशा भाषेत, जाती, वर्ण, सांप्रदायादि भेद न बाळगता, अनुपम पद्धतीने स्पष्ट करून शिकविले, एवढेच नव्हे तर विशेषतः गीतेनुसार ब्राह्मी स्थितीचा साक्षात्कार करून घेऊन स्वतः 'ज्ञान - प्रेम व सेवामय जीवन' जगून, जागतिक हिंदु धर्माचे विचार, आचार व प्रचारकार्य भारतात व विदेशात मानवकल्याणार्थ 'जगाच्या कल्याणा संतांच्या विभूती' या संत वचनानुसार आजीवन केले. अशा प. पू. श्रीगुरुदेव स्वामी चिन्मयानन्द महाराजांबाबत या वर्षीचा 'कल्याणी' विशेषांक 'ओंकार' ट्रस्ट, पुणे द्वारा प्रकाशित केला जात आहे.

श्री गुरूदेवांनी हिमालयात उत्तरकाशी, गंगोत्री इत्यादी पवित्र क्षेत्री सद्गुरू स्वामी तपोवनजी महाराज यांच्या कृपेने ज्ञान संपादन करून, गंगामातेपासून प्रेरणा घेऊन ही ज्ञानगंगा जगत् कल्याणार्थ शहरातील जनतेमध्ये सर्व मानव हितकारक सनातन धर्म संस्कृतीबद्दल जागृती होण्याचे दृष्टीने मैदानात आणली व ३१ डिसेंबर १९५१ रोजी पुणे येथे १०० दिवसीय ज्ञानयज्ञाचा प्रारंभ करून 'चिन्मय कार्याचा श्रीगणेशा' केला. त्यानंतर ४२ वर्षे स्वतः (महासमाधी दिवसापर्यंत) अव्याहतपणे केवळ सर्वात्म प्रेमाने जगाच्या कल्याणार्थ 'लोकाः समस्ता सुखिनो भवन्तु' या सद्भावनेने परम करुणेने त्यांनी ज्ञान-सेवा कार्य केले. परिणामतः भारतात व विदेशात शेकडो अध्यात्मिक, शैक्षणिक व सामाजिक सेवा कार्य करणाऱ्या अनेक संस्था लोकांच्या सहकार्याने निर्माण झाल्या व चिन्मय मिशनच्या कार्याचा विस्तार त्याच्याच कृपेने जगभर झाला आहे. त्यांच्या कालानुरूप प्रभावी शास्त्रोक्त संयुक्तिक शिकवणीने असंख्य जिज्ञासु साधकांचे हृदय परिवर्तन होऊन जीवनाला पूर्णत्वाकडे नेऊन सार्थकता देणारी नवी दिशा लाभली आहे. चिन्मय परिवारातील अनेक क्रियाशील भक्त, शिष्य, सेवकांच्याद्वारे हे स्वाध्याय व सेवाकार्य ब्रह्मलीन श्रीगुरूदेवांच्या महासमाधीनंतरही प्रगतपणे सुरू आहे. विशेषतः श्रीगुरूदेवांनी पूर्वी संकल्पिलेल्या अनेक महान् योजना, आदरणीय स्वामी तेजोमयानंदजी (चिन्मय मिशनचे जागतिक प्रमुख) यांच्या सक्षम मार्गदर्शनाने व प्रोत्साहनाने यशस्वीपणे पूर्ण होऊन कार्यान्वित झालेल्या आहेत व होत आहेत, ही त्या 'चिरंतन गुरूं' चीच कृपा ।

गुरूतत्त्व व महिमा अगाध आहे. कोणत्याही भाषेत त्याबाबत वर्णन होऊ शकत नाही. 'गुरुः साक्षात् परब्रह्म तस्मै श्रीगुरवे नमः ।' तरीपण तेच ब्रह्म सगुण रूपाने वरील प्रमाणे अवतरले असता हसत, खेळत स्वलीलेने कार्य करताना बघितलेले स्मरणात आले की, हृदयात विलक्षण आनंद प्रकटतो. करूणेने सर्व प्राणिमात्रांच्या हितार्थ कार्य केलेल्या 'जनामाजी असोनी जगावेगळा' अशा महापुरुषाचे जीवन चरित्र इतर जिज्ञासूंना प्रेरणादायक होऊ शकते.

हा विशेषांक काढल्याबद्दल 'ओंकार ट्रस्ट' पुणे या संस्थेचे कार्यकर्ते तसेच त्यांना प्रस्तुत कार्यात सहाय्य करणारांचे मी हार्दिक अभिनंदन करतो. प्रस्तुत विशेषांकाचा जास्तीत जास्त जिज्ञासू व साधक आपले जीवन सफलच नव्हे तर सार्थक करण्याचे दृष्टीने लाभ घेवोत अशी श्रीसद्गुरूचरणी प्रार्थना करतो व 'काय वानू आता न पुरे ही वाणी । मस्तक चरणी ठेवितसे' ह्या संतवचनानुसार प्रणाम करतो.

*ॐ सर्वाधारं सर्व बुद्धिप्रकाशं*
*सर्वाकारं चिन्मयं प्रेमरूपम् ।*
*नित्यं शुद्धं निष्कलं निर्विकारं*
*पूर्णात्मानं सद्गुरुं तं नमामि ।*

ॐ जय गुरूदेव ।
ॐ जय जगदीश्वर । सर्वांना प्रेम, क्षेम व हरिः ॐ !

ॐ चिन्मयानंद
स्वामी पुरुषोत्तमानंद सरस्वती.

॥ श्रीहरि ॥

स्वामी गोविन्ददेव गिरि

(आचार्य किशोर व्यास)

समन्वय कुटीर,
सप्तसरोवर,
हरिद्वार (उत्तरांचल) - २४९४१०
दूरभाष : (०१३३४) २६०२५६, ३२६११०
फॅक्स : (०१३३४) २६०९८१

धर्मश्री,
सूर्यमुखी दत्तमंदिर के समीप,
पुणे विद्यापीठ मार्ग, पुणे ४११०१६
दूरभाष : (०२०) २५६५२५८९
फॅक्स : (०२०) २५६७२०६१


॥ श्रीः ॥

दिनांक १२.४.२००७

## स्वस्तिवाचन

सांदीपनि साधनालय व चिन्मय मिशनचे संस्थापक ब्रह्मलीन पूज्य स्वामी चिन्मयानंदजी यांच्या जीवन व कार्याचा परिचय करून देणारा 'कल्याणीचा' विशेषांक ओंकार ट्रस्टद्वारा प्रकाशित केला जात आहे हे कळून मनस्वी आनंद झाला.

पूज्य स्वामीजींचे जीवन म्हणजे सळसळत्या चैतन्याचा अखंड प्रवाह होय। भारतीय संस्कृतीचा ध्वज खांद्यावर घेऊन या आधुनिक परिव्राजकाने जो विश्वसंचार केला त्याला तोड नाही. त्यांचे हे भ्रमण जगभरात विखुरलेल्या हिंदूंना त्यांच्या प्राचीन योगवेदांत धर्माचा पुन्हा परिचय करून देण्यासाठी व त्यावर अभेद्य निष्ठा निर्माण करण्यासाठी होता. भारतीयेतर आधुनिक पाश्चिमात्यांनाही स्वामीजींच्या विलक्षण लालित्यपूर्ण इंग्रजी भाषेतील अमोघ वक्तृत्वामुळे वेदान्त व भारतीय संस्कृतीचा प्रभाव प्रकर्षाने जाणवला व प्रचंड संख्येत तेही भारतोन्मुख झाले.

पूज्य स्वामीजींनी केवळ आध्यात्मिक प्रवचने केली नाहीत. ते कुशल संघटक होते आणि चिन्मय मिशनचे जगभर पसरलेले जाळे हा त्यांच्या कर्तृत्वाचा परिपाक आहे. मला भावणारे त्यांचे सर्वात मोठे वैशिष्ट्य म्हणजे विश्व हिंदु परिषदेच्या संस्थापनेपासून हिंदू समाजाला जागृत, संघटित, सक्रिय व प्रखर बनविण्यासाठी त्यांनी केलेले मार्गदर्शन व कार्य होय.

या थोर महात्म्याच्या जीवन व कार्य परिचयाने नवीन पिढीला आधुनिक पद्धतीने वेदान्त अभ्यासण्याची आणि हिंदू समाजाची निरपेक्ष सेवा करण्याची प्रेरणा मिळेल याचा मला विश्वास वाटतो. ओंकार ट्रस्टच्या या समयोचित व गौरवपूर्ण प्रकाशनासाठी संचालिकांचे हार्दिक अभिनंदन व शुभकामना. इति।

प्रातःस्मरणीय स्वामीजींच्या पुण्यस्मृतीस प्रणाम।

शुभाकांक्षी,

स्वामीगोविंददेवगिरि

चैत्र व. १ युगाब्द ५१०९



# संपादकीय

गांगा पापं, शशी तापं, दैन्य कल्पतरुस्तथा ।
पापं, तापं च दैन्यंच् घ्नन्ती संत समगमः ॥

गंगा पाप, चंद्र ताप व कल्पतरू दैन्याचा नाश करतात. परंतु या तीनही गोष्टींचा नाश करण्याचे सामर्थ्य एकट्या संतसंगामध्ये आहे. जगामध्ये जेवढी आत्मोन्नतीची साधने आहेत त्यामध्ये संतसंगाला जास्त महत्त्व आहे. संग तसा रंग हा तर सृष्टीचा नियम आहे. म्हणून सुखशांतीची इच्छा असणारा माणूस सतसंग शोधत असतो. शान्त व समाधानी जीवन जगण्याची ओढ प्रत्येकाला जन्मापासून असते. तो त्याचा स्थायीभाव आहे. परंतु विकार वासनांची जळमटे त्याच्या स्वच्छ मनाला झाकाळून टाकतात. ही जळमटे झाडून टाकून मन आरशासारखे स्वच्छ करण्याचे काम संत मंडळी करीत असतात. आपल्या भारत खंडामध्ये अशा अनेक सत् पुरुषांनी काळाच्या गरजेनुसार वेगवेगळ्या संप्रदायामध्ये अवतार घेतले आहेत. आणि स्वतःच्या संप्रदायाच्या तत्त्वप्रणाली नुसार समाज प्रबोधनाचे कार्य केलेले आहे. त्यांचे वाङ्मय हे त्यांच्या तत्त्वप्रणालीतूनच निर्माण झालेले असते. प्रत्येक संप्रदायाची व ती आचरणात आणण्याची पद्धत या प्रथम दर्शनी जरी वेगवेगळ्या वाटत असल्या तरी त्या सर्वांचा उद्देश व अंतिम ध्येय एकच असते ते म्हणजे आत्मोन्नती होय.

'साधु दिसती वेगळाले, परी ते स्वरुपी मिळाले । अवघे मिळूनी जाहले देहातीत वस्तु ॥' या ओवीप्रमाणे ते त्यांच्या संपूर्ण जीवनभर आपापल्या पद्धतीनुसार समाजोद्धाराचे काम करीत असतात. म्हणूनच अनेक आघात व आक्रमणे झेलूनसुद्धा आजही आपली 'वैदिक' संस्कृती उच्चतम पातळीवर आहे. सत्संग सगळ्यांनाच घडेल असे नाही. म्हणून प्रत्यक्ष सहवास घडला नाही तरी त्यांच्या साहित्याद्वारे त्यांची तत्त्वे व शिकवण जनतेला समजू शकतात, हा दृष्टिकोन डोळ्यांसमोर ठेवून 'ओंकार' न्यास दरवर्षी एका सत् पुरुषाच्या साहित्याचे विविध पैलू 'कल्याणी' अंकाच्या माध्यमातून जनतेपुढे उलगडून दाखवित असतो.

विज्ञान युगाच्या २० व्या शतकातील अशा लोकोत्तर पुरुषांचा विचार केला असता त्यामध्ये 'गुरूदेव स्वामी चिन्मयानंदांचे' नाव अग्रक्रमाने नजरेसमोर येते. त्यामुळे या वर्षीचे साहित्य पुष्प 'गुरूदेव स्वामी चिन्मयानंदांचे चरणी समर्पित करून त्यांची शिकवण' कल्याणी अंकाच्या माध्यमातून सर्वसामान्य जनतेपुढे सादर केली आहे.

गुरूदेव स्वामी चिन्मयानंदांचा कालखंड १९१६ ते १९९३ असा आहे. स्वातंत्र्यपूर्व काळात सुशिक्षित भारतीयांच्या मनावर पाश्चिमात्त्य संस्कृतीचा जबरदस्त पगडा होता. तो इतका होता की आपला धर्म, आपली संस्कृती ते पूर्णपणे विसरून गेले होते. नास्तिकपणा बोकाळला होता. पर्यायाने भोगवाद व भौतिक सुख याला प्राधान्य दिले जात होते. भौतिक सुखेच आपल्याला आनंद देतील या भ्रामक समजुतीने अंतरिक सुख गमावलेल्या जनतेला सावध करण्याचे महान कार्य श्री स्वामीजींनी आपल्या 'ज्ञानयज्ञा' द्वारे अविरतपणे केले.

श्री स्वामीजींनी पूज्य शिवानंदजी व सद्गुरू तपोवन महाराज यांच्या मार्गदर्शनाखाली सखोल अध्ययन करून चिंतनपूर्वक आत्मज्ञान संपादन करून त्यांच्याच कृपेने गंगामातेपासून ज्ञान प्रसाराचा घेतलेला वसा 'ज्ञानयज्ञा'द्वारे अखंडपणे चालू ठेवला. त्यांच्या 'ज्ञानयज्ञातून' त्यांनी सुशिक्षित भारतीयांना निश्चितपणेच अंतर्मुख बनवले व खऱ्या सुखाचा शोध घेण्यासाठी प्रवृत्त केले, यामध्ये तीळमात्र शंका नाही. म्हणूनच आज जगभर 'चिन्मय मिशन'ने चालवलेले कार्य आपल्याला प्रभावित करते.

'जास्तीतजास्त लोकांना जास्तीतजास्त वेळ जास्तीतजास्त आनंद देणे हा आपला धर्म आहे' हे ब्रीद वाक्य असणाऱ्या या महान तेजस्वी पुण्य पुरुषाच्या चरणी कल्याणीचे हे १६ वे साहित्य पुष्प अर्पण करताना 'ओंकार' न्यासाला अतिशय आनंद होत आहे.

आमच्या अंकाचा दर्जा उंचावणाऱ्या विचारवंत साधक लेखकांच्या सहाय्याशिवाय आम्ही दर्जेदार अंक काढू शकत नाही, याची आम्हाला पूर्ण जाणीव आहे. त्यांचे ऋण आम्ही फेडू शकणार नाही. तरीपण औपचारिक शिष्टाचार म्हणून आम्ही त्यांचे आभार मानीत आहोत. त्याचप्रमाणे अंक काढण्यासाठी आर्थिक सहाय्य करणाऱ्या जाहिरातदारांचे पण आम्ही ऋणी आहोत. तसेच 'चिन्मय मिशन'च्या साधक कार्यकर्त्यांनी आम्हाला अंक काढण्यासाठी सर्वतोपरी सहाय्य केले व त्यामुळे वेळेवर आणि चांगला अंक आम्ही काढू शकलो हे निश्चित आहे. त्यांचे पण आम्ही सदैव ऋणी राहू. त्या सर्वांचे आभार मानणे हे आमचे कर्तव्यच आहे.

॥ जय जय रघुवीर समर्थ ॥

— सौ. रजनी काळे

# अनुक्रमणिका



## आठवणी



## कविता

## ॥ ॐ नमो भगवते वासुदेवाय ॥

वसुदेवसुतं देवं कंसचाणूरमर्दनम्। देवकीपरमानंदं कृष्णं वन्दे जगद्गुरुम्॥




भगवान श्रीकृष्ण नामजप सुदर्शन यंत्र

संकल्पना, निर्मिती व हस्ताक्षर

वसंत गोडबोले

१२५, शनिवार पेठ (नेनेघाट), पुणे- ४११०३०

ॐ चिन्मय सद्‌गुरवे नमः ।।



" प.पू. स्वामी चिन्मयानंद नामजप सुदर्शन यंत्र "

संकल्पना, निर्मिती व हस्ताक्षर

वसंत गोडबोले

२२४, शनिवार पेठ (नेनेघाट), पुणे-४११०३०



## CHINMAYA MISSION

PLEDGE

We stand as one family,
bound to each other with love and respect.

We serve as an army
courageous and disciplined,
ever ready to fight against
all low tendencies and false values,
within and without us.

We live honestly,
the noble life of sacrifice and service,
producing more than what we consume,
and giving more than what we take.

We seek the Lord's grace,
to keep us on the path of
virtue courage and wisdom

May Thy Grace and Blessings,
flow through us to the world around us

We belive that the services of our Country,
is the service of the Lord of Lords
and devotion to the people,
is the devoition of the Supreme Self.

We know our responsibilities,
Give us the ability and courage to fulfil them

**OM TAT SAT !**



## CHINMAYA MISSION

# चिन्मय मिशन प्रतिज्ञा

(मराठी अनुवाद)

एकची आम्ही कुटुंबातले । प्रेमादराने दृढ बांधलेले ॥

सेनाच अमुची जणु शिस्तबद्ध । लढण्यास शौर्य केव्हाही सिद्ध ॥

मूल्ये दिखाऊ प्रवृत्ति हीन । झगडू तयांशी आम्ही रात्रंदिन ॥

परित्यागी सेवामय हे जीवित । जगतो इमाने आम्ही कृतार्थ ॥

घेऊ तयाहुनि अधिकांश देऊ । ग्रहणाहुनि जास्त निर्मित जाऊ॥

हो प्राप्त करुणा भजता प्रभुसि । सन्मार्ग लाभो तेणे आम्हासी॥

बाढीस लाभो ते आचरिता । धारिष्ट्य, सद्गुण अन् बुद्धिमत्ता ॥

'स्वराष्ट्र सेवा ती ईशसेवा' । मनी बाळगितो दृढ याची भावा ॥

प्रेमे करू जी सेवा जनाची । भक्तीच होते नारायणाची ॥

सिद्धीस नेण्या स्वकार्ये अखंड । दे धैर्य, सामर्थ्य सेवा उदंड ॥

॥ ॐ तत्सत् ॥

चिन्मय मिशन प्रतिज्ञा याचे विवरण कृपया पान क्र. १७ वर पहावे

[redacted]



Swami Chinmayananda

Sidhabari
8 Aug 1992

Ratnaparkhi,
C/o Naidu,
A-16 Rustom Colony,
Chinchwada,
Pune 411033.

Hariom! Salutations!

Your sweet-note on behalf of your friends and devotees there. Naidu and Rao must have received by now. I hope my 1993 itinerary is possible and practical.

Learn to live life a practical-[illegible], but in a [illegible] Receive everything, [illegible] short time let it all [illegible] clean and make your mind a pure Self for contemplation.

Love
[illegible]
Chinmaya





## वंदनीय कै. गोपाळ काकांच्या स्मृतीस
## भावपूर्ण श्रद्धांजली

जुन्या जाणत्या आधारातिल अध्वर्यु आपण !
हर्ष व्हायचा द्विगुणित अपुल्या आगत्यामधुन !
राजसदन जणु 'मल्हारां'तील रसिक दाद आपुली,
'अनभिषिक्त सम्राट'च आपण ! भूषण अपुल्या कुली ! ॥१॥

स्वबल केवढे ! कशी नमविली अस्मानी सुलतानी -
स्वयंशासने वळवुन लक्ष्मी, सरस्वती-पूजनी !
गुणवंतांचे पाठीराखे ! लेखातज्ज्ञ निपुण !
द्रोणाचार्यच अर्थकारणी घडवियले अर्जुन ! ॥२॥

कुटुंबवत्सल ! नातीगोती सुरम्य इंद्रधनु -
तुमच्या भवती बागडले नित 'यशोधन' नि 'तनु'
सर्जूसुद्धा 'बडा' लाडका ! थाकहि प्रिय तुमचा -
असा दरारा सहस्त्रांमधि क्वचितचि एकाचा ॥३॥

लोकसंग्रहा नाही गणती, स्मृति कुठल्या कुठल्या
'ज्ञानकोश चालता बोलता' सहवासच अपुला !
अपुले माणुस कधी न होते अनंतात विलिन,
अगणित स्मरणें ! बंध रेशमी ! होत हृदी जतन ॥४॥

हात पाठिशी बांधुन वावर नाही आज वास्तूत
जाग तरीही किती बोलकी वस्तू - वस्तूत
यशोध्वजा विश्वास - गिरीश अन् स्नुषा सुसंस्कारी -
रजनी भार्या, वहिनीं उज्ज्वला उत्तराधिकारी !! ॥५॥

विनम्र वंदन कृतज्ञ आम्ही सारे स्नेहांकित
श्रद्धांजलि नच मानसपूजा तवस्मरणी अर्पित !!

शब्दांकन : सौ. शैला सुहास पटवर्धन
श्री. सुहास गणेश पटवर्धन आणि पटवर्धन परिवारातर्फे

**ओंकार न्यासाच्या स्थापनेपासूनचे आधारस्तंभ व न्यासाच्या वाढीसाठी व प्रगतीसाठी अविरत कार्यरत असलेले निष्काम कर्मयोगी श्री. गोपाळराव काळे उर्फ काळे काका यांचे दि. २ सप्टेंबर २००६ रोजी दु:खद निधन झाले.**

**न्यासाचे खजिनदार या नात्याने त्यांनी आर्थिक व्यवहार अतिशय चोख ठेवले होते. आमच्या न्यासाचे ते एक नि:स्पृह हितचिंतक व तळमळीचे कार्यकर्ते होते.**

**आम्ही सर्वजण त्यांच्या पवित्र स्मृतीस विनम्र अभिवादन करून त्यांना ही श्रद्धांजली अर्पण करीत आहोत.**

# चिन्मयानंद - आ

**स्वामी तेजोमयानंदजी**

स्वामी तेजोमयानंदांच्या सत्संगात एका गृहस्थाने 'गुरुदेवांच्या काही आठवणी सांगा' असा खूप आग्रह धरला. आणि स्वामीजींनी सांगायला सुरुवात केली.

'गुरुदेवांची उत्कृष्टता नेमकी कशात होती' असं कुणी मला विचारलं तर मी काय सांगू ? त्यांचे निकटचे अस्तित्त्वही भारावून टाकणारे होते. त्यांचे अस्तित्त्व शब्दाहून बोलके होते आणि त्यांच्या प्रवचनापेक्षाही अधिक काही शिकवून जाणारे होते. मला तर त्यांच्या छायाचित्रातही त्यांचे अस्तित्त्व जाणवते. 'नुसते त्यांच्या सान्निध्यात राहणे' ह्याचाच आनंद खूप सुखदायक असायचा. त्या सुखाची अनुभूती विलक्षणच होती. मला त्यांच्याबरोबर जेवायला बसायला आवडायचे आणि अशी संधी मला खूप वेळा मिळालीही. भिक्षेच्या ठिकाणी त्यांची वृत्ती मोकळी असे. त्यामुळे खूप थट्टा मस्करी चालत असे. एकदा आम्हाला एका राजस्थानी घरात जेवायला बोलावले होते. गुरूदेवांना इडली फार आवडते असं त्या यजमानानी ऐकलं होतं. तो पदार्थ राजस्थानी नसल्याने त्यांच्या घरी नीट बनवता येणे अपेक्षित नव्हते. त्यामुळे ती बनवलेली इडली स्वामीजींना जरा चमत्कारिक दिसली. तेव्हा मला हळूच म्हणाले, 'आता पाहत राहा पानाकडे ! आता इडलीची व्यंगाकृती येत आहे, ती बघ !'

प्रत्येक लहानसहान गोष्टीत गुरूदेवांचे माहात्म्य लक्षात येत असे. एकदा मुंबईच्या सांदीपनी साधनालयात मी विद्यार्थ्यांना संस्कृत शिकवत होतो. एका लहानशा खोलीत हा वर्ग भरत असे. स्वामीजींना एकदा काही थोड्या मंडळींच्याबरोबर चर्चा करावयाची होती. म्हणून ते या लहान खोलीकडे आले. माझा वर्ग तिथे चालू आहे असं पाहताच म्हणाले, 'थोडा वेळ मी ही खोली वापरू शकतो का ?' खरं तर 'वर्ग बंद करा, मला इथे काही काम करायचे आहे.' अशी मला आज्ञा करण्याचा त्यांना पूर्ण अधिकार होता. पण ते तसं करत नसत, हाच त्यांचा मोठेपणा ! हीच त्यांची थोरवी !

गुरूदेवांसारख्या पूर्ण अधिकारी व्यक्तीकडून मला वेदांत शिक्षण घेण्याचा लाभ मिळाला ही केवळी भाग्याची गोष्ट ! बऱ्याचवेळी ते मला उत्तर काशीला आपल्याबरोबर नेत असत. मुंबईतील सांदीपनीसारखे तिथे नेहमीसारखे वर्ग नसत. परंतु तरीही विवेकचूडामणी व श्रीमद्‌भगवत गीता शिकवायला घेतलीच होती. चिन्मय मिशनचे इतरही सभासद भक्त मधून मधून येत जात असत. मी मात्र एकदा तिथे बरेच दिवस स्थायिक होतो आणि गुरूदेव शिकवित असताना एकदम पुढे बसत असे. त्यामुळे गुरूदेव मला एकट्यालाच शिकवित आहेत असे मला वाटत असे. घडोघडी प्रश्न विचारीत असत आणि उत्तर झटकन दिले नाही किंवा बरोबर दिले नाही की लगेच म्हणत, 'तुला उत्तर माहितच नसावं. वर्गात झोपा काढीत होतास का ?' मला जागरूक ठेवण्याकरता एखादे वाक्य अर्धवट बोलून मला पुढचे पुरे करायला सांगत आणि उत्तर जर अगदी हळू आवाजात दिले तरी सांगत की 'गंगेवर जा, आणि दुसऱ्या काठावरील माणसाला ऐकू जाईल इतक्या मोठ्याने बोल.' (ठासून व स्पष्ट बोलले पाहिजे असा कटाक्ष होता.)

स्वामीजी शिस्तीचे फारच भोक्ते होते. ते स्वत: ती पाळीत आणि दुसऱ्यांनीही पाळली पाहिजे असा आग्रह होता. एकदा गीताज्ञानयज्ञाचे वेळी त्यांच्या ध्यानवर्गाला बरेचसे ब्रह्मचारी (विद्यार्थी) आले नव्हते. तर लगेच आज्ञा केली, 'ब्रह्मचाऱ्यांना आज जेवण दिले जाणार नाही. झालं ! संध्याकाळपर्यंत आम्ही उपाशी ! संध्याकाळी मात्र चहा मिळाला आणि तोही गरमागरम उपम्याबरोबर ! एरवी चहाबरोबर काही खाणे नसे. मधून मधून शिस्तीचे असे धडे असत, पण केवढ्या करुणेने भरलेले ! असे होते त्यांच्या शिस्तीचे सौंदर्य !'

मुंबईतील सांदीपनी आश्रमात मी पहिल्यांदा रहायला गेलो तेव्हा गुरूदेवांची प्रकृती बरी नव्हती. स्वामीजी एवढे आजारी होते की कुटियात निजून असत. असेच दहा बारा दिवस गेले. दोन भक्त त्यांची सेवा करत असत. पण व्यक्तिगत अडचणींमुळे त्यांना सेवा करणे शक्य नव्हते व मला त्यांच्या जागी नेमण्यात आले. अहो भाग्यम्‌ ! स्वामीजींकडे मी गेलो तेव्हा माझी ओळख 'नवा सेवेकरी' अशी करून देण्यात आली. रोज त्यांची कुटिया झाडण्याचे काम होते. शिवाय त्यांना वेळेवर आठवणीने औषधे द्यायची, त्यांना दिवसभर काय हवं, नको बघायचं आणि रात्री तिथेच जवळपास झोपायचं ! स्टोअरचा व्यवस्थापक मला सोडवायला सकाळी थोडा वेळ येत असे. तेवढ्या वेळात मी अंघोळ वगैरे आन्हिक उरकून येत असे. अगदी पहिल्यांदा मी खोलीत भेटायला गेलो तेव्हा म्हणाले, 'इथे मला खरंच कुणाची गरज नाही आहे. पण सगळे खूप आग्रह धरीत आहेत, तर तू इथे झोपू शकतोस' पहिल्या रात्री मी खाली जमिनीवर अंथरूण घालून झोपलो. नीट शांत झोप लागली नाही. कारण सतत काळजी होती. पहाटे ३.३० वाजता 'ॐ' च्या जपाने मी दचकून जागा झालो. झटकन अंथरुणातून उठलो, झाडझूड सुरू केली. कोठार व्यवस्थापक आल्यावर तिथून बाहेर पडलो. माझ्या खोलीवर गेलो, अंघोळ केली आणि तिथेच पुन्हा खूप झोप लागली. जागा झाल्यावर जरा अपराधी भावनेनेच कुटियात गेलो. गुरूदेव काहीही बोलले नाहीत. हायसे वाटले. त्यानंतर मी अशी चूक कधीही केली नाही. ४.३० वाजता उठून सर्व कामे करीत असे.

जरा प्रकृती बरी झाल्यानंतर गुरूदेव संध्याकाळी शहरात जात असत आणि परत यायला नेहमीच रात्रीचे ११ वाजून जायचे. कधी कधी आणखीही उशीर व्हायचा व दिवसाही विश्रांती मिळत नसे. सारखी माणसे भेटायला यायची, त्यामुळे गुरूदेवांशी बोलायला मला कधीच संधी मिळत नसे. गुरूदेव आता लवकरच बाहेरगावी जाणार असे कानांवर आले. गुरूदेवांशी बोलायचे मनात ठरवले होते ते आता लवकरच करायला हवे होते. नाहीतर त्यांच्याशी बोलण्याची माझी संधी हुकलीच असती. पण बोलायचे म्हणजे काय बोलायचे, कसे

बोलायचे, काही सुचत नव्हते. एक दिवस अगदी सर्व धैर्य एकवटून गुरूदेवांशी बोलायचे ठरवले. त्या रात्री भेटायला आलेली सर्व माणसे खोलीबाहेर गेली व ते आपल्या झोपायच्या खोलीत निघाले, तेव्हा मी हळूच हाक मारली, "स्वामीजी!" "ओ, काय रे ?" 'मला एक प्रश्न विचारायचा आहे', 'विचार ना ?' आत जाता जाता दरवाज्याशी थांबून म्हणाले. खरं विचाराल तर माझ्याकडे एकही प्रश्न नव्हता. मला फक्त त्यांच्याशी बोलायचं होतं. संधी हवी होती. मी काहीतरी बोलायचे म्हणून विचारलं, 'वेदांतामध्ये अज्ञानाचे नेमके स्थान काय आहे ?' स्वामीजींनी अगदी थोडक्यात, हलक्या आवाजात उत्तर दिले आणि पुढे म्हणाले, 'पण तू आताच या प्रश्नांची काळजी करू नकोस. ब्रह्मचारी कोर्समध्ये सर्व तू शिकशीलच आणि शिकता शिकता तुझ्या सर्व प्रश्नांची उत्तरे मिळून जातील.' संभाषण पुढे चालू ठेवावे म्हणून मी पुन्हा विचारलं, 'मला आणखीन विचारायचं होतं की ब्रह्मचारी वेदांत कोर्स कधीपासून सुरू होतो आहे ?' स्वामीजी म्हणाले, 'थोड्या दिवसांनंतर मी स्वित्झर्लंडला जातो आहे. मुंबईला परत आल्यावर मी उत्तरकाशीला जाणार आहे. उत्तरकाशीला तू माझ्याबरोबर चल ना ? तिथे राहून माझी प्रकृती थोडी सुधारल्यावर मगच कोर्सचा विचार करता येईल.' एवढं तरी बोलायला मिळाले म्हणून खूप आनंद झाला. रात्री आनंदात छान झोप लागली आणि त्या दिवसापासून उत्तरकाशीला कधी एकदा जातो अशी उत्सुकतेने वाट पाहात राहिलो.

स्वामीजी स्वित्झर्लंडहून परत आले. दोनचार दिवस वाट पाहात होतो की स्वामीजी उत्तरकाशीला जाण्याविषयी मला काहीतरी सांगतील. कशाचा काही पत्ता नाही. मी उदास झालो आणि काळजीत पडलो. मला कळेना की, आता काय करावं ! मग मी आश्रम मॅनेजरच्या पत्नीकडे गेलो. तेव्हा त्या गुरूदेवांच्या कुटियाकडे त्यांना जेवण देण्याकरता निघाल्या होत्या. मी त्यांना अगदी आर्जवाने म्हटलं, 'अम्मा, माझे एक काम करा ना ? गुरूदेवांना कृपा करून विचाराना ? 'उत्तरकाशीला माझ्याबरोबर ये' असं पूर्वी म्हणाले होते त्याचं काय झालं म्हणून ?' अम्मानी त्या दिवशीच रात्रीच विचारलं, तेव्हा मी तिथंच होतो. अम्मा म्हणाल्या, 'स्वामीजी, या ब्रह्मचाऱ्याला उत्तरकाशीला नेणार होतात ना ?' स्वामीजी लगेच माझ्याकडे पाहून अगदी व्यावहारिक तटस्थेने म्हणाले, 'तू ये, तू ये माझ्याबरोबर' आणि हा होकार ऐकून मी निःश्वास टाकला. जायच्या दिवशी आपली दोन ब्लँकेट्स मला दिली आणि म्हणाले, 'हे बरोबर घे, तिकडे फार थंडी असते' एकदम त्यांच्यातले पिताजी जाणवले.

ब्रह्मचारी कोर्स पूर्ण झाल्यानंतर मी प्रवचनकार म्हणून गावोगावी फिरू लागलो. माझे लहान वय व हा असला पेशा पत्करलेला पाहून अनेक तरुण मोठ्या कुतूहलाने व सहानुभूतीने मला विचारीत, 'तुला हे शिकण्याची प्रेरणा कुणी दिली ? कोणते आकर्षण होते ?' तेवढ्याच शांतपणे मी उत्तर दिलं, 'मित्रांनो, केनोपनिषद् या पवित्र ग्रंथाने माझ्या शिक्षणाला सुरुवात केली आणि त्यानीच मला अध्यात्मिक ज्ञान घेण्याची स्फूर्ती मिळाली आणि उत्साह वाढवला. 'केन' या शब्दाचा अर्थच मुळी कुणाकडून किंवा कशाकरता असा आहे. हे प्रश्न म्हणजे मासे पकडताना गळाला लावलेले आमिष आहे. स्वामी चिन्मयानंद आहेत ना ? ते स्वर्गीय स्थानावर आपला दैवी गळ टाकून बसलेले आहेत. त्यांचा गळ कुरतडताना त्यांनी मला पाहिले मात्र, लगेच त्यांनी मला ह्या विषयसुखाच्या मलकुंडातून बाहेर खेचले आणि आपल्या सांदीपनी साधनालय नावाच्या जलाशयात आणून सोडले. हे साधनालय म्हणजे ज्ञानपीठच आहे. 'संसारसागरात कसे पोहावे' ह्याचे त्यांनी मला शिक्षण देऊन तयार केले. जेव्हा जेव्हा मला मी बुडतो आहे अशी भावना होते तेव्हा तेव्हा मी त्यांचे पाय घट्ट पकडतो आणि ते मला प्रेमाने धीर आणि उत्साह देतात आणि पुढे जाण्याची प्रेरणा देतात. हे सर्व गुरूदेवांचेच अलौकिक वैभव ! गुरूदेवांची नुसती आठवण झाली तरी त्याक्षणीच उत्साह, स्फूर्ती, आनंद या गोष्टींनी हृदय ओसंडून जाते. त्यांच्याबद्दलच्या आदराने व प्रेमाने गहिवर येतो.

त्यानंतर गुरूदेवांनी मला सिद्धबारी आश्रमाचे व त्यानंतर मुंबई येथील सांदीपनी साधनालयाचे आचार्यपद दिले. त्यामुळे अनेक विद्यार्थ्यांना आपण घेतलेले ज्ञान देण्याची मला संधी मिळाली.

१९८९ ते १९९३ पर्यंत अमेरिकेसारख्या परक्या देशात काम करण्याचे भाग्य मला गुरूकृपेने मिळाले. जेव्हा जेव्हा गुरूदेव उत्तर अमेरिकेत निरनिराळ्या ठिकाणी साधना शिबिरे घेत, प्रवास करीत असत, तेव्हा तेव्हा मी त्यांच्याबरोबर असे. वॉशिंग्टन डी. सी. मध्ये १९९३ जुलैमध्ये जे त्यांनी निवासी शिबीर घेतले ते दुर्दैवाने शेवटचे ठरले. त्या शिबीराच्या शेवटच्या दिवशी ते मला म्हणाले, 'यानंतर आता तुला मुंबईला जावे लागेल व तेथील चिन्मय मिशनचे (Central Chinmaya Mission Trust, Bombay) काम हाती घ्यावे लागेल. तुला चिन्मय मिशनच्या प्रत्येक केंद्राला भेट द्यावी लागेल. तेथील सर्व अडचणी, प्रश्न, वाद तुला सोडवावे लागतील. पण काळजी करू नकोस. ईश्वरी इच्छेने हे सर्व घडत असते आणि तोच ते सर्व निभावून नेईल.' आता दैनंदिन कार्यात जेव्हा अत्यंत बिकट अडचणी येतात, तेव्हा तेव्हा धीर देणारे ते शब्द आठवतात, आणि मी काळजी न करता शांत राहतो.

गुरूदेवांच्या छत्राखाली कशाची काळजी ?



# …यानंद - भगवद्गीते…

स्वामी पुरुषोत्तमानंद

(पू. स्वामी पुरुषोत्तमानंद हे गुरूदेव स्वामी चिन्मयानंदांचे ज्येष्ठ विद्यार्थी, चिन्मय मिशनच्या गोवा, महाराष्ट्र, गुजरात या विभागांचे प्रमुख. चिन्मय मिशनच्या प्रचार कार्याचा व्याप जन्मभर अखंड, अविरत करीत आहेत. गेले २५ वर्षे सतत देशोदेशी प्रचारकार्याकरिता अखंड फिरत आहेत. हिंदी, इंग्रजी, मराठी तिन्ही भाषांमधून प्रचार कार्य सुरू आहे. चिन्मय मिशनचे नाव महाराष्ट्रात सर्वत्र पोहोचविण्याचे बहुतांश श्रेय स्वामीजींचेच आहे. गुरूदेवांचा खूप वर्षांचा सहवास व भक्ती यामुळे त्यांनी गुरूदेवांचे अनेक गुण आत्मसात केले आहेत. साधेपणा, प्रेमळपणा, निरभिमानता, ध्येयावरची निष्ठा व त्याकरिता सतत प्रयत्न या गुणांमुळे त्यांचे अनेक भक्त सर्वत्र आहेत. चिन्मय मिशनचे मराठीतून प्रचारक तयार करण्याकरता महाराष्ट्रात कोल्हापूरजवळ संभापूर येथे महाराष्ट्र सांदीपनी आश्रम स्थापन करण्याचे मोठे कार्य स्वामीजींनी केले आहे.) स्वामीजी सांगतात ह्र

गुरूदेव स्वामी चिन्मयानंद यांच्या आणि माझ्या संबंधाबद्दल सांगायचे असेल तर मुंबई येथील सांदीपनी साधनालयात मी वेदांताचा विद्यार्थी होतो, तितकी वर्षे मागे जावे लागेल. मी मुंबईला जाण्याचे आधीही थोडी अध्यात्मिक साधना करीत होतो, ज्ञानेश्वरी नित्य पठणात होती. भावी जीवनावर खूप चिंतन करीत होतो. जीवन, मृत्यूच्या कोड्याबद्दल मनात खूप शंका होत्या. विचारांचा अगदी गोंधळ होता म्हटलंत तरी चालेल. आश्रमात मी गुरूदेवांना प्रथम भेटलो त्याआधी त्यांनी लिहिलेले (Hinduism at a glance) 'एका दृष्टिक्षेपात हिंदुत्व' हे पुस्तक मी वाचले. खूप तर्कशुद्ध रीतीने, उत्तम सोप्या भाषेत लिहिलेले ते पुस्तक मला आवडले. मी तेव्हा चांगल्या गुरूच्या शोधात होतोच, म्हणून मी त्यांना भेटण्याचे ठरवले. मराठी वातावरणात वाढलेला मी, तेव्हा बराच भावूक होतो. गुरूदेवांच्या समोर जायला थोडासा घाबरतच होतो. मी त्यांना भेटलो. येण्याचा हेतु सांगितला, तेव्हा त्यांनी माझ्याकडे फक्त पाहिले आणि म्हणाले, 'तू जर मला नीट निरखलस तर मी तुझ्याकडे लक्ष्य देईन. नंतर तू जर व्यवस्थित असलास तरच मी आश्रमात राहण्याची परवानगी देईन.'

मी घरी जाऊन परत आलो, तेव्हा माझ्या लक्षात आलं की, गुरूदेवांनी विद्यार्थ्यांना शिकवण्याकरता एक उपनिषद निवडले आहे. मी नवीन असल्याने सहजच त्यांच्याकडे जाऊन एखाद्या मित्राच्या सलगीने विचारले, 'स्वामीजी, आपण कोणते पुस्तक वाचीत आहात ?' लगेच स्वामीजी म्हणाले, 'असं एकदम विचारू नये. इतर विद्यार्थी प्रश्न कसा विचारतात ते नीट लक्ष देऊन पहा आणि मग विचार.' तिथून पुढे मी धडा घेतला व असले हलके फुलके, फालतू प्रश्न त्यांना कधी विचारले नाहीत.

आश्रमात राहायला लागल्यानंतर तिथला तो पद्धतशीरपणा मला खूप आवडला. कुठेही गलथानपणा नाही. अभ्यासक्रमही पूर्ण व्यवस्थित आखलेला, क्रमाक्रमाने पुढे नेणारा आणि गुरूदेवांची कोणत्याही विषयाची ती तर्कशुद्ध मांडणी ! इतर ठिकाणी गुरू नुसते येतात, शिकवतात आणि जातात. पण इथे आम्हाला नुसते शिकवले जात नव्हते, तर ज्ञान आमच्यात उतरवण्यात येत होते. आमच्या आश्रमात गुरू व विद्यार्थी यांचे नातेही निराळेच होते. विषयावरच चिंतन करायला व त्याप्रमाणे आचरण करायला शिकवले जाई. त्यामुळे माझ्या बऱ्याचशा शंकांचे निरसन माझे मलाच करता येऊ लागले. गुरूदेवांच्या आचरणावरून मला कळले की संन्यासी होणे म्हणजे नुसते कपडे बदलून काहीही न करता बसणे नव्हे, तर संन्यासी हा पूर्ण विकसित माणूस असतो. संन्याशाचा अकर्तेपणा कसा असतो हे त्यांच्या आयुष्याने मला शिकवले. भगवंत गीतेत म्हणतात, 'कर्ता असून मी अकर्मी आहे' आणि गुरूदेवही तसेच राहतात. चिन्मय मिशनचा प्रचंड व्याप अविरत चाललेला असतो. त्यांचा तो संसारच आहे. तरीही ते त्यापासून अलिप्त असतात. ह्या अलिप्तपणामुळेच प्रत्येक भेटणाऱ्या माणसावर ते प्रेमाचा वर्षाव करतात. कधी रागावले तरी तेवढ्यापुरतेच. ते रागाच्या आहारी कधी जात नाहीत. हळूहळू ऋषिज्ञान जसजसे मला कळू लागले, तसतसा गुरूदेवांच्याबद्दलचा आदर व पूज्यभाव वाढतच गेला. त्यांच्या शिकवण्याने मी योग्य दिशेने विचार करायला शिकलो.

पूज्य स्वामी चिन्मयानंदांच्या व्यक्तिमत्त्वाचे वर्णनच करायचे तर त्यांना फक्त 'प्रेमगंगा' येवढं म्हटलं तरी पुरे. त्यांच्या हृदयातून वाहणाऱ्या मातृप्रेमाची झुळूक एवढी शीतल असते की, बाहेरच्या रखरखीची मुळी जाणीवच होत नाही. त्याचा अनुभव मीच नव्हे तर त्यांच्या सहवासात आलेल्या अनेकांनी घेतला आहे. गुरूदेव हे अगदी आदर्श गुरू होते. आईचे निरपेक्ष प्रेम आणि पित्याची कडक शिस्त यांचा त्यांच्या ठिकाणी सुंदर मिलाप होता. अभ्यासाच्या बाबतीत विद्यार्थ्यांचा ते यथायोग्य समाचार घेत असत. कुणालाही सोडत नसत. एकदा मुंडकोपनिषदातील शिष्याने गुरूला विचारलेला प्रश्न एका विद्यार्थ्याला सांगता येईना म्हणून त्यांनी त्याला आश्रमातून हाकलून दिले. पण ह्या शिस्तीबरोबरच आमच्यावर केलेल्या अपार प्रेमाने त्यांनी आमची हृदये कायमची जिंकली.

आपले भक्त व शिष्य यांच्याबद्दलच्या भावनात्मक दृष्टीपेक्षा त्यांची शिस्त जास्त आग्रही होती. निरनिराळ्या विद्यार्थ्यांच्या योग्यतेप्रमाणे त्यांना वेगवेगळी शिस्त असे. विद्यार्थ्यांनी सुधारावे हाच त्या मागे हेतू होता. मातेच्या प्रेमळपणाबरोबर पित्याची कठोर शिस्त हा त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा एक फार मोठा उत्कृष्ट पैलू आहे. पहिल्यांदा एखाद्या करारी पित्याप्रमाणे दटावत आणि मग एखाद्या मातेसारखे आलिंगन देऊन आपल्या कुशीत घेत. एकदा आम्ही शिवमहिम्न स्तोत्राचा पाठ करीत होतो. माझा आवाज काही गुरूदेवांच्या कानापर्यंत पोचला नाही. नेहमीप्रमाणे कडकपणे म्हणाले, 'मला नीट स्वच्छ म्हणून दाखवेपर्यंत आज तुला जेवण मिळणार नाही.' झालं ! लगेच मी मोठमोठ्याने ते श्लोक म्हणून पाठ केले आणि त्यांना म्हणून दाखवले. तेव्हा अगदी आईच्या डोळ्यांनी त्यांनी माझ्याकडे पाहिले. शिस्तीची जरब आणि अपार प्रेम यांचा सुंदर मिलाफ म्हणजे आमचे गुरूदेव !

'जेवणापूर्वी विद्यार्थ्यांनी प्रार्थना म्हटली पाहिजे' असा आश्रमांत दंडक होता. एक दिवस स्वामीजींच्या लक्षात आलं की प्रार्थना म्हटली गेली नाही आहे. तर लगेच आज्ञा केली, 'आज रात्री विद्यार्थ्यांना जेवण देऊ नका' आणि विद्यार्थ्यांना म्हणाले, 'ईश्वर तुम्हाला सर्व काही देतो आणि तुम्हाला त्याचे फुकटचे आभार मानायलाही वेळ नाही ?' स्वामीजींच्या शिस्तीचा आणखी एक किस्सा सांगतो. ब्रह्मचारी म्हणून आम्ही आश्रमात असताना माझे काही सहाध्यायी आश्रम व्यवस्थापकाची परवानगी न घेता मुंबई शहरात जे. कृष्णमूर्तींचे व्याख्यान ऐकायला गेले. तेव्हा गुरूदेव प्रवचन दौऱ्यावर बाहेरगावी गेले होते. ते परत आल्यावर आश्रम व्यवस्थापकाने एक चिठ्ठी लिहून गुरूदेवांना सर्व हकीगत कळवली, तेव्हा ते काहीच बोलले नाहीत. १५ दिवस असेच गेले. आम्हाला वाटलं की गुरूदेव विसरले किंवा त्यांनी क्षमा केली असावी. पण नंतर गुरूदेवांचा सुरतला ज्ञानयज्ञ होता, तिथे जाण्याकरता आम्ही सर्व निघालो. एकदम स्वामीजींनी तो कागद बाहेर काढला व म्हणाले, 'आश्रम व्यवस्थापकाच्या अनुज्ञेवाचून तुम्ही आश्रमाच्या बाहेर गेलात असे समजले' नंतर व्यवस्थापकाकडे पाहात म्हणाले, 'पार्थ, सर्व ब्रह्मचाऱ्यांची सुरतची तिकिटे रद्द कर.' शिस्त ही त्यांची अत्यंत आवडती गोष्ट. परंतु 'आपली शिस्त दुसऱ्यावर किती लादावी, त्याची मर्यादा काय' असं मी एकदा त्यांना विचारलं तर म्हणाले, 'तुम्ही जेव्हा इतर लोकांशी संबंध ठेवता तेव्हा आपल्या हृदयाचा उपयोग करा, पण स्वत:च्या बाबतीत मात्र आपले डोके वापरा.'

गुरूदेवांचं आणखी एक स्वभाव वैशिष्ट्य म्हणजे अगदी वेळ येईपर्यंत ते आपल्या मनातील हेतू उघड करीत नसत. १९७७ सालची गोष्ट सांगतो. तेव्हा मी पिवळ्या वस्त्रातील ब्रह्मचारी होतो आणि मला संन्यास दीक्षा केव्हा मिळेल याची वाट पाहात होतो. 'शिवरात्रीच्या उत्सवाला मुंबईला ये' असे मला बोलावणे आले. खरं तर गुरूदेव त्यावेळी कलकत्त्याला असायला हवेत, पण एक कार्यक्रम रद्द झाल्याने ते मुंबईला पवई आश्रमात आले. मीही तिथे पोचलोच होतो. शिवरात्रीच्या आदल्या दिवशी मला म्हणाले, 'उद्या डोक्याचा गोटा करून संपूर्ण उपवास कर आणि जप करीत राहा' ब्र. हरिदास, ब्रह्मचारिणी शारदा व मी आम्हा तिघांना गुरूदेवांनी संन्यास दीक्षा दिली. मला त्या दिवशी कृतार्थ वाटले.

मी ब्रह्मचारी असताना गुरूदेवांच्या मनकवडेपणाचा एक छान अनुभव घेतला तो सांगतो. आम्ही शिकत असताना साधारण १९६९ सालचा उन्हाळा असेल. गुरूदेवांनी उत्तरकाशीच्या आश्रमात थोडे दिवस आमचा कोर्स घेतला. तिथला अभ्यास संपला आणि परत मुंबईच्या सांदीपनीत जायचे ठरले. माझ्या मनात आलं 'आपण बद्रीनाथच्या एवढे जवळ आलो आहोत. तर दर्शन घेऊन मग मुंबईला परतावे.' या विचाराने अगदी जोर धरला म्हणून मी गुरूदेवांना तसं विचारलंसुद्धा. तर म्हणाले, 'असं कर, आता कोर्स संपला आहे; तर तू बाहेरच्या क्षेत्रात दोन वर्षे काम कर. आपल्या पायांवर उभा राहायला शीक आणि मग बद्रीनाथला जा.' माझी खूप निराशा झाली. परंतु मी गुरूआज्ञा पाळली आणि योग्य संधीची वाट पाहात राहिलो. प्रवचनाचे कार्यक्रम सारखे, सुरूच होते. दोन वर्षांनंतर मध्येच थोडा वेळ मिळाला. सुदैवाने तेव्हा गुरूदेवांचा मुक्कामही उत्तर काशीत राहणार होता. म्हणून मी निघालो व हृषिकेशला गेलो. त्या आधी गुरूदेवांना पत्र पाठवून अनुज्ञा मागायच्या विचारात होतो. पण 'पुन्हा त्यांनी नाकारले तर' अशी भीती पोटात होतीच. म्हणून हृषिकेशला उतरल्यावर बद्रीनारायण बसची चौकशी केली. त्या दिवशीच्या गाड्या भरलेल्या होत्या. आधीच आरक्षणे झाली होती. म्हणून मग मला उत्तरकाशीला जाण्याशिवाय दुसरा पर्याय नव्हता. उत्तरकाशीला गेलो, गुरूदेवांना प्रणाम करून मग पुढे जावे असे ठरवले. मग ते काय म्हणतील तसं करायचं. सुदैवाने 'हो' म्हणाले तर ठीक, 'नाही' म्हणाले तर पुढची यात्रा रहीत करायची !

प्रणाम करायला गेलो असताना ते म्हणाले, 'बद्रीनारायणला लगेच निघायचं तुझ्या मनात आहे हे खरं ना ?' ऐकून मला आश्चर्याचा धक्काच बसला. खरं तर माझ्या चेहऱ्यावर तसा काही भावही नव्हता, तरी दोन वर्षांपूर्वी मागितलेली परवानगी अजून त्यांच्या लक्षात कशी काय आहे ? माझ्या मनातलं ह्यांनी कसं ओळखलं ? स्वामी विश्वेश्वरानंदांना माझं तिकीट काढायला सांगितलं. त्यांना गुरूदेव म्हणाले, 'बद्रीनाथला कसं जायचं आणि तिथे काय काय पाहायचं हे त्याला नीट समजावून सांगा.' मी एकदम आनंदलो. बरेच दिवसांची इच्छा पूर्ण होणार म्हणून अगदी आतून हर्ष झाला. लगेच ऋषीकेशला गेलो आणि त्यादिवशी बद्रीनाथच्या बसचे तिकीट मला लगेच मिळाले आणि गुरूकृपेने सर्व प्रवास सुखकर झाला. गंमत म्हणजे ऋषीकेशला माझ्याबरोबर जे पदयात्री होते त्यांना अजूनही बद्रिनाथचे तिकीट मिळाले नव्हते. त्यांना तिथेच थांबावे लागले. एकंदर काय ! तुम्ही सर्व गोष्टी गुरूदेवांच्यावर सोपवल्यात की त्या नीट पार पाडतातच ! हा माझा अनेक वेळचा अनुभव आहे !

गुरूदेवांच्या विनोदी स्वभावाला वगळून त्यांच्याविषयी बोलणे म्हणजे प्रभेशिवाय सूर्याबद्दल बोलणं आहे. गीतेसारख्या अध्यात्मग्रंथावर स्वामीजींचे प्रवचन ऐकतानाही लोक पोट धरधरून हसत असत. निखळ विनोद (कुणाच्याही व्यंगावर न आधारलेला) ऐकावा तर तो गुरूदेवांचाच. एखादा संकटात सापडलेला माणूस भेटायला आला तरी तो हसतच त्या खोलीतून जाणार ! स्वत: खूप आजारी होऊन रुग्णशय्येवर असताना देखील एखाद्या निरोगी तरुणाने शीळ घालावी तितक्या सहज थट्टा मस्करी करीत असत. म्हैसूरमध्ये त्यांना हृदयविकाराचा झटका आला. परिस्थिती फार गंभीर होती, दोन दिवसपर्यंत नाडीच लागत नव्हती. मी तेव्हा पुण्यात होतो. कळल्याबरोबर लगेच म्हैसूरला गेलो. ते तिथे विश्रांती घेत होते. ब्रह्मचारी गोविंदा त्यांची देखभाल करीत होता. आम्ही त्यांना भेटायला गेलो होतो.त्यांनी आमच्याकडे पाहिलं आणि हसत म्हणाले, 'विष्णु भगवान शेषनागावर झोपतात आणि तुमचे गुरू ढेकणांच्या अंथरुणावर झोपले आहेत.' तिथेच एकदा एक परिचारिका चेहरा पाडून अगदी खाली मान घालून उभी होती. गुरूदेवांनी तिला विचारलं, 'तू पेशंट आहेस का मी ?' त्यानंतर म्हणे ती परिचारिका नेहमी हसतमुख राहायला लागली. त्या दुखण्यात काम खूप साठून राहिले होते. तेव्हा गुरूदेव विनोदाने म्हणाले, 'यमराजांना जरा थांबायला सांगा. अजून तुमच्या स्वामीजींना खूप काम करायचं आहे !' सर्व आव्हानांना तोंड देण्याचे प्रचंड धैर्य त्यांच्याकडे होते.

जीवनाचे छोटेमोठे प्रश्न हसत-खेळत कसे सोडवावेत याचे स्वामीजी सतत शिक्षण देत असत. पण ते उपदेशाचे डोस पाजून नाही, तर जाता जाता विनोद करून ! एकदा असं झालं, माझ्या प्रकृतीला तिखट खाणे सोसत नसल्याने मी ते खायचं खूप दिवसापासून सोडलं होतं. गुरूदेवांच्या बरोबर मी दक्षिण भारताच्या दौऱ्यावर होतो. तिकडे खूप तिखट खाण्याची पद्धत आहे. भिक्षेला (जेवायला) गेलो की तिकडच्या घरातून मला व गुरूदेवांना मिरची वाढीत. मला नेहमी प्रश्न पडे. 'मिरची मी खात नाही', असं सांगितलं तर यजमानांना वाटेल की काय खोड्याळ माणूस आहे म्हणून ! गुरूदेवांना मिरच्या चालतात आणि शिष्य पहा किती कटकट करतोय ते ! '' म्हणून मी गुरूदेवांना माझी अडचण सांगितली. म्हटलं, 'तुम्ही बरोबर असताना मी यजमानांना ही गोष्ट सांगू शकत नाही. नाहीतर त्यांना वाईट वाटेल' गुरूदेवांनी माझं म्हणणं नीट ऐकून घेतलं, डोळे मिटले आणि म्हणाले, 'ठीक आहे. काळजी करू नकोस. आता मिरची वाढली तर वाढू देत,

नको म्हणून नकोस आणि खाऊही नकोस. असं कर, एक पापड आणखी मागून घे आणि त्या मिरचीवर ठेव. आणि काही झालंच नाही असं चेहऱ्यावर दाखवीत जेवत राहा.' एका भिक्षेला संध्याकाळी मी पू. गुरूदेवांच्याबरोबर त्यांच्या अगदी शेजारीच बसलो होतो. माझ्या ताटांत काय काय वाढत आहेत याकडे त्यांचे बारकाईने लक्ष्य होते. जेव्हा मिरच्या वाढल्या गेल्या तेव्हा मी 'आणखी एक पापड घाला' असं सांगितलं. मी काय करतो ते गुरूदेव पाहातच होते. पापडाखाली मी मिरच्या दडवलेल्या पाहून गुरूदेव एकदम मोठ्याने हसले. त्यांच्या हास्याचे कारण यजमानांना समजले नाही, पण मला समजले.

त्यांच्याकडे शिकायला येणाऱ्या लोकांच्या अनेक तऱ्हा असत. त्या त्या प्रमाणे त्यांची शिकवण्याची पद्धत बदलत असे. कुणाला प्रेमाने, कुणाला कठोर शब्द बोलून, कुणाला चिडवून. वेळेनुसार रागरंग पाहून ! एका माणसाच्या बाबतीतही त्यांची पद्धत अनेकवेळा बदलत असे. गुरूदेवांच्याकडे कुणी सल्ला मागायला आलं की मार्गदर्शन करीत परंतु सर्व जबाबदारी त्यांचे अंगावर टाकीत. एका गृहस्थाला एक ज्ञानयज्ञाचे परिपत्रक (Handbill) काढायला दिलं होतं. त्याने आपल्या कंपनीची जाहिरात त्याच्यावर ठळकपणे छापली. गुरूदेवांनी ते पाहिलं तेव्हा म्हणाले, 'यज्ञाच्या माहितीपेक्षा तुझी जाहिरातच जास्त ठळक आहे.' अशी त्यांची चूक त्याच्या गळी हळूच उतरवली.

फार कडक न होताही ते दृढनिश्चयी शिक्षक होते. शिस्त आवडणारे पिताजी होते आणि कनवाळू मातेसमान त्यांचे हृदय होते. एक-दोन उदाहरणे देतो. एकदा एक स्त्री त्यांच्याकडे आली आणि रडत रडत म्हणाली, 'स्वामीजी तुम्ही मला सोडलत काय ?' स्वामीजी लगेच उत्तरले, 'मी कुठं तुला सोडलं आहे ? पाणी लाटांना सोडू शकते काय ? एखाद वेळेस तू मला सोडशील, पण मी नाही.' एक दुसरी स्त्री एकदा त्यांना बराच वेळ नको ते बोलून सतावीत होती. शेवटी निर्लज्जपणे म्हणाली, 'स्वामीजी, मी तुम्हाला खूप त्रास दिला ना ?' लगेच म्हणाले, 'तू मला खूप त्रास देशील, पण मी तो करून घेतला पाहिजे ना ?' गीतेच्या प्रवचनाची आठवण करून देत म्हणाले, 'ते सर्व माझ्यात आहेत, पण मी त्यांच्यात नाही' असे श्रीकृष्ण म्हणतात, समजलं का ?

सांदीपनीमध्ये शिकत असलेले विद्यार्थी अगर नुकतेच शिकून बाहेर पडत प्रचारकार्यार्थ कार्यरत असलेले विद्यार्थी यांच्याकडे त्यांचे विशेष लक्ष्य असे. या संबंधात एकदा ते एका भक्ताला लिहितात, 'झाडूवाले रस्त्याची गटारे साफ करून घाणेरडे होतात. घरी येऊन स्वच्छ होतात आणि पुन्हा घाण होण्याकरता कामाला जातात. माझ्या ब्रह्मचारी (ब्रह्मचारी-मिशन सांदीपनीमध्ये वेदांताचा कोर्स पूर्ण करून मिशनतर्फे समाजसेवा करण्याची दीक्षा घेतलेले व्रती) प्रचारकांचे असेच आहे. मी शिक्षण देऊन त्यांना समाजात पाठवतो. ते अशुद्ध होतात आणि माझ्याकडे परततात. अतिशय सोशिकतेने, कधी कधी बडगा उगारून परंतु अत्यंत प्रेमाने मी त्यांना शुद्ध करून परत समाजात पाठवतो. असं चालतं. खरं तर त्यांना पुन्हा माझ्याकडे यायची जरूर भासू नये, अशीच अपेक्षा असते. कारण मी काही गाढवांचा गुरू नाही किंवा गाढवासारखा माझ्या पाठीवरून त्यांना ईश्वरानुभूतीकडे नेणाराही नाही. मी फक्त मार्गदर्शक आहे. त्यांनी आपली उन्नती स्वतःच करून घ्यायची आहे.'

त्यांच्या दैनंदिन कामातही त्यांचा अनासक्तीचा भाव दिसून यायचा. सुवर्णतुलाभाराबद्दल एकजण त्यांना भेटायला आला तर गुरुदेव म्हणाले, 'मला कशाचीच गरज नाही. तुम्हाला माझी सुवर्णतुला करायची असेल तर खुशाल करा. मला त्याच्याशी काही कर्तव्य नाही. यातून जो पैसा मिळेल तो सर्व प्रचार कार्याला जाईल. इथे तुम्ही काय देता याला महत्त्व नाही. कसे (कोणत्या भावनेने) देता याची किंमत आहे. तिथे अहंकाराला जागा नाही. जगतातील प्रगटनामध्ये प्रत्येक ठिकाणी आपण ईश्वराला पाहायला शिकले पाहिजे आणि आपले सगळे वैयक्तिक हेवेदावे विसरून एक दिलाने काम केले पाहिजे. अध्यात्मात झटपट मार्ग (Short Cut) नाही. तुम्हाला जर काही करायचे असेल तर अहंकाराला छाटा, काम करा आणि आत्म्याचा शोध घ्या.

गुरूदेवांना काम करताना पाहिलं की लगेच भगवान श्रीकृष्णाची आठवण व्हावी इतके त्यांच्यात साम्य आहे. अर्जुनाने एकदा भगवंताना विचारले होते की, तू ईश्वर आहे, मग तुला काम करण्याची काय आवश्यकता ? श्रीकृष्णाने उत्तर दिलंय, 'मला खरं तर कर्तव्य असे काहीही नाही. पण तरीही मी काम करतो. कारण मीच जर काम थांबवलं तर इतर लोकही त्याप्रमाणे वागतील. मला काही मिळवायचं आहे म्हणून मी काम करीत नाही, तर काम हीच एक प्रकारे जीवनयात्रा आहे, जीवनमार्ग आहे.'

गुरूदेवांचे सबंध जीवनच हा माझ्याकरता एक मोठा मार्गदर्शक ग्रंथ (शिक्षण) आहे. ते नुसते तत्त्वज्ञानी नाहीत तर द्रष्टे होते. त्यांचे ध्येय प्रत्यक्षात उतरविण्याकरता, ध्येयाचा एक क्षणभरही विसर न पडता, अहंकाररहित होऊन ते अविरत त्याच उत्साहाने कार्यरत असत. इतकी ही समर्पण वृत्ती मी दुसरीकडे कुठेही पाहिली नाही. ते सदैव आत्मस्थितीतच असल्याने त्यांना ते शक्य होत असावं. त्यांच्या जीवनात तर्क व तत्त्वज्ञान याचा सुंदर मिलाफ दिसतो आणि त्याला विनोदाची झालर असल्याने ते अधिकच मोहक झाले आहे.

असे हे आमचे पू. गुरूदेव ! माझे सर्वस्व असलेल्या त्यांच्याबद्दल किती आणि काय काय लिहू ? माझ्या मनांत भाव आहे,

*'त्वमेव माता च पिता त्वमेव ! त्वमेव बंधु सखा त्वमेव ॥*
*त्वमेव विद्या द्रविणं त्वमेव । त्वमेव सर्वं मम देव देव' ॥*

# रुश्रेष्ठ स्वामी तपोव

**सौ. माधवी आनंद**

*चिन्मय मिशन मुलुंड केन्द्र सेविका.*

व्यक्तीचे चरित्र त्याच्या जन्मापासून सुरू होते. तत्पूर्वी गर्भात त्या जीवाच्या झालेल्या वाढीबद्दल उल्लेखही केला जात नाही. त्याचप्रमाणे संतांच्या चरित्राचे दोन भाग पडतात - एक त्यांचा पूर्वाश्रम व तद्नंतर आत्मसाक्षात्काराकडे केलेला प्रवास. त्यांच्या पूर्वाश्रमीच्या चरित्राचा सहसा उल्लेख केला जात नाही. पण स्वामी तपोवन महाराजांसारख्या आत्मसाक्षात्कारी महान संताचे पूर्वाश्रमीचे चरित्र मात्र तितकेच प्रेरणादायी असते व त्यांच्या ईश्वरप्राप्तीच्या प्रवासाचा मागोवा त्यावरून घेता येतो असे विचार स्वामी चिन्मयानंदांनी व्यक्त केले आहेत.

१८८६ साली पालघाट जिल्ह्यातील मुदप्पालुर येथे बालम्बा आणि अच्युतन् नायर यांना एक पुत्ररत्न प्राप्त झाले. अच्युतन् नायर हे धनवान जमीनदार होते. बाळाचे नाव 'सुब्रमण्यम्' ठेवण्यात आले. त्याचे टोपण नाव 'चिप्पु कुट्टी' असे होते. १४ व्या वर्षी त्यांना नीरस वाटणाऱ्या विषयांचा अभ्यास करण्यासाठी जबरदस्तीने शाळेत घालण्यात आले. एक दिवस त्यांनी घरी सर्वांना आपला शाळेत न जाण्याचा निर्णय ऐकवला. त्यांच्या वडिलांची आपल्या मुलाने चांगला अभ्यास करून उच्च सरकारी अधिकारी व्हावे, अशी खूप इच्छा होती. त्यांनी मुलाला अभ्यास करण्याची ही कशी अमोल संधी मिळाली आहे आणि इतर कितीतरी मुलांना इच्छा असूनही पैशाअभावी ती मिळत नाही, तेव्हा या संधीचा फायदा घ्यावयास पाहिजे असे अनेक प्रकारे समजावण्याचा प्रयत्न केला. तेव्हा चिप्पु कुट्टीने त्यांना आपण शिक्षण सोडू इच्छित नाही पण शाळेत जाणे आपल्याला आवडत नाही, असे त्यांनी वडिलांना सांगितले.

त्यांच्या वडिलांनी त्यांच्या शिक्षणाची व्यवस्था घरीच केली. चिप्पुकुट्टीने मल्याळम् व संस्कृत भाषेवर चांगलेच प्रभुत्व मिळवले. १७ व्या वर्षी त्यांनी मल्याळम्‌मध्ये उत्तम लेखक म्हणून नावही मिळवले व चांगल्या प्रतीचे लिखाणही केले. पण त्यांच्या हृदयाने हिंदू शास्त्राचा सखोल अभ्यास करण्याचा ध्यास घेतला होता. बऱ्याच वेळा ते जवळच्या जंगलात जाऊन 'ॐ नम: शिवाय' चा जप करीत तासन् तास घालवत असत.

२१ वर्षांचे असताना पित्याच्या मृत्यूने ते अगदी हेलावून गेले. त्यांच्या हृदयात सुप्तावस्थेत असलेले वैराग्य एकदम जागृत झाले. आपल्या एकुलत्या एका भावाचे शिक्षण होईपर्यंत ते तेथेच थांबले. वयाच्या अठ्ठाविसाव्या वर्षी दिव्य आवाहनाला साद देण्यासाठी त्यांनी घराचा त्याग केला. पुढील ७ वर्षे त्या साधूने परिभ्रमण करीत, शास्त्राभ्यास व कठोर तप करण्यात घालवली. त्यानंतर ऋषीकेशजवळ गंगातीरी 'पुराणी झाडी' नावाच्या क्षेत्री ते आले व वास्तव्य करू लागले. कैलासाश्रमाच्या स्वामी जनार्दनगिरी यांनी त्यांना रीतसर संन्यास दिला आणि ते स्वामी तपोवनम् (तपाचे वन) झाले. त्यानंतर ते उत्तर काशीला गेले व तेथे गवताच्या एका खोलीत झोपडीत राहू लागले. तेथील लोक ह्या जागेला 'तपोवन कुटीर' म्हणून ओळखू लागले. ह्याच झोपडीच्या बाहेरच्या व्हरांड्यात स्वामी चिन्मयानंद ह्या महान गुरूंच्या चरणी सात वर्षे बसले व त्यांनी वेदांत ज्ञान आत्मसात केले.

स्वामी तपोवनम् उत्स्फूर्त कवी होते. निसर्गातील दृश्ये व ध्वनी ह्यामुळे ते आनंदाने भरून जात असत. स्वामी चिन्मयानंद लिहितात हृ 'भ्रमण करीत असताना ते नेहमी आपल्याबरोबर पेन-पेपर बाळगीत आणि त्यांच्या पवित्र हृदयात उठणारे विचार आणि सौंदयाचे दृश्य टिपत असत.' मल्याळम्‌मध्ये प्रसिद्ध झालेल्या 'हिमगिरी वहनम्' (wauderings in Himalayas) आणि 'कैलास यात्रा' ह्या दोन पुस्तकात आंतरिक व बाह्य सौंदर्याची नोंद सापडते. मल्याळम् आणि संस्कृतमध्ये लिहिलेल्या त्यांच्या इतर पुस्तकांची इंग्रजी भाषांतरे उपलब्ध आहेत. स्वामी चिन्मयानंदांच्या दृष्टीने त्यांनी लिहिलेले 'ईश्वर दर्शन' हे सर्वोत्कृष्ट पुस्तक आहे. ह्या पुस्तकाचे वर्णन करताना स्वामी चिन्मयानंद म्हणतात, 'जीवन प्रवास आक्रमित असता अध्यात्मिक विचारांचा आत्मज्ञानी पुरुषाने गुंफलेला हार.'

स्वामी तपोवनम् ह्यांच्याकडे अध्यात्मिक साधक बरेच आले पण त्यापैकी अगदी थोडेच दीर्घकाळपर्यंत टिकून राहिले. स्वामी चिन्मयानंद ह्याचे कारण सांगतात हृ उत्तर काशीचे कडाक्याचे हवामान बऱ्याच जणांना सहन करता आले नाही. त्याचबरोबर कोणत्याही सुखसोयींच्या उपलब्धतेचा अभाव आणि स्वामींची शिष्यांकडून अभ्यासाच्या बाबतीत कठीण परिश्रमांची अपेक्षा. स्वामी सर्वांना म्हणजे कडक शिस्तीचे भोक्ते होते. स्वामी चिन्मयानंद लिहितात, 'वरील सर्व घटक म्हणजे गैरसोयींमध्ये पुरेपूर भर टाकणारे होते व ज्यांना परमात्म तत्त्वाची झलक प्राप्त झाली नाही अशांसाठी.'

१९५६ सालच्या डिसेंबर महिन्यात स्वामी चिन्मयानंद आपल्या अत्यवस्थ गुरूंना भेटण्यासाठी आले असता आपल्या अशक्त गुरूंना पाहून त्यांना रडूच कोसळले. त्यानंतर स्वामी तपोवनम् यांनी त्यांना हळुवारपणे कठोर सत्यास कसे सामोरे जायलाच पाहिजे ते समजावले. स्वामी तपोवनम् म्हणाले, 'चिन्मया, वेदांत शिकणे सोपे आहे, वेदांत शिकवणे आणखीनच सोपे आहे; पण ते ज्ञान जीवनात उतरवणे खरोखरच कठीण आहे; आपल्या जन्माबरोबरच आपला मृत्यू जन्मला आहे. परमेश्वराने मला इतके आयुष्य जगण्याची आणि अनुभवण्याची संधी दिली. तुझ्या म्हणण्याप्रमाणे आता मी त्याच्यापासून दूर पळून जावे ? असे कसे करावे ? आता मी माझ्या गंगामातेचे मधुर संगीत ऐकत शांतपणे मरू नये का ? रडू नकोस. तू जा आणि तुझे काम करीत रहा.'

स्वामी तपोवनम् यांनी १६ जानेवारी १९५७ रोजी वयाच्या ६८ व्या वर्षी महासमाधी घेतली.

'स्वामी तपोवनम् ही अशी संस्था आहे, जिला कोणत्याही कारणाची मर्यादा नाही.

ते कोणत्याही कारण विशेषाचे कारण नाहीत. ते कोठूनही आले नाहीत.

सर्व व्यापी राहिले आणि सर्वव्याप्त होण्यासाठी निघून गेले.'

## गुरूश्रेष्ठ स्वामी शिवानंद

स्वामी शिवानंद, पूर्वाश्रमीचे कुप्पुस्वामी अय्यर, तामिळनाडूमधील पट्टमडई गावात एका विद्वान संतांच्या घरात जन्माला आले. त्यांचे वडील वेंगु अय्यर हे १६ व्या शतकातील सुप्रसिद्ध संत अप्पय्या दिक्षितार यांचे वंशज.

सुदृढ प्रकृतीचे कुप्पुस्वामी शाळेत असताना उत्तम खेळाडू होते. ख्रिस्ती धर्मप्रचारकांनी चालवलेल्या कॉलेजमध्ये शिकत असल्यामुळे त्यांच्यावर बायबलमधील शिकवण ठसली होती व ख्रिस्ताविषयी त्यांना आकर्षण वाटू लागले होते.

त्यांच्या सेवाभावी प्रवृत्तीमुळे त्यांनी वैद्यकीय महाविद्यालयात प्रवेश केला. पदव्युत्तर, त्यांनी सिंगापूर येथे वैद्यकीय व्यवसाय सुरू केला. त्यामुळे त्यांची आर्थिक सुस्थिती होती. त्यांची ही सुस्थिती वृद्धिंगत होत असतानाच डॉ. अय्यर यांनी पवित्र ग्रंथांचा अभ्यास चालू ठेवला. भोवताली असलेले अस्वास्थ्य व गरीबी न्याहाळताना त्यांच्या मनात जीवनाच्या हेतूविषयी प्रश्न उभे राहू लागले. १० वर्षे वैद्यकीय सेवेनंतर एक दिवस त्यांनी जीवनावश्यक असलेल्या वस्तू पिशवीत भरल्या व ते परिभ्रमणास निघाले. प्रथम वाराणसीला येऊन तेथून ते ऋषिकेशला आले. कैलासाश्रमाचे प्रमुख स्वामी विष्णुदेवानंदांकडून त्यांना संन्यास मिळाला. काही वर्षांतच स्वामी शिवानंदांनी अध्ययन आणि मनन ह्यामध्ये उंच भरारी घेतली.

त्यांनी ऋषीकेश येथे १९३४ साली 'आनंद कुटीरची' स्थापना केली. तेथे त्यांनी एक हॉस्पिटलही सुरू केले. तेथे रुग्णांची सेवा विनामूल्य होते. त्या हॉस्पिटलमध्ये सेवा करताना आश्रमवासीयांना प्रवचने देताना, योगासने शिकवताना किंवा इतरही काही कामात त्यांचा उत्साह आणि ताकद आश्चर्यजनक होती. १९३९ साली त्यांनी 'डिव्हाइन लाइफ सोसायटी'ची स्थापना केली. त्यांनी २०० हून अधिक पुस्तके लिहिली. स्वामी चिन्मयानंदांनी काही वर्षे स्वामी शिवानंदांच्या आश्रमात घालवली. स्वामी शिवानंदांनी त्यांना संन्यास दीक्षा दिली व त्यानंतर स्वामी चिन्मयानंद स्वामी तपोवन महाराजांकडे सखोल शास्त्राभ्यासासाठी गेले. स्वामी शिवानंद कर्मयोगी होते. त्यांनीच पुढे स्वामी चिन्मयानंदांना जगात परत जाऊन लोकसेवा करण्यास प्रोत्साहित केले. ते म्हणत, 'तुम्ही नेहमी लोकसेवेची नवनवीन माध्यमे अवलंबावयास हवीत. हाच निष्काम कर्मयोग आहे. माझी हीच पद्धत आहे.'

१९६३ साली त्यांनी महासमाधी घेतली. 'डिव्हाइन लाईफ सोसायटी'चे आताचे प्रमुख स्वामी चिदानंद हे स्वामी चिन्मयानंद यांचे गुरूबंधू होत.

आधार ह Chinmaya Mission Transforming Lives.

**सौ. माधवी आनंद**
चंदन अपार्टमेंट, चाफेकर बंधु मार्ग, मुलुंड, (पूर्व) मुंबई ८१.

सर्वेऽपि सुखिनः सन्तु सर्वे सन्तु निरामयाः ।
सर्वे भद्राणि पश्यन्तु न कश्चिद् दुःखमाप्नुयात् ॥

# स्वामी चिन्मयानंदः

सौ. मनिषा भा. अभ्यंकर

एम.ए. (संस्कृत) गोल्ड मेडॅलिस्ट. संस्कृत क्लासेस घेतात. ज्ञानेश्वरीचा गाढा अभ्यास. 'बाप रखुमादेवीवरू' मध्ये बरेच लेख प्रकाशित.

इयं भारतभूः पुण्यपुरुषैः अलङ्कृता । यद्यपि नाना भाषा प्रदेशेषु एषा भूमिः विभक्ता तथापि वैदिक परम्परा अत्राखण्डितःस्ति । आद्य शङ्कराचार्येण अत्र वैदिक परम्परायः पुनरुज्जीवनं कृतम् । तत्पश्चात् अस्य दीपस्तम्भस्य प्रकाशेनैके पुण्यपुरुषाः मार्गमाक्रान्तवन्तः । एषु पुण्यपुरुषेषु स्वामी चिन्मयानन्दस्य कार्यमसाधारणमासीज् ।

षडेकनवैकतमे संवत्सरे (१९१६) केरळ प्रान्ते 'एर्नाकुलं' नाम ग्रामे एकास्मिन् सुशिक्षित परिवारे एषः महाशयः जनि लेभे ! मात्रा 'बाळकृष्ण' इति तस्य नामधेयं कृतम् । 'कुट्टन मेनन' इति तस्य पितुः नाम । तस्य पिता न्यायाधीशः आसीत् । शैशवे एव तस्य नाता पञ्चत्वे विलीना ।

शैशवात् प्रभृति अयं बालः विचक्षणः आसीत्; तेजस्विनी बुद्धिः तेन उपहाररूपेण प्राप्ता इव । एर्नाकुलम् नाम ग्रामे आङ्ग्ल विद्यालये अस्य शिक्षणमभवत् । नवत्रिनवैकतमे संवत्सरे (१९३९) मद्रास - विद्यापीठात् अनेन राज्यशास्त्रविषये पदवी प्राप्ता । अनन्तरं उत्तर हिन्दुस्थाने लखनौ पत्तने अनेन साहित्यविषये न्यायशास्त्रे (कायदा) च शिक्षणमपि लब्धम् । उच्चशिक्षणं लब्धवा अनेन वृत्तपत्र व्यवसाये कार्यं कृतम् : 'नॅशनल हेरॉल्ड' नाम आङ्ग्ल वृत्तपत्रे सः स्तम्भलेखकः आसीत् । यथा सः अभ्यासपूर्ण लेखनेन वृत्तपत्र व्यवसाये प्रसिद्धः असीत् तथैव स्वातन्त्र्यसंग्रामेऽपि तस्य सहभागः आसीत् । सः कारावासमपि अन्वभवत् । कारावासे सः व्याधिग्रस्तः अभवत् ।

गच्छता कालेन सः व्यवसायनिमित्तेन हरिद्वारमागच्छत् । हरिद्वारे कस्मिंश्चित् आश्रमे कोऽपि साधुः भूत्वा जनान् वञ्चयति इति वार्ता आसीत् । अतः तस्य साधोः आचरणं ज्ञातुं सः हरिद्वारमागतः । अपि तु ईश्वरस्य संकेतः अगाधः । हरिद्वारे यस्मिन् आश्रमे सः आगतः आसीत् सः शिवानन्दस्य आश्रमः । शिष्यान् शास्त्रग्रन्थान् अध्यापयन् शिष्यान् पूर्णं ज्ञानं यच्छत् सः तस्मित् आश्रमे स्थितः आसीत् । पूर्वायुष्ये शिवानन्दः प्रसिद्धः वैद्यः आसीत् । तस्य शिवानन्दस्य आश्रमे सः कञ्चित्कालपर्यन्तम् अवसत् । शिवानन्दस्य ज्ञानदानस्य कार्येण सः प्रभावितः । यद्यपि सः साधुजनानां वञ्चनानिपुणं स्वभावं ज्ञात्वा तेषानाचरणं जनानां पुरतः व्यक्तीकर्तुं लेखमालांच लिखितुं हरिद्वार मागतः आसीत् तथापि शिवानन्दस्य कार्येण प्रभावितः सः शिवानन्दस्य शिष्यः अभवत् । तत्र तेन शिवानन्दस्य मार्गदर्शने वैदिकशिक्षणमारब्धम् । अथ गच्छता कालेन त्रिचतुर्नवैकतमे संवत्सरे फेब्रुवारीमासस्य पञ्चविंशति तमे दिने तेन संन्यासदीक्षा गृहीता (२५ फेब्रुवारी १९४३) । ततः स्वामी शिवानन्देन 'स्वामी चिन्मयानन्द' इति नामधेयं स्वीकृतम् ।

संन्यासदीक्षाग्रहणात् अनन्तरमपि स्वामी चिन्मयानन्दस्य शास्त्राध्ययनं प्रचलितमेव । चिन्मयानन्दस्य प्रखरां बुद्धिं, तीव्रां ज्ञानेच्छां वीक्ष्य स्वामी शिवानन्देन सः हिमालये तपोवनऋषिं प्रति प्रेषितः । द्वयोः गुरुशिष्ययोः मणिकाञ्चनसंयोगः आसीत् । एकादश वर्षपर्यन्तं तेन गुरोः मार्गदर्शनेन शास्त्राध्ययनं कृतम् । संपूर्ण ज्ञानमासादितमनेन । यद्यपि तेन संन्यासदीक्षा स्वीकृता तथापि कर्मसंन्यास इति तस्य न जीवनध्येयम् । वसुधैव तस्य कुटुम्बकम् । सर्व जनानामज्ञानं दूरी कर्तुं वेदान्तविचारं तान् शिक्षयितुं गुरोः अनुज्ञया पृथ्वीभ्रमणं प्रारब्धम् ।

एकपञ्चनवैक-तमे संवत्सरे डिसेम्बरमासस्य एकत्रिंशतितमे दिनाङ्के (३१ डिसेंबर १९५१) स्वामी चिन्मयानन्दस्य प्रथमः ज्ञानयज्ञः गुरोः आशीर्वादेन संपन्नः अभवत् । यथा भारते तथा सर्वस्मिन् जगति अपि अनेन महाभागेन भगवद् गीतोपनिषत्सु प्रवचनानि कृतानि । यद् ज्ञानं केवलं हिमालये मर्यादितं तत् ज्ञानं तेन सर्वेषु जनेषु वितरितम् । वेदांताज्ञानं दातुं तेन मुंबापुर्यां पवई नाम ग्रामे 'सांदीपनी साधनालयः' नाम विद्यापीठं स्थापितन् । एतस्मित् विद्यापीठे बहवः ब्रह्मचारिणः चिन्मयानन्दस्य कार्यं अधुना अपि कुर्वन्ति ।

त्रिनवनवैकतमे संवत्सरे मे मासस्य अष्ट दिनाङ्के (८ मे १९९३) एषः महाभागः ब्रह्मणि लीनः । जयतु ज्ञानदाता चिन्मयानन्दः ।

**सौ. मनीषा भा. अभ्यंकर**
रामजानकी, भोकरे कॉलनी,
चंदनवाडी, मिरज - ४१६ ४१०

# ...मयानंद - व्यक्ती ...

सौ. माधवी आनंद

*चिन्मय मिशन मुलुंड केन्द्र सेविका.*

पन्नास वर्षांपूर्वी एक उंच, सडसडीत बांध्याचा, तेजस्वी डोळ्याचा, खांद्यावर रूळणारे केस अशा युवावस्थेतील एक स्वामी हिमालयाच्या एकांतवासातून सपाट भूपट्टीवर उतरला. त्यांची दिव्य दृष्टी त्यांना प्रोत्साहीत करीत होती. ते भारतीयांना त्यांचे अध्यात्मिक वैभव पुनर्प्राप्त करून घेण्यास लावणार होते. हे अध्यात्मिक वैभव परकीय आक्रमकांनी अपहृत केले होते. स्वामीजी हिमालयात गेल्याला ९ वर्षे पूर्ण झाली होती. तेथे जाताना ते बालकृष्ण मेनन, इंग्रजी भाषा व कायदा यांचा एक उच्च पदवीधर, आत्मप्रौढीयुक्त धडाडीचा तरुण पत्रकार म्हणून गेले होते. त्यांचे उद्दिष्ट होते - हे हिमालयात राहणारे साधू-संन्यासी एकजात ढोंगी आहेत आणि त्यांचे पितळ उघडे पाडायचे आहे.

ऋषिकेश येथील स्वामी शिवानंदांच्या 'आनंद कुटीर' आश्रमात जाताना त्यांनी आपल्या मित्रांना सांगितले होते, 'हे साधू लोक त्यांचे ढोंग कसे रचतात ते मी शोधून काढणार आहे ?'

बालकृष्णनूना हे कधीच करता आले नाही. ठरवल्याप्रमाणे साधू समाजाच्या विरूद्ध हा ढोंगीपणाचा पुरावा गोळा करण्याऐवजी हा स्वतंत्र प्रवृत्तीचा, अभिमानी युवक नकळतपणे स्वामी शिवानंदांच्याच प्रभावाखाली आला. स्वामी शिवानंदांच्या साधु वृत्ती आणि प्रेमाने ते भारावून गेले व त्यांच्यामधील सुप्त अध्यात्मिक भाव जागृत झाले.

बालकृष्णन् धर्माच्या विरूद्ध असलेला असा एक तरुण युवक होता. त्यांच्या दृष्टीने धर्म म्हणजे फक्त वेडगळ समजुतीनुसार कुटुंबातील वडीलधाऱ्यांकडून यांत्रिकपणे केली जाणारी धार्मिक कृत्ये [illegible] होता. या व्यतिरिक्त आणखी काहीही नाही.

कोचीच्या महाराजांच्या घराण्याशी संबंध असलेला उच्च कुळातील हा वंशज बालकृष्णन् पाच वर्षांचा असतानाच आईला मुकला. त्याच्या आईचा तिसऱ्या प्रसूतीच्या वेळी मृत्यू झाला. त्यामुळे त्याच्या मावशीने त्याचे एर्नाकुलम् येथील पूठमपल्ली ह्या राहत्या घरात संगोपन केले. त्याच्या माता-पित्यांची नावे मंकुअम्मा आणि कुट्टन् मेनन अशी होती. कुट्टन् मेनन त्रिचूरचे मुन्सिफ जज होते. बालकृष्णन्च्या*- दोन धाकट्या बहिणी होत्या. (* पद्मिनी आणि कनकम्)

बालकृष्णन्चा जन्म झाल्यानंतर काही दिवसांतच छट्टाम्बी स्वामीगल ह्यांनी पूठमपल्ली घराला भेट दिली. हे स्वामी त्यांच्या योगिक सामर्थ्यासाठी तसेच प्राण्यांशी संवाद साधू शकण्यासाठी प्रसिद्ध होते. कुटुंबियांच्या विनंतीनुसार ह्या स्वामींनी चार दिवसांच्या बाळाचे नाव 'बाळकृष्णन्' उर्फ 'बालन्' असे ठेवले. ज्योतिषांनी त्यांचे भविष्य 'महान' आणि 'जगप्रसिद्ध' होईल असे वर्तवले. त्यानंतर दोन वर्षांनी पुन्हा ह्या स्वामींनी घराला भेट दिली तेव्हा मंकुअम्माने छट्टाम्बी स्वामीगलना बालनूला छातीवर धरून काहीतरी बोलताना पाहिले. पण तिला त्यांचे बोलणे अजिबात समजले नाही. ते काय बोलत आहेत ह्याविषयी मंकुअम्माने विचारले असता ते हसून एवढेच उत्तरले, 'काळजी करू नकोस. हे फक्त माझ्यात आणि ह्याच्यात आहे.'

पूठमपल्ली घरात दैनंदिन प्रार्थना आणि इतर विधींमध्ये मोठ्यांसमवेत लहानांनी पण सहभागी होण्याची प्रथा होती. तसे न केल्यास रात्रीचे जेवण मिळत नसे. विष्णुसहस्रनामाच्या दोन तासांच्या पठणास कंटाळणाऱ्या बालकृष्णनने डुलक्या येऊ नयेत म्हणून एक युक्ती शोधून काढली. तो शंकर भगवानांच्या तसबीरीकडे एक टक न्याहाळत असे. हे त्याला आवडले.

'रूंद कपाळावर विराजमान असलेली चंद्रकोर, कृपापूर्ण हसरे डोळे, नीलकंठाभोवती गुंडाळलेला सर्प, हसरा चेहरा. असे वाटावे - मिशांच्या मागून मुखातून प्रेम-दयापूर्ण शब्द आता प्रस्फुटित होतील आणि ऐकू येतील. हे भव्य शिव रूप बालनूच्या हृदयाला भावलेले ध्येय होते' अनेक वर्षांनंतर, स्वामी चिन्मयानंद म्हणून अवतरण झाल्यानंतर त्यांनी स्वतःच तसे लिहिलेले आहे. ते लिहितात, हा अर्चाविधी संपायची वाट पाहात असताना बालन् शंकर भगवानांच्या प्रतिमेस बऱ्याचदा न्याहाळत असे आणि डोळे मिटून आपल्या हृदयात तशीच्या तशी पूर्णपणे बघण्याचा प्रयत्न करीत असे. 'बालनूला हा इतका छान, आनंददायी छंद जडला की तो दिवसभरात केव्हाही डोळे मिटून आपल्या मनःपटलावर ते चित्र साकारत असे.' बाल्यावस्थेतच अगदी नकळतपणे हे ध्यानसाधनेचे तंत्र त्याने अवगत केले होते, असे स्वामीजींनी लिहिले आहे.

चांगला विद्यार्थी असल्यामुळे इंग्रजी माध्यमाच्या मल्याळम् ही दुय्यम भाषा म्हणून शिकवली जात असलेल्या शाळेतून त्यांनी आपलं शिक्षण अगदी [illegible] पूर्ण केले. पाचवीत असतानाच त्यांनी संस्कृत ऐच्छिक विषय घेतला व पाच वर्षे संस्कृतचा अभ्यास केला. शाळेच्या वेळेनंतर ते फुटबॉल व बॅडमिंटन खेळत असत. पोहण्यात ते पारंगत होते. एक हुशार विद्यार्थी म्हणून प्रसिद्धी मिळत होती. त्याचबरोबर 'गंमत करण्यास आवडणारा खोडकर' म्हणूनही बालन् ओळखला जात होता. मित्रांच्या घोळक्यात अनेक विषयांवर गप्पा मारीत कोपऱ्या-कोपऱ्यावर रेंगाळणे त्याला अतिशय आवडत असे. त्याचे विनोद मित्रांना खिळवून ठेवत आणि भाग्यशाली नसलेल्यांवर त्याची अपार दयादृष्टी असल्यामुळे त्याचा गोतावळा मोठाच होता.

कौमार्यावस्थेत आपल्या बुद्धिमत्तेच्या गर्वाने फुगून गेलेला हा मुलगा ईश्वराच्या अस्तित्वाविषयी प्रश्न करू लागला आणि त्याला धार्मिक विधींच्या बाबतीत तिडीक वाटू लागली. पण भगवान शंकरांशी त्याने आपले संबंध धरून ठेवले आणि प्रत्येक रात्री झोपण्यापूर्वी आपल्या अंथरूणावर बसून 'ॐ नमः शिवाय'चा जप त्याने चालूच ठेवला. त्याच्या बहिणी पद्मिनी आणि कनकम् त्याच्यावर गुपचूप पाळत ठेऊन असत आणि आपलीच मते प्रतिपादन

करणारा हा नास्तिकवादी जप कसा काय करतो ह्याचे त्यांना आश्चर्य वाटत होते.

बालकृष्णनूने लखनौ विश्वविद्यालयात प्रवेश घेतला व तेथून त्याने इंग्रजी भाषेत पदव्युत्तर आणि कायद्याची मूलभूत पदवी प्राप्त केली. कायद्याची पदवी प्राप्त करण्यासाठी अभ्यास करत असतानाच स्वातंत्र्य चळवळीने जोर धरला. नेत्यांची जेलमधून आत-बाहेर चालू होती. विद्यार्थी विरोध दर्शवित होते. बालकृष्णनूने स्वातंत्र्य चळवळीत आपला भाग उचलण्यासाठी विश्वविद्यालयाला राम राम ठोकला. ब्रिटिश शासकांच्या 'पाहिजेत' यादीत आपले नाव आहे असे कळले की तो भूमिगत होत असे.

पंजाबमध्ये सार्वजनिक संप आयोजित करण्यास मदत करीत असताना आणि पत्रके वाटताना त्यांना अटक झाली व दिल्लीच्या तुरुंगात डांबवण्यात आले. तेथे दमट, उबदार नसलेल्या, आरोग्याला घातक अशा खोल्यांमधून डझनावारी माणसे टायफॉईड किंवा तत्सम मारक रोगांमुळे मृत्युमुखी पडत होती. बालकृष्णही आजारी पडले. तुरुंगातील संरक्षकांनी ह्या आजारी माणसाला शहराच्या बाहेर रस्त्याच्या कडेला फेकून दिले. गाडीतून जाणाऱ्या एका महिलेचे लक्ष रस्त्याच्या कडेला निपचित पडलेल्या ह्या आजारी व्यक्तीकडे गेले. सहानुभूती असलेल्या ह्या स्त्रीने त्या आजारी माणसाला आपल्या गाडीत घेतले, घरी नेले व डॉक्टरांना बोलावले. पुढील काही आठवडे तिने बालकृष्णनूची तिच्या मुलाप्रमाणे काळजी घेतली. त्यावेळी तिचा मुलगा युरोपमध्ये भारतीय सेनादलाच्या सेवेत होता.

त्या दयाळू हृदयाच्या स्त्रीने ज्यांना वाचवले ते काही वर्षांनंतर अध्यात्मिक प्रकाशाचा स्रोत होणार होते आणि भारतीय इतिहासात कधीही न घडलेली चळवळ सुरू करणार होते.

१९४७ साली, 'नॅशनल हेराल्ड' नावाच्या त्यावेळच्या प्रमुख वृत्तपत्रातून हिमालयातील साधू रचत असलेल्या ढोंगाचे बिंग फोडून सर्वांसमोर प्रकट करण्यासाठी बालकृष्ण ऋषिकेशला गेले. त्यांचा पहिला निवास ऋषिकेश येथेच होता. ह्या ठिकाणी अनेक अध्यात्मिक साधक आणि साधू बरचेवर येत असत. तेथे त्यांनी स्वामी शिवानंदांच्या 'आनंद कुटीर'ला भेट दिली. एक-दोन दिवसांतच बालकृष्ण त्यांच्या भेटीचा हेतूच विसरून गेले. स्वामी शिवानंदांच्या प्रेम आणि दिव्यत्वाने ह्या तरुण नास्तिकवाद्याला प्रभावित करून टाकले. ह्या महात्म्यांच्या वेदांत प्रवचनांनी त्यांच्यातील प्रतिसाद देणारी हृदयातील तार छेडली. तरुण पत्रकाराला आश्रम जीवन जुळत असल्यासारखे दिसू लागले.

स्वामी शिवानंद त्यांचे दैनंदिन कार्यक्रम (शांत चित्ताने) पार पाडीत. हे बालकृष्णनूला आश्चर्यकारकच वाटले. स्वामी शिवानंदांचे त्यांनीच सुरू केलेल्या विनामूल्य हॉस्पिटलचे व्यवस्थापन, लेख आणि पुस्तकांचे लेखन, त्यांना भेटण्यासाठी जगभरातून येणाऱ्या भक्तांसाठी वेळ काढणे, सायंकाळचा सत्संग घेणे, पाठोपाठ अध्यात्मिक ग्रंथांवर प्रवचन असे आणखीही काही कार्यक्रम त्यांच्या दैनंदिनीत समाविष्ट होते आणि तरीही दैवी शांततेचा लाभ ते इतरांनाही देत होते.

बालकृष्णनूनी त्यांची दोन दिवसांची भेट तीन महिन्यांपर्यंत लांबवली. दिल्लीला परत आल्यावर आपल्या वृत्तपत्राचे काम पुन्हा सुरू केल्यावर ह्या तरुण वृत्तपत्रकाराने त्यांच्या लिखाणात आणखी एक विभाग सुरू केला. तो म्हणजे ह अध्यात्मिक पुस्तकांचे परीक्षण. ह्यातील बहुतेक पुस्तके स्वामी शिवानंदांनी लिहिलेली, काही श्री. अरविंद यांनी तर काही इतर साधू-संतांनी लिहिलेली होती.

दिव्य जीवनाचे आवाहन लक्षपूर्वक ऐकत ह्या तरुणाने पुढील काही वर्षे दिल्ली आणि ऋषीकेशला चकरा मारण्यात घालविली. १९४८ च्या सुरुवातीला त्यांनी आपले वास्तव्य 'आनंद कुटीर'मध्ये जवळ जवळ हलवलेच होते. पण टपालाने आपले लेख ते दिल्लीला पाठवित असत. त्यानंतर आपल्या नातेवाईकांसमवेत हिमालयातील पवित्र स्थळांना भेटी देण्यात त्यांनी पाच महिने व्यतीत केले. ह्या दरम्यान त्यांनी उत्तरकाशीलाही मुक्काम केला व त्यांची तपोवन महाराजांबरोबर भेट झाली. ह्या यात्रेहून ऑगस्टमध्ये ऋषीकेशला परत आल्यावर बालकृष्णनूना संन्यास दीक्षा घ्यायची प्रबळ इच्छा झाली. पण त्यासाठी त्यांना आपल्या पित्याची परवानगी मिळवण्याची आवश्यकता होती. पण त्यांच्याशी तर बालकृष्णनूचा सात वर्षे काही संपर्कच नव्हता. याचे कारण आपल्या मुलाच्या हालचालींमुळे वडिलांना काळजी वाटू नये हेच होते.

बालकृष्णनूनी आपल्या पित्यांना ८ पानी विस्तृत पत्र लिहिले. त्यात त्यांनी आपल्या भावना, आपले जीवन म्हणजे फक्त खाणे, पिणे आणि प्रजनन एवढेच नसावे असे का वाटते याचे वर्णन केले. पत्र वाचून पित्याला धक्काच बसला. आपला जेष्ठ पुत्र, जो शालेय व महाविद्यालयीन काळात पैशानी विकत घेता येणाऱ्या सर्व उत्तमोतम वस्तूंकडे आकर्षिला गेला होता, जो फॅशनचा गुलाम होता, धर्मापासून परावृत्त झालेला होता त्याला संन्यास घ्यावासा कसा काय वाटू लागला हे त्यांना कळेना. शिवाय इतर मुलांप्रमाणे आपल्याही मुलाने विवाह करावा व आपण नातवंडांना खेळवावे हीपण इच्छा त्यांच्या मनात होतीच.

पण ह्याबद्दल आपल्या मुलाशी बोलणे निष्फळ आहे हे कुट्टन मेननना कळून आले. त्यांनी अंदाज बांधला की प्राण्यासारख्या क्षुद्र आनंदाचे जीवन सोडून देऊन आपला मुलगा स्वखुशीने तप-त्यागाचे जीवन निवडत असेल तर त्याचे कारण एवढेच की त्याची कोणत्या तरी महान संतांशी भेटगाठ झाली असली पाहिजे. त्यांनी परवानगी दिली.

२५ फेब्रुवारी १९४९ ला आणखी ५ शिष्यांबरोबर बालकृष्णनूना संन्यास देण्यात आला. स्वामी शिवानंदांनी त्यांना 'चिन्मयानंद सरस्वती' असे नाम दिले. त्याचा अर्थ 'शुद्ध चैतन्यमय आनंदाने पूर्ण असलेला.'

नवीन संन्याशाला शास्त्रांचा खोल अर्थ आकलन करण्यासाठी मार्गदर्शन करणाऱ्याची आवश्यकता आहे हे लक्षात घेऊन स्वामी शिवानंदांनी ह्या तरुण संन्याशाला उत्तरकाशीला पाठविले. स्वामी शिवानंदांनी त्यांना सांगितले, 'तुला धर्म शास्त्रावर प्रभुत्व प्राप्त करावयाचे आहे ना ? तर मग तुझ्याच प्रांतातील केरळातील महान गुरू स्वामी तपोवनम् यांच्याकडे जा.'

ऋषिकेशच्या उत्तरेला १०० मैलांवर गंगेच्या तीरावर उत्तर काशी हे खेडेगाव वसलेले आहे. येथे एका खोलीवजा झोपडीत महात्मा स्वामी तपोवनम् राहात होते. वेदांत ज्ञान प्राप्त करण्याची इच्छा असलेले तपस्वी त्यांच्या चरणाशी जाऊन बसत आणि त्यांची परम सत्यावरची प्रवचने श्रवण करीत. 'ह्या परम सत्याची स्वामी तपोवन महाराजांनी प्रत्यक्ष अनुभूती घेतलेली होती' असे स्वामी चिन्मयनंदांनी नंतर वर्णन केले आहे.

स्वामी तपोवनम् यांनी लिहिलेल्या 'Hymns to Badrinath' या पुस्तकाचे प्रास्ताविक लिहिताना १९६५ मध्ये स्वामी चिन्मयानंद म्हणतात, 'स्वामी तपोवनम् ब्रह्मानंदाने इतके परिप्लुत झालेले होते की त्यांनी अनुभवलेला ईश्वर साक्षात्कार, जो शास्त्रसंमत आणि भारताच्या इतिहासातील सर्व संतांना संमत आहे, तो इतरांबरोबर वाटण्याशिवाय ते दुसरे काही करूच शकत नव्हते.'

स्वामी तपोवन महाराजांचा आश्रम नव्हता, ना ते शिष्यांना बोलवत असत. त्यांचा दृढ विश्वास होता की, खऱ्या साधकाला योग्य गुरूकडे परमेश्वरच पोहोचवतो. त्यांच्याकडे काही विद्यार्थी आले पण फारच थोडे त्यांच्याजवळ दीर्घकाळ राहिले. ते कडक शिस्तीचे गुरू होते. ते त्यांच्या विद्यार्थ्यांकडून ज्या गोष्टींची अपेक्षा करीत त्यात तडजोड चालायची नाही. बर्फासारख्या थंड गंगेच्या पाण्यात दिवसातून दोनदा अंघोळ केलीच पाहिजे. तसेच धर्मशास्त्रांचा सखोल अभ्यास. संध्याकाळ होण्यापूर्वी अभ्यासपूर्ण झालाच पाहिजे कारण वीज नव्हती. आश्रमाची कामे केलीच पाहिजेत. कोरडी रोटी आणि कधी प्रसंगी डाळ, भाजी ह्यावरच भागवले पाहिजे. ही भिक्षा जवळपासच्या गृहस्थांकडून मिळत असे. थोडक्यात, स्वामी तपोवनम्‌ना त्यांच्या शिष्यांनी त्यांच्यासारखेच तपस्वी जीवन जगावे अशी अपेक्षा होती.

स्वामी तपोवन महाराजांच्या खोलीतील स्वच्छता राखणारा व त्यांच्यासाठी स्वयंपाक करणारा एक प्रेमळ रहिवासी - जगदीश, स्वामी चिन्मयानंदांचे आश्रमात आगमन कसे झाले ह्याचे १० वर्षांनंतर वर्णन करताना सांगत होता : 'माझ्या ३० वर्षांच्या स्वामी तपोवनम् यांच्या सेवा कालांतील सगळ्यात महान, दिव्य क्षण १० वर्षांपूर्वी आला. तो म्हणजे अतिशय उत्साही, गुरूंकडून वेदांत शिकण्यासाठी पूर्णपणे आसुसलेल्या एका गोड मुलाचा प्रवेश. त्या वेळेस उंच, सडसडीत बांध्याच्या स्वामी चिन्मयानंदांना पाहून, त्यांचे गुरू त्यांच्यावर टाकणार असलेला ज्ञानाचा भार पेलू शकतील का याचे बघणाऱ्याला आश्चर्यच वाटले असेल.'

स्वामी तपोवन महाराजांचा शिष्य म्हणून आवश्यक असलेले शारीरिक शिस्तीचे जीवन अवलंबण्यास तरुण स्वामी कटिबद्ध झाले होते. प्रत्येक दिवशी गुरू एखाद्या ग्रंथाचे काही श्लोक घेत असत व त्याचे निरूपण हिंदीतून करत असत. त्यांच्या प्रवचनांची स्वामी चिन्मयानंद लगेचच इंग्रजीतून टिपणे लिहून घेत असत. रोजी रात्री त्यांच्या वास्तव्याची खोली - म्हणजे गाईचा गोठा जेथे थंडगार वाऱ्याला जराही पायबंद नव्हता अशा ठिकाणी विश्रांती घेत. तेथे तासन् तास ते गुरूंनी केलेल्या निरूपणावर मनन करीत व ध्यानावस्थेत जात असत. मनात आलेल्या शंका विचारण्यास ते कधीही मागे-पुढे पहात नसत. असे इतर शिष्य कधीच करीत नसत.

जसा एखादा शिल्पकार ओबड-धोबड दगडातून सुंदर कलाकृती निर्माण करतो त्याचप्रमाणे स्वामी तपोवन महाराज ह्या उत्सुक शिष्यातील धारदार कडा काढून टाकत होते. त्यासाठी कधी ते मधुर वचनांचा उपयोग करीत तर कधी कठोर. प्रत्येक दिवसामागे स्वामी चिन्मयानंद आपल्या गुरूंना अधिक जाणत होते, अधिक पूज्य भाव बाळगत होते.

सात वर्षांनंतर, वेदांत ज्ञान पूर्णपणे ग्रहण करून हृदय आपल्या देशवासीयांच्या प्रेमाने पूर्ण भरलेले अशा स्थितीत स्वामी चिन्मयानंद त्यांनी नामकरण केलेली 'गंगोत्री योजना' अमलात आणण्यास तयार झालेले होते. त्यांनी ह्या योजनेला असे नाम देण्याचे कारण म्हणजे गंगोत्री - जेथे गंगा उगम पावते ते स्थान. येथे गंगेच्या तीरावर स्वामीजी बसले असता वेदांत ज्ञानाचा प्रसार जनताजनार्दनात करण्यावी दृढ प्रेरणा त्यांना आली. 'गंगामातेची ती गर्जना ऐकून मी थरारलो. हे मी करू शकतो ? सुशिक्षित वर्गासमोर मी उभा राहू शकतो ? त्यांच्या अश्रद्ध हृदयात आपल्या ह्या भव्य सांस्कृतिक वारशाच्या एक तरी जाणीव शलाका जागृत करू शकेन का ?' ह्या दिवसाचे स्मरण करीत अनेक वर्षांनंतर स्वामीजींनी म्हटले आहे. स्वामीजींच्या लक्षात आले की हे कार्य करण्यासाठी प्रथम त्यांना धर्मशास्त्रावर एकाधिकार सांगून त्यांचा विपरीत अर्थ वेदांत ज्ञान म्हणून प्रचार करणाऱ्या धर्म मार्तंडांशी त्यांना निकराची टक्कर द्यावी लागणार आहे. स्वामीजींना, सर्वसामान्यांना हवा जितकी सहजतेने मिळू शकते तितकी सहज उपलब्धता शास्त्रांची करून द्यावयाची होती. आव्हान तर जबरदस्त होते.

१९५१ च्या भारतभ्रमणानंतर त्यांनी दुःखपूर्ण उद्गार काढले, 'आश्रम आणि मंदिरे जी हिंदुत्वाची प्रतिके समजली जातात त्यांची दुरावस्था व दुर्व्यवस्था पाहून मी निराश झालो व माझा भ्रमनिरास झाला.'

पण स्वामीजींनी आपल्या योजनेबद्दल जेव्हा स्वामी तपोवन महाराजांना सांगितले, तेव्हा त्यांना काही त्याविषयी फारशी उत्सुकता वाटली नाही. त्यांनी आपल्या शिष्याला इशारा दिला की, ब्राह्मण पंडितांच्या हातून धर्मशास्त्रांचा ताबा काढून घेणे अतिशय अवघड आहे. त्यांनी अशीही सूचना दिली एकदा का संन्याशाने ह्या कार्याला हात घातला की तो अडकून पडेल. 'लोकांना जर वेदांत ज्ञान हवे असेल तर योग्य वेळेस ते गुरूकडे येतील.' स्वामी तपोवन महाराज म्हणाले, पण तरीही अंतिम निर्णय त्यांनी आपल्या शिष्यावर सोपवला.

स्वामी शिवानंदांनी 'गंगोत्री योजनेला' मनापासून पुष्टी दिली. १ वर्षांपूर्वी ते स्वतःच वेदांत ज्ञान प्रचार करण्यासाठी भारतयात्रेस गेले होते. अशा योजनेची आवश्यकता त्यांनाही जाणवली होती. त्यांनी स्वामी चिन्मयानंदांमध्ये ती तेजस्विता आणि निर्भयता अनेक वेळा बघितली होती. त्यांनी स्वामीजींची प्रवचने ऐकली होती. त्यांना खात्री होती की, युवक स्वामींच्या वेदांतावरील प्रवचनांनी लोकांना लाभ होईल. त्यांनी स्वामी चिन्मयानंदांना आग्रहपूर्वक सांगून पाठविले - 'जा स्वामी विवेकानंदांप्रमाणे गर्जना कर.'

प्रवचनाचे यश उपस्थितांची संख्या निर्देशित करीत असेल तर स्वामी चिन्मयानंदांचे २३ डिसेंबर १९५१ चे पुण्यातील पहिले प्रवचन म्हणजे पूर्णतः अपयशच होते. ह्या शहराच्या आपल्या आधीच्या भेटीत भेटलेल्या लोकांनी ठरवलेल्या प्रवचनाला फक्त १८ लोक उपस्थित होते. श्रोत्यांमध्ये काही टीका करण्याच्या उद्देशाने आलेला पुरोहित वर्ग होता. कारण आयोजित केलेल्या १०० दिवसीय उपनिषद् ज्ञानयज्ञाच्या बाबतीत लोकांना कळल्याबरोबर स्वामी. चिन्मयानंदांना पंडितांकडून धमक्या मिळण्यास सुरुवात झाली होती. 'स्वामीजींवर दैवी प्रकोप होईल आणि जर त्यांनी अ-ब्राह्मणाने धर्मशास्त्रांवर दीक्षा न घेतलेल्या लोकांपुढे इंग्रजीतून प्रवचने केली तर त्यांची जीभ झडून जाईल.' अल्पसंख्य उपस्थितीबद्दल संयोजकांना काळजी वाटत होती पण दृढनिश्चयी नवीन गुरूंना मात्र वाटत नव्हती.

'आपण हिंदू बनू या' ह्या धाडसी नावाखाली त्यांचे प्रास्ताविक व्याख्यानात ३२ वर्षांच्या दाढीवाल्या स्वामींनी आपल्या आश्वासक वाक्प्रभुत्वाने भारतातील अध्यात्मिक प्रचार मोहिमेच्या योजनेविषयी सांगितले. स्वामी चिन्मयानंदांनी श्रोत्यांना संबोधित करून सांगितले, 'भारतामध्ये हिंदुत्व म्हणजे पवित्र अंधश्रद्धा, वेशभूषेची, खाण्या-पिण्याची, बोलायची इ. एक विशिष्ट पद्धतीचे गाठोडे याहून अधिक काही नाही. आपल्या देवांना म्हणजे व्यवस्थापन अधिकाऱ्यांना मर्त्य पातळीपर्यंत आणले गेले आहे. सश्रद्ध हिंदू त्यांच्याच पीठाची प्रार्थना करेल व त्याला हवे असलेले परवाना पत्र मिळवून घेईल. म्हणजेच पुरोहितांना आवश्यक ती दक्षिणा देईल.'

शब्द परिणाम साधत होते. येथे उपस्थित असलेले स्वामी लोकांच्या परिचयाच्या भाषेत, त्यांच्या वैयक्तिक जीवनातील उदाहरणे देत सांगत होते. येथे एक व्यक्ती होती जी त्यांना सांगत होती की जर लोकांनी मनावर पक्के घेतले तर मनुष्यत्वाने सर्वोच्च वैभव ते गाठू शकतील. स्वामीजी जरी परम

सत्याबद्दल बोलत होते तरी त्यांच्या बोलण्यात हास्याचे कल्लोळ उठवणारे विनोद आणि खुमासदार कल्पक कथा समाविष्ट होत्या.

त्यानंतरच्या दुसऱ्या दिवसापासून पुढील ४२ वर्षांत जगाच्या वेगवेगळ्या भागात होणाऱ्या शेकडो ज्ञानयज्ञांपैकी पहिल्या यज्ञाला स्वामीजींनी सुरूवात केली. 'ज्ञान यज्ञ' ही संज्ञा त्यांनी श्रीमद्‌भगवत भक्तीतून उचललेली. तेथे श्रीकृष्ण भगवान जाहीर करतात की, ह्या पवित्र संवादाचे जो शिष्य अध्ययन करतो तो ज्ञानाच्या वेदीवर यज्ञ करतो.

सुरुवाती सुरूवातीचे यज्ञ ४१ ते १०० दिवसांपर्यंत चालत. पण नंतर स्वामीजींच्या वेळाची अधिकाधिक मागणी होऊ लागली आणि हे यज्ञ ७ ते १० दिवस ह्या कालखंडाचे झाले. ऑगस्ट १९९३ मध्ये महासमाधी घेईपर्यंत स्वामी चिन्मयानंदांनी त्यांचे अनुयायी त्यांना 'गुरूदेव' म्हणतात ह ५७६ ज्ञान-यज्ञ संपन्न केले. अनेक अध्यात्मिक शिबिरे घेतली. जगभर परिभ्रमण करताना त्यांनी लाखो मैलांचा प्रवास केला. दोन वेळा तीव्र हृदयाचे झटके येऊन गेल्यानंतर सुद्धा त्यांचा कर्मवेग इतका प्रचंड असावयाचा की, त्यांचे कार्य दिवसाला २५ तास, सप्ताहात ८ दिवस, आणि एक वर्षात १३ महिने होईल इतके असावयाचे.

त्यांच्या शारीरिक स्वास्थ्याकडे पाहता त्यांनी कामाचा वेग कमी करावा अशी त्यांना विनंती करणाऱ्यांना ते उत्तर देत, 'मी विश्रांती घेतली तर मी निकामी होईन.' ते थकले आहेत का असे एकदा त्यांना विचारले गेले असता ते हसले आणि उत्तरले, 'मी कर्म करत असतो तर मी थकलो असतो; पण (आकाशाकडे बोट दाखवून) भगवान नारायणच कर्म करीत असता मी कसा काय थकेन ?'

हातातील लेखणी आणि मौखिक शब्दांनी गुरूदेवांनी भारतीयांना आदी शंकराचार्यांशी परिचित करून दिले. अद्वैत वेदांती आचार्यांच्या ग्रंथांतून प्रतिपादन केलेले गूढ सत्य त्यांनी सर्वसामान्यांना समजेल अशा भाषेत मांडले. गुरूदेवांची भगवद् गीतेवरची रसाळ प्रवचने ऐकून कुरूक्षेत्राच्या युद्धभूमीवर अर्जुनाच्या मनात उडणारी खळबळ ही जीवनातील युद्धभूमीवर आपलीच उडणारी खळबळ आहे, ह्या बाबतीत श्रोते निःशंक झाले. अर्थातच गीतेची आपल्या जीवनात असलेली यथार्थता सहजपणे आणि लगेचच लोकांना समजून आली.

श्रीमद् भगवद्गीतेवरील भाष्यात गुरूदेवांनी लिहिले आहे, 'ह्या भगवद्गीतेमध्ये हिंदुत्व कृतीशील आहे. त्यांच्या ज्ञानाची कृतीशीलता एका व्यक्तीच्या जीवनातील समस्येवरचा तोडगा आहे, गुरूदेवांनी दाखवून दिले आहे की अर्जुनाची सुरुवातीची धक्क्याची, गोंधळाची आणि आपल्याच नातेवाईक, परिचित, गुरूजनांच्या समोर कुरूक्षेत्राच्या युद्धभूमीत उभे ठाकण्याची परिस्थिती ही बहुतेक लोकांच्या दैनंदिन जीवनाच्या युद्धातील आव्हानांना सामोरे जाताना उडणारा भावनांच्या गोंधळ ह्याहून काही भिन्न नाही आणि अर्जुन जसा त्या परिस्थितीतून, भगवान श्रीकृष्णांचा उपदेश ऐकून, बाहेर आला तसाच प्रत्येक मनुष्य अर्जुन-स्थितीतील गोंधळातून बाहेर येऊ शकतो असे गुरूदेव सांगतात. 'पण त्या व्यक्तीने अर्जुनाप्रमाणे श्रद्धेने आणि आग्रहाने गीतेचा आधार घेतला तर.'

४२ वर्षांच्या मानवतेच्या सेवेत गुरूदेवांनी विविध योजना हाती घेतल्या व त्यावर आपला शिक्कामोर्तब केला. अजूनही त्या योजना 'चिन्मय मिशन' च्या नावाखाली बहरत आहेत, वाढत आहेत. व्यक्तिगत त्यांना ह्या जगात काम करून ना काही मिळवायचे होते, ना काही गमवायचे होते. तरीही गुरूदेवांना आपल्या भक्तांना, त्यांचे व्यक्तिमत्त्व पूर्णपणे फुलवण्यासाठी वेगवेगळी क्षेत्रे उपलब्ध करून द्यावयाची होती.

संपूर्ण विश्वात बाराच्या आसपास सांदीपनी साधनालये - जेथे वेदांत ज्ञानाचा प्रसार करू इच्छिणाऱ्या तरुण-तरुणींसाठी दोन वर्षांचा निवास स्तरावर हिंदू धर्मशास्त्रांचा अभ्यास करण्यासाठी सोय केलेली आहे. ७२ चिन्मय विद्यालये, ६ महाविद्यालये, अवासीय भारतीयांच्या मुलांसाठी अंतर्देशीय निवासी शाळा, भारतात आणि भारताबाहेर मिळून ३० मंदिरे, बालकांसाठी बाल-विहार, युवकांसाठी युवाकेंद्रे, हॉस्पिटल, प्राथमिक आरोग्य काळजी (Primary health care facilities) घेण्याची व्यवस्था केंद्रे, धंद्यांविषयी प्रशिक्षण केंद्रे, अनाथाश्रम आणि ज्येष्ठ नागरिकांसाठी निवास स्थळे त्यांच्या प्रचंड अध्यात्मिक वारशात यांचा समावेश आहे.

ह्या सर्व योजना म्हणजे भक्तांना निःस्वार्थ सेवा करून वासनाक्षय करण्याची क्षेत्रे होतील ह्याबद्दल गुरूदेवांनी दक्षता घेतली. ते म्हणाले, 'आपल्या भोवतालच्या लोकांची सेवा करताना आपण ईश्वराचीच सेवा करीत असतो. जीवनातील प्रत्येक कृती सर्वव्यापी, नित्य सदाशिवाची पूजा आहे.'

मिशनची दृष्टी फक्त हिंदूंपर्यंतच किंवा फक्त भारतापुरतीच मर्यादित नसावी ह्यावर त्यांनी अनेक वेळा भर दिला. ते म्हणाले, 'आपली दृष्टी संपूर्ण मानव जातीला, सर्व देशांना, समाजाला सामावून घेईल. आपल्या भक्तीचा विषय मानव आहे आणि तोच आपल्या भक्तीचा मुख्य केंद्रबिंदू आहे.' आपल्या शिष्यांना, साधकांना, भक्तांना पुष्ट करीत अहोरात्र अथक परिश्रम करणारे, एका यज्ञ शाळेतून दुसऱ्या यज्ञशाळेत जाणारे सर्वांनाच प्रिय झालेल्या गुरूदेवांनी आपल्या आराध्य श्रीकृष्णामध्ये सामावण्याचा निर्णय घेतला. मिशनची यथायोग्य व्यवस्था लावून, शिष्यांना योग्य त्या सूचना देऊन मिशनचा भार अगदी योग्य अशा शिष्योत्तमाच्या स्वामी तेजोमयानंदजींच्या खांद्यावर टाकून हे महायोगी तपस्वी कालातील तत्त्व परब्रह्मात ३ ऑगस्ट १९९३ ला लीन झाले. ते ना कोठून आले, ना कोठे गेले. ते आहेत, आहेत आणि आहेतच. सगळ्यांच्या हृदयात. हे महान तत्त्व विलसत आहे. प्रेरणा, प्रकाश देत आहे. मार्गदर्शन करीत आहे. अनंत तत्त्वाला सांत शब्दात पकडणे कधीच शक्य नाही. पण शब्दावाचून त्याचा परिचय होत नाही. म्हणूनच हा प्रपंच. ही भावपूर्ण शब्दांजली परम पूज्य गुरूदेव स्वामी चिन्मयानंदांच्या चरणी सादर अर्पण.

**सौ. माधवी आनंद**
५०३ चंदन अपार्टमेंट, वाफेकर बंधू मार्ग, मुलुंड (६), मुंबई ४०००८१.
आधार : Chinmaya Mission Transforming Lives.

अलसस्य कुतो विद्या अविद्यस्य कुतो धनम् ।
अधनस्य कुतो मित्रं अमित्रस्य कुतः सुखम् ।।

सुखार्थी त्यजते विद्यां विद्यार्थी त्यजते सुखं ।
सुखार्थिनः कुतो विद्या कुतो विद्यार्थिनः सुखं ।।

# प्रतिज्ञा

**सौ. सविता चक्रवर्ती**

*चिन्मय मिशन मुलुंड केन्द्र सेविका.*

"We staud as our family bound to each other with love and respect"

मनुष्य समाजाचा एक घटक आहे. कोणत्याही व्यक्तीने कितीही स्वावलंबत्वाचा दावा केला तरीही जन्म घेतल्यापासून तो कितीतरी गोष्टींवर अवलंबून असतो. पहिल्या श्वासापासून लागणारी हवा ही काही स्वनिर्मित असत नाही. व्यक्तीच्या वाढीसाठी मिळालेले वातावरण, आजुबाजूचे लोक, वस्तू, निसर्ग इत्यादींचे दायित्व असते. ह्या सर्वांचे माणसाला भानही राहात नाही. हे भान ठेवणे अतिशय आवश्यक आहे. जमीन, आकाश, वायु, पाणी, उष्णता, वृक्ष, वेली, फळे, फुले, अन्न-धान्य, पशु-पक्षी, नातेवाईक हे कितीतरी घटक व्यक्तीचे जीवन समृद्ध करतात. अर्थातच ह्या सर्वांशी आपले संबंध कसे असावयास पाहिजेत ? आपला सर्वांकडे पाहण्याचा दृष्टिकोन कसा असावयास हवा याचे मार्गदर्शन करताना परमपूज्य गुरूदेव सांगतात - कुटुंबातील सभासदांप्रमाणे आपले संबंध असावेत. पण आजकाल कुटुंब म्हटले की, बऱ्याच वेळा विचित्रच चित्र दिसून येते. भावंडांमध्ये भांडणे, एकमेकांविषयी हेवे-दावे, असूया, राग-द्वेष, आदर-सन्मानाचा अभाव. प्रत्येकजण 'मी व माझे' ह्यात खोल खोल रुतलेला, आपल्या भोवतालच्या सीमा जितक्या संकुचित करता येणे शक्य तितक्या केलेल्या हेच सर्वसामान्य चित्र. अशा कुटुंबास शांती कोठून असणार ? समाधान कोठून असणार ? तेव्हा प्रथम आवश्यकता आहे कुटुंबाची मूल्ये, चांगल्या धारणा यांचे पुनर्वसन करण्याची. कुटुंबातील व्यक्तींना एकमेकांशी दृढ बांधून ठेवण्यासाठी आवश्यक असलेले सूत्र आहे 'प्रेम व आदरा'चे. कोणत्याही व्यक्तीस दुसऱ्यांनी आपल्यावर प्रेम करावे, आपल्याला आदर द्यावा, आपल्याला आनंद, शांती द्यावी, आपले जीवन सुखकर करावे असेच वाटत असते. आपल्याला कोणी दुःख द्यावे, आपला अपमान करावा असे कधीच कोणास वाटत नाही. मग हे प्राप्त करण्याची गुरूकिल्ली आहे, 'प्रथम तुम्ही दुसऱ्यांवर प्रेम करा, दुसऱ्यांना आदर द्या.' उत्तरार्थ तेही तुम्हास तशीच वागणूक देतील.' याही पेक्षा अधिक सूक्ष्म विचार तर असा सांगितलेला आहे की, सर्वात आधी स्वतःवर प्रेम करा. स्वतःचा आदर करा. एक गोष्ट निश्चित असते - आपण जेव्हा म्हणतो दुसऱ्या व्यक्तीने आपला अपमान, अनादर केला तेव्हा त्यापूर्वी आपणच आपला अपमान, अनादर आपल्या कृतीने, वचनाने, विचाराने केलेला असतो. जर आपल्याला आपला सन्मान करता येत असेल तर समोरच्या व्यक्तीची आपला अपमान करण्याची हिम्मतच होणार नाही. उदाहरणार्थ, भांडणांमध्ये एक व्यक्ती जेव्हा अपशब्द वापरते तेव्हाच दुसरी व्यक्ती अपशब्द वापरण्यास प्रवृत्त होते आणि अंततः दोघांचेही अधःपतन होते. पण पहिल्या व्यक्तीला जर भान राहिले की, वाणी ही ईश्वरप्रदत्त आहे, तिचा उपयोग आदरपूर्वकच केला पाहिजे. तेव्हा अपशब्द येण्याचा प्रश्नच येणार नाही. जरी दुसऱ्या कोणी अपशब्द वापरला तरी आपली वैचारिक धारणा आपल्याला तसे करण्याची अनुमती देणार नाही. थोड्या वेळाने समोरची व्यक्ती शांत तर होईलच पण ती व इतरही बघणारे लोक आपल्या संयमावर विचार करतील व त्यांच्या वर्तणुकीत सकारात्मक बदल घडवून आणण्याचा प्रयत्न करतील. होता होता संपूर्ण समाज मधूर वाणीचा अवलंब करू लागेल. जेव्हा निसर्गातील शक्तींनाही आपण प्रेमाने साद देऊ तेव्हा त्याही प्रेमानेच प्रतिसाद देतील. ह्याचे कारण भगवद् गीतेच्या तिसऱ्या अध्यायात स्पष्ट केले आहे. ब्रह्मदेवांनी निसर्गातील शक्तींना व मानवाला सृष्टीनिर्मितीच्या वेळेस संदेश दिलेला आहे. तुम्ही दोघे परस्परांमध्ये प्रेमादर भाव ठेवून एकमेकांची वृद्धी होईल असा व्यवहार ठेवा. ह्या निसर्ग शक्ती मानवाला त्याने जर निसर्गनियमांचे पालन केले तर श्रेयप्राप्त्यर्थ मदतच करतील व कामधेनू होतील.

भारतीय संस्कृतीत 'मी' ला जागाच नाही. मी च्या सीमा रूंदावत जाऊन विश्वाला भिडतात व ते 'वसुधैव कुटुम्बकम्' होते. विश्वाच्या कल्याणात व्यक्तीचे कल्याण सामावलेले असते. त्यामुळे आपल्या कल्याणासाठी वेगळी प्रार्थना करावयाची, प्रयत्न करावयाची आवश्यकता राहात नाही. भारताला स्वातंत्र्य मिळाल्यावर भारताच्या प्रत्येक नागरिकाला स्वातंत्र्य मिळालेच ना. म्हणूनच विश्वकल्याण साधण्यासाठी समाजातील प्रत्येक व्यक्ती, वस्तू, प्राण्यांशी आमचा संबंध प्रेमादराने दृढ असावयास हवा.

'प्रेम' ही मानवी मनाची अति सुंदर स्थिती आहे. पशु-प्राण्यांना, वृक्ष-वेलींना ते फारच कमी प्रमाणात असल्यामुळे त्याचे प्रगटन फारच मर्यादित स्वरूपात होऊ शकते. पण मानवाने दिलेले - दाखविलेले प्रेम जाणण्याइतकी प्रगल्भता मात्र त्यांच्या ठायी निश्चितच असते व ते प्रेमाला प्रतिसादही देतात. एक प्रेम स्वार्थरहित-करता आले की तदनुषंगिक क्षमा, दया, करुणा, अहिंसा इत्यादी गुण व्यक्तीच्या ठिकाणी आपोआपच येतात आणि त्याचे व्यक्तिमत्त्व आदर्श, उदात्त, सर्वसमावेशक होते. व्यक्ती समाजाचा घटक असल्यामुळे समाज, पर्यायाने राष्ट्र व नंतर संपूर्ण विश्वाचे उत्थान होते आणि प्रत्यक्ष स्वर्गच पृथ्वीवर अवतरतो. परमपूज्य गुरूदेवांनी प्रतिज्ञेच्या पहिल्याच पंक्तीत व्यक्तीच्या सुंदर व्यक्तिमत्त्वाचे आरोपण करून विश्व कल्याणाचे ध्येय निर्देशित केलेले आहे.

We serve as an army
courageous and disciplined
ever ready to fight against
all low tendancies and false values
within and without us.

प्रेम आणि आदर ह्या दोन उच्च आदर्शांवर बांधला गेलेला समाज संघटित झाला. मग त्या समाजाने काय करावे ? गुरूदेव म्हणतात, व्यक्तीत रुजलेले हे दोन मूलभूत सद्गुण कायम ठेवण्यासाठी काळजी घेण्याची आवश्यकता आहे. युद्धांच्या कथा वाचताना आपल्याला बऱ्याच वेळा दिसून येते की जिंकलेल्या

राजाला वाटते की शत्रू हरला आहे व तो विजयोत्सव साजरा करू लागतो. त्यात त्याच्या देशवासियांसहित तो रंगून गेला असतानाच पराजित राजा पुन्हा हल्ला चढवतो व विजयी झालेल्या राजाला गाफील पकडून हारवून टाकतो. अगदी तसेच, प्रेम-आदर वाढू लागले म्हणजे आपल्यातील हिणकस भावना पूर्णपणे नष्ट झाल्या आहेत. राग-द्वेष हद्दपार झाले आहेत, आसुरी गुण परत डोके वर काढणे शक्यच नाही अशा भ्रमात राहू नये. व्यक्तीच्या मनात, समाजाच्या मनात हे दुर्गुण कोठेतरी लपून-छपून राहतात व वेळ सापडला की जोराने उसळी मारून बाहेर येतात. त्यावेळेस त्यांची शक्ती प्रचंड असते. आणि मग व्यक्तीची, समाजाची मूल्ये क्षणात धुळीस मिळतात. म्हणून सतत जागरूक राहण्याची आवश्यकता आहे. ह्या निम्नप्रवृत्तींचा नाश करण्यासाठी, आम्हाला सदैव आपल्याकडे ओढू पाहणाऱ्या दिखाऊ मूल्यांचा सामना करण्यासाठी धैर्य व शिस्तबद्धता असावयास हवी. परमपूज्य गुरूदेव सांगतात. अशा शिस्तबद्ध व धैर्यशाली घटकांची आम्ही एक सेनाच आहोत. व्यक्तीतील व समाजातील निम्न, दिखाऊ मूल्यांशी लढा देण्यास आम्ही कटिबद्ध आहोत. पहिल्यांदा स्पष्ट केलेल्या प्रेम व आदराच्या भावना आम्हाला कमजोर बनवीत नाहीत तर अधिकच बलशाली बनवतात. त्या विरोधी भाव बाहेरून येवोत वा अंतरातून येवोत त्यांचे पूर्णपणे निर्मूलन करून आमच्या व्यक्तिमत्त्वाचे सौदर्य जोपासण्यासाठी तत्पर राहण्याविषयी बजावतात.

We live honestly the noble life of
sacrifice and service producing more than what we consume
and giving more than what we take

सेनेसारखी तत्परता, जागरूकता बाणवल्यानंतर काय फक्त युद्धप्रसंगाची वाट बघत बसावयाचे का ? अथवा युद्धप्रसंग बलपूर्वक निर्माण करावयाचे. परमपूज्य गुरूदेव सांगताना दोन्ही करण्याची आवश्यकता नाही. बुद्धीमध्ये हे सद्‌गुण ठसवल्यानंतर आपली जीवन जगण्याची पद्धत त्यागाधिष्ठित व सेवामय असावी.

'त्याग' हा शब्द ऐकताच लोकांच्या मनात भय निर्माण होते. त्यागमय जीवनाच्या बरोबर विरुद्ध असे भोगमय जीवन. वरवर असे दिसते की भोगमय जीवनात किती आनंद आहे. पण खरे तर आनंद भोगमय जीवनात नसून त्यागमय जीवनातच आहे. ह्याचे उत्कृष्ट उदाहरण म्हणजे श्रीराम व रावण.

श्रीरामांच्या जीवनात फक्त त्याग नू त्यागच दिसून येतो. अगदी लहान वयात, भावंडांबरोबर खेळताना श्रीराम मुद्दाम हार पत्करीत व भरताला खेळ जिंकू देत. भरतांच्या चेहऱ्यावरील जिंकण्याचा आनंद श्रीरामांना आनंदित करीत असे. सगळ्यात कळस म्हणजे राज्यलक्ष्मी प्राप्त होण्यास काही अल्पशा काळाचा अवधी असताना, पित्याने मातेला दिलेल्या वचनाचे पालन करण्यासाठी त्यांनी वनलक्ष्मीच्या वैभवाचा प्रसन्न चित्ताने स्वीकार केला व चवदा वर्षे वनवास भोगला. तेथेही ऋषी-मुनींच्या भेटी घेत, सत्संग, चिंतन करीत तो कालावधी आनंदात व्यतीत केला व अगणित लोकांना आनंदाचे दान केले. तर रावण त्रिभुवनाच्या संपत्तीचा उपभोग सुवर्णाच्या लंकेत राहून घेत होता. तरी असंतुष्ट, असमाधानीच होता. मोहयुक्त रावण आनंदाच्या जवळपास फटकूही शकत नव्हता. अतिभोग आनंद देण्यास समर्थ तर नसतात पण रोगांना मात्र निश्चितपणे आमंत्रण देतात. व्यक्तीला स्वार्थी, संकुचित बनवितात.

सुखोपभोगांतून मिळणारा आनंद अल्प, क्षुद्र असतो. विषय संपले की तो आनंदही संपतो. तो रजोगुणी किंवा तमोगुणी असतो. पण त्यागातील आनंद सत्त्वगुणी असल्यामुळे दीर्घकाळ टिकतो व शांती प्रदान करतो.

श्रीमद्‌भागवतामध्ये राजा रंतिदेवाची कथा येते. हा राजा आपल्याकडे येणाऱ्या प्रत्येक अतिथीला तृप्त केल्याशिवाय अन्नग्रहण करीत नसे. राजा असूनही तो त्याचा उदरनिर्वाह भिक्षान्नावर करीत असे. एकदा असे काही परीक्षेचे क्षण आले की, बऱ्याच दिवसांनंतर त्याला चांगली भिक्षा प्राप्त झाली. घरातील इतर लोकही उपवास घडणार नसल्यामुळे आनंदित झाले. पण अतिथींची अशी काही रीघ लागली की त्याला खाणे तर सोडाच पण पिण्यासाठी पाणीही पुरेसे उरले नाही. तरीही हा श्रेष्ठ राजा परमेश्वराची प्रार्थना करू लागला की, सर्व प्रजेची दुःखे माझ्याकडे येवोत व प्रजाजन सुखी होवोत. असा हा त्यागातील आनंद अद्‌भुत आहे. त्याचा प्रत्यक्ष अनुभव घेतल्यावाचून तो कळत नाही. म्हणूनच संत महात्मे असे त्यागमय जीवन जगतात. त्यांना काही त्यांच्या त्यागाचे प्रदर्शन करावयाचे नसते किंवा कोणाकडून सहानुभूती मिळवावयाची नसते. त्याग त्यांना आनंद देतो. त्यागामुळे व्यक्तीचे विकसन होते, परमार्थाकडे वाटचाल होते. प्रत्येक व्यक्ती कळत-नकळत कोठेतरी त्याग करतच असते. त्याग अपरिचित आहे अशी व्यक्ती क्वचितच असू शकेल. पण तो जाणीवपूर्वक सदासर्वकाळ केल्याने अधिक लाभदायक होतो. मानवाच्या अंतिम उद्देशाप्रत घेऊन जातो. मग ह्या त्यागाविषयी भय, उदासीनता, न्यूनगंड का बरे असावा ? त्यागाबरोबरच गुरूदेव सेवेचा संदेश देतात. रावण सर्वांकडून आपली सेवा करून घेत होता. प्रत्यक्ष ब्रह्मदेव, वायुदेवता, इंद्र इत्यादी रावणाची सेवा करीत होते आणि रावण निर्लज्जपणे त्यांच्याकडून सेवा घेत होता. तरीही तो सुखी नव्हता. श्रीरामचंद्र मात्र कोणाकडूनही आपली सेवा करून घेत नसत. तर स्वतः सर्व प्राणीमात्रांची सेवा करीत असत. जसे त्यागाचे तसेच सेवेचे. सेवा करून प्राप्त होणारा आनंद अनुभवल्याशिवाय ध्यानात येत नाही. सेवामय जीवन हेच खरे सार्थ जीवन. निसर्गातील सर्व शक्ती अहोरात्र सेवा करीत असतात. पृथ्वीमाता सर्व प्राणीमात्रांना आधार देऊन सेवा करीत असते. चंद्र, सूर्य, वायु, आकाश, जल, अग्नि, वृक्ष, पर्वत ही केवढी सेवा करीत असतात ह्याचा आपण विचार तरी करतो का ? विचार तर करीत नाहीच पण बऱ्याच वेळा त्यांच्याशी आपला व्यवहार कृतघ्नपणाचा असतो. पृथ्वीवर किती अत्याचार करतो आपण ? पण ती मात्र त्याकडे दुर्लक्ष करून आपले सेवाव्रत अखंड चालू ठेवते. जल म्हणजे पाणी. त्याला आपण जीवन म्हणतो पण इतका अनादर करतो की विचारता सोय नाही. तसेच वृक्ष-वेली, पर्वत इतर प्राणी याबद्दल आणि मग आपल्या कृतघ्नतेचा कळस झाला की आपल्याच दुष्कर्मांचा परिणाम म्हणून, ह्या शक्तींचे संतुलन बिघडते व त्या शक्ती अगदी अल्पशा प्रमाणात आपल्यावर उलटल्या तरी आपण त्यांचा वेग सहन करू शकत नाही. तेव्हा वर आलेल्या उल्लेखानुसार ब्रह्मदेवांनी सांगितल्याप्रमाणे आपण ह्या शक्तींचा आदर करण्यास शिकले पाहिजे व त्यांच्याप्रमाणे आपलेही जीवन सेवा व त्यागमय बनवले पाहिजे. मग ऋद्धि-सिद्धी सेवा करण्यास हात जोडून उभ्या राहतील.

क्षणोक्षणी आपण कितीतरी वस्तू ग्रहण करीत असतो, घेत असतो. निसर्गात फक्त मनुष्यच असा आहे की, जो फक्त घेणेच जाणतो. देणे जाणत नाही. म्हणून गुरूदेव येथे मंत्र देतात, आपण जितके घेतो त्याच्या अधिक पटीने आपण दिले पाहिजे. दिल्यामुळे आपल्या शक्ती, वैभव कधीच कमी होत नाहीत तर द्विगुणित होतात.

संकुचितता व्यक्तीला संकुचित बनविते, विशालता विशाल बनविते. म्हणूनच गुरूदेव सांगतात, संकुचितता सोडा. हा मानवाचा धर्म नाही. विशाल व्हा. विश्वात्मक व्हा, विराट व्हा. विराटातून सर्व आले आहे. विराटातच आहे व

विराटातच लीन होणार आहे. मग येथे संकुचित वृत्तीला थारा कसा ? तुमच्याकडे जे काही असेल त्याने ह्या जगताची सेवा करा. मुक्तहस्ताने ते वाटा. देण्याने ना विचार कमी होत, ना भावना कमी होत, ना शक्ती क्षीण होत, ना वैभव ऱ्हास पावत. तेव्हा द्या, द्या आणि द्या. देण्यातील, सेवेतील, त्यागातील आनंद अनुभवा. आनंद आपले स्वरूप आहे. तो आपला वारसा आहे. अशा प्रकारचे जीवन हेच खरे जीवन. ते आपण प्रामाणिकपणे जमले पाहिजे.

We seek the Lord's Grace
to keep us on the path of
virtue courage and wisdom

आता गुरूदेवांनी दाखविलेल्या सन्मार्गावर चालण्यासाठी आपल्यात पुरेसे सामर्थ्य, धैर्य, सद्गुण, ज्ञान आहे का ? ह्या सगळ्यांचे दान करणारे आहेत प्रत्यक्ष परमेश्वर. ते म्हणजे पूर्ण धैर्य, सर्वगुणसंपन्न, ज्ञानस्वरूप आहेत. तेव्हा हे गुण आमच्यात अवतरण्यासाठी परमेश्वराची आम्ही करुणा भाकतो. जेव्हा आपण म्हणतो, माझ्यात इतके सद्गुण आहेत. मला ज्ञान आहे, माझ्यात धैर्य आहे तेव्हा अहंकार बळावतो. अहंकार व्यक्ती-व्यक्तीमध्ये भेद निर्माण करतो, भिंती निर्माण करतो, संकुचितता आणतो. हा अहंकाराचा वारा लागून उन्मत्तता न येऊ देण्यासाठी, प्रमत्तता न येऊ देण्यासाठी परमेश्वराला शरण जाणे हा एकच उपाय आहे आणि आमच्यातील न्यूनता भरून काढण्यास तो समर्थ आहेच. परमेश्वराविषयी उत्कृष्ट भाव जोपासण्यास व अहंकार नष्ट करण्यास जीवन प्रार्थनामय असावयास हवे. अशी विनम्रता व्यक्तीच्या सद्गुणांचा उत्कृष्ट साज आहे. त्याविना सर्व सद्गुण शोभाहीन आहेत.

म्हणून जीवन सेवामय, त्यागमय, प्रार्थनामय असावे.

May Thy grace and blessings flow
through us to the world around us

परमेश्वराची प्रार्थना करताना परमेश्वराचे आशीर्वाद प्राप्त करताना त्याची विनवणी करावी की, तुझे आशीर्वाद सर्वांना उपलब्ध आहेतच. ते माझ्यामार्फत आजूबाजूच्या जगात वितरीत व्हावेत. जगामध्ये कार्य करताना 'मी कर्ता' असा भाव येणे अगदी स्वाभाविक आहे. 'मी कर्ता' झाल्याबरोबर 'मी भोक्ता' होणे क्रमप्राप्तच आहे. अहंकार वाढीला लागून [illegible] कुंठित होतो. पण तेच आपल्याला स्वत:लाच परमेश्वराच्या [illegible] कर्तृत्व-भोक्तृत्व भाव संपुष्टात येतात. मोक्षाचे दालन खुले होते. परमेश्वराच्या हातातील बासरी व्हावे. त्याला हवे ते स्वर छेडू देत. त्यातून निर्माण होणारे संगीतसूर आसमंतात भरून राहतील व त्यात व्यक्तीचा 'सीमीत मी' विरून जाईल. अहंकार नष्ट झाला की परमेश्वर स्वरूप, विश्वातून प्रत्यक्ष प्रकट होईल. ह्या संपूर्ण समर्पणात कोठलेही भाव नाहीत, ना कर्म ना कर्मफल, ना कर्ता ना भोक्ता.

We believe that the service of
our country is the service of Lord of Lords
and devotion to the people
is the devotion to the Suprem Self

'आम्ही' पासून सुरुवात केल्यानंतर व्यक्तिगत अहंपणाच्या भिंती कोसळून पडल्या की व्यक्ती स्वत:पुरती मर्यादित न राहता देशसेवेच्या माध्यमातून झेपावते ती थेट विश्वसीमेपर्यंत. ही देशसेवा म्हणजेच देवसेवा आहे. देवसेवा म्हणजे काही मूर्तींत सीमीत नाही. एकदा का सर्वदेशीय परमेश्वराचे दर्शन झाले, त्याची सेवा सुरू झाली की मूर्तीपूजा-मूर्तीसेवा गौण ठरते. जनताजनार्दनाची भक्ती म्हणजे परमात्म्याची भक्ती आहे. मग अशा विश्वव्यापी व्यक्तीस देश-काळ-वस्तूचे बंधन राहात नाही. सगळे विधी-नियम त्याच्यासाठी शिथील होतात. तोच विश्वरूप बनून राहतो. आता आणखी करणीय त्याच्यासाठी असे काही राहातच नाही. त्याचा परमेश्वर म्हणजे विश्व. त्याचे आराध्य जनताजनार्दन व त्यांची सेवा हीच त्याची पूजा. हीच त्याची भक्ती !

We know our responsibilities
Give us the ability and courage to
fulfill them.

'मी'पासूनचा प्रवास खूप मागे पडला. 'अज्ञ' जीव सज्ञान झाला. प्रथम किंकर्तव्यमूढ जीवाला जीवनदृष्टी प्राप्त झाली. जीवनाचे लक्ष्य दृष्टिपथात आले. आपले कर्तव्य काय याची जाणीव झाली. पुरुषार्थ करावयाची तयारीही झाली आहे. तेव्हा परमेश्वराकडे एकच प्रार्थना आहे ह 'एक पाऊल मी तुझ्या दिशेने उचलतो आहे. माझे साध्य साधण्यासाठी आवश्यक ती क्षमता आणि धैर्य तू मला दे.'

अशा प्रकारे परमपूज्य गुरूदेवांनी ह्या प्रतिज्ञेद्वारे प्रत्येक व्यक्तीस मार्गक्रमणा करण्यासाठी पथनिर्देशन केले आहे. वेदांत तत्त्वांनुसार पुरुषार्थ करण्यासाठी प्रवृत्त करण्याची ताकद ह्या शब्दांमध्ये आहे. कर्मयोग, भक्तियोग व ज्ञानयोगाचा संदेश त्यात सामावलेला आहे. गरज आहे विचारपूर्वक त्याचे अवलंबन करण्याची.

॥ ॐ तत् सत् ॥

सौ. सविता चक्रवर्ती



स्वामीजींचे पहिले व्याख्यान

# बनू या (२३ डिसें

एक हिंदू स्वामी बोलणार ! पार्श्वभूमी म्हणून एक हिंदू मंदिर. हिंदू श्रोत्यांच्या गर्दीने भरलेला हॉल आणि चर्चेचा विषय : 'आपण हिंदू बनू या.' विचित्रच ! हा प्रसंग हास्यास्पद विरोधाभास आणि अर्थहीन विसंगती असल्यासारखा वाटतो. ह्या स्वामीच्या धीटपणाबद्दल तुम्हाला वाटणारे आश्चर्य मला स्पष्टपणे दिसत आहे.

सुशिक्षित हिंदूची कोणत्याही चर्चेत त्याच्या धर्माचा नुसता उल्लेख केला तरी त्याबद्दल नाक मुरडणे आणि अनादर करणे ही एक नवीन फॅशन झाली आहे. व्यक्तिशः माझी स्वतःची सहानुभूती आपल्या धर्माच्या ह्या समीक्षकांच्या बाजूने आहे. पण जेव्हा हा अविचारी चमू आपल्या पवित्र धर्मापासून पळून गेल्याने आपला सामाजिक व राष्ट्रीय फायदा होईल असे जाहीर करण्यास सुरुवात करतो तेव्हा माझी बाजू तपासून पाहण्यासाठी क्षणभर थांबतो.

आपल्या देशातील नैतिक, सांस्कृतिक अधोगतीच्या वर्तमान परिस्थितीत धर्म पूर्णतः नाहीसा करणे हे विनाशाकडे आपली वाटचाल गतिमान करण्यासारखे आहे. आपला धर्म कितीही अधोगतीस पावलेला असला तरीही कुठलाही धर्म नसण्यापेक्षा ते चांगले आहे. माझी अशी योजना आहे की, हिंदुत्वाचे पुनरूज्जीवन करण्यासाठी आपण प्रयत्न करणे शहाणपणाचे ठरेल म्हणजे अनेक शतकांतून सिद्ध केल्याप्रमाणे आपल्या धर्माच्या महानतेत आपण आपल्या संस्कृतीच्या, सुसंस्कृततेच्या शिखरापर्यंत जो एकेकाळचा आपला इतिहास होता तेथपर्यंत पोहोचू शकू.

भारतामध्ये हिंदुत्व ह्याचा अर्थ धर्मवेडेपणाने वाटणारी अज्ञानाची भीती किंवा पोशाखाची, स्वयंपाकाची, खाण्याची, बोलण्याची इत्यादी इत्यादी विशिष्ट पद्धती ह्याशिवाय आणखी काही नाही. आपल्या केवळ नैतिक पातळी असलेल्या व्यवस्थापन अधिकाऱ्यांच्या पातळीपर्यंत उतरल्या आहेत. [illegible] निष्ठावान हिंदू प्रार्थना करील आणि आपल्याला इच्छित असलेल्या वस्तूंसाठी विशेष परवाना मिळवून घेईल; थोडक्यात, पुजाऱ्याची आवश्यक दक्षिणा दिली तर !

हे अधःपतन कोणत्याही अपघाती, अकस्मात ऐतिहासिक क्रांतीचे फळ नाही. दोनशे वर्षांपर्यंतच हिंदुत्व राज्याश्रयाविना आणि श्रीमंतांकडून थोडेसेही प्रोत्साहन नसलेले.अशा अनावश्यक अनाथ स्थितीत होते. एकेकाळी पंडित, तत्त्वज्ञानी हे राज्याचे योग्य सल्लागार होते. पण नंतर ब्राह्मण व क्षत्रिय वर्गाची गुणवत्ता खालावली. स्वतःला ऐषारामाच्या व सत्तेच्या महारोगी उबेत कुजवत त्यांनी आपल्याला आत्ता आपण असलेल्या शोचनीय अवस्थेप्रत आणून ठेवले. सुशिक्षित वर्गाची ओरड ह्या 'अधर्म'तेच्या विरुद्ध आहे. तथापि, अविचारी, माहिती नसलेले नेतेच ह्याला 'हिंदुत्व' असे म्हणतात.

निश्चितपणे, हिंदुत्व आपणासाठी फक्त निर्दय दुकानदार, भ्रष्टाचारी कारकून, भित्रे पुरुष, प्रेम नसलेले मालक, अविश्वासू नोकर उत्पन्न करणार असेल; हिंदुत्व आपल्याला फक्त अशाच प्रकारचे सामाजिक जीवन देऊ शकत असेल की ज्यात प्रत्येक माणूस आपल्याला भावाविरुद्ध, जर हिंदुत्व आपल्याला केवळ भूक, विवस्त्रता, गरीबी देऊ शकत असेल; जर हिंदुत्व आपणास लूटमार, चोरी करण्यास प्रवृत्त करू शकत असेल; जर असहिष्णुता, हटवादीपणा, निर्दयता, क्रूरता हीच मूल्ये शिकवू शकत असेल तर मी सुद्धा त्या हिंदुत्वाबद्दल असेच ओरडेन 'नाश होवो, नाश होवो'.

आणि तरीसुद्धा वर वर्णन केलेल्या दुःखद परिस्थितीचे वास्तव चित्र आहे ज्याच्यात हिंदू लोकांनी स्वतःला एक राष्ट्र म्हणून पतित होऊ दिले आहे. वर्तमान भारतातील महान हिंदू धर्माच्या अनर्थाचे हे दुःखद चित्र आहे.

पण हिंदुत्व म्हणजे जो आपण आपल्या दैनंदिन जीवनात प्रदर्शन करण्यास शिकलो आहोत तो बाह्यात्कारी देखावा नाही. हिंदुत्व हे पूर्णत्वाचे शास्त्र आहे. [illegible]मध्ये प्रत्येक व्यक्तीच्या, सामाजिक, राष्ट्रीय, आंतरराष्ट्रीय प्रश्नास उत्तर आहे. पण दुर्दैवाने आपण अंधतेने पालन करीत असलेला धर्म हा खरा उदात्त हिंदू धर्म नाही. ज्यांचा हेतू - आपणास त्यांच्या योजनेचे व वासनांचे गुलाम बनवणे असा होता - अशा स्वार्थी, उद्धट, सत्तावेड्या पुजारी वर्गाकडून आपणावर लादली गेलेली ही पूर्वापार फसवी योजना आहे. आजचा अडाणी हिंदू हा धर्मविषयक असे घातपाती कृत्य करणाऱ्यांचे दुःखद यश सिद्ध करतो. त्यांच्या मार्गदर्शनाने 'आपल्या हिंदू धर्माचा कणा आहेत अशा आपल्या पवित्र शास्त्रांमध्ये सांगितलेल्या मूलभूत सिद्धांतांकडे' दुर्लक्ष केले आहे. खरा हिंदू धर्म हा 'उपनिषदा'त सांगितलेला 'सनातन धर्म' आहे.

उपनिषदे अचूक शब्दांमध्ये जाहीर करतात की स्वरूपतः माणूस - त्याच्या प्राप्तव्याच्या उच्च शिखरावर असलेला - स्वतःच ईश्वर आहे. त्याला असा सल्ला देण्यात आला आहे की, त्याने त्याच्या दैनंदिन जीवनातील अनुभव अशा संयोजित व शास्त्रीय रीतीने जगावेत की प्रत्येक तासागणिक तो जाणीवपूर्वक आपल्या अपूर्णतेचा साठलेला जाड थर दूर करेल ज्याच्यामुळे त्याचे सौंदर्य, दिव्यत्व आणि त्याच्यातील खरे शाश्वत, व्यक्तिमत्त्व झाकले गेले आहे. प्रत्येक व्यक्ती ज्या पद्धतीने स्वतःस जाणीवपूर्वक स्वप्रयत्नाने आपले खरे स्वरूप प्राप्त करून घेण्यासाठी शुद्ध व उन्नत करू शकेल त्या पद्धती म्हणजे हिंदुत्वाचा विषय आहे. हिंदुत्वाने त्याच्या खुल्या विशाल दालनात त्याच्या तत्त्वांना पुराणे, शास्त्रातील विस्तृत वर्णनांनी आणि त्यावरच्या टीकांनी त्याच्या हजारो वेगवेगळ्या स्पष्टीकरणांनी सुरक्षित आणि आच्छादून ठेवले आहे. इतक्या विस्तृत परिणामकारक रीतीने सत्याच्या मंदिराची भव्यता व खरे सौंदर्य ह्यांची जपणूक केली आहे की आज 'महाविद्यालयीन पदवी विभूषित अशिक्षित' त्यांच्या भाषेच्या आणि पुरातन संस्कृत लेखकांच्या शैलीच्या अज्ञानामुळे, फुलांच्या माळा व तोरणांमध्ये मंदिरच हरवून बसलेत.

आपल्या धर्म ग्रंथांमधून हिंदू धर्मास आपणास काय शिकवावयाचे आहे आणि त्याचा संदेश आपल्या दैनंदिन जीवनाचे प्रश्न सोडविण्यासाठी कसा

काय उपयोगात आणता येईल हे जाणून घेणे हे, पुण्यात ३१ डिसेंबर १९५१ पासून सुरू होणाऱ्या ह्या शतदिवसीय उपनिषद् ज्ञानयज्ञाचे लक्ष्य आहे.

जर साधक, धर्मातील आदर्श जीवनात उतरवण्यास तयार नसतील तर धर्म मृत व अपरिणामकारक ठरतो. तसेच पाहिले तर असे कुठलेतरी राजनैतिक, सामाजिक किंवा सांस्कृतिक तत्त्वज्ञान आहे की जे त्याची तत्त्वे दैनंदिन जीवनात न पाळता सुद्धा अभिवचन दिलेल्या यशाच्या प्रांतात घेऊन जाऊ शकेल ?

भूतकाळात आपली संस्कृती कितीही महान असली तरी इतिहासाच्या पानांमधून वर्णन केलेली तिची मृत महानता आपणास आजच्या परिस्थितीत उपयोगी पडत नाही. अज्ञान जंगलात गुहेत राहणाऱ्या असंस्कृत मानवास जर आधुनिक देशांतील लोकांसारखे सुसंस्कृत व्हावयाचे असेल तर ही आमूलाग्र क्रांती फक्त प्रवचनांमधून किंवा आधुनिक सुसंस्कृत देशांतील पद्धतींचे विस्तारपूर्वक वर्णन करणाऱ्या वाङ्मयाचे अध्ययन करून त्यांना साध्य करून घेता येणार नाही. त्यांना जीवनाची सुसंस्कृत मूल्ये माहीत करून घ्यावी लागतील आणि त्याप्रमाणे ती जगावी लागतील. नुसती ती समजून घेण्याने त्यांना काही फायदा होणार नाही. त्यांना आपल्या ज्ञानाचे फलस्वरूप प्राप्त करून घ्यावयाचे असेल तर तसे त्यांना जे समजले आहे ते जीवनात उतरवून करून घेता येईल. सुसंस्कृत माणसासारखे जगण्यासाठी त्यांना त्यांचे असंस्कृत विचार व कर्मे ही पूर्णपणे सोडून द्यावीच लागतील.

वस्तुतः त्याग केल्याशिवाय कोणतीच प्रगती होणे कधीच शक्य नाही. आपल्याला सत्कृत्ये करणारी तरुण व्यक्ती बनण्यासाठी बाल्यावस्थेतील खेळांमध्ये वाटणाऱ्या आनंदाचा त्याग केला पाहिजे. पुन्हा परिपक्व वयाचा आदर, तारुण्यातील जोषाचा त्याग केल्याशिवाय मिळवता येणार नाही.

जर आपण भौतिक जीवनाच्या पशुतुल्य नीच मूल्यांचा त्याग करण्यास आणि त्याऐवजी खऱ्या धर्मयुक्त जीवनाच्या उदात्त मूल्यांचा बदल करण्यास तयार नसू तर आपण धर्माच्या कृपाप्रसादाची आशा ठेवू शकत नाही. कितीही उत्कृष्ट पाककलेच्या पुस्तकाच्या अभ्यासाने आपली भूक भागणार नाही. औषधाच्या नावाचा कितीही वेळा जप केला किंवा कितीही वेळ त्यावर ध्यान केले तरी आपल्याला हवा असलेला गुण जोपर्यंत आपण ते औषध घेत नाही तोपर्यंत येणार नाही. जसे गुहेत राहणारी माणसे शेकोटी भोवती बसून प्रगत संस्कृतीविरुद्ध केवळ तक्रार करून तिला कमी लेखतात तसेच आचरणात न आणलेल्या धर्माचा धिक्कार करणे हे तेवढेच निरर्थक आहे. हे सत्य जाणले तरच धर्माचा कृपाप्रसाद आपणास प्राप्त होईल.

ह्या शतदिवसीय उपनिषद ज्ञानयज्ञाच्या दरम्यान सर्व सत्य धर्मांचे रसस्वरूप सार असलेले शाश्वत सुख व आनंदाचा शोध घेण्याचा आपण प्रयत्न करणार आहोत. ह्या शंभर दिवसात आपण उपनिषदांमध्ये उद्घोषित केलेल्या सत्य तत्त्वांच्या प्रकाशात सार्वजनिक जीवनाचा शास्त्रीय अर्थ समजून घेण्याचा प्रयत्न करणार आहोत. आपण हिंदू धर्माचे जे सार आहे त्या पूर्णत्वाच्या शास्त्राच्या शोधाप्रत येऊ.

हिंदुत्व म्हणजे काय ते आपण जाणून घेऊ ! केवळ आपल्यासाठीच नाही तर संपूर्ण विश्वासाठी आपण आपल्याशी प्रामाणिकपणे शपथ घेऊ या की एकदा का आम्हाला शाश्वत सत्याच्या आधाराची खात्री पटली की पवित्र आणि सनातन धर्माने पुरस्कार मूल्ये जितक्या प्रमाणात शक्य होईल तितक्या दृढपणे जगण्याचा आम्ही प्रामाणिक प्रयत्न करू.

आपण हिंदू बनू या आणि हजारो शंकराचार्य, शेकडो बुद्ध, डझनांनी विवेकानंद असलेल्या खऱ्या हिंदुस्थानची (हिंदूंचे घर) रचना करू या.

# 'कथा संन्यासाची'

कु. शोभा
जमशेदपूर

दिनांक ३ जुलै १९७०

ओम् ! ओम ! ओम् !

प्रणाम

तुझं हिंदीत लिहिलेले सुंदर पत्र, वाचायला थोडं जड गेलं खरं, पण वाचून खूप आनंद वाटला. तुझ्या पत्रांतला प्रत्येक शब्द स्नेहाने, प्रेमाने ओथंबलेला होता; आणि प्रत्येक ओळींतून तो मला जाणवत होता. तू मला प्रामुख्याने खालील ३ प्रश्न विचारले आहेस.

**१) तुम्ही स्वामीजी (संन्यासी) कां झालात ?**

**२) तुम्हाला एकांतवासातलं आयुष्य आवडतं कां ?**

**३) तू 'स्वामी' व्हावस कां ?**

खरं सांगायचं तर तुझं लहान वय लक्षात घेता, तुझ्या प्रश्नांची उत्तरं तुला समजतील अशा भाषेत कशी द्यावीत हाच माझ्यापुढे प्रश्न आहे. तरीसुद्धा तुझ्यापुढे मी माझे विचार मांडणार आहे.

**१. तुम्ही स्वामीजी कां झालात ?**

हे बघ माझे आईवडील व इतर नातेवाईक मंडळी ही अत्यंत श्रद्धाळू व धार्मिक होती. माझे बालपण त्यांच्या सहवासात, त्यांनी जोपासलेल्या त्याच वातावरणात गेलं. ती वडीलधारी मंडळी पुराणांतल्या विविध गोष्टी सांगत. त्यांतल्या श्रीरामांच्या कथांनी मला भारून टाकलं; तर श्रीकृष्णाच्या मोहक व सुंदर रूपानी आणि प्रेमळ वागण्याने मोहित केलं. हनुमानाची निस्सीम भक्ती, राधा व इतर गोपिकांची श्रीकृष्णावर असलेली श्रद्धायुक्त भक्ती, ध्रुवाचा दृढ निश्चय, प्रल्हादाचा नारायणावरचा अतुलनीय विश्वास याही कथा माझ्या मनावर ठसा उमटवून गेल्या. जसजसा मी मोठा होत गेलो व वरच्या वर्गात गेलो, तसतसा मी शालेय अभ्यासात गुंतत गेलो आणि मग सहाजिकच धार्मिक अध्ययन मागे पडत गेलं. आणि कॉलेजात गेलो तेव्हा तर यापूर्वी ऐकलेल्या त्या गोष्टी निरर्थक आहेत, असंच वाटायला लागलं. माझ्या मनात शंकाकुशंकांच काहूर माजलं...आणि त्या शंकांचं निरसन करायला, मला कोणी मिळालंच नाही, (त्यामानानं तुम्ही मुलं भाग्यवान आहांत. कारण 'बालविहार' वर्गात तुम्हाला तुमच्या प्रश्नांची उत्तर मिळतात.)

मी कॉलेजातून बाहेर पडल्यावर राजकारणांत शिरलो. पण या सर्व खटपटींत माझ्या स्पष्ट लक्षात आलं की मला हवा असलेला आनंद वा समाधान यांत कुठेही मिळत नाही. उलट अगदी चिमुकला आनंद मिळवण्याकरता या जगांत अतोनात व प्रमाणाबाहेर कष्ट करावे लागतात. एवढं असूनही त्या आनंदाला चिंतेची व दु:खाची झालर असते ते वेगळंच. त्यामुळे त्या आनंदाचं स्वरूप आपल्यापाशी पोचेपर्यंत त्यांतली गोडी, त्याची ओढ संपलेली असते. सारांश इतकाच की जे आयुष्य त्यावेळी जगत होतो ते पूर्णतया निरर्थक व असमाधानकारक होतं. त्यामुळेच मी आपल्या धर्माचा, धर्मग्रंथांचा अभ्यास करण्यास प्रेरीत झालो. अध्ययन करताना वेदान्ताबद्दलची माझी जाण वाढत गेली. आणि मग सहाजिकच असं वाटायला लागलं की आपण या अध्ययनासाठी पूर्ण वेळ दिली पाहिजे. आपलं पूर्ण आयुष्य या कार्याला वहायचं तर गुरूचे मार्गदर्शन हवे म्हणून मी माझ्या गुरूंकडे गेलो. त्यांच्या मार्गदर्शनाखाली अभ्यास करताना, हे ज्ञान तुमच्यासारख्या मुलांना द्यावं असं वाटायला लागलं... आणि या ज्ञानाचा सर्व जगतात प्रसार व्हावा असंही वाटायला लागलं. शोभा, संन्यास म्हणजे हे कार्य करण्याकरता धारण करण्याचा गणवेषच आहे. आणि एकदा तो घातला की त्याच्याशी प्रामाणिक रहात सर्वांचीच सेवा करायला हवी. मला वाटतं हीच माझी संन्यास घेण्याची कथा आहे.

**२. तुम्हाला एकान्तवासातील आयुष्य आवडतं कां ?**

हे बघ शोभा, मला एकटेपणा कधीच जाणवत नाही. मी एकटा राहतो हे खरं आहे. बघ गोंधळलीस ना ? या दोन्हींतला फरक तुझ्या लक्षात आला का ? एकदा मी कॉलेजात असताना एका श्रीमंत माणसाने त्याच्या सुंदर बंगल्याची चावी मला दिली. बंगलासुद्धा प्रशस्त, वनराईने वेढलेला, डोंगराच्या माथ्यावर होता. आसपास मैलभर तरी दुसरं कुठलंही घर नव्हतं. माझा अभ्यास काहीही अडचण न येता व्हावा हाच त्यांचा उद्देश होता. मला खूप आनंद झाला. मी लगेच बंगल्यात रहायला गेलो. संध्याकाळी माळ्याने मला सलाम ठोकला आणि तो निघून गेला. घरमालक तर आधीच परवानगी काढून आपल्या मुलांना भेटण्यास शेजारच्या खेड्यात गेला होता आणि खरं सांगू, त्या विशाल असा दुसरं कुणीही नसल्यामुळे मला बेचैन वाटायला लागलं. त्या घरात मला एकटं एकटं वाटायला लागलं... एकटेपण जाणवायला लागलं...

पण पुढे मी उत्तरकाशीला माझ्या आश्रमांत एकटाच बसलो होतो तरी मला एकटेपणा जाणवला नाही किंवा त्याची भीतीही वाटली नाही. कारण ठाऊक आहे कां तुला ? शोभा, आपण जेव्हा एकटे असतो असं दिसतं तेव्हा ते खरे आपण त्या परमेश्वराजवळ असतो. पण आपले विचार जेव्हा त्या परमेश्वराला सोडून दुसरीकडे भरकटतात तेव्हा आपल्याला एकटेपणा जाणवतो. कुठल्याच व्यक्तीला एकटेपणा आवडत नाही. कारण एकटेपणाला दु:खाची सावली असते आणि तीच वेदना व दु:ख देते. पण त्या जगन्नेत्या श्रीकृष्णाबरोबर सतत असणं, त्याचा सतत विचार करणं हाच जीवन जगण्याचा योग्य, सुखद मार्ग होय. तात्पर्य, संन्यासी होणं म्हणजे त्या जगद्गुरू कृष्णाबरोबर एकटं आयुष्य सत्कार्यी लावणं होय.

आता मला सांग शोभा, असं मस्त 'एकांती' जीवन तुला नाही का आवडणार ?

**३. तू स्वामी (संन्यासीनी) व्हावसं का ?**

शोभा तू मुलगी आहेस, आतां तुला मुलगा होता येणार नाही. तसंच तुला

'स्वामी' होता येणार नाही. फार तर स्वामिनी होता येईल. तसं पाहिलं तर प्रत्येक स्त्रीला 'स्वामिनी' बनता येईल पण त्याची आज गरज आहे का ? मुळीच नाही. त्या जगदीश्वरावर नितान्त विश्वास ठेवणारे व त्याची सदैव भक्ती करणारे सर्व महान भाग्यवंत होत (महात्मा).

आणि हे बघ शोभा, त्या जगदीश्वराचे महात्म्य जर जगाला, त्यांच्या चरित्रांतून, कथांतून सांगायचं असेल तरच तुला 'स्वामिनी' व्हावं लागेल, अन्यथा नाही.

सोपंच उदाहरण द्यायचं तर एखाद्या आंधळ्या माणसाला रस्ता ओलांडून जायला मदत करताना अथवा ऐन रहदारीच्या वेळी, वाहाने इतस्तत: पळत असताना, एखादा लहान मुलगा जर रस्त्यामध्ये पळू लागला तर त्याला आवरताना, [illegible], आपल्याला पोलीस होण्याची गरज नाही. हे काम तुम्ही केव्हाही करू शकता.

पण समजा तुम्हाला, रस्त्यावरची रहदारी कर्तव्य म्हणून दिवसभर नियंत्रित करायची आहे, त्यांना मार्गदर्शन करायचं आहे, तर मग त्या वाहतूक-पोलीसाचाच गणवेष घालणं भाग आहे. नाहीपेक्षा तुमचे हातवारे पाहून तुम्हाला लोक वेडे म्हणतील. त्या जगदीश्वराची भक्ती करण्यास, त्याचं चिंतन करण्यास तुला स्वामिनी होण्याची गरज नाही. पण त्या वाहूतक नियंत्रकासारखे तुला सर्व समाजाला जर भगवंताचे महात्म्य समजावून सांगायचे असेल, पटवून द्यायचे असेल तर मग तुला गेरू रंगाची साडी परिधान करणं योग्यच ठरेल. कारण सर्व जीवनभर, मृत्यूपर्यंत तुला हेच कार्य करावे लागेल. आपलं सर्व जीवन, आयुष्यातला क्षण न् क्षण त्या जगदीश्वराच्या पायाशी अर्पण करावा लागेल.

पण खरं सांगू, हे सगळं तुझी बी.ए.ची परीक्षा झाली की ठरवू शकतो. नाही का ? प्रेम -

चिन्मयानंद



## श्री दत्तात्रेय प्रसन्न

**परिचय प. पू. स्वामी चिन्मयानंदांचा**

होता पूर्वाश्रमी अतर्क्य सगळे
तो केरळी मेनन
धर्माची अवहेलना करितसे
वाटे मनी खेद न
जिज्ञासू असता जनास पुसिले
या कारणे कौतुके
जावे तूं हिममंदिरी म्हणुनियां
त्यांनी दिली उत्तरे ॥१॥

नंतर
शंका त्या निरसोनि ज्ञान दिधले
नंदा शिवा प्रत्यही
होते पुण्यमई सपात्र म्हणुनी
संन्यास दिक्षा दिली
होता 'चिन्मय' वाणि ती प्रकटली
सत्संग तो लाभता
वृत्ती ध्येय तया तपोवन गुरू
देती स्वये तत्वता ॥२॥

तद्नंतर
झाला चिन्मय तो जसा शुकमुनी
वैराग्य संपन्नही
बुद्धाची करुणा, दयाघन असे
ख्रीस्तापरी योग्यही
ज्ञानी, भक्त गुणी तसाच गमला
आचार्य श्री शंकर
ध्येयाने करि जागृती गुरूकृपे
तो मानवी भास्कर ॥३॥

ज्ञानाचा यश दीप घेवुनि करी
तो थोर वाचस्पती
'मी मी क्रोध नि काम यात रमता'
होणार कैसी गती
सांगे ते अति कौतुके सकळिका
आली जना जागृती
देशी अन् परदेशि ती बहुजना
ती आलि ही अनुभुती ॥४॥

नाही आज हयात चिन्मय जरी
चित्तात नित राहिले
देते सौख्यस्मृती मनी तरळता
ते बोल हृदयातले ॥६॥

श्री गुरू निरोपे परिपूर्ण


**शां. गो. पोतदार**
१५८८ सदाशिव पेठ, टिळक रोड, पुणे ४११०३०. दूरध्वनी : २४३३७५६२

# स्वामी चिन्मयानंदांची

**डॉ. सौ. सुमती देशपांडे**

*एम.ए. मराठी, एम. एड., पीएच.डी. मराठी हिंदी भारुड काव्य - एक अभ्यास. ३० वर्षे नोकरी - कर्मवीर भाऊराव पाटील हिरे हायस्कूल उपमुख्याध्यापिका म्हणून निवृत्त. ३ वर्षे संत नामदेव अध्यासनात संशोधन सहाय्यक. संत साहित्यावर निरनिराळ्या मासिकांतून लेख.*

## प्रास्ताविक

भारतीय संस्कृतीच्या इतिहासात काळाच्या गरजेनुसार 'धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ।' या भगवंतांच्या वचनाप्रमाणे, अत्यंत प्रेमाने प्रगटलेल्या युगपुरुषांनी जगाचा उद्धार करण्यासाठी, जगाच्या कल्याणासाठी मानवावतार धारण केला. सर्वसामान्य मानवाप्रमाणे जन्माला येऊन सांस्कृतिक, धार्मिक पुनरुत्थानाचे, जनजागृतीचे महान कार्य केल्यामुळे भारतीय संस्कृती टिकून राहिली. आधुनिक काळात श्रीमद् शंकराचार्य, स्वामी विवेकानंद इत्यादी महान् ऋषीपरंपरेचा मागोवा घेत संत ज्ञानेश्वरांच्या

*'व्यासांचा मागोवा घेतु । भाष्यकारातें वाट पुसतु ॥'*

या ओवीप्रमाणे आजच्या विज्ञानयुगात वेदान्तज्ञानाच्या प्रचाराद्वारे, पुनर्जागृती समाजात घडविणारे तत्त्वज्ञ, संत 'स्वामी चिन्मयानंद' यांच्या अनेक पैलुंपैकी त्यांच्या 'राष्ट्रभक्ती'संबंधी थोडासा विचार या लेखाद्वारे करण्याचा मानस आहे. आधुनिक समाजाचे सूक्ष्म अवलोकन केल्यानंतर स्वामीजींना असे आढळून आले की, आज बाह्य सुखसोयींनी युक्त असलेल्या पण आध्यात्मिक ज्ञान व संस्कृती विसरलेल्या सुशिक्षित पिढीला आंतरिक शांती, समाधान मिळत नाही. ही आजच्या मानवी जीवनाची शोकांतिका आहे. प. पू. स्वामीजींनी 'जीवनात सुख हे बाह्य व्यवस्थेवर अवलंबून नसून आंतरिक अवस्थेवर अवलंबून आहे 'जसे मन तसा माणूस' असे पटवून दिले आहे.स्वामीजींचे सर्व जीवन अलौकिक आणि दिव्य आहे.

## राजकीय पार्श्वभूमी

भारताला स्वातंत्र्य मिळून चार वर्षे झाली होती, तेव्हा म्हणजे १९५१ साली प. पू. स्वामीजी तपोवन महाराजांचे शिष्य म्हणून त्यांच्याकडील वेदाध्ययन पूर्ण करून गुरूंच्या आज्ञेप्रमाणे भारत वर्षाचा दौरा करून आले. दोनशे वर्षे परकीय सत्तेचे जुलूम सहन करून हा देश एका विमनस्क स्थितीत होता. भारतावर तुर्क, अफगाण, मुसलमान अशा अनेक राष्ट्रांनी आक्रमणे केली आणि सोन्याचा धूर निघत असलेल्या या भारत भूमीतून संपत्ती लुटून नेली. ब्रिटिशांच्या राजवटीने भारतात इंग्रजी शिक्षण पद्धती सुरू केली. त्यामुळे अनेक लोक प्रभावित झाले. पण त्याबरोबर त्यांची अस्मिता संपवत गेली. पण काही बुद्धिमान लोकांनी याच शिक्षणाच्या माध्यमातून समता, गणतंत्र, स्वायत्तता या संज्ञांशी आपले नाते जोडले आणि त्यांनीच सुराज्य निर्मितीची स्वप्ने पाहिली. समाजवादी पार्टीचे मुख्य पुढारी श्री. जयप्रकाश नारायण यांच्यापासून स्वामीजींनी स्फूर्ती घेतली आणि भारताच्या 'स्वातंत्र्य लढ्यात' स्वत:ला झोकून दिले. दुसरे महायुद्ध सुरू झाले आणि गोपाळकृष्ण गोखले, बाळ गंगाधर टिळक यांसारख्या नेत्यांनी भारताच्या स्वातंत्र्याची बाजू उचलून धरली. भारतात राहणारे ब्रिटिश रूबाबदार आणि श्रीमंतीत रहात होते. इंग्लंडच्या [illegible] वैभवात ब्रिटिश व्हाइसरॉय राहत होते. त्यांना पूर्ण जाणीव होती की, आता वैभवात ते स्वत:च्या देशात राहू शकणार नाहीत. गांधीजींनी १९४२ साली 'चले जाव' चळवळ सुरू केली. स्वामीजी त्या लढ्यात भाग घेतलेले एक विद्यार्थी होते. ते लखनऊ महाविद्यालयात शिकत होते. भारतभर चाललेल्या धरपकडीत स्वामीजींवर 'एक मद्रासी' म्हणून पकड वॉरंट काढले होते. ते त्यावेळी भूमिगत झाले आणि त्यानंतर ते काश्मीरमध्ये फिरत राहिले. एक वर्षानंतर त्यांनी काश्मीर सोडले आणि दिल्लीजवळ अकोटाबाद गावात ब्रिटिश इंटेलीजन्स कम्युनिकेशनच्या सेंटरमध्ये 'मशीन ऑपरेटर' म्हणून नोकरीला लागले. स्वत:च्या बुद्धिमत्तेच्या जोरावर ते ब्रिटिश ऑफिसरचे पी.ए. झाले. त्यामुळे त्यांच्या रहाण्या, जेवणाचा प्रश्न सुटला. लखनऊच्या विश्वविद्यालयाची पदवी त्यांना मिळवायची होती. मनमिळावू स्वभाव, इंग्रजी भाषेतील संभाषण चातुर्य यामुळे ते ऑफिसर्सना प्रिय झाले. याच काळात वैमानिक होण्यासाठी ते कोचीनला गेले. पण दृष्टिदोषामुळे त्यांना नाकारण्यात आले. अकोटाबादहून ते पंजाबात आले. ते स्वातंत्र्य सैनिकांबरोबर काम करू लागले. तेथेच त्यांना अटक झाली. ब्रिटिशांनी त्यांना तुरुंगात टाकले. ओली, कोंदट, अंधारी जागा, तेथील थंडी, अस्वच्छता यामुळे स्वामीजींना रोगाची लागण झाली. त्यांना तुरुंगातून बाहेर काढले. पण त्याच वेळी एका ख्रिश्चन स्त्रीने त्यांना आपल्या घरी नेऊन त्यांच्यावर औषधोपचार केले. ती स्त्री स्वामीजींच्या रूपात स्वत:च्या युरोपमध्ये लढणाऱ्या मुलाला पहात होती. त्या ख्रिश्चन स्त्रीला कल्पना नव्हती की, तिने भविष्य काळातील एका थोर हिंदु महात्म्याचे प्राण वाचविले होते.

## राष्ट्रभक्त चिन्मयानंद

भारताचे प्राचीन वैभव पुन्हा मायभूमीला मिळवून देणे हे स्वामीजींचे जीवित कार्य होते. त्यासाठी भारतवासीयांमध्ये राष्ट्रप्रेम, राष्ट्र व संस्कृतीचा अभिमान, सेवाव्रत इत्यादी गोष्टी बाणविण्यासाठी त्यांनी आपले जीवन वेचले. जेव्हा जेव्हा भारतावर परकीय देशांकडून आक्रमण झाले; तेव्हा तेव्हा राष्ट्रभक्तीने भारलेले भारताच्या थोर व अतुलनीय संस्कृतीचा अभिमान असणारे, भारताच्या त्यागी आणि क्षमाशील मनोवृत्तीचे दर्शन घडविणारे लेखन त्यांनी केले. इ. स. १९६२ साली चीनने भारतावर आक्रमण केले, त्यावेळी स्वामीजींनी ऑल इंडिया रेडिओवर भाषण केले. त्याचे शीर्षक 'आव्हानाला सामोरे जा !' असे होते. राष्ट्रावरील प्रेम, धर्माबद्दल असलेली नितांत आणि अढळ श्रद्धा यांनी उत्स्फूर्त असे भाषण केले.'आम्ही शांततेसाठी प्रार्थना करू. पण अधर्मापुढे नमणार नाही. समाधानात राहू, पण आक्रमकांपुढे मान तुकवणार नाही. आम्ही नरम आहोत, पण शुद्ध प्रतिक्रियेत नाही. आपण या आव्हानाला यशस्वीपणे तोंड देणार आणि आमचा हिमालय परत मिळवणारच.' असे उत्स्फूर्त भाषण केले.

मुंबईच्या 'सांदीपनी साधनालया'ची स्थापना ९ जानेवारी १९६३ साली झाली. तेव्हा स्वामीजींनी जे भाषण केले, त्यामध्ये 'आपला देश संकटात आहे, त्यापेक्षाही आपला धर्म जास्त संकटात आहे. सांस्कृतिक, धार्मिक आधार सुटला की, भारतवासीयांना एकजूट राखणे कठीण होणार आहे. आपल्याला भारतीय म्हणून अभिमानाने जगायचे असेल, तर आपल्या भारतीय संस्कृतीचे संरक्षण व संवर्धन केले पाहिजे, कारण तेच आमचे 'स्फूर्ती स्थान' आहे.' याच काळात बंगलोर आकाशवाणीवरून केलेल्या भाषणात असेच भाषण केले होते. 'आपल्या भूतकाळाच्या श्रेष्ठ संस्कृतीचा, ऋषी परंपरेचा गर्व वर्तमान काळात माणसाला कोणताही त्याग करायला स्फूर्ती देतो; म्हणून आपल्या संस्कारले असे राष्ट्रप्रेम व स्फूर्ती जागृत करण्याचे प्रयत्न केले पाहिजेत. त्यागी वृत्ती निर्माण केली पाहिजे. बऱ्याच लोकांनी तसे आचरण करून आपल्या लोकांपुढे आदर्श निर्माण केले पाहिजेत. उत्तम जीवनपद्धती कशी असावी, हे दाखविणारा श्रीमद् भगवत् गीतेसारखा दुसरा ग्रंथ नाही.' असे स्वामीजी म्हणत.

इ. स. १९६५ साली स्वामीजी परदेश दौऱ्यावर गेले असताना आपल्या प्रवचनातून 'वेदांचा संदेश हा सर्व मानव जाती करता आहे' हे त्यांना सांगायचे होते. देशाभिमान आणि भारतीय तत्त्वज्ञान याबद्दल स्वामीजींना अत्यंत आदर वाटत असे. ते एका पत्रात लिहितात, 'एखादा स्वच्छ दूरदर्शी असलेला, ध्येयावर निष्ठा असलेला, त्यागी, थोर नेता जर आपल्या देशाला लाभला, तर माझी खात्री आहे की, आपल्या सर्वांच्या जीवनातील कचरा दूर होईल आणि रंध्रारंध्रातून आपल्या संस्कृतीचा सुगंध उधळून वर येईल.' या सर्वांमधून स्वामीजींचे आपल्या देशावरील प्रेम, निष्ठा, आदर दिसून येतो.

इ. स. १९६५ मध्ये पाकिस्तानने जेव्हा भारतावर हल्ला केला, तेव्हा सर्व चिन्मय मिशनच्या सभासदांना उटकमंडहून स्वामीजींनी जे पत्र पाठविले होते, त्यामध्ये सुद्धा, आपले सर्व कार्य आपल्या संस्कृतीच्या रक्षणाकरता राष्ट्रसेवेकडे वळविले पाहिजे. त्यासाठी प्रत्येकात त्याग करण्याची, धैर्य दाखविण्याची क्षमता निर्माण केली पाहिजे. आपल्या सनातन ऋषींच्या पवित्र भूमीबद्दलचा भक्तिभाव तरुणांमध्ये वाढविला पाहिजे' असे लिहिले होते. त्यासाठी स्वामीजींनी ज्ञानयज्ञ सुरू केले. स्वामीजी युद्ध सरहद्दीवर जाऊन आले. जवानांसाठी पैसा, धान्य, कपडे जमवून त्याचा विनियोग करण्याकरता सर्व देशभर केंद्रे सुरू केली. १९६५ च्या युद्धात राष्ट्रप्रेमाने भारलेल्या जवानांनी अमेरिकेच्या रणगाड्यांचा धुव्वा उडविला.

भारताला स्वातंत्र्य मिळाल्यावर ३६ वर्षे झाल्यानंतरही भारताची स्थिती सामाजिक, राजकीय, आर्थिक सुधारली नाही. हे पाहून स्वामीजींचा जीव तुटत असे. तरुणांना उद्देशून 'तरुण व राष्ट्रजागृती' या विषयावर भारताचे चित्र रेखाटून तरुणांना मार्गदर्शन करणारे भाषण त्यांनी केले. तरुण मुलांमध्ये राष्ट्रभक्ती दिसत नव्हती; त्याला कारण स्वातंत्र्यानंतर दिले गेलेले 'शिक्षण' असे स्वामीजींचे मत होते. 'भारत' हा शब्द स्फूर्तिस्थान बनवायला हवा होता. ते झाले नाही. उलट ऐषारामी नोकऱ्या कराव्यात. कष्ट करायला नकोत, त्याग करायला नको, असा भ्रष्टाचारी विचार समाजात बोकाळत होता. याचे अपार दुःख स्वामीजींना होत असे. 'हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंत माझा देश आहे. त्यातला प्रत्येक मानव माझा बांधव आहे. हे मनात ठसविणे गरजेचे आहे', असे स्वामीजींना वाटे. 'भारतात समाज दोनच आहेत : १. जे हिंदू होते २. जे हिंदू आहेत. भारतीय परंपरा ही ८२ टक्के असलेल्या हिंदूंची आहे. हिंदू भरभराटीला आले तर देश भरभराटीला येईल. राजकीय नेते यामध्ये उगीचच भेद पाडतात. त्यामुळे हताश न होता त्यातून बाहेर पडले पाहिजे. तरुणांनो, तुम्हीच भारताचे शिल्पकार आहात !' या आणि अशा या पूर्वीच्या भाषणातून त्यांनी समाजातील तरुण पिढीला साद घातली कारण भारताची धुरा ही यापुढे तरुण पिढीच वहाणार होती.

स्वामीजींची प्रवचने ही केवळ ज्ञानप्रदर्शने नव्हती, तर ती भावपूर्ण असून प्रभावी होती. ती थेट हृदयात उतरत होती. प्रवचनासाठी व्यासपीठावर येताक्षणीच सुरुवातीला न चुकता ते श्रोत्यांना वंदन करीत आणि संपल्यावर पुन्हा हात जोडत. कशाचाही पोकळ अभिमान त्यांनी बाळगला नाही. आपल्या जवळ असलेल्या विद्येचे मनन करणे आणि त्या विद्येचा इतर लोकांना फायदा होणे हे दोन उद्देश त्यांचे असत. प्रत्येक वेळी काळ, सामाजिक परिस्थिती, राजकीय गुंतागुंत याचे त्यांना भान असे. त्यामुळे त्यांचे प्रवचन लोकांना समाधान देत असे. लहान मुले समोर असतील, तर ते हावभावासह गोष्टी सांगून त्यांना हसवत; तर तरुण वर्गासमोर राष्ट्रातील, समाजातील समस्या मांडून त्यांना यशस्वीपणे तोंड देण्याइतके बलवान कसे व्हावे ते शिकवीत.

## समारोप

प. पू. स्वामीजींनी आपले कार्य पुढे चालू राहण्यासाठी ८ ऑगस्ट १९५३ साली 'चिन्मय मिशन' नावाची संस्था स्थापन केली. स्वामीजी म्हणतात, 'चिन्मय मिशन' हे एक कुटुंब आहे, हे विसरू नका. आपापसात दुष्ट बुद्धी ठेवू नका. प्रचारक म्हणून काम करताना आपले ध्येय डोळ्यांपुढे ठेवा.' स्वामी तेजोमयानंदांनी स्वामीजींच्या कार्याबद्दल थोडक्यात वर्णन केले आहे, ते यथार्थ आहे.

*'ज्ञानयज्ञप्रचारंच ब्रह्मचारिप्रशिक्षणम् ।*
*श्रुतिस्मृतिपुराणादि आख्या ग्रंथप्रकाशनम् ।*
*बालकेषुच संस्कारो विचारो युवकेषुच ।*
*धर्मनिष्ठा देशभक्तिर्लोकसेवा तथैवच ॥ चिन्मयाष्टकम् ॥'*

या महान विद्वान, राष्ट्रप्रेमी संतांचे महानिर्वाण अमेरिकेतील सॅन डियागो येथे ३ ऑगस्ट १९९३ रोजी झाले. ९ ऑगस्ट १९९३ रोजी सिद्धबारी येथील सांदीपनी आश्रमात विधीपूर्वक भूसमाधी वैदिक मंत्रांच्या घोषात देण्यात आली.

**डॉ. सौ. सुमती देशपांडे**
३६/४, एरंडवणा, पांडुरंग कॉलनी,
'संकल्प बंगला', पुणे ४११०३८.
दूरध्वनी : २५४३०५७६



विद्या मित्रं प्रवासेषु भार्या मित्रं ग्रहेषु च
व्याधितस्यौषधं मित्रं धर्मो मित्रं मृतस्य च ॥

पुस्तकस्था तु या विद्या परहस्तगतम् धनम् ॥
कार्यकाले समुत्पन्ने न सा विद्या न तद् धनम् ॥

# चिन्मयानंद स्वामी

सौ. शुभांगी गजानन पानसे

*एम.ए.बी.एड. कविता करण्याचा छंद. काव्यसंग्रह प्रसिद्ध. उत्कृष्ट कथाकथन.*

गीता म्हणजे योगेश्वर भगवान श्रीकृष्णाच्या मुखातून स्रवलेले माधुर्य व सौंदर्य ह्यांचे वाङ्मयीन स्वरूप. भगवान गोपाळकृष्णांच्या प्रेम मुरलीने गोकुळात सर्वांना मुग्ध केले, तर योगेश्वर श्रीकृष्णाच्या ज्ञानमुरलीने, गीतेने, कुरूक्षेत्राच्या रणभूमीवर अर्जुनाला युद्धासाठी प्रवृत्त केले. आजपर्यंत अनेक ज्ञानी, भक्त, विद्वान लोक मग ते कुठल्याही देशातील अथवा काळातील असोत, त्या सर्वांना गीतेने मुग्ध करून सोडलेले आहे. या गीतेने मानवाला जीवन जगण्याची हिंमत दिली आहे.

मी विद्वान नाही, संस्कृत साहित्यज्ञ नाही, योगी नाही, तरीही गीता मला आवडते. कारण योगेश्वर कृष्णांवर माझी निष्ठा आहे. कॉलेजमध्ये कुठलाही अभ्यास करताना गीतेतील वचने मधून मधून भेटायची. पण गीतेची ओळख झाली ती चिन्मय मिशनशी संबंध आल्यावरच. चिन्मयानंदांनी आपले सर्व आयुष्य ज्ञान, वक्तृत्व गीतेचा प्रचार करण्यात घालवले. मला त्यांचे प्रत्यक्ष ऐकण्याचे भाग्य लाभले नाही. तरीही पूज्य पुरुषोत्तमानंदांची प्रवचने ऐकून गीतेचा अर्थ समजत गेला.

प. पू. स्वामी चिन्मयानंद मूळचे केरळचे. ८ मे १९१६ साली दक्षिण भारतातील एर्नाकूलम येथील पूथमपल्ली यांच्या घरात त्यांचा जन्म झाला. त्यांचे खरे नाव 'बालकृष्णन् मेनन'. वडील त्रिचूरचे. कुरूपथ कुटून मेनन. कोचीन संस्थानचे मुन्सफ म्हणून ते काम करीत. स्वामीजी घरातील मोठा मुलगा. दोन लहान बहिणी. अशा सुसंस्कृत, सुशिक्षित संपन्न घराण्यात त्यांचा जन्म झाला. घरातील वातावरण अतिशय धार्मिक, रूढिप्रिय होते. दररोज बराच वेळ साग्रसंगीत पूजा होत असे व सर्व मुलांनी त्यावेळी जप, नामसंकीर्तन, सायंकाळी केलाच पाहिजे अशी कडक शिस्त होती. छोट्या बालनूला भावला तो त्याच्या स्वभावाशी जुळणारा. चंद्रकलाधारी शिव शंकर.

देवीची पूजा चालू असायची. एक तासभर तिच्यावर अभिषेक, फुले वहात असत. छोट्या बालनूला नेहमी प्रश्न पडायचा की, ती देवी भक्तांचा एवढा त्रास का सहन करते ? पूजेच्या काळात तो शिवाचे ध्यान करायचा, ती प्रतिमा तशीच त्याच्या डोळ्यांसमोर उभी रहायची. ती उपासना आहे हे पुढे मोठ्या वयात त्यांच्या लक्ष्यात आले.

ते पत्रकारिता शिकले. मूळचेच चिकित्सक, हुशार असल्याने स्वातंत्र्य लढ्यात ओढले गेले. इंग्रजांचा ससेमिरा चुकवण्यासाठी ते ऋषीकेश येथील शिवानंदांच्या आश्रमात राहिले. हेतू हा की, ह्या स्वामीचा भोंदूपणा बाहेर काढायचा. पण शिवानंद सच्चे स्वामी कार्यकर्ते होते. चिन्मयानंद त्यांच्या कार्याने भारले गेले. त्यांच्याकडून त्यांनी १९४९ मध्ये संन्यास दीक्षा घेतली. १९५३ मध्ये चिन्मय मिशन म्हणून ही संस्था कार्यरत झाली. १९६४ साली विश्व हिंदू परिषदेची स्थापना केली. चिन्मय इंटरनॅशनल फाऊंडेशन संशोधन संस्था सुरू केली. उत्तर भारत, दक्षिण भारत सर्व ठिकाणी मिशन केंद्र स्थापन केले.

त्यांच्याबद्दल किती सांगावे. तपोवन महाराजांनी त्यांची कडक परीक्षा घेतली व मगच ज्ञान दिले. एकदा कोणीतरी गुरूंना कापड आणून दिले. त्यांनी चिन्मयानंदांना त्या कापडाचा गुरूसाठी अंगरखा शिवायला सांगितला. स्वामीजींनी तो कुडता हाताने शिवला, धुतला व एका सकाळी गुरूंना दिला. त्यांना वाटले शाबासकी मिळेल. पण गुरूंनी तो निरखून पाहिला. त्यांना म्हणाले, 'तू निष्काळजीपणा केलास. ह्याला भोक पडले आहे.' आता स्वामीजींना माहीत होते त्यांनी काळजीपूर्वक सर्व काम केले आहे. त्यांना खूप राग आला. ते रात्री आवराआवर करू लागले. त्यांनी ठरवले असल्या माणसाच्या हाताखाली मला राहायचे नाही. मग तेथील एका गुरूबंधूने सांगितले, 'अरे, ते तुझी परीक्षा पहात आहेत. ही सत्त्व परीक्षाच आहे. तुझ्यावर त्यांची मर्जी आहे. तू परत जाऊ नकोस.' मग चिन्मयानंद शांत झाले. पहिल्यापहिल्यांदा त्यांना वाटायचे की, [illegible]र गोष्टी का शिकवत आहेत ? सरळ ब्रह्म म्हणजे काय ? हे का नाही शिकवत ? एकदा धाडस करून त्यांनी गुरूंना तसे विचारलेही ! गुरू त्यावेळी काहीच बोलले नाहीत. एके दिवशी गुरूंनी त्यांना पाणी मागितले. त्यांनी पटकन् ग्लासमधून पाणी आणून दिले. गुरूंनी तो ग्लास फेकून दिला. ते म्हणाले, 'ग्लास कशाला आणलास ? मी फक्त पाणी आणावयास सांगितले.' त्यावर स्वामी चिन्मयानंद म्हणाले, 'गुरूजी नुसते पाणी कसे आणणार ? ते कसे शक्य आहे ?' त्यावर हसून तपोवन महाराज म्हणाले, 'हेच मला सांगायचे आहे.' ज्याप्रमाणे साहित्याशिवाय पाणी आणता येत नाही. त्याप्रमाणे उपाधिशिवाय ब्रह्म शिकवता येत नाही. ब्रह्म हे देश, काल, वस्तू यांच्या पार आहे. या उपाधि पार करूनच ब्रह्मानुभव घ्यायला हवा.

एकदा काय झाले. आश्रमात असताना कोणीतरी घरी कार्य झाले म्हणून त्या सर्वांना लाडूचा बॉक्स आणून दिला. सर्व तरुण साधक शिष्य रोज साधे अन्न खाऊन कंटाळली होती. त्यांना खूप आनंद झाला. आता संध्याकाळच्या जेवणात लाडू मिळणार. पण काही नाही. रोजचे फिके जेवण मिळाले. ३-४ दिवस गेले तरी मुलांना, शिष्यांना लाडू मिळालेच नाहीत. सर्व मुलांना वाटले की, सर्व लाडू गुरूंनी फस्त केले. शेवटी एकाने धीर करून गुरूंना लाडूबद्दल विचारले. गुरू फक्त हसले. त्यांनी आपल्या खोलीतून लाडवाचा बॉक्स आणला. तसाच होता. ते म्हणाले, तुम्हाला न देता मी कसे खाईन ? पण वासनांवर विजय मिळवायचा कसा त्याचा पाठ होता तो ! पुढील जीवनात कितीतरी मोहाचे क्षण येणार. त्यांच्यावर विजय मिळवण्याची ती सुरुवात होती. मग सर्व मुले खजील झाली. अशा गुरूंच्या हाताखाली चिन्मयानंदांना अध्यात्म, वेदांत यांचे शिक्षण मिळाले.

चिन्मयानंद म्हणत, यज्ञशाळा ही माझे देवघर आहे. हेच माझे पूजास्थान आहे. श्रोता, जनताजनार्दन हाच माझा परमेश्वर आहे. स्वतःच्या पांडित्याचा, त्यांना पोकळ अभिमान नव्हता. दिखाऊपणा नव्हता. त्यांचे दोन उद्देश होते. एक त्यांच्या गुरूने दिलेल्या विद्येचे मनन व दुसरा म्हणजे इतर लोकांना त्याचा

फायदा देणे. परमेश्वराच्या हातातील आपण एक साधन आहोत, असा त्यांचा दृढ विश्वास होता. प्रवचनाचा विषय अतिशय सोपा करून सांगण्याची त्यांची हातोटी विलक्षण होती. श्रोत्यांना आपला त्रास होऊ नये म्हणून, प्रवचनाच्या वेळी जाण्यायेण्याचा मार्ग स्वतंत्र असावा यांवर त्यांचा कटाक्ष होता. प्रवचनाच्या समाप्तीबाबत ते अतिशय काटेकोर असत. हिशोब अतिशय चोख ठेवले पाहिजेत, यांवर त्यांचा कटाक्ष असे.

त्यांची विनोदबुद्धी अतिशय तरल होती. एकदा एका भक्ताने प्रश्नोत्तरांत विचारले, 'स्वामीजी, ख्रिश्चनांत रविवार हा चर्चसाठी राखून ठेवला आहे. आपल्याकडे असा एखादा वार का नाही राखून ठेवलेला ?' त्यावर ते मिस्किलपणे उत्तरले, 'हिंदू संस्कृतीत धर्म हा पार्टटाईम जॉब समजत नाहीत. धर्म ही जीवनात सतत, नित्य आचरणाची गोष्ट आहे.'

दुसरी आठवण म्हणजे एकदा एका शिबीराच्या शेवटी, एका माणसाने विचारले, 'स्वामीजी, स्वर्ग मिळवण्यासाठी कार्य केले पाहिजे ?' थोड्या वेळाने स्वामीजी उत्तरले, 'विद्वान मित्रा, मग गेले आठवडाभर तू कोठे होतास ?'

स्वामीजींबद्दल काय आणि किती लिहावे ? या युगातील मानवाच्या समाधानाबद्दल ते एका ठिकाणी म्हणतात, 'मानवाने स्वतःवरचे नियंत्रण, आत्मप्रभुत्व गमावल्यामुळे हे युग अयशस्वी ठरले आहे. निसर्गावर विजय मिळवून त्यांवर मात करून एखाद्या दासाप्रमाणे त्याच्याकडून सेवा करून घेण्यात तो दंग झाला आहे. त्याने आपल्या स्वतःच्या अंतर्गत सद्वृत्तीची उपेक्षा केली आहे. आपल्या चर्मचक्षूंनी पाहण्यासाठी शक्ती विकसित करण्यात आणि ज्या ज्या वस्तू त्याला दिसतात त्या नीटनेटक्या करण्यात तो आपले सर्व बुद्धिकौशल्य गुंतवीत आहे. सूक्ष्म इंद्रिय ग्रहणक्षमता त्याने अविकसित ठेवली आणि त्यामुळे साहजिकच धनी नसलेल्या एखाद्या बगीच्याप्रमाणे त्याच्या जगताचे रान बनले आहे.' ते सांगत, 'आपल्या हृदयाची धडधड अंतरात असते. पण ती कुठून येते ते माणसाला कळत नसते. सर्व काळांत, सर्व देशांत सर्व धर्मांत आदर्श शोधण्याचा प्रयत्न झाला आहे. त्यालाच मानवाने ईश्वर असे नाव दिले. मनुष्य त्याला बाहेर या जगात, आकाशात, पाताळात, ढगांत, देवळांत, मशिदीत, चर्चमध्ये शोधण्याचा प्रयत्न करत असतो व शेवटी त्याला कळत असते की, ज्याला आपण बाहेर तळमळून शोधत असतो तो मनुष्याच्या आंत अंतरंगात दडून बसलेला आहे.'

त्यांच्याबद्दल कुणी म्हटले आहे की, 'स्वामीजींचे कार्य हे गिर्यारोहणाइतके अवघड होते. अधोगतीला गेलेल्या समाजाला उन्नतीच्या पायऱ्या चढून जाण्यास मदत करणे आणि तेही कुणाच्या मदतीशिवाय, एका कफल्लक संन्याशाने करावे. त्या काळात फारच थोडे लोक अथवा संन्यासी यांत भाग घेत असत. पण समाजाची दुरावस्था, एवढा उत्तुंग तत्त्वज्ञानाचा वारसा असणारा हिंदू समाज, त्याची उदासीनता, निद्रावस्था, शक्तीहीनता व त्यांचे सुसंस्कृतीबद्दलचे अज्ञान पाहून स्वामीजींना फार खेद झाला, कळवळाही आला. अशा समाजाला जागे करणे हे सोपे काम नव्हते व तेही एका निर्धन संन्याशाला. पण त्यांनी अविश्रांत श्रम करून हे पाया भरणीचे कार्य केले.

स्वामी तेजोमयानंदांनी एका ठिकाणी त्यांच्याबद्दल म्हटले आहे,

*ये गुणा सर्व शास्त्रेषु वर्ण्यन्ते ब्रह्मज्ञानिनाम् ।*
*तेस्यां सर्वदा पूर्णः राजते सर्व योगिनाम् ॥*

मानव कल्याणाकरिता अवतरलेले आमचे ब्रह्मज्ञानी, महायोगी गुरूदेव आपल्याकरिता एक मोठा वारसा ठेवून गेले. आपण प्रत्येकाने त्यातला वाटा उचलायचा आहे. गुरूदेव, तुम्हीच आम्हाला ती बुद्धी आणि कार्यशक्ती द्या, एवढीच प्रार्थना !

जय गुरूदेव !

**सौ. शुभांगी गजानन पानसे**
१, श्रेयस सोसायटी, कोंढवा रोड,
(सुर्यप्रभा गार्डन जवळ), बिबवेवाडी, पुणे ३७. फोन : २४२६६५७६

# ...न्मयानंद आणि त्यां...

**श्री. माधव पर्वते**

*एम.ए. (हिन्दी) बी.एड्. राष्ट्रभाषा रत्न (वर्धा) मराठी साहित्य विशारद (म.सा.प., पुणे) प. दा. अभ्यासक्रम पूर्ण.
संगीत विषयक ३ परीक्षा (भारत गायन समाज)*

ॐकार ट्रस्टतर्फे यंदा कल्याणी विशेषांक स्वामी चिन्मयानंदांबद्दल निघणार, ऐकले नि मनात असंख्य विचार येऊ लागले. अनेक आठवणी जाग्या झाल्या. स्वतःच्या सुविचाराखाली सही न करता जरा वेगळ्या प्रकारचा उभा ओंकार लिहिणारे चिन्मयानंद आठवले. ८० साली सांगली शहरात जेव्हा घराशेजारच्या छोट्या मुलांच्या गीता वर्गात लहान मुलांसाठी ते आले तेव्हा त्यांना मी जवळून पाहिले. यतिवराचा भगवा वेष धारण केलेली त्यांची उंच, प्रसन्न हास्यमूर्ती एक वेगळाच प्रभाव पाडून गेली. मुलांशी बोलताना सलगीने त्यांच्या आवाक्यातील उदाहरणे ते सोप्या इंग्रजीत सांगत होते. एकात्मतेचा विषय पटविताना आपल्या हाताचा पंजा दाखवून 'बोटे वेगळी पण परस्परांशी जोडलेली / सहाय्यक तसे आपण सारे एक' असे सांगत होते.

त्यांचे एक सूत्रमय लेखी वाक्य एखाद्या प्रेषितासारखे वाटते - 'जेव्हा मी अधिक दूर दूर जाईन तेव्हा तुमच्या अधिक जवळ येईन' याच त्यांच्या भाकितामुळे असेल मी त्यांच्यावर प्रथमच लेख लिहिण्यासाठी त्यांचे छोटेसे पुस्तक निवडले आहे. 'His Vision' त्यांच्या संस्थेने ९५ साली प्रकाशित केलेले व त्यांच्याच रंगीत ४-५ छायाचित्रांनी सजीव व आकर्षक केलेले आहे. तथापि संपूर्ण अनुवाद देण्याचा इरादा नाही, एवढे पटले की ओठात तेच, पोटात तेच ! संदेहरहित निरूपण त्यामुळेच ते करू शकतात मग विषय कोणताही असो. आपली मुलेबाळे, संस्कृती शिक्षण, खरा कार्यकर्ता, शिक्षकाची भूमिका - इ. इ. आपली सामाजिक जाणीव-बांधिलकी वाढविणारे ते खचितच आहेत. विशेष म्हणजे इंग्रजी वाक्यरचनेतही भगवान अकर्ता, समष्टीचा विचार विवेकी होणे इ. संस्कृत शब्द ते वापरतात. भारतीयांना ते लेखन त्यामुळेच सहजच आपलेसे वाटते. देशाच्या गरजांचा अखंड विचार व शिक्षण इतिहासातील दाखले देतात तेव्हा त्रिकालाबाधित सत्य सांगणारे ते असल्यामुळे आजही ताजे व अनुसरणीय वाटतात. 'शिक्षकाची भूमिका' यामध्ये ते म्हणतात, 'सध्याच्या परीक्षा पद्धती बदलणे आवश्यक आहे. नुसते टंकलेखक किंवा कारकून चालू पद्धतीमुळे तयार होतात. विद्यार्थ्यांची स्वतःची विचारपद्धती विकसित व्हायलाच हवी. त्यांची निर्णयक्षमता वाढायला हवी. स्वयंशिक्षण त्यांना घेता येणे जरूरीचे आहे. शिक्षकांना आपले काम 'वर्क लोड' ओझे न वाटता ते आनंदाची व स्वसमाधानाची मिळकत (जॉय लोड) वाटली पाहिजे. १९३० साली राजकारणी लोकांची जबाबदारी होती स्वराज्य मिळविणे पण आता ६० साली नव्या पिढीची जडणघडण व खऱ्या भारताची निर्मिती करणे शिक्षकांची जबाबदारी आहे, असे मला वाटते.' सूक्ष्म विचारी राष्ट्रसंताचे हे विचार स्पृहणीय आहेत. जीवनमूल्यांची देवाणघेवाण-प्रसार करणे म्हणजेच धर्म असे त्यांना वाटत होते. म्हणून जसे रामकृष्ण मिशन तसे यांनी चिन्मय मिशन काढले व भारतभर दौरे केले. विचार प्रसृत केले. त्यांना माहीत होते संघटनेतून असे विचार लवकर पुढे जातात. भगवान बुद्धाने तेच केले. आद्य शंकराचार्यांनी तेच केले व स्वामी विवेकानंदांनी तेच केले आणि मूल्यांचे आदर्श ती जगणाऱ्या व्यक्तीतूनच लोकांपुढे उभे राहतात. पराक्रमी व निश्चयी वीर पुरुषांची मालिका त्यांचे डोळ्यांसमोर उभी राहते. प्रेम व त्याग यांची मूर्ती ख्रिस्तामुळे समाजाला दिसली. भगवान बुद्धांची अहिंसा, दुष्टांना प्रखर विरोध करणारा कृष्ण, १४ वर्षे वनवास आपल्या तत्त्वांसाठी स्वीकारणारा राम आणि एकनिष्ठ भक्ती असलेला हनुमान यातूनच समाजाला मूल्ये जपण्याची व शिकण्याची ताकद मिळते. त्यातून मग धर्मविचार पुढे जातात. जीवनपद्धती त्यातून विकसित होते. मग तिला कुणी धर्म म्हणेल, कुणी संस्कृती म्हणून गौरवेल. प्रश्नोत्तरातून सांस्कृतिक शिक्षण किंवा मूल्याधारित शिक्षण समजावून देतात. स्वामीजींनी स्वतःकडे गुरूदेव अशी भूमिका घेऊन आपला विषय पटवून दिला आहे.

यातच एक वैशिष्ट्य मला आढळले ते म्हणजे अलीकडे आपल्या राष्ट्रपतींनी जो तरुणांना सात कलमी संदेश दिला त्यातील दोन गोष्टी ते पूर्वीच लिहून गेले आहेत, ते म्हणतात ह

'सध्याचे वैज्ञानिक किंवा तांत्रिक शिक्षण योग्य ती माहिती देण्यास समाजाला उपयुक्त आहेच. त्यामुळे तुम्हाला विशेष क्षमताही पात्र होईल पण तेवढे पुरेसे नाही. या शिक्षणात आणखी दोन गोष्टी हव्यात. त्या दिल्या जात नाहीत. १) नैतिकता व २) सौंदर्यदृष्टी (त्यात स्वच्छता आलीच) आपल्यातून या दोन गोष्टी निघून चालल्या आहेत. रस्ते, बसेस, घरे, भिंती पाहा सर्वत्र अतिशय अस्वच्छता आढळते. लंडनमधे असे चालेल का ? लगेच तुरुंगाची हवा दाखवतील. तसेच समोरचा प्रत्येकजण करतो म्हणून आपणही भ्रष्टाचार करावयाचा हे कितपत योग्य ? तो न करणे म्हणजे नैतिकता जपणे / जोपासणे.' या विचारांचे व आजच्या राष्ट्रपती 'सप्तपदीतील' साम्य सहज लक्षात येईल.

मला वाटते क्रांतदर्शी व्यक्तीच असे लिहू शकतात. कारण त्यांना अखंड चिंतनाने व व्यापक अनुभवाने राष्ट्रपतींप्रमाणे ही अंतर्दृष्टी (व्हिजन) प्राप्त झालेली असते. त्यांना आपले निश्चयात्मक विचार बोलून दाखविल्याशिवाय राहवत नाही. मग राष्ट्रपतींप्रमाणे इतरांनाही तेच आदेश देऊ शकतात. त्यांच्या 'अंतरीचा' ज्ञान दिवा उजळू शकतात. मालवू नको रे असा संत सोहिरोबांप्रमाणे प्रेमळ सल्ला देऊ शकतात. किंवा वि. स. खांडेकरांसारखे शिक्षक त्या आधारे एखादा चित्रपट काढून, मार्गदर्शन करू शकतात.

या पुस्तिकेतील खरा कार्यकर्ता (सेवक) हा त्यांचा शेवटचा लेख मला खूप आवडला. जणू त्यांचेच ते गुणवर्णन आहे. जसे श्रीरामदास स्वामींनी त्यांच्या दासबोधात उत्तम पुरुष लक्षण लिहिले आहे, चिन्मयानंद लिहितात, 'खरे कार्यकर्ते दुर्मीळ असतात. तुम्ही धार्मिक असाल, अध्यात्मिक विचारांचे असाल पण धर्म विचार भोवतालच्यांना देणे, त्यांची सांस्कृतिक जाणीव वाढती ठेवणे, ती त्यांना कितपत पेलते हे पाहणारे फार कमी. स्वतःच्या मान-मान्यतेची फिकीर त्यांना कधीच नसते. कुणाकडून देणग्या मिळोत न मिळोत त्यांना चिंता

नसते. किती लोक त्यांचे कार्य समजू शकतील याचीही ते काळजी करीत नाहीत. पण एकदा ज्यांना त्यांचे कार्य कळले ते त्यांच्या पायाशी विनम्र होतात. काही त्यांचा द्वेष, मत्सर करतील पण त्या कार्यकर्त्याला आपल्या नियोजित कार्याचेच प्रेम असते. 'एष पन्था - एतद् कर्म' अशी त्याची धारणा असते. म्हणून तर त्यात तो रंगलेला असतो. तो जणू चांगल्या अर्थाने एककल्ली झालेला असतो. ते काम केल्याशिवाय त्याला बरे वाटत नाही. खरे तर सांस्कृतिक क्षेत्रात हीच भूमिका हवी म्हणून तर समाजात पुष्कळ कार्यकर्ते असले तरी फार थोडे पारमार्थिक क्षेत्रात उठून दिसतात. एखाद्या युद्धवीराप्रमाणे ते बाह्यत: दिसणार नाहीत. तरी त्यांची गतिमानता स्वनिर्धारात असते. ध्येयाविषयींच्या निश्चयात असते आणि त्यांच्या योजलेल्या कार्यक्रमात असते.

असा निश्चय असल्याखेरीज खरा (सेवक) कार्यकर्ता पुढे जाऊ शकत नाही. आंतरिक ऊर्मीने तो काम पार पाडतो. जणू काम हाच त्याचा प्राण असतो. बुडणाऱ्या व्यक्तीच्या द्रुत हालचालीप्रमाणे तो आपल्या कामातूनच आनंद मिळवितो. अशा कामालाच 'साधना' म्हणतात.

खरा सेवक शांतपणे काम करीत राहतो. त्याला वाटते आपले काम जगावेगळे नाही. कुणाच्या समाधानाकरिता किंवा स्तुतिगुणगान ऐकण्याकरता तो ते करीत नाही. म. गांधींजी उत्तर काशीत स्वामींना एकदा म्हणाले होते, 'अरे आनंद शांतीत असतो तो बेचैनीत शोधणे बरे नाही. आपण आपली मानसिक शांती टिकविली पाहिजे.'

तुम्ही समाजाला केव्हा उपयुक्त व्हाल ? केवळ पैशाने ? छे तुम्ही तुमची अध्यात्मिक संपत्ती / मानसिक बळ म्हणजे तुमचे नवनवीन विचार द्या - जे तुम्ही समजून घेतले आहेत व आनंदात जगत आहात. त्यामुळे एकदा तुमचेकडे आलेली माणसे फिरून तुमचेकडे येतील, प्रभावीत होतील. त्यांना तुमचेकडे येण्याची जणू भूक लागेल. तुम्ही तुमच्यातील चांगुलपणा ओळखा, इतरांच्यातील पाहा व आनंद वाटेल ते काम करा.'

या शिवाय 'सांस्कृतिक शिक्षण'या निबंधात ते म्हणतात -

१) शिक्षण मला माझ्या मनावर ताबा ठेवण्याची शक्ती देते. शिक्षण लाभलेला मनुष्य इतरांना मदत करण्यास तयार असतो. जो स्वार्थी आहे तो काय कामाचा ? शिक्षण म्हणजे साऱ्या जगाची एकात्मता जाणण्याची शक्ती. 'समष्टी' चा विचार करता यायला हवा. मनाची निर्मळता / उदारता. तुम्ही एकदा मनावर ताबा ठेवून काम करू लागला म्हणजे कोणतेही काम, धंदा, व्यवसाय असो त्यामध्ये अधिक सौंदर्य येईल, अधिक नीटनेटकेपणा येईल. शिक्षणाचा हाच सुपरिणाम आहे.

२) सध्या देतात ते केवळ माहितीपूर्ण - सूचनात्मक शिक्षण. रोजी, रोटी कशी कमवावी सांगणारे उदरभरणार्थ शिक्षण. शील घडविणे आता मागे पडले आहे. उदारमतवादी नागरिक बनायला हवेत ते होत नाही.

मित्रांनो, नवनिर्माण - कार्याची जबाबदारी घ्या. जीवन दृष्टी बदला व देशविकास साधा. मोहनिद्रेतून जागे व्हा. स्वतंत्रपणे विचार करा.

३) मनाला सुशिक्षण देणे गरजेचे. ते एज्युकेशन. आपली दैवी शक्ती किंवा आंतरिक शक्ती जागृत व्हायला हवी.

४) यासाठी आहेत त्या शिक्षकांना प्रशिक्षण देऊन शिक्षक तयार करावे लागतील. शिबिरे / कार्यशाळा घ्याव्या लागतील. मिशनने असे प्रयोग करून पाहिले. प्रथम प्रतिसाद कमी, ३ दिवसांनंतर त्यात लोक रमले. रामायण कथा, भजने असे पूरक कार्यक्रम योजले. प्रादेशिक भाषेत वर्ग चालविले. उदा. हिंदीत तेजोमयानंद तो वर्ग घेत. शेवटी जे श्रेष्ठ आचरतात तेच समोरचे लोक आचरण करतात. म्हणजे शिक्षण देण्यासाठी शिक्षकांची नवी फळी तयार करावी लागेल.

५) नुसते मूल्यांबद्दल वाचून उपयोग नाही. कृती नित्य घडायला हवी.

६) शिक्षकी व्यवसायात लोक शिरत नाहीत कारण तो पोटाचा व कमीपणाचा व्यवसाय वाटतो. देशभक्तीची भावना वाढवा जसे सैनिक जवान काम करतात कमी पगार असेल पण ती देशसेवा - सीमेवर मरणे हीसुद्धा देशसेवा वाटते तेव्हा ते काम त्यांचे हातून उत्तम होते. शिक्षकानेही मानसिक समाधान मिळविले पाहिजे. नवीन पिढी मी घडवीत आहे हा विचार हवा. सत्शील, निर्धारक्षम मुले मी तयार करतो हा विचार हवा. मला डॉ. सी. वी. रमण यांचे शिक्षक भेटले ते फार आनंदात होते.

'आपली मुले-बाळे' या लेखात त्यांनी मुलांच्या मनोविकासाचे टप्पे अगदी ५ वर्षांपूर्वीपासून २५ वर्षांपर्यंत दिले आहेत. त्यात मुख्यत: आजच्या पिढीला निष्प्रेम जीवन, तुटक प्रेम अनुभवता येते. तसे नको असे मुद्दाम सुचविले आहे. बुद्ध्यांक पूर्वीपेक्षा मुलांचा अधिक त्यामुळे पालकांपेक्षाही सध्याची मुले हुशार आढळतात. हा अनुभव सांगून त्यांना प्रेमाने वाढवा. अगदी बालपणी तर त्याला आपण सुरक्षित आहोत, आपले पालक मनापासून आपले कौतुक करतात याची सुखदभावना वाढवा असे ते सुचवितात. त्यांचे कल्पनामय वातावरण त्यांना उपभोगू द्या. गोष्टींची पुस्तके, सामुदायिक गीते यात रमू द्या. तरच त्यांची प्रतिभा जागृत होईल. ललीत क्रीडा व हस्तोद्योग दोन्हींचा अनुभव उपकारक, बहुमोल, अमोल इ. सूचना दिल्या आहेत. सारे वाचले म्हणजे वाटते चिन्मयानंद आचार्य होते. खरे स्वामी होते.

*'जो जनांमध्ये वागे । जनांवेगळी गोष्टी सांगे ।*
*ज्याचे अंतरी ज्ञान जागे । तोचि साधू ॥' (दासबोध)*

**श्री. माधव पर्वते**
बी-५, शिवसाई कॉम्प्लेक्स, पोस्ट आनंद नगर, सिंहगड रस्ता, पुणे ५१.

# रूदेव स्वामी चिन्मयानंदां

डॉ. सौ. रेवती अ. जावडेकर

*एम.बी.बी.एस., डी.सी.डी., डि.जि.ओ. चिन्मय मिशन सांगली शाखा उपाध्यक्ष - वेदान्ताचाकोर्स पूर्ण. अभ्यास वर्ग घेतात.*

श्रीमत् भगवत् गीता अध्याय २ - श्लोक ६८ ते ७२ पर्यंत भगवंतानी ब्रह्मनिष्ठ पुरुषाच्या ब्राह्मी स्थितीचे वर्णन केलेले आहे. त्यांतील मुख्य लक्षणे म्हणजे त्या पुरुषाची इंद्रिये इद्रियांच्या विषयांपासून सर्व प्रकारे निग्रह केली गेलेली असतात. त्याची बुद्धी स्थिर असते. परमात्म दर्शन सर्व प्राण्यांची रात्र असते त्याच वेळी त्या दर्शनसमाधी संयमी जागृत असतो. तो संपूर्ण प्राण्यांना जी रात्रीप्रमाणे वाटते त्या ज्ञानस्वरूप परमात्म प्राप्तीमध्ये जागृत असतो आणि ज्या नाशवान् सांसारिक सुखांबद्दल सर्व प्राणी जागृत असतात त्या सुखासंबंधी तो रात्रीप्रमाणे झोपलेला अर्थात उदासीन असतो. नाना नद्यांचे जल सर्व बाजूंनी परिपूर्ण, अचल प्रतिष्ठा असलेल्या समुद्रामध्ये त्याला विचलित न करता जसे सामावून जाते त्याप्रमाणेच सर्व भोग त्या स्थितप्रज्ञ पुरुषात कुठलाही विकार उत्पन्न न करता सामावले जातात. तोच परम शांतीला प्राप्त करतो. तो पुरुष संपूर्ण कामनांचा त्याग करून ममतारहित, अहंकाररहित आणि स्पृहारहित होऊन विचरत असतो. ही ब्रह्माला प्राप्त झालेल्या पुरुषाची स्थिती आहे. ही स्थिति प्राप्त झाल्यावर योगी कधी मोहित होत नाही आणि अंतकाळीही या ब्राह्मीस्थितीत स्थिर होऊन ब्रह्मानंदास प्राप्त होतो.

अलीकडच्या काळात होऊन गेलेल्या महापुरुषात श्रीगुरूदेव हे या लक्षणांनी युक्त असे युगपुरुष होते. उत्तम प्रवचने करणारे निष्काम कर्मयोगी बरेच आढळतात पण भगवत् गीतेत वर्णन केलेली ही लक्षणे ज्यांच्या जीवनात प्रकर्षाने आढळतात असे महात्मे फार विरळ असतात. अशांना अवतारी पुरुष म्हणणेच अधिक योग्य ठरेल. ईश्वरी योजनेनुसार विशिष्ट काळात विशिष्ट कार्य करण्यासाठीच ते या पृथ्वीतलावर आलेले असतात. त्यांच्याकडून म्हणूनच सामान्य माणसाला अचंबित करणारे कार्य घडते.

आधुनिक भारतात प. पू. स्वामी चिन्मयानंदांच्या रूपाने जणू आद्य शंकराचार्यच वेदान्ताचा प्रचार करण्यासाठी पुन्हा अवतरले होते असे म्हटले तर अतिशयोक्ती ठरणार नाही. त्यामुळे ब्रह्मनिष्ठ पुरुषाची लक्षणे त्यांच्या ठिकाणी कशी दिसून येतात हे पहाणे संयुक्तिकच ठरते. त्यांच्या जीवनातील घटना पाहिल्या की, आपली या विषयी खात्री पटते.

प. पू. स्वामी चिन्मयानंदांचा उल्लेख आपण श्रीगुरूदेव असाच करू या. त्यांचे पूर्वाश्रमीचे नाव श्री. बाळकृष्ण मेनन होते. केरळ राज्यातील कोचीन संस्थानातील एर्नाकुलम् गावी ८ मे १९१६ मध्ये एका प्रतिष्ठित, सुसंस्कृत सधन घराण्यात (शुचिनां श्रीमतां गेहे) त्यांचा जन्म झाला होता. त्यांचे शिक्षण इंग्रजी माध्यमाच्या शाळेत झाले. त्यांनी राजकारणशास्त्र या विषयात पदवी घेतली होती. प्रथम ऐषआरामाची, ख्यालीखुशालीची आवड होती. सधन लोकांत येणे जाणे होते. पण अशा रहाणीत राहूनही त्यांच्या मनात खोल कुठेतरी अध्यात्म विचारांचा स्फुल्लिंग जागृत होता. लहानपणापासून नित्य भगवान शंकरांचे ध्यान करण्याची सवय त्यांना जडली होती.

श्रीमंत लोकांच्यात वावरताना त्यांचे नाटकी वागणे त्यांच्या लक्षात आले. हवयात प्रेम नाही फक्त द्वेष, वैर पण बाहेरून प्रेमाचे नाटक चाले. प्रत्येकजण काही ना काही कारणाने दुःखी आणि तरीही अहंकार बाळगणारा हे पाहून मुळातील अध्यात्मिकता जागृत झाली. म्हणून भारतीय आणि पाश्चात्त्य तत्त्वज्ञानाचा अभयास केला आणि खऱ्या साधूचा शोध घेत असता इ.सन १९४७ मध्ये ऋषीकेशच्या स्वामी शिवानंदांची गांठ पडली. त्यांचे जीवन पाहून प्रेरणा मिळाली आणि संन्यस्त जीवन घालविण्याचा निर्धार केला व त्यांच्याकडूनच इ. सन १९४९ मध्ये शिवरात्रीस संन्यास दीक्षा घेतली. त्यांनी 'स्वामी चिन्मयानंद' नाव ठेवले. मूळ धर्मग्रंथ संस्कृतमध्ये शिकण्याची त्यांची ओढ पाहून स्वामी शिवानंदांनी त्यांना उत्तर काशीला पूज्य स्वामी तपोवन महाराजांकडे धाडले. तेथेच त्यांनी वेदांत ग्रंथांचा अभ्यास केला. त्यावेळी त्यांच्या लक्षात आले की, वेदांत हे नुसते सिद्धान्त शास्त्र नसून आचरण्याचे शास्त्र आहे. ते आचरणात आणल्यास माणसाचे जीवन सुधारून त्यास शाश्वत सुखाची प्राप्ती होईल. तेव्हापासूनचे त्यांचे सर्व जीवन पाहिले की त्यांच्या इंद्रिय निग्रहाची कल्पना येते. त्यानंतर इ. सन १९९३ मध्ये अंतिम श्वास घेईपर्यंतच्या त्यांच्या आयुष्यात आपल्या निश्चयापासून ते कधीही ढळले नाहीत. स्थित प्रज्ञाची लक्षणे त्यांच्या ठिकाणी अनेकांनी अनुभवली आहेत. ज्यामुळे आपल्या जीवनाचे सार्थक झाले, त्या वेदांताचा प्रचार करून सर्वसामान्यांपर्यंत तो पोहोचवून, त्याप्रमाणे कसे वागावे हे शिकवून त्यांना सुखी करण्याचा ध्यास त्यांनी घेतला होता. हिंदू धर्माबद्दल त्यांनी अत्यंत डोळस अभिमान होता. तत्त्वज्ञान आणि धर्माचरणाचा प्रचार, प्रसार यालाच त्यांना स्वतःस वाहून घेतले होते.

पू. स्वामी पुरुषोत्तमानंद म्हणतात की, खरा संन्यासी कसा असतो हे त्यांनी दाखवून दिले. चिन्मय मिशनचा प्रचंड व्याप सांभाळून ते अलिप्त असत. सर्व कर्मे करूनही ते अकर्ता होते, निःसंग होते. त्यामुळे ते सर्वांवर प्रेमाचा वर्षाव करीत असत. ते आदर्श गुरू होते. आईचे प्रेम आणि पित्याची कडक शिस्त यांचा सुंदर मिलाफ त्यांच्या ठिकाणी होता.

संपूर्ण प्राण्यांसाठी रात्रीसमान असणाऱ्या ज्ञानस्वरूप परमात्मप्राप्ती संबंधी ते नित्य जागृत तर होतेच शिवाय अनेकांची अज्ञान निद्रा त्यांनी घालवून त्यांनाही जागृत केले. नाशवान् सांसारिक प्राप्तीसंबंधी सर्व प्राणी जागृत असतात. तीसंबंधी ते पूर्ण उदासीन होते. (ती प्राप्ती त्यांना अज्ञान रूपी रात्रीप्रमाणे प्रतीत होत होती.)

त्यांच्या भक्तांनी, चहात्यांनी त्यांच्या ज्या असंख्य आठवणी दिलेल्या आहेत, त्यावरून कुठल्याही परिस्थितीत त्यांची शांती ढळत नव्हती, याचा प्रत्यय येतो. राजेशाही महालात अथवा भुताटकीच्या घरांतही ते सारखेच समाधानी असत. चिन्मय मिशनच्या प्रारंभीच्या काळात त्यांनी जे कष्ट सोसले होते ते पाहिले की सर्व प्राणिमात्रांचे हित साधण्याविषयीची त्यांची तळमळ

दिसून येते. विषय ग्रहणातील त्यांची अलिप्तता दाखविणारे एकच गंमतीदार उदाहरण येथे पाहू.

स्वामी स्वरूपानंदांनी एक आठवण दिली आहे. एकदा एका भक्ताकडे न्याहारीसाठी श्रीगुरूदेव गेले होते. त्यांना आवडते म्हणून कॉफी केली होती. कॉफी पिताना प्रत्येक घोटाला 'आहा ! काय छान !' असे ते म्हणत होते. मध्येच म्हणाले, 'कोण म्हणतो विषयात सुख नाही !' त्यांचे हे वाक्य ऐकून सर्व आश्चर्याने त्यांच्याकडे पाहू लागले की, प्रवचनात हे सांगतात की विषयांत सुख नाही आणि आत्ता हे कसे काय ? ते पाहून श्रीगुरूदेव मोठ्याने हसले आणि नंतर तेथून जाताना म्हणाले, 'पण हे सुख क्षणिक आहे !'

त्यांच्या वाढदिवसासाठी कुणी शुभेच्छा दिल्यातर ते नेहमी सारखे हसत हसत म्हणत, 'कुणाचा जन्म ? कुणाचा वाढदिवस ?' कुणी वय विचारले तर, उलट विचारीत 'माझ्या वयोगणनेला कुठून सुरुवात करू ?' त्यांच्या प्रवचनातून एक गोष्ट श्रोता निश्चित शिकत असे की, मी म्हणजे आत्मा अमर आहे. त्याचा जन्मही होत नाही आणि त्याला मृत्यूही येत नाही.

पण असे हे श्रीगुरूदेव १९९३ साली स्वामी स्वरूपानंद यांच्या वाढदिवशी त्यांच्या बरोबर न्याहारी करण्यासाठी आणि जेवण्यासाठी खोळंबून राहिले होते. ते म्हणाले, 'तुझा वाढदिवस असताना तुला सोडून मी कसे खाऊ ?' एवढेच नव्हे तर पित्याने लहान मुलाचा हात धरून केक कापावा त्याप्रमाणे स्वतः त्यांचा हात धरून केक कापला आणि आपल्या हाताने एक तुकडा त्यांना भरविला. शिवाय त्यांना म्हणाले, 'तू किती वर्षे जगलास यावर तुझे वयोमानाचे मोजमाप तू करू नकोस. तू जितकी वर्षे मानव सेवा केलीस ते तुझे खरे वय !'

श्रीगुरूदेवांच्या षष्ठ्यब्दिपूर्तीच्या वेळी ते म्हणाले की, एखादा प्रेमळ पिता आपल्या मुलासाठी घोडा घोडा खेळतो. मुलाची करमणूक करावी एवढाच पित्याचा मतलब असतो. माझी अज्ञानी मुले हा समारंभ करून आपली करमणूक करून घेत आहेत. मी ती पित्याप्रमाणे खुशीने करून देतो आहे. खरे तर स्वामींना जन्मदिवस नाही ! असो, आता ही ब्राह्मी स्थिती नव्हे का ? अशी एक ना दोन किती उदाहरणे द्यावीत ?

पूज्य गुरूदेव गेल्या शतकातील एक अत्यंत थोर अध्यात्मिक गुरू आणि ज्वलंत देशभक्त होते. हिंदुत्वाच्या पुनरुत्थापनाचे ते फार मोठे प्रवर्तक, प्रचारक होते. सर्व समाजाला कळेल अशा सोप्या भाषेत त्यांनी खुसखुशीत आणि विनोदी शैलीत वेदांताच्या शास्त्रग्रंथाचे विवरण करून ते सर्वसामान्यांपर्यंत पोहोचविण्यासाठी जे परिश्रम घेतले त्यास तोड नाही. अगदी सुरुवातीला ज्ञानयज्ञासाठी मदत करायला कार्यकर्ते नव्हते. शिवाय प्रसिद्धीकरिता लागणारा पैसाही नव्हता. तेव्हा ते आपल्याला कुणी ओळखू नये म्हणून पायजमा आणि बंडी घालीत. डोक्याला एक फडके गुंडाळत आणि स्वतःच हातात मेगॅफोन घेऊन सायकलवर स्वार होऊन गावात गल्लोगल्लीतून उन्हातान्हाची पर्वा न करता मोठमोठ्याने ज्ञानयज्ञाची घोषणा देत हिंडत असत. काय ही लोकहिताची कळकळ !

तसेच एकदा पवईच्या आश्रमात प. पू. स्वामी गंगेश्वरानंद भेट देण्यास आले होते. ते (अंध) प्रज्ञाचक्षू असल्याने श्रीगुरूदेवांनी त्यांना स्वतः हाताला धरून स्टेजवर नेऊन खुर्चीवर बसविले आणि आपण त्यांच्या पायाशी बसून त्यांचे पाय चेपू लागले. अमानीत्वाची ही उदाहरणेच किती बोलकी आहेत नाही का ?

त्यांच्या ब्राह्मी स्थितीची कल्पना देणारी एक-दोन उदाहरणे पहा. एकदा एक स्त्री त्यांच्याकडे आली आणि रडत रडत म्हणाली, 'स्वामीजी ! तुम्ही मला सोडलंत काय ?' श्रीगुरूदेव लगेच म्हणाले. 'मी कुठं तुला सोडलं आहे ? पाणी लाटांना सोडू शकते का ? एखादं वेळेस तू मला सोडशील, पण मी नाही !' एक कुणी दुसरी स्त्री एकदा त्यांना बराच वेळ बोलून सतावीत होती. शेवटी निर्लज्जपणे म्हणाली, 'स्वामीजी मी तुम्हाला खूप त्रास दिला ना ?' लगेच श्रीगुरूदेव उत्तरले, 'तू मला खूप त्रास देशील, पण मी तो करून घेतला पाहिजे ना ?' गीतेच्या प्रवचनाची आठवण करून देत म्हणाले, 'ते सर्व माझ्यात आहेत, पण मी त्यांच्यात नाही.' असे श्रीकृष्ण म्हणतात, समजले का ?'

पूज्य श्रीगुरूदेवांना हृदय विकाराचे झटके येऊन दोन दोन दिवस त्यांची नाडीही लागत नव्हती, तरी ते आपल्या खोलीतून चालत बाहेर येऊन सर्वांचा निरोप घेऊन स्वतः आपल्या पायांनी रुग्णवाहिकेत चढले आणि मग बिछान्यावर झोपले. हृदयाचे काम फक्त २५ टक्के चालू असताना अविरत कार्यरत राहाणे, देहभाव संपूर्ण लयाला गेल्याशिवाय कसे काय जमू शकेल ? कुणाला तरी त्यांनी पत्रांत लिहिले की, आपले हृदय प्रसरण पावले आहे. (विस्तारीत झाले आहे. असे डॉक्टर्स म्हणतात) पण त्यांना माहीत नाही की, त्यासाठीच तर सर्व आयुष्यभर मी धडपडतो आहे. पण ही गोष्ट तुमच्या माझ्यात ठेवा, डॉक्टर्सना सांगू नका.'

एकदा स्टेजवर चढताना पायाला खिळा टोचला. श्रीगुरूदेव तसेच व्यासपीठावर चढून बसले व नेहमीप्रमाणे दीड तास अस्खलीत प्रवचन केले. नंतर हरि ॐ म्हणून सर्वांना निघून जाण्याची खूण केली. सर्व निघून गेल्यावर पाहिले तर पायांतून रक्तस्राव होऊन जखमेच्या जागी पितांबर चिकटून बसला होता. या वरून देहाचे विस्मरण कसे होत असे ते स्पष्ट कळून येते. त्यांच्या दृष्टिकोनातून श्रोता हा परमेश्वर, ज्ञानयज्ञाचे स्थान हे देवघर, पूजा स्थान आणि दीड तास प्रवचन ही त्या विश्वेश्वराची पूजा असे. आपण म्हणजे परमेश्वराच्या हातातील एक साधन आहोत अशी त्यांची दृढ निष्ठा होती. व्यासपीठावरून बोलताना भगवान वेदव्यासच आपल्या मुखाने बोलत आहेत अशी त्यांची दृढ श्रद्धा होती.

त्यांना स्वतःला कर्तव्य काहीही नव्हते. भगवान श्रीकृष्णांप्रमाणे ते इतरांसाठीच अविरत कार्य करीत असत. कुणी पाद्यपूजा केली तर ती आपली पूजा असे मानीतच नसत. डोळे मिटून घेऊन त्यावेळी आपले गुरू पू. तपोवन महाराजांचे स्मरण ते करीत आणि त्यावेळी त्यांची मानसपूजा करण्याची ही एक संधी आपल्याला प्राप्त झाली आहे असे ते मानत.

एकदा श्रीगुरूदेवांना कुणीतरी विचारले की देह तर जड आहे आणि आत्मा निर्लेप म्हणून त्याला दुःखानुभव नाही. मग वेदना कुणाला होतात ? 'देह तादात्म्यातामुळे वेदना जाणवतात, ते नसेल तर त्या जाणवणार नाहीत,' असे उत्तर मिळाले. तसेच एकदा 'सिद्ध माणूस जगात जन्म का घेतो ? कारण त्यांच्या ठिकाणी वासना नसतात. शिवाय त्यांच्या दृष्टिकोनातून जग हा भ्रम आहे.', असा विषय श्रीगुरूदेवांसमोर चर्चेत निघाला. तेव्हा चर्चा चालू असता एकाएकी श्रीगुरूदेवांनी डोळे मिटले आणि ते बोलले, 'ध्यान करणारा ध्यानस्थ कधीच लयाला गेला आहे. आता या शरीरातून फक्त श्रीनारायणच वहात आहे !'

असो, याप्रमाणे कितीही लिहिले तरी ते पुरे पडणार नाही. त्यांनी महासमाधी घेतल्यावर जी छायाचित्रे काढण्यात आली त्यात आपोआपच तेजोवलय, निळ्या प्रकाशाच्या शलाका अथवा निळे ढग आलेले आहेत. यावरूनही आपण त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा अंदाज बांधू शकतो. म्हणूनच पू. स्वामी तेजोमयानंद म्हणतात :

*ये गुणाः सर्व शास्त्रेषु वर्ण्यन्ते ब्रह्मज्ञानिनाम् ।*

*तैर यं सर्वदा पूर्णः राजते सर्वयोगिनाम् ॥*

*अशा या पूज्य श्रीगुरूदेवांच्या चरणी कोटी कोटी कोटी प्रणाम !*

*– हरिः ॐ तत् सत् –*

**डॉ. सौ. रेवती अ. जावडेकर**

अलकेमी नर्सिंग होम, विश्रामबाग, सांगली ४१६४१५

# मी चिन्मयानन्द - एक

श्री. स. वि. भागवत

*महाराष्ट्र शासन सेल्स टॅक्स अधिकारी पदावरून निवृत्त (१९९७). ४० वर्षे गुरूदेवांची सेवा. अनेक अभ्यास वर्ग. महाराष्ट्र व गोवा केंद्राचे चिन्मय मिशनचे समन्वयक. अनेक व्याख्याने व प्रवचने दिली.*

प. पू. गुरूदेव हाडाचे शिक्षक कसे होते हे आपण या पूर्वीच्या लेखात (मे २००२) पाहिले आहे. त्यांच्यातील या शिक्षकानेच आज कितीतरी चांगले शिक्षक घडविले असून चिन्मय मिशनमध्ये हीच परंपरा आता पुढेही चालू राहिलेली आपणास दिसून येते. याचे प्रमुख कारण ते जसे उत्तम शिक्षक होते तसेच उत्तम शिक्षणतज्ज्ञही होते. शिक्षक व शिक्षणतज्ज्ञ ही सहसा एकत्र न येणारी व्यक्तिमत्त्वे पूज्य गुरूदेवांच्या ठिकाणी एकत्र आलेली आपल्याला स्पष्टपणे प्रत्ययास येतात. खरोखरच हा दुर्मिळ, दैवी योगच होय. खऱ्या शिक्षणतज्ज्ञाला आपल्या शिक्षणप्रणाली पुढे गतिमान कशा ठेवाव्यात याचे भान असावे लागते आणि गुरूदेवांजवळ ते होते.

शिक्षणतज्ज्ञ म्हणजे शिक्षण क्षेत्रातील एक अत्यंत महत्त्वाचे व्यक्तिमत्त्व. शिक्षण विषयक धोरण आखणे, वेगवेगळ्या प्रकारचे अभ्यासक्रम व परीक्षा पद्धती तयार करून त्यांची अंमलबजावणी करणे, शिक्षक व विद्यार्थी संबंधाचा तसेच पालक व पाल्य या संबंधाचा सखोल अभ्यास करून त्याबाबत मार्गदर्शक तत्त्वे आखून देणे, शिक्षण क्षेत्रातील विद्यमान सुविधा व अडचणी यांचा विचार करून त्यावर उपाययोजना सुचविणे, शैक्षणिक धोरणातून निर्माण होणाऱ्या समस्यांचा विचार करणे अशा एक ना अनेक बाबींचा विचार शिक्षणतज्ज्ञाला करावा लागतो. पूज्य गुरूदेवांच्या या व्यक्तिमत्त्व विशेषाचे चिंतन आपण प्रस्तुत लेखात करणार आहोत.

मुंडकोपनिषदात सर्व प्रकारच्या ज्ञान शक्यता दोन प्रमुख गटात पडतात असे प्रतिपादन केले आहे. ही ज्ञानाची दोन क्षेत्रे म्हणजे लौकिक ज्ञान व अलौकिक ज्ञान ही होत. (परा व अपरा विद्या) बहिर्मुख वृत्तीने आपण भौतिक जगातील विषयवस्तूंचे ज्ञान प्राप्त करून घेण्याच्या प्रयत्नात असतो. परंतु विषयवस्तूंचे ज्ञान आपणास ज्याच्या प्रकाशात होते त्या आपल्यामधील अध्यात्माचीही जाण आपणास असणे आवश्यक आहे. प्राचीन काळापासून आजपर्यंत ज्ञानाच्या अगणित शाखा मानवी बुद्धीने विकसित केल्या आहेत. हे सर्व ज्ञान लौकिक स्वरूपाचे होय. मानवी जीवनातील बहुतांश व्यवहार हे लौकिक ज्ञानावर अवलंबून असल्यामुळे तो ज्याला जे जे माहीत नसते ते ते वेगवेगळ्या माहितीच्या स्वरूपात गोळा करून आपल्या चित्तात साठवून ठेवण्याचा प्रयत्न करीत असतो. त्यामुळे प्रचलीत शिक्षण पद्धतीत अधिकाधिक विषयांचा आपण शब्दकोश बनणे आणि योग्य वेळी ती माहिती प्रकट करणे हाच आजकाल शिक्षणाचा प्रधान हेतू झाला आहे. एकविसाव्या शतकात प्रवेश करताना 'माहिती तंत्रज्ञान' ही आणखी एक लौकिक शाखा विकसित झाल्यामुळे आता तर ही माहिती माणूस आपल्या मेंदूऐवजी यांत्रिक मेंदूतच साठवून ठेवू लागला आहे. म्हणजेच माणूस हा केवळ या माहितीचा संकलक झाला आहे. प. पू. गुरूदेवांनी एका शिक्षकाच्या परिषदेचे उद्घाटन करताना या बाबतीत काढलेले उद्गार चिंतनीय आहेत. ते म्हणतात -

'अलीकडच्या शिक्षण पद्धतीत शिक्षक म्हणजे विद्यार्थ्यांच्या डोक्यात एखाद्या विषयाची माहिती कोंबून परीक्षेच्या वेळी ती बाहेर काढण्याचे एक साधन झाला आहे. हे काही शिक्षण नव्हे. माणसाजवळ असलेल्या ज्या ज्ञानाने तो शहाणा होतो ते खरे शिक्षण. ज्यामुळे शील संवर्धन होते ते खरे शिक्षण !' पूज्य गुरूदेवांच्या या चिंतनातून दोन बाबी स्पष्ट होतात, त्या अशा की, आजचे शिक्षणतज्ज्ञ शिक्षकाला एक साधन बनवू इच्छित आहेत आणि विद्यार्थ्याला ज्ञानकोश. जितका ज्ञानकोश समृद्ध तितका तो अहंकारी आणि जितका अहंकार अधिक तितके शहाणपण कमी. त्यामुळे ज्ञानशाखांचा विस्तार होऊनसुद्धा ते मानवाला समाधान व शांती देऊ शकत नाही. याचे कारण शीलभ्रष्टता. अलौकिक ज्ञानाचा अभाव. पूर्वी शिक्षकाच्या व्यक्तिमत्त्वातून विद्यार्थ्याचे व्यक्तिमत्त्व घडत असे. या विषयी पूज्य गुरूदेव म्हणतात, 'शिक्षण प्रणालीत शिक्षकाच्या शीलाला व व्यक्तिमत्त्वाला महत्त्व असते. त्याने विद्यार्थ्याचे शुष्क प्रेम आणि आदर संपादून चालत नाही. त्याच्या जवळ भावनेचा ओलावा आणि बौद्धिक पात्रता असेल तरच खऱ्या अर्थाने तो विद्यार्थ्यांच्या आदरास पात्र होतो. हा आदर नसल्यास त्याने जे काही शिकविले असेल त्याचा परिणाम दीर्घकाळ टिकणारा असत नाही. उपदेश आणि आदर्श या दोन गोष्टी हातात हात घालून चालायला हव्यात !'

म्हणूनच आधुनिक शिक्षणतज्ज्ञांनी कोणत्याही प्रकारच्या प्रगत अशा शिक्षणविषयक योजना तयार केल्या, कितीही काळजीपूर्वक त्याची आखणी केली तरी त्या योजना ज्यांनी राबवायच्या असतात व ज्यांच्यासाठी राबवायच्या असतात ते दोन घटक शुद्ध व स्थिर नसतील तर त्या योजना निष्फळ ठरतात. ही शुद्धता व स्थिरता अंत:करणाच्या धारणेवर अवलंबून असते. अंत:करणाची ही धारणा बदलायची असेल तर स्वामी विवेकानन्द व स्वामी चिन्मयानन्द यांच्यासारखे अलौकिक ज्ञानाचा विचार करणारे शिक्षणतज्ज्ञ हवेत. या दोघांनीही ऐहिक व अध्यात्मिक शिक्षणाचे महत्त्व आपल्या विचारातून स्पष्ट केले आहे. महर्षि व्यासांचे या संदर्भात एक वचन आहे. ते म्हणतात, 'कलियुगात दानासारखी श्रेष्ठ गोष्ट नाही. सर्व दानात श्रेष्ठ दान म्हणजे अध्यात्मिक विद्येचे दान, दुसऱ्या प्रतीचे दान म्हणजे भौतिक विद्येचे दान, तिसरे दान म्हणजे प्राणदान आणि चौथे दानक्षुधिताला अन्नदान.' याचाच अर्थ अध्यात्मिक व भौतिक या दोन्ही विद्या प्रगतीच्या दृष्टीने महत्त्वाच्या आहेत. या बाबतीत श्रीमद्भगवद्गीतेच्या १८ व्या अध्यायात श्रीव्यासांनी संजयाच्या मुखातून एक महासिद्धांत कथन केला आहे.

*यत्र योगेश्वर: कृष्णो यत्र पार्थो धनुर्धर: ।*
*तत्र श्रीर्विजयोभूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम् ॥*

या श्लोकावर भाष्य करताना पूज्य गुरूदेव म्हणतात, ''पारलौकिक व ऐहिक यांचे सुंदर एकीकरण हेच मनुष्याचे योग्य जीवन धोरण असल्याचे गीतेत

अपेक्षिले आहे. श्रीव्यासांसमोर जगाची अशी व्यवस्था आहे की, ज्यामध्ये मनुष्य ऐहिक व अध्यात्मिक मूल्यांचा सुखद मिलाफ असलेले जीवन जगत आहे !'' इथे श्रीकृष्ण योगेश्वर हा अलौकिक ज्ञानाचे प्रतीक आहे, तर अर्जुन ऐहिक ज्ञानाचे. हे अलौकिक ज्ञान म्हणजे जीवन मूल्यांचे ज्ञान. हल्लीच्या शिक्षण पद्धतीत जितके महत्त्व या ऐहिक किंवा लौकिक ज्ञानाला दिले जाते तितके महत्त्व अलौकिक ज्ञानाला दिले जात नाही. लौकिक जीवनात माणूस अलौकिक अशा जीवनमूल्यांना जोपर्यंत मानाचे स्थान देत नाही तोपर्यंत विज्ञानाने तो कितीही शिकलेला असला तरी तो सुसंस्कारित असू शकणार नाही. पूज्य गुरूदेव शिक्षणाचा मूल्यांशी संबंध जोडताना म्हणतात --

'मूल्याधार शिक्षण म्हणजेच राष्ट्राच्या संस्कृतीचे पुनरुत्थान होय. फार पूर्वीपासून ही जीवनमूल्ये जगणारे नेतृत्व या मूल्यांचे संस्करण आपल्या आचरणातून विद्यार्थ्यांवर करीत असत. या जीवनमूल्यांचे संस्करण करणारी जी एक व्यवस्था तिला धर्म असे म्हणतात. या धार्मिक शिक्षणाची बीजे जर विद्यार्थ्यांच्या अंत:करणात बालवयातच रुजविली तर हळूहळू ती चांगली मूळ धरतात आणि भविष्यात त्यातून एक चांगले व्यक्तिमत्त्व घडविण्यास सहाय्य करतात ! म्हणूनच शिक्षण व्यवस्थेत शिक्षक हा ज्ञानवितरणाचे यांत्रिक साधन न होता आदर्शच असायला हवा.' 'आदर्श समोर ठेवून जीवन जगा' असे गुरूदेव नेहमी म्हणत.

शिक्षकांप्रमाणेच पालकांवरही मुलांच्या शिक्षणाची जबाबदारी असते म्हणून पालकांनी स्वत:मध्ये बदल घडवायला हवा असे त्यांचे सांगणे होते. मूल जर वाईट मार्गाला लागले तर ती जबाबदारी केवळ पालकांचीच. आज किती पालक ही जबाबदारी खऱ्या अर्थाने स्वीकारण्यास तयार आहेत ? घरातल्या स्त्रीने ही जबाबदारी प्रामुख्याने स्वीकारून स्वत:चाच अनुकरणीय आदर्श मुलांसमोर ठेवावा. मुलांवर संस्कार करीत असताना राजकीय व सामाजिक परिस्थितीला जबाबदार धरले जाऊ नये असे गुरूदेवांचे मत होते. आपल्या देशात चांगले शिक्षण देणाऱ्या संस्था असाव्यात असे त्यांना नेहमी वाटत असे. बाल मनावर संस्कार करणाऱ्या वृत्तीची व्याप्ती कशी वाढेल या दिशेने प्रयत्न करीत असताना एका नवीन उपक्रमाची देणगी त्यांनी समाजाला दिली. 'चिन्मय बालविहार' हा एक चांगला उपक्रम अत्यंत पद्धतशीरपणे त्यांच्या काळातच नावारूपाला आला. त्यांना लहान मुले फार आवडत. त्यांच्यावर ते खूप प्रेम करीत. मुलांवरच्या या प्रेमामुळे पहिला बालविहार त्यांनी १९६० साली सुरू केला. वर्तमान जगात मुलांवर संस्कार कोणते व कसे करावेत याचे एक तर पालकांना ज्ञान नसते आणि असलेच तर त्यासाठी द्यायला त्यांच्याजवळ पुरेसा वेळ नसतो. शाळांमध्ये असे संस्कार करण्याची सोय वेगवेगळ्या कारणांमुळे नसते. अशा परिस्थितीतून घराघरातून सुरू केलेला हा बालविहाराचा उपक्रम सध्याच्या युगात मुलांना वरदान तर पालकांची सोय झाली आहे. पूज्य गुरूदेवांच्या दृष्टिकोनातून हा 'राष्ट्रासाठी एक इतिहास घडविणारा कार्यक्रम आहे.' या कार्यशाळांतून उद्याचे नेतृत्व आकाराला येत आहे असे ते म्हणत. बालविहारच्या उपक्रमात सातत्य रहावे, त्यात नाविन्य निर्माण व्हावे व त्याचा जोमाने प्रसार व्हावा म्हणून तसेच पुढे कार्यकर्ते निर्माण व्हायला हवेत, हे ओळखून त्यांच्या प्रशिक्षणाची सोयही त्यांनी करून ठेवली आहे. त्यासाठी त्यांच्याच तालमीत तयार झालेल्या शिक्षकांनी व सेवक / सेविकांनी उत्तमोत्तम प्रकारचे संस्कारक्षम साहित्य निर्माण केले आहे.

बालविहारचा हा उपक्रम लहान मुलांवर संस्कार करण्याचे एक प्रमुख माध्यम म्हणून कार्य करीत असतानाच पूज्य गुरूदेवांनी हेच संस्कार शालेय माध्यमाद्वारे करण्याचे लक्ष्य समोर ठेवून चिन्मय विद्यालयाचा उपक्रमही सुरू करण्याचे ठरविले. पहिली नर्सरी शाळा १९६५ मध्ये केरळ राज्यात सुरू केली. या शाळेमध्ये संस्कार शिक्षणाबरोबर शालेय शिक्षण देण्याची सोय उपलब्ध झाली. आज मितीला अशी ७२ विद्यालये कार्यरत आहेत. त्यात एक आंतरराष्ट्रीय निवासी विद्यालय कोईंबतूर येथे आहे. या ७२ विद्यालयांपैकी २० उच्च माध्यमिक विद्यालये असून २३ माध्यमिक विद्यालये आहेत. इतर विद्यालये विकसनाच्या मार्गावर आहेत. प. पू. गुरूदेव स्वामी चिन्मयानंदांना आंतरराष्ट्रीय निवासी विद्यालयाची कल्पना सुचली. त्यानंतर त्यांचे शिष्योत्तम प. पू. स्वामी तेजोमयानंदजी यांनी पूज्य गुरूदेवांच्या या संकल्पनेला सुरेख आकार दिला. पूर्वेची प्राचीन समृद्ध संस्कृती आणि पश्चिमेची सृजनशील व स्वतंत्र विचारधारा यांचा अलौकिक संगम या विद्यालयात झालेला आपणास दिसून येतो.

संस्कारक्षम व निरोगी समाज निर्माण होण्यासाठी शिक्षणसंस्था हे अत्यंत प्रभावी माध्यम आहे आणि शिक्षक हा या शिक्षण संस्थेचा महत्त्वाचा घटक आहे. अशा या महत्त्वाच्या घटकासमोर वर्ग घेताना गुरूदेव म्हणाले --

'आज शिक्षक हा शाळा व समाज यामधील दुवा आहे. विद्यार्थी आणि पालक यांमधील एक कडी आहे आणि या बाबतीतच आत्मपरीक्षणाची आज गरज आहे. ज्या तऱ्हेने आपण राष्ट्रसेवा करायला हवी तशी ती आपण करतो कां ? स्वतंत्र भारतात या अशा महत्त्वाच्या व्यवसायात आज जे आहेत आणि ज्यांच्यावर समाज घडविण्याची जबाबदारी आहे त्यांनी कारण काहीही असो, या बाबतीत आपल्या कर्तव्यात कसूर करता कामा नये.' प्रचलित परीक्षा पद्धतीबाबत आपले स्पष्ट विचार व्यक्त करताना ते म्हणतात, 'वर्तमान परीक्षा प्रणाली बदलायला हवी. ही पद्धती फक्त टंकलेखक व कारकून निर्माण करणारी आहे. ही अशी हवी की, जी विद्यार्थ्याला स्वत:लाच मुळापासून विचार करायला लागेल, स्वतंत्रपणे निर्णय घ्यायला शिकवेल. मुलांना शिकवीत असताना टिप्पणी लिहून देणे व पाठ्य पुस्तकांचे पाठांतर करून घेणे या दोन पद्धतीत शिक्षक जोपर्यंत बदल करीत नाही तोपर्यंत ही नवीन पद्धत सुरू करता येत नाही' !

इथे एक गोष्ट प्रामाणिकपणे सांगाविशी वाटते ती अशी की, आश्रमातील विद्यार्थ्यांचा वर्ग घेताना स्वत: गुरूदेव याच पद्धतीचा अवलंब नेहमी करीत. विद्यार्थी जर प्रामाणिक असेल तर त्याला त्यांच्या हाताखाली स्वतंत्रपणे विचार करण्याचे वळण लागतच असे.

वर्तमान युगातील मुले, त्यांच्या मनाची ठेवण, बुद्धीची झेप, सभोवतालचे वातावरण आणि प्रतिकूल अशा परिस्थितीत मुलांच्यात दिसत असलेली झुंजण्याची जिद्द या सर्व गोष्टींचे निरीक्षण आणि अभ्यास या बाबत गुरूदेवांचे विचार शिक्षणक्षेत्रात सर्वांना मार्गदर्शक ठरतील असेच आहेत. ते म्हणतात,

'हल्लीची मुले काही वेगळीच वाटतात. ती एखादी गोष्ट आकलन लवकर करतात. ती खूप चलाख वाटतात. आपल्या वर्तमान युगातील गतिमान जीवनाशी झुंज देण्यासाठी त्यांनी आपल्यामध्येच अनेक खास गुण जमा केले आहेत. आधुनिक विज्ञान आणि तंत्रज्ञान वेगाने प्रगत होत आहे, त्याचा प्रसार होत आहे. त्यामुळे आपल्या मुलांना जगण्यासाठी आणि झुंज देण्यासाठी वातावरण पूर्णपणे बदलले आहे. तीसुद्धा या नवीन वातावरणात घडत आहेत. सभोवताली असलेल्या या जगाशी सामना करण्यासाठी त्यांच्या सामर्थ्यात निसर्गानेच वाढ केली आहे. म्हणूनच त्यांच्या बुद्धीची पकड आणि त्यांची भावनिक घडण यात ती काही वेगळीच वाटतात. साहजिकच त्यांच्या बाह्य वागणुकीतसुद्धा ती विलक्षणच वाटतात.'

पूज्य गुरूदेवांचे हे निरीक्षण इतके सूक्ष्म आणि वास्तव आहे की शिक्षक व पालक या दोन्हीही घटकांना त्यापासून शिकण्यासारखे खूप आहे. इतकेच

काय तर सभोवतालच्या इतरांनीही त्यावर अवश्य विचार करावा असेच आहे. गुरूदेव पुढे म्हणतात, 'ही मुले या प्रतिकूल वातावरणात ढकलली गेली आहेत. इतकेच काय तर त्यांच्या आईवडिलांचे प्रेमही त्यांना कमीत कमी मिळत आहे. तरीही या वातावरणात जगायला शिकली आहेत. ही मुले सभोवताली निव्वळ स्वार्थच पहात आहेत. आत्मसंयमन आणि त्यागाच्या वृत्तीने कोणी जीवन जगत आहेत हे त्यांना कधीही दिसतच नाही. अत्यंत आदरणीय असे पालकांसमोरच काही नाही. सारी जण वेड्यासारखी धावत सुटली आहेत. क्षणिक सुखाच्या आणि क्षुल्लक करमणुकीच्या आश्रयाला जात आहेत' ! गुरूदेव पुढे म्हणतात की, मुलांच्या बाबतीत, त्यांना समजून घेण्यात आपले ज्ञान अगदी तोकडे आहे यात अजिबात संशय नाही. मुलांना त्यांच्या दृष्टिकोनातून समजून घेतले पाहिजे असे ते म्हणत.

वेगवेगळ्या वयोगटाच्या मानसिक घडणीचा त्यांचा अभ्यास इतका सूक्ष्म होता की कोणत्या वयात त्यांच्यावर कसे संस्कार करावेत हे ते अचूकपणे सांगत. मग ते शिक्षकांना केलेले मार्गदर्शन असो किंवा बालविहार सेविकांना केलेले प्रबोधन असो. ते म्हणत - ५ ते १० वर्षे या वयोगटातील मुलांच्या बुद्धीचा आणि भावनेचा विकास करावा. जीवन मूल्यांचे शिक्षण त्यांना देण्यासाठी हेच योग्य वय आहे. पौराणिक कथांचे आदर्श त्यांच्यासमोर ठेवून हे साध्य करून घ्यावे. सामुदायिक पठण व समूहगान यांचाही उपयोग याच वयोगटात परिणामकारक ठरतो. मनाचा बराचसा विकास झाला असल्यामुळे १० ते १४ वर्षे वयोगटाच्या मुलांना झगडण्यासाठी थोडेफार साहित्य हवे असते. त्यामुळे मुलगा असो किंवा मुलगी, त्यांच्या मनात झटापट करण्यासाठी काही कल्पना असतील तर त्यांना त्यात स्वारस्य वाटते. जीवनाच्या दिशा जाणून घेण्यात या क्षणिक टिकणाऱ्या कुतूहलातसुद्धा ही मुले आनंद मानतात. १५ ते १८ वर्षांच्या कालावधीत या त्यांच्या कल्पनांचे त्यांच्या मनात रोपण करण्यासाठी, त्या रुजविण्यासाठी त्यांना मदत करावी. ज्या कल्पनांवर त्यांचा विचार चालू असेल त्या कल्पना व्यक्त करण्यासाठी त्यांना प्रोत्साहन द्यावे. त्यांचा बुजरेपणा हळूवारपणे दूर केला पाहिजे. या वयात त्यांच्या हातून घडणाऱ्या चुकांबाबत आपण त्यांच्यावर टीका कधीही करू नये. पुढे १८ ते २० वर्षे वयाच्या कालावधीत जेव्हा त्यांच्या शरीराची व मनाची पूर्णपणे वाढ झालेली असते तेव्हा त्यांना विषयांचे आकलन खोलवर असणे गरजेचे वाटते. साधनेमध्ये काही पावले लवकर उचलावीत असे त्यांना वाटते. असे केल्याने आपल्या अविचारी आणि वेडसर मनाचा जोरदार लोंढा आपण आपल्या परिश्रमाने आणि सवयीने नियंत्रित करू शकतो असे त्यांना वाटू लागते. अशा वेळी थोडासा जप आणि मनाला शांतीचे काही क्षण हे त्यांना उपयुक्त होऊ शकतात. ज्यावेळी तरुण २० ते २५ वर्षांच्या वयोगटात होतात तेव्हा एखाद्या प्रगल्भ विषयाची ओळख आपण त्यांना ताबडतोब करून देऊ शकतो. कोणताही आडपडदा न ठेवता त्यांना ईश, केन, कठ ही उपनिषदे आणि श्रीमद्‌भगवद्‌गीता अध्याय २,३,६,९,१२ व १३ शिकवा. पुढचा अभ्यास त्यांचा त्यांनाच करू द्या.

अशा क्रमवार पद्धतीचे जर प्रामाणिकपणे अनुकरण केले तर आपल्या उगवत्या पिढीचे शिक्षण अधिक परिणामकारकरित्या पूर्ण करू शकू.

'मुले हीच आपले भविष्य होत' असे जेव्हा गुरूदेव म्हणत तेव्हा त्यांच्या दृष्टिकोनातून त्याचा अर्थ असा आहे की, त्यांना आताच आपण योग्य विचार करायचे शिक्षण दिले पाहिजे. आजच ती योग्य निर्णय घेण्यात पारंगत कशी होतील त्या दृष्टीने त्यांना घडविले पाहिजे. आपल्या देशात मुलांना केवळ जीवनमूल्ये शिकवून भागणार नाही तर आपल्या निष्ठांनुसार जीवन जगण्यासाठी लागणारे धाडस आणि शौर्य त्यांना शिकवा असे पूज्य गुरूदेव म्हणत असत.

अशा प्रकारे 'उद्याचा भारत' घडविण्याच्या इच्छेने पूज्य गुरुदेवांनी लहान मुले व तरुण पिढी या दोहोंवर जितके प्रेम केले तितके अन्य कोणावरही केले नसावे. त्यासाठी त्यांनी विविध कार्यक्रम तयार केले, ते राबविले आणि पुढील योजनांच्या संकल्पना आपल्या शिष्यांसमोर मांडल्या. शैक्षणिक क्षेत्रात कार्य करणाऱ्या त्यांच्या शिष्यांनीही त्यावर सखोल चिंतन केले आणि त्यातूनच साकारला एक महान शैक्षणिक प्रकल्प - 'चिन्मय व्हिजन प्रोग्रॅम' सीव्हीपी.

'सत्य काय आहे हे जाणून घेणे, जीवनाचे आपणास आकलन होणे आणि त्यायोगे एखाद्याने त्याच्या उद्दिष्टपूर्तीसाठी स्वत:ला पात्र करून घेणे हा शिक्षणाचा हेतू होय.' ! प. पू. गुरूदेवांची ही दृष्टी पूर्ण करण्यासाठी हा एक सर्वव्यापक मूल्याधार शैक्षणिक प्रकल्प तयार केला गेला आहे. प. पू. स्वामी तेजोमयानंदांनी या प्रकल्पाची सुरुवात २१ मे १९९६ रोजी केली. या कार्यक्रमांतर्गत मुलांना हिंदू संस्कृतीचे दालन खुले केले जाते. राष्ट्रप्रेमाची उत्तुंग भावना त्यांच्यात वाढीस लावली जाते आणि त्यांच्यात एक वैश्विक दृष्टिकोन निर्माण केला जातो. या शिवाय व्यवस्थापन क्षेत्रात वेदांताचा आणि व्यवस्थापनाचा परस्पर संबंध कसा आहे यावर संशोधन करणारी 'चिन्मय व्यवस्थापन संस्था' आणि विज्ञान आणि अध्यात्म यामध्ये दुवा म्हणून काम करणारी 'चिन्मय इंटरनॅशनल फाऊंडेशन' सीआयएफ या संस्थाही शैक्षणिक क्षेत्रात उत्तम प्रकारे कार्य करीत आहेत.

शिक्षण क्षेत्रात प्रतिष्ठेचे समजले गेलेले हे सर्व कार्यक्रम प. पू. गुरूदेव स्वामी चिन्मयानंद हे एक महान शिक्षणतज्ज्ञ होऊन गेले याचीच साक्ष देत उभे नाहीत काय ?

**श्री. सदाशिव विष्णू भागवत**
शिवप्रभा २२२, गंगानगर, अंबरनाथ

# समर्थ रामदास स्वामी
# व स्वामी चिन्मयानंद


**श्री अनंत स. काईतवाडे**

*इंदौर केंद्राचे सेवक. अध्यात्मिक लेख दैनिक भास्करांतून प्रसिद्ध. विविध मनोरंजक पुस्तकांचे लिखाण. दासबोधाच्या परिक्षा. सज्जनगड.*


आज जेव्हा मी पूज्य स्वामी तेजोमयानंदांच्या (स्वामी चिन्मयानन्दजींचे शिष्य) अध्यात्मिक जीवनाकडे वळण्याचा प्रसंग आठवतो, तेव्हा मला याचे मूळ श्री स्वामी समर्थ रामदासांच्या प्रेरणेत असावे असे वाटते. लहानपणी आईला 'दासबोध' ग्रंथ वाचून दाखविताना त्यांनी केवळ वाचनच न करता, मननही केले असले पाहिजे. त्याशिवाय जीवनात परिवर्तन होणे कठीण आहे. हे 'दासबोधाचे' बीज पेरले गेले व त्यास स्वामी विवेकानन्दांच्या साहित्याचे खतपाणी लाभले. त्याची फलनिष्पत्ती तरुणपणी समर्थ गुरू स्वामी चिन्मयानन्दजी यांची भेट व शिष्यत्व यांत झाली. हा केवळ योगायोग नसून, हे सर्व पूर्व पुण्याईचेच फळ आहे. गोस्वामी तुलसीदासांनी म्हटले आहे --

*बिनु सत् संग बिबेक न होई । राम - कृपा बिनु सुलभ न सोई ॥*

श्रीरामकृपेने पूज्य गुरूदेवांचा सत्संग लाभला व योग्य शिष्यास योग्य गुरू भेटले. शिष्याची साधना पूर्णतेकडे पोहोचली की, गुरू स्वत:च शिष्यास भेटतो हे यावरून खरे वाटते. या भेटीनंतर स्वामी तेजोमयानन्दानी (त्या आश्रमीचे सुधाकर) घरदार, शिक्षण सोडून सांदीपनी साधनालयात वेदांताचे प्रशिक्षण घेतले व ब्रह्मचारी विवेक चैतन्य (स्वामी विवेकानन्दांचे नामसादृश्य) व नंतर स्वामी तेजोमयानंद म्हणून 'चिन्मय मिशन' चे नाव तेजोमय केले.

बालपणीचे आराध्य दैवत श्री समर्थ स्वामी रामदास व तरुणपणी भेटलेले सद्‌गुरू पूज्य स्वामी चिन्मयानन्दजी या दोघांचे व्यक्तिमत्त्व, कर्तृत्व व चरित्र पाहिले की, अशी खात्री पटते की, जर मनापासून आराध्य देवतेचे ध्यानस्मरण केले तर त्या आराध्यदेवतेची कोणत्या ना कोणत्या स्वरूपात नक्कीच भेट होते.

आजपासून ३०० वर्षांपूर्वीचे स्वामी रामदास व २० व्या शतकातील स्वामी चिन्मयानन्द यांच्यातील साम्य स्थळे पाहून आश्चर्य वाटते. समर्थांनी १२ व्या वर्षी घर सोडून १२ वर्षे तप केले व नंतर १२ वर्षे तीर्थाटन केले. या प्रमाणे ३६ व्या वर्षानंतर जगदुद्धाराच्या कार्यास प्रारंभ केला. स्वामी चिन्मयानन्द यांनी उच्च शिक्षण प्राप्त केल्यानंतर पत्रकारिता, देश-स्वातंत्र्य-आंदोलन इ. करून वयाच्या ३२ व्या वर्षी स्वामी शिवानंदांकडून वेदान्ताचे शिक्षण घेतले व संन्यास घेतला. स्वामी शिवानंदांनीच त्यांना अधिक ज्ञान संपादण्यासाठी पू. तपोवन महाराजांकडे पाठवले. तिथले वेदांताचे शिक्षण पूर्ण झाल्यावर पायी भारत भ्रमण केले. नंतर गुरू-आज्ञा घेऊन इ.स. १९५१ मध्ये आपल्या कार्यास प्रारंभ केला. दोघांच्याही कार्याचे प्रारंभ स्थळ 'महाराष्ट्र'च आहे. समर्थांनी चाफळ खोऱ्यात तर गुरूदेवांनी पुण्याच्या गणेश मंदिरात कार्यारंभ केला.

दोघांनाही प्रतिकूल परिस्थितीचा सामना करावा लागला. समर्थांना जुलमी परकीय सत्ता, तर गुरूदेवांना स्वकीयांच्या विरोधाचे चटके बसले.

ज्याप्रमाणे महाराष्ट्रातील समर्थ रामदासांनी आपल्या एकट्याच्या हिताचा विचार न करता, सर्वस्वाचा त्याग करून व देशबांधवांच्या स्थितीचे चिंतन करून, त्यांच्या उन्नतीचे कार्य केले, त्याचप्रमाणे केरळमधील कोचीन येथे जन्मलेल्या गुरूदेवांनी आत्मज्ञानाचा प्रसार सर्वसामान्य लोकांपर्यंत पोहोचावा म्हणून आपले जीवन सर्वस्व वाहून घेतले.

समर्थांचा रामदासी संप्रदाय व गुरूदेवांची चिन्मय-मिशन संस्था यांनी जे कार्य केले ते अभूतपूर्व आहे. समग्र दासबोध ही समर्थांची शिकवण आहे, तर श्रीमद्‌भगवद्‌गीतेवरील प्रवचने ही प्रामुख्याने सर्वसामान्य जनांना गुरूदेवांनी दिलेली शिकवण आहे. रामदासी संप्रदाय व चिन्मय-मिशन या दोहोंनी अध्यात्म विद्या किंवा आत्मज्ञान यांचा पाठपुरावा केला. इतर सर्व गोष्टींपेक्षा अध्यात्माचे महत्त्व कोटीगुणे अधिक आहे, यात तिळमात्र शंका नाही.

ज्याला लोकसंग्रह करावयाचा आहे, त्याच्या ठिकाणी प्रबोधन शक्ती व इतरांचे मनोगत जाणून घेण्याची कला अवगत असणे अत्यंत आवश्यक असते. या दोन्ही गोष्टींचा समन्वय समर्थ रामदास व गुरूदेव यांच्या ठिकाणी आढळतो.

स्पष्ट, सरळ, ओघवती भाषा शैली, भाषेवरील प्रभुत्त्व, संमोहक वाणी या सर्वांच्या जोडीने आचार-विचार व उच्चार यांतील एकवाक्यता हे अत्यंत महत्त्वाचे असते व या सर्वांमुळेच गुरूदेव व समर्थ रामदास प्रभावी ठरले. समर्थांच्याच शब्दांत सांगावयाचे झाल्यास 'बोलण्या सारिखे चालणे । स्वये करुनि बोलणे ॥' हे असेल तरच त्याला अर्थ प्राप्त होतो व म्हणूनच दोघेही धर्मस्थापनेचे महान कार्य करू शकले.

लोकांचे अंतरंग जाणून त्यांच्या वेदनांवर फुंकर घालण्याचे सामर्थ्य असल्यामुळेच संतमहात्मे हे अवघड काम लीलया करीत असतात. गुरूदेवांनी सर्वांना इतके प्रेम दिले की, प्रत्येकाला वाटायचे की, गुरूदेव माझ्यावरच खरे प्रेम करतात. समर्थांनी 'आवघेचि सुखी असावे । ऐसी वासना ॥' धरून, परांतर जाणून, तदनुरूप वर्तन करून, लोकांत हिंदू धर्माबद्दल श्रद्धा उत्पन्न करून त्यांना सन्मार्गावर आणण्याचे कार्य केले.

श्रीसमर्थ एके ठिकाणी स्वत: बसून रहात नसत व शिष्यांनाही बसू देत नसत. त्याचप्रमाणे गुरूदेवांनीही स्वत: कधीच एका ठिकाणी ५-७ दिवसांपेक्षा अधिक वास्तव्य केले नाही. ५-७ दिवसांचा 'गीता-ज्ञानयज्ञ' करून लोकांत वेदांत व धर्मशास्त्राची प्रवृत्ती जाग्रत करून सर्व राष्ट्रभरच नव्हे तर जगभर अखंड परिभ्रमण केले. वर्षभराच्या त्यांच्या वेळापत्रकात एक दिवसही विश्रांतीचा किंवा स्वत:साठी राखून ठेवलेला नसायचा. त्यांचे म्हणणे होते --

'If I rest, I rust.'

*नित्य नूतन हिंडावे । उदंड देशाटन करावे ॥*
*तरीच भिक्षा मागता बरवे । श्लाघ्यवाणे ॥*

या उक्तीप्रमाणे श्रीसमर्थ व गुरूदेव दोघांनीही भिक्षाटनाचा मार्ग अनुसरला. पण तो स्वत:च्या उदरनिर्वाहासाठी नाही, तर समाजकार्यासाठी, देशहितासाठी. वसुंधरा बहुरत्ना आहे. तेव्हा परिभ्रमण करीत असता नाना प्रकारच्या लोकांशी

संबंध येऊन देशस्थिती, समाजस्थिती याचे यथायोग्य अवलोकन करता येते. म्हणूनच विवेक, परिभ्रमण व तत्परता (आलस्यरहित) हे गुण श्रीसमर्थ व गुरूदेव यांच्या ठायी प्रकर्षाने आढळतात. वेळेचे भान व पालन इतके काटेकोर असे की, लोक आपल्या घड्याळाचे काटे त्यानुसार लावीत असत. ही सवय चिन्मय मिशनमध्ये अशी दृढ झाली आहे की, प्रत्येक सदस्य वेळेचे महत्त्व जाणतो. त्यामुळेच मिशनचा कार्यक्रम ठरलेल्या वेळेनुसारच होणार याची प्रत्येकाला खात्री असते.

गीतेतील कर्मयोगाचे पालन श्रीसमर्थ व गुरूदेव ह्या दोन्ही कर्मयोग्यांनी जीवनभर केले. श्रीसमर्थांनी 'यत्न तोचि देव जाणावा' हा प्रयत्नवाद सांगितला व उद्योगावाचून स्वस्थ बसून केवळ परमेश्वरावर हवाला टाकून कार्यसिद्धी होणार नाही हे दोघांनीही स्वत:च्या उदाहरणांनी लोकांना दाखवून दिले.

श्रीसमर्थांना किंवा गुरूदेवांना अविरत इतके कार्य करण्याची खरोखर स्वत:साठी आवश्यकता होती का ? ते तर आत्मज्ञानी व स्वस्वरूपात राहणारे होते. पण केवळ जनहित हेच ध्येय डोळ्यांसमोर ठेवून आणि 'उक्ति तशी कृती' हा आदर्श जनसामान्यांपुढे ठेवण्याच्या हेतूने व लोकांनी तसेच आचरण करावे (स्वस्थ बसून राहू नये) म्हणूनच त्यांनी स्वत:च्या प्रकृतीचीसुद्धा पर्वा न करता अखंड कार्य केले.

विवेक, वैराग्य, विरक्ती, निस्पृहता, क्षमाशीलता, मधुर वाणी, परोपकार इ. अनेक गुणांचे अभूतपूर्व मिश्रण श्रीसमर्थ व गुरूदेव यांचे ठायी दिसून येते. त्याचे वर्णन करण्यास शब्द अपुरे पडतील.

ज्याप्रमाणे समर्थांच्या देखरेखीखाली तयार झालेले असंख्य शिष्य केवळ महाराष्ट्रभरच नव्हे, तर सर्व देशभर हिंडून रामदासी संप्रदायाच्या माध्यमातून, पारतंत्र्यात सडत असलेल्या देशबांधवांमध्ये राष्ट्रप्रेम व स्वधर्म भावना जागृत करू शकले, त्याचप्रमाणे गुरूदेवांच्या मार्गदर्शनाखाली वेदांताचे इंग्रजी माध्यमातून शिक्षण घेतलेले अनेक ब्रह्मचारी व स्वामीजींनी, पाश्चात्त्य संस्कृतीपुढे लाचार झालेल्या सुशिक्षित समाजातील देशवासीयांना वेदान्त व हिंदू धर्मशास्त्राचे ज्ञान करून देण्याचे अलौकिक कार्य केले. आज इंग्रजी, हिंदी, मराठी व इतर सर्व प्रांतीय भाषेतून ज्ञान-यज्ञांद्वारे चिन्मय मिशनचे ब्रह्मचारी व स्वामीजी जगभर वेदान्ताचा प्रचार व प्रसार करीत आहेत. शास्त्रोक्त पद्धतीने वेदान्त-शिक्षण देणारी चिन्मय मिशन ही अग्रगण्य संस्था आहे.

श्रीसमर्थांप्रमाणेच भव्य चेहरा, तेज:पुंज कांती, सुदृढ शरीर यष्टी, गळ्यांत रूद्राक्ष माळा, कौपीन वस्त्रे, पायी पादुका (खडावा), हाती जपमाळ, लांब दाढी, लांब केस असे तेजस्वी रूप गुरूदेवांना ही लाभले होते.

श्री समर्थ व गुरूदेव यांच्यातील काही वैशिष्ट्य-साधर्म्ये पुढीलप्रमाणे सांगता येतील. ते भरभर, शिस्तीत व ताठ राहून चालत, जणू काही सैनिकी अधिकारीच त्यांच्या चालण्यावरून अंधव्यक्तीसुद्धा त्यांना सहज ओळखू शकत असे. त्यांच्या दृष्टीत समोरील व्यक्तीच्या मनाचा ठाव घेण्याचे सामर्थ्य होते. त्यांच्या नजरेला नजर देणे सहज शक्य नसे. पहाटे ३ वाजल्यापासून रात्री ११-१२ वाजेपर्यंत सतत कार्य करण्याच्या त्यांच्या पद्धतीकडे पाहून त्यांना निद्रेचीही आवश्यकता नसे की काय, कोण जाणे ? असेच वाटे. दोघांनाही व्यायामाची आवड होती. लहान मुले अत्यंत प्रिय होती. शिवाय गायनाची आवड, अमोघ वक्तृत्त्व कला, निरंतर वाचन, लेखन, जबरदस्त स्मरणशक्ती इ. अनेक गुणांचे साम्य आढळते. आकर्षक बोलणे व अखंड सुमधूर वाक्कप्रवाह यांमुळे श्रोते देहभान विसरून जात असत.

ज्याप्रमाणे श्रीसमर्थ श्रीरामचरित्रांतील प्रसंग हुबेहुब डोळ्यांसमोर उभे करीत, त्याचप्रमाणे गुरूदेव आपली प्रतिपादन करण्याची पद्धत, प्रसंगी विनोद व हावभाव यामुळे गीतेतील कठीण तत्त्वज्ञानही अत्यंत सुलभ व सोपे करीत असत.

श्रीसमर्थ रामदास स्वामी व गुरूदेव स्वामी चिन्मयानन्दजी यांच्याबाबतीत कितीही लिहिले तरी कमीच वाटेल. श्रीसमर्थ महंतांचे महंत, राष्ट्रगुरू होते, तर गुरूदेव गीता-आचार्य, गुरू-श्रेष्ठ होते. त्यांच्या गुणांचा पार कोणास लागणार? श्री समर्थांनी लक्षावधी लोकांना श्रीरामचरित्राचा व श्रीरामभक्तीचा परिचय करून दिला, तर गुरूदेवांनी गीता-ज्ञानयज्ञांच्या माध्यमांतून अविरतपणे लाखो लोकांना गीता-तत्त्वज्ञानाची ओळख करून दिली. अशा सर्वगुण संपन्न महापुरुषांचे, परब्रह्माचे वर्णन करण्याचे सामर्थ्य कोणात आहे ?

**श्री. अनंत स. काईंतवाडे**
ए-१०५, शिवकृपा, धन्वतरी नगर, पोस्ट राजेंद्र नगर,
इंदौर ४५२०१०

# कृतज्ञताज्ञापनम्

## परमपूज्य स्वामी तेजोमयानंद कृत

समस्तजनकल्याणे निरतं करुणामयम्
नमामि चिन्मयं देवं सद्गुरुं ब्रह्मविद्वरम् ॥१॥
संस्कृतेर्वीक्ष्य हानिंच भारतस्य च दु:स्थितिम् ।
द्रवितं हृदयं यस्य वन्देऽहं तं महामुनिम् ॥२॥
निष्क्रिया करुणा क्वापि सफला न भविष्यति ।
इति मत्वा सर्वदैव कर्मणि वर्तते यति: ॥३॥
स्वयं कुर्वन्कारयज्च कर्माणि विविधानि य: ।
असक्त: सर्वकार्येषु वर्तते सर्वदा च स: ॥४॥
ज्ञानयज्ञप्रचारं च ब्रह्मचारिप्रशिक्षणम् ।
श्रुतिस्मृतिपुराणादि व्याख्याग्रन्थ प्रकाशनम् ॥५॥
बालकेषु च संस्कारो विचारो युवकेषु च ।
धर्मनिष्ठा देशभक्तिर्लोकसेवा तथैवच ॥६॥
यथा वृद्धिं प्राप्नुवन्ति तथा यत्नं करोति स: ।
सर्वदा सर्वभावेन सद्गुरुर्नो यतीश्वर: ॥७॥
ये गुणा: सर्वशास्त्रेषु वर्ण्यन्ते ब्रह्मज्ञानिनाम् ।
तैरयं सर्वदा पूर्णो राजते सर्वयोगिनाम ॥८॥
निर्गुणे निश्चला निष्ठा, सगुणे सरसा रेति: ।
संगमो मधुरस्त्वायं देशिके नो महात्मनि ॥९॥
अनेक जन्मार्जितपुण्यप्राप्त: ।
मया गुरुर्यो जगति प्रसिद्ध: ।
यस्य प्रसादेन मन: प्रशान्तम् ।
बभूव मे नं शिरसा नमामि ॥१०॥
कृतज्ञता याच हृदि स्थिता मे
वक्तुं न शक्या खलु यत्नतोऽपि ।
गुरो प्रसीद कृपया विधेहि
त्वत्पादभक्तिं परमानुरक्तिम् ॥११॥
हरि ॐ तत् सत्

# तोचि साधु ओळखावा

अॅड्. व. ना. उण्डे

*अॅडव्होकेट. १०-१२ वर्षे ज्येष्ठ नागरिक संघटनेसाठी कार्यरत.*

संतश्रेष्ठ तुकाराम हे महाराष्ट्राचे पवित्र श्रद्धास्थान आहे. ज्ञानोबा-तुकाराम ही वाणी महाराष्ट्रात तरी लहानग्या वयातच मुखोद्गत झालेली असते. येथील आळंदी-देहू ही क्षेत्रे या दोन्ही संतांच्या वास्तव्याने इतिहास कालापासून पुनीत झालेली आहेत. नराचा नारायण कसा होऊ शकतो याचा प्रत्यय तुकारामांच्या चरित्रात आहे. तुकारामांचा सदाचार म्हणजे श्रेष्ठ हिंदु संस्कृतीच्या नीतिमत्तेचे सार आहे. त्यांच्या अभंगवाणीची योग्यता व सामर्थ्य ब्रह्मवाक्याएवढे आहे. ज्ञान आणि भक्तीचा पावन संगम या अभंगवाणीतून प्रत्ययाला येतो. याच अभंगवाणीतील एक पृथ्वीमोलाचा अभंग आहे. तो असा -

*जें कां रंजले गांजले । त्यासि म्हणे जो आपुले ॥*
*तोचि साधु ओळखावा । देव तेथे चि जाणावा ॥१॥*

या अभंगाचा मतितार्थ असा की जे जन विविध तापाने रंजलेले, गांजलेले असतात, ज्यांना सांभाळणारा कोणीही नसतो त्यांना आपले म्हणून पोटाशी घालणारा तोच संत असतो. अशा सज्जनाचे चित्त लोण्याप्रमाणे अंर्तबाह्य मृदू असते. जो आपल्या मुलांवर माया करतो तशीच माया दासदासीवरही करतो. त्याला साधू म्हणतात. अशा साधुजवळ देवाची खूण असते किंबहुना तुकाराम महाराज म्हणतात त्याप्रमाणे असा साधु म्हणजे प्रत्यक्ष भगवंताची मूर्तीच होय. साधुसंतांच्या मनात जनसामान्याविषयी किती कळवळा असतो याची प्रचिती सिद्ध करणारा हा अभंग आहे. त्यातील तत्त्वज्ञान खरोखर मनाला भिडणारे व चिरंतन आहे.

संत तुकोबांनी मनुष्य स्वभावाला मुरड घालून सन्मार्गाने जाण्यासाठी वाट दाखविली. त्यातही मानवतावादी दृष्टिकोनच प्रामुख्याने स्पष्ट केला. मनुष्याला सज्जनपणे वागता येऊ शकते पण त्यासाठी त्याचे स्वभावात काही गुणांचा अंतर्भाव असावा लागतो व अशा सद्‌गुणांनीच मनुष्यातील साधुत्व ओळखता येते. अशी व्यक्ती व प्रत्यक्ष परमेश्वर यात खरे तर फरकच नाही. फक्त आपल्या आजूबाजूला अस्तित्त्वात असलेल्यांची आपणास जाण हवी. समाजात चिंतेने ग्रासलेले, दुःखाने पिडलेले, उपेक्षिलेले, अनेक प्रकारच्या अडचणीत असलेले, योग्य मदतीशिवाय, मार्गदर्शनाशिवाय भरकटणारे, अनावधानाने कुमार्गाला लागलेले अनेक असतात. आपल्यातील सुप्त गुण जसे - करुणा, ममत्त्व, हळुवारपणा, प्रामाणिकपणा, सहृदयता व परोपकार, सहजप्रवृत्ती व त्याजबरोबर सक्रीय सहाय्य करण्याची इच्छा शक्ती यांचा प्रयत्नपूर्वक विकास केल्यास आपणास अशा रंजलेल्या, गांजलेल्या व्यक्तींच्या दुःखावर फुंकर घालता येईल, त्यांना मदतीचा हात देता येईल, त्यांचे दुःखात सहभागी होता येईल व त्यांचे आयुष्याला योग्य गती व आशय देता येईल. नाहीतरी साधुत्त्व किंवा संतत्त्व आपणास वेगळे काय शिकविते ?

समाजाला उन्नत करणारे, समाजाला परिस्थितीची जाण आणून जागृत करणारे, समाजाचे उद्‌बोधन करून अनेक चांगल्या उपक्रमांचा आदर्श देणारे व समाजासाठी आयुष्यभर झटणारे. ब्रह्मलीन परमपूज्य गुरूदेव स्वामी चिन्मयानंदजी व त्यांचे अपरोक्ष त्यांचे कार्य अविरत चालू ठेवणाऱ्या त्यांच्या शिष्यगणांनी हे समाजकार्य चालू ठेवले आहे.

गुरूदेव चिन्मयानंद (पूर्वग्रहीचे श्री. बाळकृष्ण मेनन) यांचे भौतिक जगावरील वास्तव्य फक्त ७७ वर्षांचे. अतिशय उच्च कोटीतले संन्यासी म्हणूनच ते जगले. तसे पाहिले तर वेदान्त हाच त्यांचा चिंतनाचा व अभ्यासाचा विषय. उपनिषद व भगवत् गीता या संबंधीचे त्यांचे विचार, भाष्य व त्यांची शिकवणूक तर प्रसिद्धच आहे. वैदिक काळातील ऋषीमुनींचे सदाचाराचे वागणे, सुख आणि समाधानाने भरलेले मन म्हणजेच यश आणि यशस्वितेची गुरूकिल्ली. राग, काळजी, हव्यास, उत्तेजितपणा, अधिरपणा हे अवगुण व्यक्तिमत्त्वातून घालविणारी गीतेतील शिकवण, धर्म म्हणजे नेमके काय व तो कोणासाठी आहे ? आपल्याजवळचे देत राहणे हीच गीतेची खरी शिकवण, अध्यात्मिक जीवन म्हणजे काय ? ज्ञान व सत्य यांची कास धरून मनुष्याने त्याच्यातील अहंकार घालविला तर तोही परमेश्वर बनू शकतो. फक्त अविरत कष्टानेच यश मिळू शकते... आदि त्यांचे विचार त्यांचे असंख्य व्याख्यानांतून व निवडक लेखांतून भारतीयांना व भारताबाहेरील त्यांचे असंख्य अनुयायांना समजलेले आहेत. गुरूदेवांचे व्यक्तिमत्त्व कसे होते ? त्या व्यक्तिमत्त्वातील सामान्यांना जाणवणारी शक्तिस्थळे कोणती होती ? गुरूदेव अतिशय निर्भय व्यक्तिमत्त्वाचे होते. प्रचंड बुद्धिमत्तेचे तेज त्यांचे चेहऱ्यावर झळाळत असे. त्यांचे वक्तृत्त्वात अमोघ सहजता व शक्ती असायची. व्यक्तिमत्त्वात हृदयाचा मोठेपणा असल्याने काही प्रसंगी व्यक्तिगत संभाषणात दयाबुद्धी व अनुकंपा अनुभवास येत असे. वागण्यात, बोलण्यात ओथंबलेले प्रेम जाणवत असले तरी कधी कधी आवेशयुक्त व अतिशय परिणामकारक बोलत असत. अवघड व गूढ प्रश्नांना सुद्धा अतिशय सहज व पटणारे स्पष्टीकरण देत असत. मात्र भोंदूगिरी करणाऱ्या व दाखविणाऱ्या तथाकथित साधू-संतांबद्दल त्यांचे विचार स्पष्ट असत. वेडगळ समजुतीवर त्यांचा कधीच विश्वास नव्हता व चमत्कार करून दाखविण्यावर तर त्यांचा तीव्र आक्षेप असे. गुरूदेवांचे एकूणच वागणे, वावरणे शिस्तबद्ध असायचे. वक्तशीरपणाबद्दल तर त्यांची ख्यातीच होती. त्यांना आलेल्या प्रत्येक पत्रास ते स्वत: व तेही स्वत:चे हस्ताक्षरात उत्तर देत. दिवसातील ८ ते १० तास त्यांचे पत्र लेखनात जात. २००/२५० व्यक्तींचे नावनिशिवार पत्ते पिनकोडसह ते लीलया तोंडाने सांगत असत. एवढी स्मरणशक्ती सतेज होती. त्यांचे भाषणात अगर प्रवचनात त्यांना संपूर्ण शांतता हवी असे. मध्येच कोणी कारणपरत्वे उठून जात असल्यास ती व्यक्ती निघून जाईपर्यंत ते बोलायचे थांबत व कोणतीही प्रतिक्रिया न देता थोड्या वेळाने पूर्वीच्याच पद्धतीत भाषण चालू करत. भाषणात अगर प्रवचनात बोजडपणा नसे. उलट अधून मधून सौम्य विनोदसुद्धा करीत. प्रवचनाचे विषय समाजातील प्रत्येक घटकाला स्पर्श

करणारे असत. वेदान्ताचा अभ्यासक असलेले हे व्यक्तिमत्त्व आधुनिक काळाशी व त्यातील समस्यांशी पूर्ण समरस झालेले होते आणि बहुधः त्यामुळेच चिन्मय मिशनचे कार्य समाज जीवनास धरून चाललेले आहे.

गुरूदेव स्वामी चिन्मयानंद यांनी मानवतेच्या भावनेने, निरपेक्ष व सेवाभावी वृत्तीने अनेकांच्या जीवनातील अंधारात प्रकाशकिरणांचा झोत टाकला. आधुनिक काळात यशस्वी जीवन जगण्यासाठी नुसते मार्गदर्शनच नव्हे तर काही आवश्यक उपक्रम स्वतः सुरू केले. जुन्या तत्त्वनिष्ठ जीवनपद्धतीची आधुनिक जीवनपद्धतीशी योग्य सांगड घालून भारतीय समाजाला योग्य दिशा व प्रतिष्ठा मिळवून दिली. असे सामाजिक निरलस सेवा करणारे, सामाजिक विषयात प्रबोधन करणारे गुरूदेव माझे दृष्टिने सद्गुरू व साधुसमानच आहेत व म्हणूनच 'दिव्यत्त्वाची जेथ प्रचिती, तेथे कर माझे जुळती' या उक्तीनुसार मला ते वंदनीय आहेत. समाजासाठी जे उदात्त कार्य स्वामी चिन्मयानंद यांनी सुरू केले व आजतागायत जे कार्य चालू आहे त्यात साधुत्वाची व्याख्या व संकल्पना ह्या दोन्ही गोष्टींची पूर्तता आहे.

म्हणूनच, स्वामी चिन्मयानंद यांचे जीवन, त्यांची शिकवण व समाजासाठी त्यांनी केलेले कार्य त्यांचे निर्वाणानंतरही चालू असलेले मिशनचे कार्य मला तरी त्यांचेतील साधुत्त्वाचीच प्रचिती देत असते.

**ॲड. व. ना उण्डे**
प्लॉट क्र. बी ६१, गुरूदीप १/३०१,
तुळशीबागवाले कॉलनी, सहकारनगर क्र. २,
पुणे ४११००९.
फोन - ०२०/२४२२८५४६



## स्वामी चिन्मयानंदांच्या संदेशातून - भारताची देणगी

वेदान्त म्हणजे -
शास्त्रीय विश्लेषणाचा धर्म !
देव आणि दानव, पांडव आणि कौरव
ह्या संघर्षासारखाच -
मानवी अंतःकरणातील तणावही चिरंतनच !
परंतु अंतिम यश हे -
ज्या अर्जुनाने वृंदावनीच्या ईश्वराला -
आपला सारथी म्हणून निवडले -
त्यालाच प्राप्त होते !
हिंदू धर्मातील भक्तियोग - भक्तीचा, श्रद्धेचा मार्ग !
कर्मयोग - निःस्वार्थी कर्माचा मार्ग !
ज्ञानयोग - ज्ञानाचा - जिज्ञासेचा मार्ग !
हे सारे आपला दर्जा उंचावून घडवेल आपल्याला -
दैवी मितीच्या प्रतिष्ठेला आणि उंचीला स्पर्शिणारे !
आपल्यातील नवीन जाणीव शक्तीला जागृत करणारे !
वैज्ञानिक युगातल्या समस्यांची उकल -
त्या जागृतीद्वारेच होणार ! विस्तारत जाणार !
व्यक्ति - समाज - राष्ट्र आणि - विश्व - अशी !
जी पिढी माणसाला सुधारेल -
ती जागतिक शांततेचीही अध्वर्यु होईल -
वेदान्त - गीता - उपनिषदे शरीराच्या नसानसात भिनावीत !
यांच्या अभ्यासाने, आचरणाने आणि प्रसाराने
शोभू भारतपुत्र ! उपनिषद - द्रष्ट्यांच्या अपेक्षेतील महामानव !
॥ हरि ॐ तत्सत् ॥

**शब्दांकन - सौ. शैला पटवर्धन**
(आधारभूत पुस्तिका - 'आत्मस्वरूप जाणा' सेंट्रल चिन्मयानंद ट्रस्ट, मुंबई)

यौवनं धनसंपत्तिः प्रभुत्वमविवेकता ।
एकैकमप्यनर्थाय किमु यत्र चतुष्टयम् ॥

हस्तस्य भूषणं दानं, सत्यं कण्ठस्य भूषणम् ।
श्रोत्रस्य भूषणं शास्त्रं भूषणैः किं प्रयोजनम् ॥

# र्म आणि मानवी मू

मी चिन्मयानंदांचे भाषण दि. २०

## हा परिसंवाद कां ?

इतिहास सांगतो की, सर्व धर्मानें समाजामध्ये महत्त्वाची भूमिका बजावली आहे. आधुनिक काळातही विश्वांतील लाखो लोकांना जीवन जगण्यासाठी आवश्यक अशी उत्कट इच्छा, आकांक्षा देतो आहे. विज्ञान, तंत्रज्ञान आणि कलाशास्त्र यांच्या आधुनिक युगातील आगमनामुळे धर्माबद्दल काही बुद्धिवंतांच्या मनात गोंधळ उडाला. धर्माची आवश्यकता आहे का ? भविष्यात या धर्माचं काय स्वरूप असावं ? मानवी मूल्ये व धर्म हे समोरासमोर आले तर यातलं काय महत्त्वाचं ? वगैरे प्रश्नांवर बुद्धिवंतांनी विचार करायला सुरुवात केली.

प्रत्येक धर्माची नीतीपर शिकवण आणि प्रथा यांतून निर्माण झालेल्या गोंधळामुळे बुद्धिवादी वर्ग धर्मापासून दूर फेकला गेला. त्यांना, आपण कुठल्या एका धर्माचे आहोत असं म्हणून घेण्यापेक्षा स्वतःला निधर्मी म्हणून घेण्यात अधिक भूषण वाटू लागले. परंतु त्याचवेळी बऱ्याच समाजाच्या कल्याणाचा विचार करणाऱ्या विचारवंतांना धर्माची जागा कुठली मूल्ये घेऊ शकतील याबद्दल साशंकता निर्माण झाली.

जगतांतील विविध धर्मांनी, सामाजिक व मानवी मूल्ये जतन करण्यास मदतच केली आहे. लाखो लोकांच्या मनात आज जी समाजाची वैचारिक वीण टिकून आहे ती धर्माच्या प्रभावाखालीच. हा धर्माचा प्रभाव आता जर धोक्याची सूचना देत असेल; जे आज जगभर दिसतंय, तर त्याची जागा कोणी घ्यायची ? समाजाला एकसंध कोण ठेवू शकेल ? मानवी मूल्याबद्दलचा आदर व त्यावरचा विश्वास मानवी मनात धर्माशिवाय करणे शक्य आहे का ?

वर निर्देशित केलेले आणि इतर मूलभूत प्रश्न या परिसंवादांत चर्चिले गेले. **हा मनोवेधक चित्तरंजक परिसंवाद चिन्मय मिशन, पुणे यांनी २० ऑक्टोबर ६९ रोजी**, बालगंधर्व रंगमंदिर पुणे येथे आयोजित केला होता.

प्रमुख बुद्धिवंत आणि प्रख्यात सामाजिक विचारवंतांनी या परिसंवादात भाग घेतला होता. त्यांतील वक्त्यांची नावे पुढीलप्रमाणे श्री. नानासाहेब गोरे, न्यायाधीश व्ही.ए. नाईक, श्री. डी. के. बेडेकर आणि स्वामी चिन्मयानंद.

"ही जर वक्तृत्व चर्चा असती तर मी आज तुम्हाला उद्देशून बोललो नसतो. हा परिसंवाद आहे आणि यात भाग घेणाऱ्या विद्वानांनी जशी आपापली मते मांडली त्याचप्रमाणे मीही 'धर्म आणि मानवी मूल्ये' या विषयावरची माझी मते, माझा प्रामाणिक दृष्टिकोन तुमच्यापुढे विचारार्ह म्हणून मांडणार आहे.

आत्ताच्या या क्षणापर्यंत, बोललेल्या कुठल्याही वक्त्याने 'धर्माची' व्याख्या करण्याचा प्रयत्न केला नाही. कारण त्यांनी असं गृहीत धरलं की चर्चेस, देवळे, मशिदी, धार्मिक संस्था, मिशन्स, मठ, आश्रम, पाठशाळा यामध्ये जे आपण पाहतो तो 'धर्म' होय. नेमक्या याच मुद्दयाचा आधार घेऊन सांगितलं गेलं की, या धर्मांमुळे जातीय दंगली घडतात... अस्पृश्यता वाढते, विविध धार्मिक युद्धे होतात आणि ईश्वरावर अंधश्रद्धा ठेवल्यामुळे जणू आपण माणुसकीचा अपमान करतो आहोत. हे सर्व घडण्यास 'धर्म'च जबाबदार आहे. इतकंच नाही तर धर्म माणसामाणसांत व देशादेशांत फूट पाडण्यास व आपाआपसातले मतभेद वाढवण्यास जबाबदार आहे. म्हणजेच मानव जातीत एकमेकांत द्वेष पसरवणारा व ऐक्य भंग करणारा आहे. याचाच अर्थ असा की, 'धर्म' हा मानवतेविरूद्ध आहे. बोलण्याच्या ओघात असंही एक अधिकारवाणीयुक्त चमत्कारिक विधान केलं गेलं की २० व्या शतकातला माणूस काहीही निर्माण करू शकतो, तो कशालाही भीत नाही, आपली स्वतःची काळजी घेण्यास तो समर्थ आहे आणि त्याच्यासाठी त्याला कुठल्याही परमेश्वराची वा त्याच्या मार्गदर्शनाची गरज नाही. ईश्वराची आणि धर्माची, या दोन्हींची काहीही गरज नाही. आणि तरीही आज जो धर्म अस्तित्वात दिसतो तो काही विशिष्ट मूठभर लोकांमुळेच आणि स्वतःचाच गौरव करून घेण्यासाठी ते या धार्मिक संस्था चालवतात व जपतात. धर्माबद्दलची अशी मूलभूत गृहित धरून परिसंवादात आतापर्यंत जे विचार मांडले गेले त्यावरून तुम्ही साहजिकच असा निष्कर्ष काढाल की, (आपल्याला) धर्माची आवश्यकता नाही.

हे जर खरंच असं असेल तर माझं तुमच्याशी दुमत नाही, कारण धर्म जर असाच असेल तर मलाही निश्चित वाटतं की, अशा धर्माची आवश्यकता नाही. परंतु प्रश्न असा आहे की धर्म असा आहे का ? क्षणभर आपण कल्पना करू की आतापर्यंत मांडला तो धर्म होय. मग मित्रांनो मला सांगा की, हा धर्म शतकानुशतके, वर्षानुवर्षे म्हणजे इतिहासाच्या अरुणोदयापासून, आजपर्यंत कसा काय टिकून राहिला ? आजही तो धर्म आहे म्हणूनच तर हा परिसंवाद घडतो आहे. आपल्याला असं तर म्हणायचं नाही, की, आपले पूर्वज इतके मूर्ख होते की, धर्माचा हा फोलपणा त्यांच्या लक्षातच आला नाही ? आणि मानवाच्या प्रगतीत व ऐक्यात धर्म हाच मुख्य अडसर आहे हे त्यांना कळलंच नाही ? याचा अर्थ असा आहे का की फक्त आपल्याच पिढीला अचानक ज्ञान झालं आणि धर्माचा पोकळपणा आपल्या लक्षांत आला ?

आपल्या धर्मात बहुमोल असं काहीतरी असलं पाहिजे नाही तर मानव जातीने इतके वर्षानुवर्षे हा धर्म सहन केलाच नसता आणि आपली धर्मसंस्था आपल्यात राहूच दिली नसती. म्हणूनच आपल्या धर्मात काय विचार मांडले हे आपण जाणून घेतले पाहिजे. काळाच्या ओघात कुठल्या परकीय विचारांनी त्यांना झाकून टाकलंय की ज्यामुळे आज आपण किंवा आपल्यापैकी काहीजण तरी तिरस्कार करू लागलो व आपण त्याला नाकारू लागलो ? सामाजिक जीवनाच्या दृष्टिकोनातून विचार करता, आपल्या धर्म संकल्पनाच्या कार्यवाहीत दुष्ट संकल्पना घुसल्या आहेत म्हणून धर्मच झुगारून देणं हे अत्यंत घातक कृत्य तर ठरेलच पण त्याचबरोबर मानवतेचा तो घोर अपमान ठरेल. त्याऐवजी त्यातले दोष व त्रुटी दूर कराव्यात आणि आपल्या धर्मात मानवतेच्या सेवेसाठी

जे मौलिक विचार आहेत त्याचे जतन करावे हे अधिक संयुक्तिक व शहाणपणाचे नाही कां ठरणार ?

जेव्हा जेव्हा देशातल्या रुग्णालयांवरून मी जातो तेव्हा माझ्या मनात विचार येतात की रुग्णालयांची संख्या वाढते आहे, नवनव्या औषधांचे संशोधन झालं आहे, वैद्यकीय महाविद्यालयांची संख्याही वाढत आहे आणि पर्यायाने डॉक्टरांची संख्याही वाढते आहे आणि तरीसुद्धा रुग्णालयातल्या सर्व खाटा विव्हळणाऱ्या रुग्णांनी तुडुंब भरलेल्या आहेत. आपल्या असंही लक्षात येतं की वैद्यकीय क्षेत्रातील संशोधनात अधिक प्रगती होते आहे, आजच्या रोगांवर रोज नवनवीन औषधांचा शोध लागतो आहे, तरीसुद्धा नवीन रोगांची माहिती उपलब्ध होते आहे. अर्थात हे रोग शारीरिक स्तरावरचे नसले तर मानसिक स्तरावरचे असतील. अशा वेळी आपण जर हट्ट धरला की, "ही रुग्णालये निरुपयोगी आहेत, ती बंद केली पाहिजेत" तर हे न्याय्य ठरेल का ? आपल्याकडे रुग्णालये, डॉक्टर्स, विविध प्रकारची औषधे व नवनवीन उपचार पद्धतीत लक्षणीय वाढ होऊनसुद्धा मानवजात अजूनही रोगमुक्त झालेली नाही. याचा अर्थ असा थोडाच आहे की, वैद्यकीय शास्त्राचा टाकाऊ म्हणून धिक्कार केला पाहिजे वा सर्व रुग्णालये बंद केली पाहिजेत.

औषधांची भरमसाठ किंमतवाढ, डॉक्टरांची वाढीव फी यामुळे काही रुग्णांची पिळवणूक होत असते. तरीसुद्धा आपल्याला औषधे, डॉक्टर्स, रुग्णालये व दवाखाने निकालात काढता येणार नाहीत. अशा वेळी अक्कल हुशारीने घेतलेला निर्णय हाच की जे लोक आजारी पडतात, त्यांच्यात मूलभूत असा बिघाड असला पाहिजे किंवा डॉक्टर करीत असलेल्या औषधोपचारात कुठेतरी काही गल्लत होत असावी, वा औषधे पुरविणाऱ्या कंपनीच्या औषधात काही कमतरता असावी. या व्यतिरिक्त दुसरा कुठलाही निष्कर्ष निघू शकत नाही.

त्याचप्रमाणे माझी अशी प्रामाणिक समजूत आहे की 'धर्म' ही एक संस्था आहे आणि तिचेच रूपांतर 'पंथात' होतं आणि एकदा तिचा 'पंथ' झाला की मग ह्यातला सगळा चांगुलपणा, विकृत होत जातो, बिघडत जातो. गांधीवाद हा एक आदर्शवाद आहे. ज्या क्षणाला गांधीवाद संस्था म्हणून प्रस्थापित झाला त्याबरोबर त्याचा ऱ्हास सुरू झाला. मनुष्य एकदा इतरांच्या संपर्कात आला की, तो आपल्या उच्चमूल्यांची नेहमीच तडजोड करताना दिसतो आणि साहजिकच त्या तत्त्वातील उदात्तता व पावित्र्य भ्रष्ट करून टाकतो. आपल्याला आदर्श मूल्यांबाबत तडजोड करण्याची एवढी सवय लागली आहे की, जसं जसा काळ पुढे जात राहतो तसतसं वर्षागणिक वाढत्या प्रमाणात ही तडतोड आपण स्वीकारीत राहतो. त्यामुळे गोंधळ अधिकच वाढतो आणि शेवटी तो इतरेजनांना घातक ठरतो. काळाच्या ओघात मूल्यांचा हळूहळू नाश पावणं व भ्रष्ट होणं हेच तडजोड स्वीकारावयाच्या सवयीचे दुष्परिणाम आहेत. जेव्हा जेव्हा अशी परिस्थिती निर्माण झाली तेव्हा आपल्या पूर्वीच्या काळांतील हुशार व सूज्ञ पिढ्यांनी तेव्हा समाजाला नवं नेतृत्व दिलं आणि मग त्यांनी झालेल्या चुका सुधारून आपल्या संस्थेत चैतन्य निर्माण करून तिला पुनरुज्जीवित केलं. नेमकं हेच हिंदू धर्माबाबत घडत आले आहे.

आपल्या असंही लक्षात येते की पूर्वी योजनाबद्ध कार्य करणाऱ्या अनेक ज्ञानी माणसांनी अगदी योग्य क्षणी पूर्ण विचार करून हिंदू संस्कृती व हिंदू धर्म यातील चैतन्याचे व जीवन शक्तीचे पुन: नूतनीकरण केले. त्या दूरदृष्टी असलेल्या समर्थ ज्ञानी माणसांनी त्यावेळच्या समकालीन समाजाच्या गरजा आणि दर्जा लक्षात घेऊन त्यावेळी प्रचलीत असलेल्या धर्मामध्ये सुधारणा घडवून आणल्या. हे करताना जुन्या रुढीतले वाईट दोष काढून टाकले आणि समाजाची योग्य सेवा करण्यासाठी त्या जुन्या रूढींना नवीन आयुष्य बहाल केले. याप्रमाणे वैदिक धर्माचा व संस्कृतीचा ऱ्हास झाला तेव्हाच पौराणिक धर्माचा उदय झाला आणि पौराणिक संस्कृती जशी लोप पावली तेव्हा बुद्धाचा अवतार होऊन त्याने समाजातील माणसांना धर्माच्या नीतियुक्त मूल्यांची आवश्यकता पटवून दिली. जेव्हा बुद्ध तत्त्वज्ञानाचा वेगळा अर्थ काढला गेला तेव्हा आदी शंकराचार्य येऊन त्यांनी सर्व धार्मिक संस्थांत सुधारणा घडवून आणली आणि अद्वैत तत्त्वज्ञानाला प्रामुख्याने पुढे आणले. शंकराचार्यांनंतर जेव्हा धार्मिक लोक फक्त तोंडी लावण्यापुरतेच वेदांती राहिले तेव्हा रामानुजन यांचा उदय झाला. आणि त्यानंतर मध्वाचार्य, वल्लभाचार्य, निंबार्क, ज्ञानेश्वर, तुलसीदास, कबीर, तुकाराम आणि रामदास हे पुढे आले आणि जेव्हा १९ व्या शतकामध्ये आपली संस्कृती धर्माच्या नावाखाली तामसिक रीतीने काम करू लागली तेव्हा रामकृष्ण परमहंस व विवेकानंद यांनी वैश्विक ऐक्याची व सेवाधर्माची शिकवण दिली. यावरून आपण जाणू शकतो की आपल्या देशाच्या धार्मिक इतिहासात संस्कृती पुनरुज्जीवीत करणाऱ्या लाटा येतच होत्या. आणि हे घडत असताना मूळ अध्यात्मिक तत्त्वे तीच राहिली. फक्त प्रत्येक क्रियाशील ज्ञानी माणसाने त्या त्या वेळच्या समाजाला उपयोगी पडतील आणि त्याचे प्रश्न सुटतील असा अर्थ लावला.

मग आता प्रश्न उरतो की, मूलभूत अध्यात्मिक तत्त्वे वा तत्त्वज्ञान या जगात वावरताना कशी वापरायची ? समाजातील प्रत्येक व्यक्तिने कुठली प्रक्रिया वापरून जीवन जगावं आणि ती मूल्ये व्यवहारात उतरवावी ? आणि या जगाच्या मैदानांत जिथे उपनिषदांनी, ऋषींनी सांगितलेली सत्य तत्त्वे तंतोतंत पाळली जातात, त्यालाच या देशात धर्म म्हणतात. आपल्या हिंदुत्वामध्ये अनेक धर्म आहेत आणि नेमके याचमुळे सामान्य लोकांच्या मनात गोंधळ उडविणारे हे कारण ठरते. कारण या अनेक धर्मांचा मिळून एक धर्म बनला आहे व त्या सर्वांना एकत्रितपणे सर्वसाधारण हिंदुत्व म्हणतात. हे आवश्यक होते आणि आहेही. हिंदू धर्माच्या या महासंघातून एकेक भाग वेगवेगळ्या ऐतिहासिक काळात अनुयायांच्या खास मागण्याहून वेगवेगळा होत गेला. १९ व्या शतकातील धर्माच्या पुनर्जीवनाची जी लाट आली ती अनेक वर्षांच्या राजकीय गुलामगिरी व परकीय धर्मांच्या प्रभावामुळेच. पण ती लाट आपल्याच धर्मातील, समाजातील वाईट रुढी निपटून काढण्यास असमर्थ ठरली. आजच्या या क्षणी अनेक वर्षे राजकीय स्वातंत्र्य उपभोगून आपण आपल्या समाजातील उणिवांची प्रकर्षाने जाणीव करून घेत आहोत आणि त्याजबरोबर धर्म संस्थांमधील उणीवाही उघड्या पडत आहेत. दुर्दैव हे की आपल्यातील दुर्गुणांचे तण उपटून काढण्यास योग्य असे नेतृत्व लाभलेच नाही.

आजारीपण बरे करण्याचा मार्ग म्हणजे आजारी माणसाला मारणे नव्हे. एखाद्या मोठ्या वृक्षावर जेव्हा बांडगुळे चढतात, तेव्हा ती मूळ वृक्षाचा रस आणि जीवन शोषून घेतात आणि त्यावेळी तो वृक्ष अपेक्षित फळे देऊ शकत नाही. पण म्हणून वृक्षच तोडून टाकणं हा काही योग्य मार्ग नाही. त्याकरिता बागेतील तण किंवा झाडावरील बांडगुळेच काढायला पाहिजेत. साहजिकच त्यामुळे आपली बाग आपणच लावलेल्या झाडांनी प्रफुल्लित होईल आणि वाढणारे वृक्ष सशक्त होऊन आपल्याला फळे देतील. त्याचप्रमाणे ज्या सामाजिक संस्था धर्माचे कार्य करतात, अशा संस्था आपल्याच नव्हे तर इतर सर्व देशातही कार्य करताना काही चुकीच्या कल्पना व मार्ग निवडताना दिसतात. इतके असूनही त्या त्या संस्था लोकांची सेवा करतात, त्यांना आश्रयही देतात. याचाच अर्थ असा की त्यांत अशी काही मानवी मूल्ये आहेत की, ती पोषण करून आपण जोपासली पाहिजेत व त्यात भेसळ म्हणून शिरलेल्या वाईट व

चुकीच्या प्रथा काढून टाकून तो धर्म वाढविला पाहिजे. सध्याच्या आधुनिक जगात जेव्हा विज्ञान प्रगती करीत माणसातली माणुसकीच काढून टाकीत आहे तेव्हा जी काही मूल्ये, तावून, सुलाखून, पारखून घेतलेली मानवी मूल्ये, धर्मामुळे आज टिकलेली आहेत ती अशी रस्त्यावर फेकून चालणार नाही.

मी सुरुवातीलाच म्हटल्याप्रमाणे एक मुद्दा मांडला गेला की, आधुनिक माणसाला भीती माहितीच नाही. तो कशालाही घाबरत नाही. आजच्या पिढीतील माणसाला भीती वाटत नसेल तर ती कुठल्या पिढीत वाटत होती ? आपल्या पूर्वजांना ? आणि ते कशाला भीत होते ? ते वादळाला भीत होते का जंगलातल्या रानटी जनावरांना, प्रचंड वेगाने रोरावत वाहणाऱ्या नद्यांना, की त्यांतल्या भोवऱ्यांना ? पर्वतांना, मुसळधार पावसाला, ढगांच्या गडगडाटाला की कडाडत चमकणाऱ्या विजेला, इ. नैसर्गिक संकटांना ? आता मला सांगा. आजही आपण या सर्वांना घाबरत नाही का ? मी तर असं म्हणेन आधुनिक मानवाला या सर्व नैसर्गिक आपत्तींची भीती तर वाटतेच पण त्याशिवाय त्यांना विज्ञान आणि मानवी शास्त्र (शरीर शास्त्र) यांच्यातील नवनवीन शोधांमुळे अधिकतर भीती वाटते, उदा. ॲटम बॉम्ब, हैड्रोजन बॉम्ब, नशा उत्पन्न करून विभ्रम उत्पन्न करणारी औषधे, वातावरणातील प्रदूषण, वाढती लोकसंख्या, राजकीय क्रांती, उलथापालथ आणि लष्करी बंडे आणि उठाव. थोडक्यात आपली सर्वच पिढी मानसिक ताणावामुळे भीतीखाली वावरत आहे. जर शास्त्र आणि विज्ञानाने आपल्याला सुविधा दिल्या असतील तर त्यांनी अत्यंत गंभीर, राजकीय, सामाजिक व मानसिक समस्याही आपल्यापुढे उभ्या केल्या आहेत याची जाणीव आपल्यापैकी बऱ्याच जणांना नाही आणि ज्यांच्या ती लक्षात आली आहे त्यांना त्या समस्या सोडवण्याचे मार्ग गवसलेले नाहीत. रानटी जीवन जगत असतानासुद्धा गुहेत वास्तव्य करून, तुमच्या या छोट्याशा राहण्याच्या जागेतसुद्धा, तुमच्या जीवनात हास्याच्या लकेरी उमटत असत. परंतु आजची पिढी उत्तुंग गगनचुंबी इमारतीतील फ्लॅटमध्ये राहून, खायला-प्यायला भरपूर असताना आणि चांगला निवास व उत्तम कपडेलत्ते असताना आजचा मानव विषण्ण, दुःखी आणि काळजीने ग्रासलेला दिसतो. अशा स्थितीत तो जो हसण्याचा प्रयत्न करतो ते हास्य, [illegible] आणलेले व कृत्रिम वाटते. शास्त्र आणि विज्ञानांच्या शोधांमुळे, क्रांतीमुळे आपली संपूर्ण पिढीच भीतीग्रस्त, नाउमेद आणि भ्रमनिरास झालेली आहे. आणि [illegible] तुम्ही छातीठोकपणे सांगता की आजच्या माणसाला भय नाही, [illegible] आवश्यकता नाही, आणि तो स्वतःच स्वतःची काळजी घेऊ शकतो ?

तरीसुद्धा आपण जर म्हणणार असाल की धर्माचं उगमस्थान भीतीच आहे, तर मग अगदी त्याच न्यायाने असंच म्हणावे लागेल की विज्ञान आणि लोकशाही हीसुद्धा भीतीतून निर्माण झाली. एक अद्भुत चमत्काराच्या भयातून आणि दुसरी, जुलमी राजवट व दहशतीच्या भयातून. प्रगतीच्या पथावर उडी मारण्यासाठी भयाची फळी वापरण्यात काहीही गैर नाही. जसे आपण जगातील काही गोष्टींची भीती बाळगतो कारण सृष्टीमध्ये वृक्ष, पर्वत, नद्या आणि अरण्ये यांच्यापेक्षा मानव हा छोटा प्राणी आहे. साहजिकच हे सर्व कुठून आले ? ह्या निर्मितीला कोण जबाबदार आहे ? माझे या जगाशी नक्की नातं काय ? हे जग कोणी निर्माण केलं ? मूलभूत प्रश्नांचा शोध घेताना त्यांच्यात धार्मिक तृष्णा आणि वृत्ती निर्माण झाली असावी. आणि शेवटी काही बुद्धिवान माणसं अशा निष्कर्षाप्रत आली की, या सर्वांनाच काही शक्तिशाली तत्त्व, वा सत्य किंवा ईश्वर ही जगतरूपी नाट्याच्या मागे असावीत, की ज्याच्यातून हे सर्व जग निर्माण झालं व तोच हे सावरून धरतो आहे. मला सांगा, या विचारात आणि निर्णयात काय चूक आहे ? समजा त्यांनी जगताबद्दल प्रश्नच निर्माण केले नसते तरीसुद्धा त्यांनी स्वतःबद्दल प्रश्न निर्माण केलेच असते. जसे मी येथे का आलो ? मला कुणी निर्माण केले ? मी असा का वागतो ? मी आता वागतो त्याहून वेगळा का वागू शकत नाही ? मी जीवनात अधिक प्रविण, अधिक सुखी, अधिक आनंदी कसा होईन ? अशा पद्धतीने प्रश्नांच्या उत्तरांचा शोध घ्यायला सुरुवात केली त्यातून जे निष्पन्न होते त्यालाच अध्यात्मिक सत्य म्हणतात आणि उपनिषदांच्या भाषेत त्यांनाच मूल्ये म्हणतात. सध्याच्या आधुनिक जगतात जसे राजकीय पुढारी जगताचे मूल्यमापन करतात आणि राजकीय मूल्ये आणि आर्थिक सत्य या आधारावर त्याची विभागणी करतात. त्याचप्रमाणे पुरातन ऋषींनी, ज्यांना मानवी जीवनाचे सत्य सापडले होते आणि अस्तित्वाचीही जाण होती, त्याआधारे ही त्यांनी समाजाची विभागणी केली. त्यावेळी त्यांचा मुख्य उद्देश मानवाचे भावनिक आणि भौतिक जीवन अधिक सुसंगत व्हावे हाच होता. त्यावेळीच त्यांनी समाजाची राजकीय स्थिती व आर्थिक स्थिती यात बदल करण्याचा प्रयत्न केला नाही. जेव्हा जेव्हा शुद्ध विज्ञान किंवा कठीण तत्त्वज्ञान समाजासाठी उपयोगात आणावे लागते त्यावेळेला खरं तर व्यावहारिक कौशल्याची गरज असते.

शास्त्राचा ज्यावेळी जीवनात उपयोग केला जातो तेव्हा ते विज्ञान व कलाशास्त्र होते. आणि म्हणूनच शुद्ध तत्त्वज्ञान सामाजिक परिस्थितीला लावले की तो धर्म होतो आणि या शुद्ध तत्त्वज्ञानाचा जीवनात वापर केला तर त्यातूनच धार्मिक नियम वा धार्मिक कर्मे, भक्ती, तप, ध्यान हे उद्भवतात आणि म्हणूनच सामाजिक जीवनाच्या संदर्भात धर्म हा अध्यात्मिक आणि तात्त्विक सत्य शिकून घेण्याचे एक क्षेत्र बनते. कृपा करून लक्षात घ्या. मी फक्त आदर्श तत्त्वाबद्दल बोलतोय. जे सध्या कोठेही आजूबाजूला आढळत नाही.

मानवी इतिहासात काही कालखंडामध्ये काही ठिकाणी धर्मांवरून युद्धे झाली. मान्य आहे, हे खरे आहे. पण म्हणून जर आपण धर्म हा कुचकामी आहे अशा निष्कर्षाप्रत येऊ व म्हणून तो फेकून देण्यास योग्य आहे असे म्हणू तर मग असे करण्यापूर्वी व त्याचबरोबर बरीच युद्धे राजकीय मतभेदामुळे आणि महत्त्वाकांक्षेमुळे झाली म्हणून आपल्याला राजकारणही फेकून द्यावे लागेल. आर्थिक स्थितीवरून किती युद्धे झाली ? किंवा [illegible] निर्माण करण्यासाठी अनेक माणसांना गुलामगिरी पत्करावी लागली. करारनामे करून मजुरीही करावी लागली ? माणसाच्या स्वार्थीपणामुळे युद्धे ही कुठल्या ना कुठल्या स्वरूपात होत राहतील आणि हे कसे टाळावे ही मुख्य समस्या आहे. माणसाला त्याला त्याच्या खालच्या स्तरावरील स्वार्थी स्वभावापासून उदात्त विचाराकडे कसे वर उचलायचे ? या समस्येला राजकारण आणि अर्थशास्त्र हे काही मदत करू शकतात कां ? विज्ञानाने याला काही मदत केली कां ? फार पूर्वीपासून फक्त धर्मांचाच मानवाला कमी स्वार्थी बनवण्यात आणि विविध उदाहरणांनी आणि पाठपुरावा करून माणसा-माणसांत प्रेम वाढवण्यास उपयोग झाला आहे. उदा. बुद्ध वा येशुख्रिस्त वा रामकृष्ण परमहंस यांनी हजारो लोकांना मानव-बंधूंवरती समानतेने प्रेम करायला शिकविले आणि स्वतः मोठा त्याग करून मानवजातीची सेवा करायला शिकविले. अशा रीतीने धर्म आणि धार्मिक गुरू यांनी मानवापुढे एक उत्कृष्ट नियम, नीतीमूल्य मांडले आणि या जगताबद्दलचा विचार करताना स्वतःच्या वागणुकीचे उदाहरण घालून मानवाला स्वार्थीपणातून आणि अहंकारातून वर उचलले. धार्मिक आचरण एवढ्यासाठीच घालून दिले की त्यापासून वैयक्तिक अहंकार नाहीसा होईल. या व्यावहारिक सूचना वा धार्मिक नियम यांचा तपशील सतत बदलत आला आहे आणि तो समाजाच्या

परिवर्तनाबरोबर तसा बदलणे स्वाभाविक आहे. अशा बदलत्या पद्धतीत व्यक्तींना या नव्या पद्धतीत मूलभूत अध्यात्मिक सत्य कसं कार्यान्वित करावं याकरिता पुन:मार्गदर्शनाची वा परत एकदा सूचना देण्याची जरूरी असते. म्हणजेच वेळोवेळी व्यावहारिक तत्त्वज्ञान याला वेळोवेळी नवे स्वरूप व नवे नियम द्यावे लागतात. **'परंतु, मानवाला माणुसकी जपण्यासाठी कुठल्या ना कुठल्या स्वरूपात धर्माची आवश्यकता आहे.'** जगात असेही काही देश आहेत की ज्यात धर्म नामशेष केला आहे आणि सर्व धार्मिक कर्मकांडांवर बंदी आणली आहे आणि तरीसुद्धा त्या ठिकाणी धर्माची जागा अन्य गोष्टींनी घेतली आहे. जसे लष्करी कवायती, सांस्कृतिक व राजकीय महोत्सव, मे दिन, क्रांति दिन इ. ईश्वराची जागा आता राजकीय पुढाऱ्यांनी घेतली आहे आणि ग्रंथ वा लेखन यांना बायबल वा कुराणाइतकाच मान देऊन आपले जीवन त्यानुसार घडविण्यासाठी लोक प्रयत्नशील आहेत. पूर्वी ईश्वराची भीती वाटायची आता या सत्ताधारी मोठ्या भावाची भीती वाटायला लागली आहे. त्याचा रोष ओढवून घेऊ नये. कारण ते पाप ठरेल. म्हणून या मोठ्या भावाच्या शब्दाला संपूर्ण सत्य समजून लोक त्याप्रमाणे वागतात. याचा दुसरा अर्थ असा की, एका बाजूस धर्म व त्याच्या नियमांचे उच्चाटन करावयाचे आणि तिची जागा कोणत्यातरी सत्ताधारी माणसाच्या रूपाने मूल्ये म्हणून उभी करावयाची, हा एवढाच फरक आहे. समाजातील माणसांना नेहमीच एक सार्वजनिक जागा लागते की, तिथे कुठल्यातरी समारंभाच्या निमित्ताने ते एकमेकांना भेटू शकतात. त्यामुळे त्यांच्या रोजच्या कंटाळवाण्या जीवनाला व त्यात निर्माण होणाऱ्या क्षुल्लक समस्यांवर मात करून आपली त्यात अडकलेली मने उन्नत करू शकतात.

आतापर्यंत आपल्याला इतर व्याख्यात्यांनी सांगितले की असे मन उन्नत करायला व स्फूर्ती मिळवायला धर्माची आवश्यकता नाही. उलट नुसती मानवी नीतीमूल्ये जपली तरी हे होऊ शकते. प्रत्येकाला मानवी मूल्ये काय आहेत ते माहीत आहे, त्यामुळे त्यांच्याकरिता विशिष्ट झेंड्याखाली येण्याची वा विशिष्ट संस्था काढून याची जाणीव देण्याची गरज नाही. कबूल ! एकदम कबूल ! महोदय आपल्या सर्वांनाच मानवी मूल्ये माहीत आहेत. विचार करताना माझ्या मनात असा मुद्दा येतो, माझी पत्नी आणि मुले यांचा सांभाळ करणे हे माझे कर्तव्य आहे आणि त्याला मानवी मूल्य आहे. आता त्याचा सांभाळ कसा करावयाचा हे मी ठरविणार. ते मी ठरविलेले मूल्य असेल, नाही कां ? त्याकरिता मी पाकीट मारले तर मला त्यात काही गैर वाटणार नाही. आणि ते माझे मानवी मूल्य ठरते. म्हणजेच माझी मानवी मूल्यांची कल्पना आणि तुमची मानवी मूल्यांची कल्पना यात तफावत असणार. असे प्रत्येक व्यक्तीला मानवी मूल्य ठरवायला दिले तर एखादा मनुष्य खून करूनसुद्धा, या माणसांनी माझा आणि कुटुंबाचा अपमान केला असे सांगून सुटावयाचा प्रयत्न करेल. मूल्य ठरविण्याची जबाबदारी व्यक्तिगणिक ठेवली तर समाजात सावळा गोंधळ उडेल. यासाठीच सर्वमान्य आचारसंहिता असावी व एकच परिमाण असावे उदा. तुम्ही कापडाच्या दुकानात गेलात व एक मीटर कापड मागितलेत व त्या दुकानदाराने समजा फक्त १० इंच वा. ८ इंच कापड दिले तर तुमचा व्यवहार होणारच नाही. असा गोंधळ उडू नये म्हणून एक मीटर म्हणजे किती इंच हे परिमाण पॅरीस येथील संग्रहालयात ठेवलेले आहे आणि त्यामुळे सर्व जगात या मान्य केलेल्या मीटरशीच तुलना केली जाते. तेव्हा आपण जेव्हा मानवी मूल्ये म्हणतो तेव्हा त्याचे मान्य केलेले परिमाण काय ? माननीय महोदय, इस्लामी माणसाला वाटते दुसऱ्या धर्माच्या माणसाला त्याची मतं पटवून दिली की ते चांगलं कृत्य आहे. मला वाटतं मी हिंदू आहे म्हणजे हे श्रेष्ठ आहे. (हे सर्व श्रेष्ठ आहे) तुम्ही असंही म्हणाल की, दया, सहनशीलता, करुणा, सेवा वगैरे या सर्वांनाच माहिती आहेत. पण करुणा म्हटलं की माझी करुणा करण्याची कल्पना तुमच्या कल्पनेपेक्षा वेगळी असू शकते. महात्मा गांधींची देशसेवेची कल्पना ही स्टॅलिनच्या देशसेवा करण्याच्या कल्पनेपेक्षा भिन्न होती. तरीही ती दोन्ही माणसे मानवी मूल्ये जगत होती. स्वत:च्या देशाला वाचविण्यासाठी देशाची लोकसंख्या ३३ टक्क्यांनी कमी करणे ही हिटलरची देशसेवेची पद्धत होती. समाजात एकजिनसीपणा येण्यासाठी राष्ट्रीयत्व पुरेसे आहे. त्यासाठी धर्माची गरज नाही. होय ना ? आपण आपल्याच आयुष्यात हिटलरनी राष्ट्रीयत्वाची व्याख्या केली त्याचे महाघोर परिणाम आपण सर्वांनीच आपल्या आयुष्यात पाहिले आहेत. या विविध कल्पना काही प्रमाणात ग्राह्य असू शकतात. तुलनात्मक दृष्ट्या पाहिले तर स्वकेंद्रित ब्रह्मचर्य पालन करून जगण्यापेक्षा असं जर वाटलं की मला बायका मुले असावीत, कुटुंब असावं तर हा दृष्टिकोन व्यापक समजला जाईल. समजा मी असं ठरवलं समाजाकरिता, माझ्या जातीकरिता मी माझ्या घराचा व सुखसोईंचा त्याग करायचा ठरविला तर ते निश्चित अधिक व्यापक ठरेल. इतकंच नव्हे मी जर जातीचा आनंद विसरून त्याचा त्याग करून माझ्या देशाकरिता वा प्रदेशाकरिता कार्य करू लागलो तर ते अतिशय योग्य व सुंदर होईल. **'जितकी माझी दृष्टी अधिक व्यापक व दृष्टिकोण अधिक सर्वसमावेशक दृष्टिकोण आणि तादात्म्यपूर्ण असेल तितकी माझी मानवी मूल्ये उदात्त तर होतील.'** धर्माला एक वेगळा पर्याय म्हणून मी राष्ट्रीयत्व स्वीकारावे असाही एक पर्याय सुचविला गेला जरूर, हे मला मान्य होण्यासारखे आहे. पण मग चिनी वा पाकिस्तानी वेगळे राष्ट्रीयत्व मानणारे असल्यामुळे त्यांच्याशी मी दुष्टपणे वागणार नाही का ? जेव्हा तुम्ही विश्वातील सर्व प्राणीमात्रांवर प्रेम करण्याची भाषा करता तेव्हा असा संकुचित विचार चालणार नाही. आपली दृष्टी याहून अधिक विशाल व्हायला हवी. आपल्यात 'वसुधैव कुटुंबकम्' ही भावना निर्माण व्हायला हवी. हे सर्व विश्व एकच कुटुंब आहे.

आणि अशी वैश्विक एकात्मता व बंधुभावना याची कल्पना मी कशी काय रुजविणार ? मग त्याकरिता मला विशाल आदर्शाशी एकजीव व्हायला नको कां ? मी जेव्हा माझ्या घराशी किंवा जातीशी वा देशाशी एकजीव होतो, तेव्हा मी दुसऱ्या देशाशी, घराशी वा जातीशी यांच्याशी मी संघर्ष करून त्यांचा नाश करण्यास उद्युक्त होतो. पण समजा त्याऐवजी मी जर अमर्याद, अधिक भव्य अशा अनंत सत्यतत्त्वाशी मिसळून गेलो की हे विश्व ज्याचे अभिव्यक्ती आहे अशा तत्त्वाशी तर मग अशा माझ्या विशाल भव्य दृष्टिकोनातून मी सर्व प्राणीमात्रांवर प्रेम करून शकेन, नव्हे नव्हे सर्व विश्वालाच प्रेमाने कवेत घेऊ शकेन. मित्रांनो, हाच आदर्श आपल्या पूर्वजांनी, ऋषीमुनींनी मानला होता. परंतु, या शिखरावर तुम्ही आम्ही कितीही हव्यास केला तरी तेथे लगेच पोहोचू शकत नाही म्हणूनच आपण एकेक पाऊल त्या दिशेकडे टाकले पाहिजे. जो आज धावण्याच्या शर्यतीत सर्वात जास्त वेगाने धावतो म्हणून प्रसिद्ध आहे, तो त्याच्या बालपणी चालायला शिकताना पावलं अडखळतच टाकत होता, आणि ती टाकताना पडतही होता. त्याचप्रमाणे आपल्यातल्या एखाद्याला ही वैश्विक समन्वयता साधता आली नाही तरी हरकत नाही पण आपण सर्व प्रयत्न करतो आहोत हे महत्त्वाचे आहे. धर्माचा हाच उद्देश होता की आपला दृष्टिकोन विशाल व्हावा.

**''सामान्य माणसाला त्याच्या सीमित अस्तित्वांतून व वासनेतून निर्माण होणाऱ्या स्वार्थीपणातून, लोभांतून व मत्सरांतून बाहेर काढून त्याला या उच्च पातळीवर आणून जगाकडे बघायला शिकवणं हाच तर**

धर्माचा मूलभूत हेतू होता.''

जेव्हा जेव्हा धर्म असा विशाल दृष्टिकोन ठेवून पाळला जात होता तेव्हा तो आवश्यक होता. जेव्हा जेव्हा धर्म आणि त्याचे उद्दिष्ट यांची सांगड घातली गेली तेव्हा तो मानवजातीला वरदानच ठरला. याउलट, दुर्दैवानं जेव्हा तो धर्म संकुचित होऊन माझा धर्मगुरू, माझा पवित्र ग्रंथ, माझी धार्मिक कर्मे, माझी कार्याची पद्धत हीच बरोबर आहे, इतरांची नाही, हा अट्टाहास आणि अशा इतर संकुचित अति धर्मवेडात गुंतला तेव्हा आता जे त्याच्यावर आरोप केले जात आहेत त्याप्रमाणे खरंच तो समाजात दुफळी माजविणारा व काही विशिष्ट लोकांकरिता तो झाला. आणि हे सर्व धर्मसंस्था स्थापन केल्यामुळे झाले.

आता या मुद्यावर विचार करू या. धर्म संस्थेत का बांधला गेला ? का ? कारण तुम्हाला आम्हाला आणि त्याच्या अनुयायांना तसा तो हवा होता. ऋषी मुनींना व ईश्वर प्रेषितांना तो तसा नको होता. हा सामान्य माणसाच्या मनाचा कमकुवतपणा होता आणि मग संस्था फार मोठी होत गेली व अवजड झाली की त्याचे छोटे विभाग पाडावे लागतात. मला सांगा, या देशातील राजकीय गटांबद्दल विचार केला तर एकतरी गट असा आहे का की, ज्याचे विभाग पाडले नाहीत. आपल्याकडे सीपी आय, सीपी आय (एम), सीपी आय (एम.एल.) आहेत आणि भविष्यात आणखी किती विभाग पडतील माहिती नाही. याची काय गरज आहे ? हे घडतं कारण या माणसांच्या अवाढव्य जमावात प्रत्येक माणसाला वैयक्तिकरित्या आत्मीयता व एकमेकांत बांधिलकीपणा जाणवत नाही. क्षणभर आपण धर्माकडे आणि राजकारणाकडे दुर्लक्ष करा. तुम्ही जर मोठ्या शहरात गेलात तर त्यांत क्लब, छोटे-मोठे, पाहायला मिळतील. एखादी व्यक्ती वर्षानुवर्षे एका क्लबचे मेंबर असूनसुद्धा त्या क्लबचा अचानक राजीनामा देते. तो असे का करतो ? त्याला विचारलं तर तो म्हणेल आता आताशा फार गर्दी झालीय क्लबमध्ये. जास्तच वाढलाय क्लब. त्यामुळे मला त्यात हरवल्यासारखे वाटते. मग तो आणि तसेच वाटणारे त्याचे मित्र दुसरा क्लब काढतात. हा क्लब त्याला आपलासा, घरच्याप्रमाणे वाटतो. तो म्हणतो मी सबंध दिवस विविध व्यापार संकुलातून वणवण हिंडत असतो. त्यामुळे काम संपल्यावर मी क्लबवर [illegible] वाटते. जेव्हा हे शक्य होत नाही तेव्हा मी क्लबतरी [illegible] देतो. बुद्धिवादी माणसं जेव्हा एकत्र येतात तेव्हा त्यांच्या [illegible] मतभेद आढळतो परंतु सर्वसामान्य माणसे जेव्हा एकसंघ (संस्था) [illegible] तेव्हा त्यांना तो संघ आपलाच वाटतो. कारण ते स्वतंत्ररित्या कधीही विचार करीत नाहीत. साधारण स्वतंत्र विचार करणाऱ्यांची संख्या फार अल्प असते. आणि साहजिकच अशी माणसे एक वेगळा कंपू करून राहतात. संस्था अवाजवी वाटली व मोठी झाली की संस्थेचे विभाग पडायला सुरुवात होते. धर्माच्या बाबतीत मात्र संस्थांना जडलेल्या या रोगाची दुसरी बाजू पहायला मिळते. त्यात त्यांचे पोट विभाग व बारीक सारीक मुद्देपण येतात. अर्थात असं घडण्यात मूलभूत अशी काहीच चूक नाही पण जेव्हा त्यांच्या विचारात फरक पडून ते एकमेकांशी भांडायला उठतात तेव्हा संकट उभे राहते. यामुळे ताणतणाव वाढतात, धर्मवेडेपणा वाढतो आणि सहनशक्तीही संपते. जर त्या सर्वांनाच समजलं की आपल्या सर्वांचेच अंतिम ध्येय एकाच मूलभूत चैतन्यातून निर्माण झालेले आहे तर त्यांच्यामध्ये एकमेकांना समजून घेण्याची वृत्ती निर्माण होते. जी आज आपल्या भारतामध्ये विविध धर्मामध्ये आणि एकाच धर्माच्या अनेक विभागामध्ये आढळते. 'समस्या तेव्हाच निर्माण झाली की, जिचे रूपांतर युद्ध आणि दंग्यात झाले. जेव्हा राजकीय मंडळींनी धर्मात लुडबुड करायला सुरुवात केली.'' हे म्हणणे भारताबद्दल; मध्ययुगीन युरोपाबद्दल आणि अरेबियाबद्दल संयुक्तिक ठरेल. धर्माने मानवजातीत दुःख निर्माण केले नाही व बहाल केले नाही. जी धार्मिक युद्धे झाली ती योग्य धर्माची राजकारणाशी सांगड असंस्कृतपणे घातल्यामुळे झाली. राजकारणी जेव्हा धर्मात शिरले तेव्हा त्यांनी त्यांच्याबरोबर त्यांच्या आकांक्षा आणि मतभेद आणले. धार्मिक वृत्तीची माणसे क्वचितच राजकारणात शिरताना दिसतात. पुरातन भारतात जेव्हा धार्मिक मंडळी राजकारणात पडली तेव्हा त्यांना राजगुरू म्हणूनच राजकारणात प्रवेश करावा लागला आणि तेव्हा सुद्धा त्यांनी देशादेशातील तंट्यात मध्यस्थी करून ते मिटविण्याचे आटोकाट प्रयत्न केले त्यामुळे देशात शांती, सौख्य, उत्कर्ष नांदू लागले. जेव्हा राजकारण्यांना राजगुरूंची अडचण वाटायला लागली आणि त्यांच्या वैयक्तिक आकांक्षेला बांध, मर्यादा पडू लागल्या तेव्हा त्यांना राजकारणातून बाहेर फेकण्यात आले.

मघाशी भाषणाच्या ओघात माझ्या एका सहभागी मित्राने, श्री. नानासाहेब गोरे यांनी, सामान्य माणसे, मी वापरत असलेल्या कपड्याशी धर्माचा संबंध जोडतात असे विधान केले. पुढे ते असेही म्हणाले, की मी हा पेहराव बदलून सामान्य माणूस वापरतो तसा पोशाख वापरला तर माझे ६० टक्के अनुयायी मला सोडून जातील. नानासाहेब गोरे, हाच तर्क जर मी लढवला आणि म्हटलं की नानासाहेबांनी माझे भगवे कपडे घातले तरी देशातील त्यांच्या अनुयायांची संख्या मुळीच कमी होणार नाही. माननीय महोदय, अनुयायी, कपड्यात वावरणाऱ्या माणसाच्या मागे धावतात. लोकांना त्या व्यक्तिमत्त्वाचे सौंदर्य त्यांना ओढून घेते. त्या व्यक्तीच्या गुणांच्या सुवासामुळे ते त्यांच्या मागे जातात. तुम्ही जरी माझ्या रंगाचे कपडे घातलेत तरी समाजवादी लोक तुमच्याच मागे येतील कारण ते तुम्हाला एक प्रामाणिक, सच्चा आणि कळवळा असणारा राजकीय पुढारी मानतात. आणि मी जरी पांढरे कपडे घातले तरी माझ्या मागे येणारे अनुयायी माझ्याच मागे येतील. कारण मी काय व्यक्ती आहे आणि मी त्यांना काय देऊ शकतो हे ते पुरेपूर जाणतात.

''धर्म हा प्रेरक आणि उदात्त आहे कारण त्यांत मूलभूत मूल्यं अनुस्यूत आहेत.'' त्यांत कमकुवत दुवे आहेत, होते आणि आजही काही कच्चे धागे [illegible]. त्यांत कमतरता आहे. [illegible] नाकारला तर मग या देशात कुठलीच संस्था [illegible] नाही कारण आपल्याकडे कार्य करणाऱ्या संस्थांत एवढ्या अगणित त्रुटी आहेत की त्याच्यामुळे आपल्या समाजाला घोर संकटांना तोंड द्यावं लागलं आहे. अशावेळी आपण काय केलं पाहिजे ते हेच की आपल्यातील सकारात्मक विचार करणाऱ्या विचारवंतांनी त्यातले दोष काढून टाकले पाहिजेत आणि सशक्त संस्थेची बांधणी करून तिला समाजासाठी चांगले कार्य करण्याकरिता सक्षम बनवली पाहिजे. माझं वैयक्तिक मत हेच आहे की कधी नव्हे ते आज देशाला धर्माची अधिक आवश्यकता आहे. माणसं आज पार गोंधळून गेलेली आहेत. अवाढव्य वाढलेली लोकसंख्या यामुळे सामान्य जनांच्यावर तीव्र सामाजिक दडपण आहे. सर्वांनाच असुरक्षित वाटत आहे. श्रीमंत माणसाला चिंतेनं ग्रासलं आहे. मध्यम वर्गीय माणूस चिरडला जातो आहे तर गरीब माणसांची आशा करण्याची क्षमताच संपली आहे. आताच्या क्षणाला त्यांना कुठून विरंगुळा मिळत असेल व मदत अपेक्षित असेल तर ती फक्त 'धर्माकडूनच'. पण आपण तर म्हणता की धर्मगुरू वा धर्मसंस्था यांची गरजच नाही तर अशा वेळी आपण फक्त दिल्लीकडे डोळे लावून बसले पाहिजे ! सध्या दिल्लीत आपण काय पहातो ? तुम्हाला नक्की

काय म्हणायचंय ? की या देशांत धर्म इतका खालच्या पातळीवर उतरलाय की गेल्या २० वर्षांत जेवढं राजकारण उतरलं आहे ? मग तुम्ही असं म्हणण्याचं धाडस करणार का की आम्हाला यापुढे राजकीय पक्षच नकोत व राजकारणही नको. पण असं तुम्हाला निश्चित वाटणार नाही. राजकारणात काही त्रुटी, दोष निश्चित आहेत. पण आपण निराश न होता त्याविरुद्ध लढलं पाहिजे. मी स्वतः अजून आशावादी आहे. आणि बुद्धीवान माणसाचं हेच खरं वैभव आहे की तो माणुसकीतला आवश्यक चांगुलपणा तो पाहू शकतो. तो हेही जाणतो की आजुबाजूची परिस्थिती माणसाला वाईट वागायला भाग पाडते. या त्यांच्या वैयक्तिक दुर्बलतेतून, दोषांतून आणि मनाविरुद्धच्या तडजोडीतून, धर्म अगदी प्राचीन काळापासून त्यांना बाहेर पडण्यास सहाय्य करीत आला आहे. म्हणून माझं प्रामाणिक मत हेच आहे की, आम्ही धर्माच्या जागी नुसती तथाकथित मानवी मूल्ये ठेवून चालणार नाही.

.... त्याकरिता फक्त मानवीमूल्येच उपयोगी पडतात. यासाठी माननीय श्री. बेडेकर यांनी एक उदाहरण दिले. त्या उदाहरणात त्यांनी एका मुलाला रस्ता ओलांडण्यासाठी एका माणसाने केलेली मदत याचे वर्णन आले आहे. हे अत्युत्कृष्ट मानवी कर्म होय. कारण ही मदत म्हणजे शुद्ध मानवी मूल्याच्या जाणीवेतून झालेली आहे. त्यावेळी आपल्याला असेही सांगितले गेले की या घटनेकडे धार्मिक मनुष्य कसा बघेल ? एका सहृदय माणसाने मला मदत केली असं वाटण्याऐवजी तो मुलगा म्हणेल, "मी देवाची प्रार्थना केली आणि या माणसाच्या रूपाने येऊन मला त्याने रस्ता ओलांडण्यास मदत केली." या रोजच्या घटनेत परमेश्वराला मध्ये घालण्याबद्दल श्री. बेडेकरांचा आक्षेप आहे, पण मग या दृष्टिकोनातून काय चूक आहे. रस्ता ओलांडण्यास मदत स्वीकारणाऱ्या माणसाला हा धार्मिक दृष्टिकोन कसा मदत करतो ते बघू या. (ईश्वर मध्ये आणला नाही तर) तो मदत घेतलेला माणूस, त्या मदत करणाऱ्या माणसाच्या दयाळू कृतीमागे त्याला ईश्वराचे अस्तित्व जाणवेल. त्यामुळे ही कृतज्ञता व्यक्तिगत राहत नाही. तर उलट सर्वांभूती परमेश्वर पहावा या सत्याचा बोध आपल्याला होतो. जेव्हा असा मनुष्य दुसऱ्याला मदत करतो तेव्हा त्याला त्याच्या या दयाळू कृतीबद्दल पोकळ गर्व वाटत नाही, उलट तो समजतो की माझ्यातल्या नारायणाने त्याला मदत केली. असा दृष्टिकोन धरला की अहंकारात्मक गर्व कमी होतो आणि दुसऱ्या माणसाने आपल्याला नमस्कार करावा या सतत आपल्याकडे पाहून स्मित करावे अशी अपेक्षा ठेवणार नाही त्याकरिता त्याला दोषही देणार नाही. ती कृती आणि त्यामागचा अहंकार परमेश्वराच्या भक्तीत विरघळून जातो; कारण तो ईश्वर दुःखात माणसाला मदत करण्यास सदैव तयार असतो.

मघाशी बोलण्याच्या ओघात कोणीतरी असं म्हणाले की, आपल्या सर्वांना मानवी मूल्याची जाणीव आहे. पण प्रश्न असा उभा राहतो की, मला वाटणारे मूल्य हे योग्य आहे की अयोग्य आहे हे कसं ठरवायचे. धर्मात म्हणे समाजावर पाप पुण्याचे ओझे लादले आहे. अर्थात जोपर्यंत आपण आपल्या आदर्श मूल्याप्रत जाण्याची महत्त्वाकांक्षा बाळगतो आहोत तोपर्यंत ही पाप-पुण्याची कल्पना अटळ आहे. परंतु प्राथमिक अभ्यासक्रमात नेमलेल्या ग्रंथात या धर्माज्ञेमागचा तर्क समजावून सांगितलेला नसतो किंवा काही मुद्देसूद विवरणही केलेले नसते. फक्त 'अमूक करा', 'अमूक करू नका' एवढेच सांगितलेले असते. पण पदव्युत्तर अभ्यासक्रमात नेमलेल्या शास्त्रग्रंथात या आज्ञेमागचा तर्क उलगडून सांगितलेला असतो. यांनाच हिंदू धर्मात उपनिषद ग्रंथ म्हणतात. उदा. डॉक्टर कधीही आपल्या रोगीजवळ पेशंटशी त्याच्या रोगाबद्दल व त्याच्या लक्षणाबद्दल चर्चा करत बसणार नाही, कारण ते त्याला समजणार नाही आणि तसं केलं तर तो वेळेचा अपव्यय केल्यासारखे होईल. कारण उघड आहे की, रोगी हा वैद्यकशास्त्रातल्या विज्ञानाच्या परिभाषेबद्दल अनभिज्ञ असतो. परंतु, त्या रोगासंबंधी तेच डॉक्टर इतर बरोबरीच्या डॉक्टरांबरोबर वैद्यकीय शास्त्राचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांबरोबर बोलतील व चर्चा करतील. पण रोग्याला मात्र 'हे औषध घे', 'ते औषध घे' एवढेच सांगतील. अगदी त्याचप्रमाणे बुद्धीने परिपक्व झालेल्या शिष्याला शास्त्रीय ग्रंथ व गुरू 'हे करा आणि हे करू नका' या मागची कारणमीमांसा समजावून देतात. अशा कृती किंवा अशी कर्मे आपल्या मनात पश्चात्ताप निर्माण करीत नाहीत. त्यामुळे मनात प्रक्षुब्धता निर्माण होत नाही. अशाच कर्मांना पुण्य व गुणवान कर्म म्हणतात. ज्या कृती केल्यानंतर मनात विचारांच्या रूपाने परत परत येऊन प्रक्षुब्धता निर्माण करतात व त्या केल्याबद्दल मला लाज व पश्चात्ताप वाटायला लावतात त्यांनाच पाप म्हणतात."

या पापपुण्य प्रक्रियेचे तात्पर्य हेच की या जगतात कार्य करताना माझ्या मनापुढे विशाल दृष्टिकोन पाहिजे. त्या सर्वव्यापी ईश्वराची आणि ईश्वरीतत्त्वाची जाणीव सतत जागृत ठेवून कार्य करावे. क्षणिक भावनाविवश होऊन घाईगर्दीने कृती करू नये. अशी पद्धत अवलंबली की माझं जगाशी असलेलं नातं वेगळे स्वरूप घेतं आणि मग रोजच्या जीवनात मानवी मूल्ये पाळणे सहज शक्य होते. खरा धर्मच मानवी मूल्यांना जन्म देतो.

आपल्या जीवनात हे पावित्र्य व आदरभाव असे एकाएकी निर्माण करणं हे अत्यंत अशक्य आहे आणि म्हणूनच आपल्याला मूर्तीपूजा सांगितली आहे की जी आपल्या धार्मिक आयुष्याचा एक प्रतिकात्मक रूप असते. त्या सगुणोपासनेतून वा मूर्तीपूजेतून आपण आदर्शतत्त्वाबद्दल पूज्य भाव बाळगण्यासाठी जागृत होतो. मग भले आपले प्रतीक कोयता, हातोडा, अशोकचक्र वा तारे नक्षत्रे आणि वेगवेगळ्या रंगाचे पट्टे असतील, त्याने काही फरक पडत नाही. ही सर्व चिन्हे त्या त्या प्रत्येक देशाची आदर्श मूल्ये दर्शवितात आणि त्यामुळे मनात आदरभावाचे आवाहन करतात. मग कर्तव्याची जाणीव होत आपण त्याला मानवंदना करतो. ध्वजाचे कापड म्हणजे माझा देश नव्हे. तसेच प्रतीक वा मूर्ती म्हणजे आपले ध्येय नव्हे. जसं लग्नात घातलेली अंगठी म्हणजे माझी पत्नी नव्हे. या सर्व गोष्टी मला माझ्या उदात्त ध्येयाची आठवण करून देतात. कारण त्या गोष्टी त्या ध्येयाची प्रतिके असतात पण दुर्दैवाने आपण आपली ध्येये विसरतो आणि मूर्ती वा प्रतिकाला चिकटून बसतो. हेच नेमके आपल्या धर्माच्या बाबतीत घडते. अर्थात त्याचमुळे आपला देवळाकडे बघण्याचा दृष्टिकोन, धार्मिक कार्ये व इतर उत्सव समारंभ याबाबतीत हेच दर्शविते. आपल्यापैकी बरेचजण आपल्या निरर्थक लवाजम्यामागे असणाऱ्या आदर्शाबद्दल अनभिज्ञ असतात. म्हणूनच त्या कृती / वस्तू निरर्थक वा यांत्रिक वाटतात. त्यामुळेच धर्म आणि धार्मिक कार्ये निरर्थक ठरली आहेत. कारण त्यामागे तत्त्वज्ञान हे आधुनिक युगातील मानवाला एक तर त्याच्या ध्यानात आले नाही वा त्याला कोणी समजावून सांगितले नाही. स्वामी विवेकानंदांनी हेच सत्य थोडक्यात पण स्पष्ट शब्दात सांगितले आहे.

"धर्माला जर तत्त्वज्ञानाचा पाया नसेल तर तो धर्म भोळेपणा होईल. आणि तत्त्वज्ञानाला धर्माचा आधार नसेल तर तो वेडगळपणा ठरेल."

सकाळपासून जो परिसंवाद झाला व जे विचार मांडले गेले त्यातून एक गोष्ट, माझ्या मित्रांनो, स्पष्ट होते. आपण सर्वच जण मान्य करता की धर्माच्या तत्त्वज्ञानाच्या सत्याबद्दल आपल्यात भांडणे वा मतभेद नाहीत. आणि म्हणूनच मी म्हणतो की धर्माबद्दल विचार करताना तत्त्वज्ञानाची बैठक वा जाणीव

आवश्यक आहे. ह्याचाच दुसरा भाग म्हणजे तो व्यवहारात उतरवताना आपण कौशल्य बाळगलं पाहिजे. हे एकदा नीट समजून घेतलं की धर्माला अर्थ प्राप्त होतो. धर्म आपली सेवा करू शकतो, अहंकाराच्या कचाट्यातून बाहेर पडण्यास मदत करू शकतो. तसेच आपल्याला कोत्या अहंकाराच्या दृष्टिकोनातून बाहेर काढू शकतो. आपली उन्नती एवढी उच्च होते की, आपल्याला वैश्विक एकात्मतेची जाणीव होते. आपण आपल्या क्षुद्र कामना वा आशा यांच्या वर उचलले जातो. हे घडलं की मी मालकाची सेवा करायला योग्य ठरतो. धर्माची तात्त्विक बैठक समजल्यानंतर मानवी मूल्ये व त्याचा सुगंध आपल्यातून बाहेर पडायला लागतो. अशा वेळी एक प्रश्न उत्पन्न होतो की, धर्माशिवाय मानवी मूल्ये पाळता येणार नाहीत कां ? होय ते शक्य आहे. पण धर्माची चौकट समजली असेल तर तुम्ही अधिक परिणामकारक, निराश न होता भ्रामक कल्पना टाकून मानवी मूल्ये जगू शकता यामुळे आपण आपली दमछाक न करताही आशेने व अमाप उत्साहाने मानव जातीची सेवा करू शकता. धर्म अर्थातच मग आपल्या भावना उदात्त करण्यास व बुद्धी तीक्ष्ण करण्यास सहाय्य करील. त्यामुळे आपल्या समाजसेवेला एक परिणामकारक मूल्य प्राप्त होईल. तत्त्वज्ञान आपल्याला आदर्श पुरवते तर धर्म मानवी मूल्ये कशी अभिव्यक्त करावी यासाठी शिक्षण देते. गेली अनेक वर्षे टिकण्याचे सामर्थ्य धर्माला यामुळेच मिळाले. आज कर्मकांडाची बांडगुळे त्यावर चढली आहेत त्यामुळे धर्माचे मूलभूत तत्त्व झाकोळलं गेलं आहे. इतिहासात जर डोकावून पाहिलं तर लक्षात येईल की कितीतरी वेळा त्या त्या वेळच्या धार्मिक प्रथा वा पद्धती बंद पाडल्या व झुगारून दिल्या आहेत. त्यामुळे वैदिक काळातील ईश्वर व त्यातील धार्मिक कार्ये आज अपरिचित आहेत. परंतु पौराणिक काळातील पद्धती अजून जिवंत आहेत. खरं तर त्याही आता बदलल्या पाहिजेत. आज आपल्यापुढे गोंधळाची स्थिती निर्माण झाली आहे कारण समाजात गेल्या शतकात खूपच बदल झाला आहे. पण त्याप्रमाणे धर्मात आपण सुधारणा केली नाही.

मी जेव्हा म्हणतो धर्म आवश्यक आहे, तेव्हा कृपया समजून घ्या की त्याचा अर्थ असा नव्हे, त्यात अस्पृश्यतेसारखे दोष राहिले पाहिजेत. ते तर काढले पाहिजेत. गेले २० वर्षे कायदा करूनसुद्धा अस्पृश्यता नाहीशी होऊ शकली नाही हे म्हणणे अवास्तव आहे कारण हा प्रकार [illegible] तीन हजार वर्षे अस्तित्वात आहे. अमेरिकेचेच उदाहरण घ्या ना ! तेथे [illegible] वर्षांहून अधिक जुनी नाही. जे राष्ट्र नव्या प्रथा उचलण्यास सर्वांत अधिक चपळ आणि प्रबळ आहे तेथेसुद्धा काळे-गोरे हा भेद आजही मिटलेला नाही. याच अमेरिकेची ओळख प्रगतशील देश आणि पुढारलेला समाज म्हणून होते. स्वातंत्र्य आणि मनाप्रमाणे वागण्याची मोकळीक देण्याच्या बाबतीत लोकशाही जाणीव असलेला असा हा देश भक्कम किल्लाच आहे. आणि तरीसुद्धा काळ्यांबद्दल वाटणारा सामाजिक तिरस्कार तितक्याच तीव्रतेने टिकून आहे. सत्य गोष्ट ही आहे की, आपल्या भारतात गेल्या २० वर्षांत अस्पृश्यता घालवण्याचे प्रयत्न बऱ्यापैकी यशस्वी झाले आहेत याची जाणीव ठेवावी आणि म्हणूनच असं म्हणता येईल की त्या मानाने हिंदु समाज तितकाच अधिक पुढारलेला आहे. ज्यांचा छळ होतो ते तर उतावळे असतातच पण त्याही पेक्षा समाजसुधारक अधिक उतावळे आहेत. परंतु, सांस्कृतिक क्रांती घडवून आणण्यास वेळ लागतो. आता हेच बघा ना ! एखाद्या व्यक्तीला आपली एक सवय आपल्याला घातक आहे हे माहीत असते आणि तरीसुद्धा ती वाईट सवय सोडण्यास बराच काळ लागतो. सुशिक्षित लोकांबद्दल म्हणाल तर त्यांच्यातून अस्पृश्यता जवळजवळ गेली आहे. हीच कल्पना खेडोपाडी व ग्रामीण भागात उतरवण्यास वेळ लागतो. कारण नवीन कल्पना खेडोपाडी व ग्रामीण भागात उतरवण्यास वेळ लागतो. खरी समस्या हीच आहे. भारतात कुठल्याही गोष्टीचे खापर धर्मावर फोडले जाते कारण इथे धर्म समाजातील सर्व स्तरावर आणि प्रत्येक जीवनशैलीत झिरपला आहे. आपल्याला आपल्या आई-वडिलांबद्दल वाटणारा आदर हा धर्मच आहे, आपल्या पत्नीबद्दल वाटणारी भूमिका हा धर्मच आहे. आपले अन्न आणि खायच्या सवयी याही धर्मात मोडतात. आपण वापरतो ते कपडे व त्याची वापरण्याची पद्धत हे धर्मानुसारच असते. सारांश धर्म जीवनाच्या प्रत्येक अंगाअंगात शिरलेला आहे. त्यामुळे समाजातील कुठलाही दोष धर्माच्या वेशीवर टांगता येतो. अर्थात ही टीका सहन करण्याची ताकद धर्मात निश्चितच आहे. धर्म मानणारे सर्वच जण हे मान्य करतात की, समाजात आज जो दिसतोय तो खऱ्या अर्थाने धर्म नव्हे. फक्त प्रश्न असा आहे की आपण धर्मच फेकून द्यायचा की त्यावर चढलेली दुष्ट प्रथांची बांडगुळं काढून टाकून तो सुधारायचा. आपल्या बुद्धिवान पूर्वजांनी धर्मात वेळोवेळी बदल केला, म्हणूनच आजही आपल्या देशाकडे उच्च अध्यात्मिक संस्कृतीचा वारसा जपणारा देश म्हणून पाहिले जाते. पण आधुनिक भारतीय लोकशाही पद्धतीने मते घेऊन ठरवतील की, आपल्याला धर्म नको आणि अध्यात्मिक संस्कृतीही नको आणि आम्हाला निधर्मी संस्कृती हवी तर हिंदुत्व या विचाराचे स्वागतच करील, हेच तर आपल्या संस्कृतीचे मोठेपण आहे. कारण आपली संस्कृती लोकसत्ता मान्य करणारी आहे. इतकेच नव्हे तर समाजाच्या कल्याणासाठी स्वतःचा नाश करण्याचा आत्मघातकीपणा मान्य करण्याइतका हिंदू धर्म उदार व विशाल आहे.''

प्रेषक : रत्नग्राही

# ...ाची कला (The A...


डॉ. कमलताई वैद्य

*परमहंस परिव्राजकाचार्य प. पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वतींच्या अंतरंग शिष्या. परांडा येथे स्वामी स्मारक रूप - श्रीराम मंदिर. श्रीराम चरित मानस मंडळाच्या माजी अध्यक्षा. स्वामींची ५६ वर्षे सेवा करण्याची संधी. गीता प्रेसतर्फे मानस गूढार्थ चंद्रिका हिंदीतून तसेच मराठीतून छापणे यासाठी प्रुफे तपासणे. प. पू. रामसुखदासजी व प. पू. तेजोमयानंदजी यांची अविरत वाङ्मय सेवा. दासबोध मराठी गद्य अनुवाद. वाल्मिकी रामायणाचा मराठी अनुवाद सुरू.*


ही पुस्तिका श्रीराम बात्रा यांनी सेंट्रल चिन्मय मिशन ट्रस्टसाठी प्रकाशित केली आहे. यात वेदान्ताचा परिचय आणि वेदान्ताची मूळ तत्त्वे असे दोन विभाग आहेत. पहिल्या विभागात एकूण पंचवीस लेख आहेत. ते पूर्वी 'भारतज्योति'च्या साप्ताहिक रविवारच्या पुरवणीमधून 'फ्री प्रेस जर्नल'मधून प्रकाशित केले गेले होते. दुसऱ्या विभागात वेदांत तत्त्वज्ञानाची मांडणी आणि मूळ तत्त्वे याविषयी थोडक्यात माहिती दिली गेली आहे. ही प्रकाशित केली गेलेली माहिती वेदान्त-तत्त्वज्ञानाच्या विद्यार्थ्यांना वेदान्ताचा परिचय होण्याच्या दृष्टीने पुरेशी आहे. अशा प्रकारच्या पूर्वतयारीनंतर तो वेदांताचा प्रत्यक्ष अभ्यास करून त्याचे प्रात्यक्षिक करण्यास पात्र ठरतो. प. पू. स्वामी चिन्मयानंदांनी विद्यार्थ्यांसाठी जो अभ्यासक्रम तयार केला होता तोही या पुस्तिकेत शेवटी देण्यात आला आहे. चिन्मय मिशनच्या सर्व केंद्रातून हा अभ्यासक्रम पद्धतशीरपणे विद्यार्थ्यांकडून करून घेण्यात येतो. सर्व देशांत हा अभ्यासक्रम आठवड्यातून एकदा अत्यंत शिस्तबद्ध रीतीने शिकविण्यात येतो. श्री. पार्थसारथी यांनी या सर्व लेखांचे अत्यंत परिश्रमपूर्वक आणि कुशलतेने संकलन केले आहे.

पहिल्या विभागात एकूण पंचवीस लेख आहेत. त्यांची मांडणी अत्यंत सुसंगत आणि क्रमवार करण्यात आली आहे. या विभागातील सर्वच लेख अत्यंत मननीय आहेत. श्री गुरूदेव कुठेही आपण काही नवीन सांगत आहोत, असा अभिनिवेश आणत नाहीत तर ऋषीमुनींनी फार पूर्वी समस्त मानव जातीच्या कल्याणासाठी वेदान्ताच्या रूपाने जे तत्त्वज्ञान प्रकाशित केलेले आहे. ते समस्त मानव जातीला कसे उपयुक्त आहे आणि ते म्हणजे केवळ सिद्धांत नसून ते आचरणात आणण्याचे पद्धतशीर शास्त्र कसे आहे हे त्यांनी प्रत्येक ठिकाणी दाखवून दिले आहे व जे जे हे ज्ञान आत्मसात करतील त्यांनी ते आचरण्यात आणून आपले व जगाचे कल्याण साधून घ्यावे हेच त्यांच्या जीवनाचे उद्दिष्ट होते. विशेषत: तरूण पिढीने याचा लाभ घेऊन स्वत:चे जीवन त्यानुसार घडवून आपली आणि राष्ट्राची उन्नती साधावी अशी आत्यंतिक तळमळ त्यांच्या समस्त जीवनातून, त्यांच्या साहित्यातून व्यक्त झाली आहे. हे ज्ञान जाति, वर्ण, लिंग इत्यादी भेदांना थारा देत नाही. सर्वांसाठी ते उपयुक्त आहे. श्रीगुरूदेवांचे वैशिष्ट्य म्हणजे त्यांची निवेदन शैली ! ऋषीमुनींचेच तत्त्वज्ञान त्यांनी आधुनिक काळात ज्यांना संस्कृतचा गंधही नसेल अथवा ज्यांचे फारसे शिक्षणही झालेले नसेल अशा लोकांनाही कळेल अशा रीतीने इतके सुंदर भाषेत मांडले आहे की, ते ऐकल्यावर अथवा वाचल्यावर मनुष्य त्यांच्या आणि त्यांच्या शैलीच्या प्रेमात पडल्याशिवाय राहू शकत नाही.

या विभागातील प्रत्येक लेख म्हणजे एकेक मौल्यवान विचाररत्नच आहे. त्यामुळे प्रत्येक लेखाचा परिचय करून देणे अत्यंत आवश्यक आहे. पण हे काम अत्यंत अवघड आहे. लेखातील प्रत्येक शब्द महत्त्वाचा आहे. त्यामुळे संक्षेप करणेही बरोबर वाटत नाही. पहिल्या लेखात स्वातंत्र्य म्हणजे स्वेच्छाचार नव्हे तर स्वातंत्र्याचा उपभोग घेण्यासाठीही काही नियमांचे पालन करावेच लागते, यावर भर देण्यात आला आहे. आपल्या घटनेतही स्वातंत्र्याबरोबर काही नियम आणि निर्बंधांचे उल्लेख आहेत. स्वातंत्र्याचा उपभोग घेण्यासाठीच त्यांची आवश्यकता असते. वाहतुकीच्या नियमांचे उदाहरण देऊन हा मुद्दा स्पष्ट केला आहे. स्वातंत्र्याच्या नावाखाली हे नियम झुगारून दिले तर अनर्थ ओढवेल. त्याचप्रमाणे धर्मग्रंथही माणसाचे जीवन सुखी, समृद्ध व्हावे म्हणून काही यमनियम सांगतात. ते पाळणे अत्यंत आवश्यक आहे. धर्माचे तत्त्वज्ञान आणि यमनियमानुसार त्याचे प्रत्यक्ष आचरण या दोन्हीचा समन्वय करणे हेच मुख्य धर्माचरण, खरा धर्म आहे हे अनेक वेळा प्रतिपादन केले असून एकाशिवाय दुसरे कसे व्यर्थ आहे, हे दाखवून दिले आहे.

जगात अपूर्णता आणि दुष्टता फार बोकाळली आहे, अशी तक्रार सर्व लोक करतात, पण शस्त्राला धार लावायची तर ज्यावर ते घासावयाचे तो पृष्ठभाग ओबडधोबडच हवा. तसेच जगातील दुष्टतेमुळे समस्या अथवा त्रास उद्भवत नसून आव्हानात्मक परिस्थितीला तोंड देण्याची, सामोरे जाण्याची माणसाची कुवत कमी झाली आहे, ही खरी समस्या आहे. हे मूळ कारण लक्षात न घेता माणूस काळ, परिस्थिती यांना दोष देतो. पाण्याने अर्धा भरलेला पेला पाहून कुणी अर्धाच म्हणून दु:खी होतो, तर दुसरा अर्धा तरी भरलेला आहे ना याचाच आनंद मानतो. बहुतेक जण कारणाशिवाय कुरकुर करतात. आपल्याला जे काही मिळालेले आहे त्यासाठी परमेश्वराचे आभार मानण्याची सवय आपण लावून घेतली पाहिजे. उगीच दु:ख करण्याची सवय सोडून दिली तरी कितीतरी शक्तीची बचत होईल.

स्वातंत्र्य हे मनुष्य जातीचे खास वैशिष्ट्य आहे. आपण सुखासाठी भौतिक वस्तूंची गुलामगिरी करण्याचे सोडून दिले पाहिजे हीच खरी स्वतंत्रता आहे. हे करीत नाहीत ते समस्या आणि आव्हाने यांनी त्रस्त होऊन जातात. विषयांपासून मिळणारा आनंद खरा नसतो. विषयासक्तीवर ताबा मिळविण्यात खरा पुरुषार्थ आहे. असा माणूस दीपस्तंभाप्रमाणे अविचल राहून शांतीचा अनुभव घेतो. कुशल नागरिकाप्रमाणे वादळवाऱ्यात शांत राहण्याची कला आपण आत्मसात केली पाहिजे. धर्मग्रंथ याबाबत होकायंत्राप्रमाणे मदत करतात. त्यांच्यावर दृढ श्रद्धा ठेवून आपण त्याप्रमाणे आचरण करू तर आपणही शांती आणि पूर्णता प्राप्त करू शकू.

अशा कुठल्याही परिस्थितीत विचलीत न होणाऱ्या व्यक्तीबद्दल गैरसमज होतात, त्याची निंदा केली जाते. पण तो माणूस संवेदनारहित असतो, असे नाही. त्याच्याजवळ भावना असतात पण तो त्यांच्याबरोबर वहात जात नाही. भावना विवशतेमुळे माणसाचा समतोल ढळतो. तो हास्यास्पद ठरतो आणि पारमार्थिक अथवा लौकिक प्रगती करू शकत नाही. पूर्वीचे महात्मे अशा

धैर्याचे होते की कुठल्याही प्रकारच्या वादळात ते हिमालयाप्रमाणे अचल राहिले. लोकांच्या दुःखाने त्यांचे हृदय द्रवत असले तरी त्यांची बुद्धी नेहमी स्थिर असे. मनुष्याने आपल्या आदर्शाची निवड करून त्याप्रमाणे आपले व्यक्तिमत्त्व विकसित केले पाहिजे. जीवनाच्या यशाचे रहस्य आपल्या हृदयांतील भावनांच्या वादळापेक्षाही आपले मस्तक उंच ठेवण्यात आहे. यशस्वी माणूस आपली अलिप्तता आणि निर्णय घेण्याचे सामर्थ्य भावनांच्या वादळातही गमावत नाही. उत्तम आदर्शाची निवड करून त्यास पूर्णपणे प्रामाणिकपणे आणि सर्वस्वी वाहून घेण्याचे धैर्य दाखविले पाहिजे. असा बौद्धिक, प्रामाणिकपणा आपल्या आदर्शावरील दृढ निष्ठा आणि पूर्ण समर्पण यामुळे मानवाच्या वैयक्तिक आयुष्याला एक उच्च अधिष्ठान प्राप्त होते. अशा व्यक्तीमुळे राष्ट्रालाही यश आणि परिपक्वता प्राप्त होते.

गर्भात असल्यापासून अखेरच्या श्वासापर्यंत जीवनातील प्रत्येक क्षणी दुःखापासून दूर राहाणे आणि सुख प्राप्त करणे या दोन उद्देशांनी सर्व क्रिया होत असतात. परिस्थिती सतत बदलते त्यामुळे अशा प्रकारे प्रयत्न करूनही उद्दिष्ट साध्य होत नाही. सर्वांचे ध्येय एक असते पण प्रत्येक व्यक्ती जे उपाय योजते ते भिन्न असतात. म्हणून आनंद खरा कुठे असतो याचा शोध घ्यावयास पाहिजे. दुःख व सुख मनावर अवलंबून असते म्हणून मनाच्या स्वास्थ्यावर माणसाचा आनंद अवलंबून असतो. मनुष्यालाच हे सामर्थ्य असते की, त्याच्या आनंदासाठी तो भोवतालच्या वस्तू अथवा व्यक्तींवर अवलंबून नसतो. पण हे सामर्थ्य तो जाणत नाही आणि आनंदासाठी तो बाहेर धाव घेतो की, जेथे आनंदाच्या केवळ भ्रमाचा अनुभव येतो पण खरे शाश्वत सौख्य मिळत नाही. आपले धर्मग्रंथ आपल्याला या सुप्त आणि गुप्त सामर्थ्याची जाणीव करून देतात. हे जो जाणतो तो मनुष्य दीपस्तंभाप्रमाणे पूर्णतेच्या प्रकाशाने युक्त असतो आणि इतर वादळात भरकटणाऱ्यांनाही मार्गदर्शन करतो.

## कर्माची अपरिहार्यता

कुणीही माणूस कर्म केल्याशिवाय जिवंत राहू शकत नाही. पण प्रत्येकाच्या कर्मात भिन्नता असते. या थोर भूमीतील विचारवंतांनी शोध करून तीन प्रकारची कर्मे असतात असे शोधून काढले आहे. कामाच्या स्वरूपावरून हे वर्गीकरण केलेले आहे. (१) व्यवसायी (श्रमजीवी) आयुष्यात ध्येय नसते. स्वार्थासाठी (पगार, नफा) काम करणारे. यात मुख्यमंत्री अथवा मुख्य न्यायाधीश ही अंतर्भूत होऊ शकतात. खूप काम करतात पण पूर्ण आत्मकेंद्रित असतात. (२) कार्यकर्ते (सेवा करणारे) आदर्श बाळगून खूप काम करणारे, कमी स्वार्थी आयुष्याबद्दलचा दृष्टिकोन बरा असतो. फक्त नफ्यासाठी धडपडत नाहीत. काही ध्येय असते व ते पूर्ण करण्यासाठी निरंतर धडपडतात. समाजाच्या फायद्यासाठी झटतात. सर्व राजकीय, सामाजिक, धार्मिक कार्यकर्ते यात येतात. (३) योगी - (Man of Achivement) पगारासाठी, फायद्यासाठी किंवा यशासाठी काम करीत नाहीत. विषयाची आसक्ती नसते किंवा जगात बदल घडवून आणणे वगैरेही इच्छा नसतात. केवळ कर्तव्यभावनेने कर्मे करतात आणि त्यातच त्यांना आनंद मिळतो. वेगळी फळाची आशा नसते. आपले काम चोख करणे यातच त्यांचे समाधान असते. समाजाची पर्वा नसते. कुणी निंदा अगर वंदा. उदाहरणे : ख्रिस्त, सॉक्रिटिस, गांधीजी यांना दुःखे सहन करावी लागली. इतिहासात अनेक उदाहरणे आहेत. याशिवाय अशीही उदाहरणे आहेत की ज्यांची पूजा केली गेली. पिढ्यान् पिढ्या कीर्ती गायली गेली. हे तीनही प्रकार सर्वत्र समाजात सर्व थरांत आढळतात. आपण काय करतो याला इतके महत्त्व नाही तर ते कसे करतो यास महत्त्व आहे. फार थोडे ध्येयासाठी कार्य करतात. मोठे ध्येय असले तर उत्साह, रस, स्फूर्ती मिळते. रोजच्या कामातही आनंद मिळतो आणि जगण्यातही आनंद मिळतो. म्हणून उच्च ध्येय ठेवून आपण व्यवसायी, सेवेकरी व्हावयास हवे आणि नंतर योगी व्हायला हवे. ध्येय, तत्त्वज्ञान हवे याशिवाय माणसांतील उत्तम ते कधी बाहेर पडणार नाही. उत्साह, प्रामाणिकपणा आणि कुशलता कामात दिसणार नाही.

कामाच्या दर्जावर यश अवलंबून असते. दर्जा सुधारला पाहिजे. आदर्श उत्तम हवेत. त्यांच्या अनुकरणाने, मार्गदर्शनाने उत्साह मिळतो. आदर्शाचा दर्जा श्रेष्ठ हवा. कर्मात सौंदर्य, कुशलता येते. अमानुष दैवी यश मिळविणारे सर्व थोर लोक उच्च आदर्शांमुळे महान झाले. त्यांच्या परिश्रमाची फळे पुढील पिढ्यांना भोगावयास मिळत आहेत.

हल्ली योग्य आदर्शांचा तुटवडा आहे. स्वार्थाने प्रेरित होऊन काम केले जाते. ध्येयपूर्ण दृष्टि नाही. अधिक चांगले काम करण्यास प्रेरणा नाही. तेच तेच काम यांत्रिकपणे केले जाते. सर्वत्र हाच अनुभव येतो. ऋषीमुनींनी शोध घेतला, कारणे दाखवली आणि उपायही सांगितले. कामाचा दर्जा, सौंदर्य यात वाढ व्हावयास हवी. आपल्या त्रासाला आपणच कारण असतो. वैषयिक आनंद, अखंड कर्मफळाची अपेक्षा या बहिर्मुखी वृत्तीमुळे, इच्छांमुळे चिंता, उद्वेग उत्पन्न होणे अपरिहार्य असते. यावर मात करण्यासाठी ध्येय ठरविले पाहिजे, अविश्रांत श्रम घेऊन समर्पण भावाने यशासाठी झगडले पाहिजे. समर्पण भावाने, स्वार्थरहित भावनेने कार्य केले की उत्साह वाढतो आणि ते आंतरिक समाधान देते. एक सौंदर्य आणि आनंद जीवनास प्राप्त होतो आणि कुशलता आणि यशाची प्राप्ती करून देते.

धर्म माणसाला अत्युच्च आदर्श पुरवितो. पण हल्लीचे जग स्पर्धायुक्त, स्वयंकेंद्रित आणि अहंकारयुक्त दृष्टिकोन असलेले आहे. त्यामुळे परिवर्तन घडणे अवघड जाते. निसर्गाच्या कायद्याला तडजोड नाही. यश मग ते पारमार्थिक असो वा लौकिक ते समर्पणावर अवलंबून असते. म्हणून वैयक्तिक पातळीवर विचार न करता सामाजिक, राष्ट्रीय अथवा त्याहीपेक्षा मोठे ध्येय धरून सर्व लक्ष, क्रिया त्यावर केंद्रित करणे आवश्यक असते.

मनुष्याचा जगाशी संपर्क येतो तेव्हा सुख किंवा दुःख यांचा अनुभव येतो. अनुभवाचा हा प्रवाह अखंड चालू असतो. यालाच जीवन म्हणतात. जागतिक वातावरणात बदल घडवून आणला की माणूस सुखी होईल या कल्पनेने अनेक अद्भुत ऐश्वर्यशाली उपकरणे शोधून काढण्यात आली की ज्यांनी विषयभोग सुख वाढले आहे. पण मानसिक ताणतणावाची समस्या कायम आहे. या विरोधाभासाची कारणे ऋषींनी शोधली आहेत. आंतरिक स्वभावाचा परिस्थितीशी संबंध येतो. स्वतःवर नियंत्रण नाही. आत्मसंयमन केल्याने अनुभवातून आनंद होतो. त्यासाठी व्यक्तिमत्त्वाची पुनर्रचना करणे आवश्यक आहे. जागतिक समस्येचे हे मूळ कारण आहे. त्यासाठी मानवी जीवनात सक्रीय परिवर्तन व्हावयास हवे. बाह्य जगातील सुधारणांच्यामुळे Standard of Living जीवनाचे राहणीमान सुधारले. पण आंतरिक सुधारणांमुळे Standard of Life जीवनालाच उच्च दर्जा प्राप्त होतो.

अपचन झालेल्या माणसासमोर उत्तम भोजन ठेवले तरी त्यास ते नकोसे वाटते. खरी भूक लागते तेव्हाच ते स्वादिष्ट वाटते. त्याप्रमाणे उत्तम जीवन जगण्याची तीव्र इच्छारूपी आंतरिक भूक लागली तरच माणूस जीवन विकास करू शकतो व त्याचे Standard of Life वाढते, दृष्टिकोन विशाल होतो, आंतरिक सुधारणा होऊन अवगुण जातात; उच्च विचारांनी तो भारून जातो.

जीवनाच्या राहणीमानाचा व जीवनाचा दोन्हींचा विकास एकाच वेळी व्हावयास हवा.

जीवनाचे दोन मार्ग सांगितले गेले आहेत प्रेयस आणि श्रेयस. आपण कुठल्या मार्गाने जावयाचे याचा स्पष्ट स्वच्छ आणि ठाम निर्णय घ्यावा लागतो. प्रेयसचा मोह पडतो. त्यात तत्कालीक सुख मिळते पण अंती दुःख प्राप्त होते. श्रेयस् मार्ग प्रथम नको वाटतो पण शेवटी तो अत्यंत कल्याणकारक आणि पूर्णतेचा अनुभव देणारा ठरतो. त्यात आत्मसंयमन आणि शिस्त यांची आवश्यकता असते. त्याने शांती आणि समाधान दोन्हींचे सुख मिळते. शास्त्रीय संशोधनाचे ही महत्त्व जरूर आहेच. उच्च राहणीमान हे नौकेच्या शिडासारखे आहे तर उच्च जीवन हे नौकेच्या बुडासारखे आहे. नौकेचे बूड जड, रूंद व सखोल हवे.Practical code of Healthy Living आरोग्यपूर्ण जीवन कसे जगावे हे धर्मग्रंथ सांगतात.

समाजाच्या घटकांवर त्याची शक्ती, त्याचा आनंद अवलंबून असतात. इमारत तिच्या साहित्यावर विटा वगैरेंच्या दर्जावर अवलंबून असते. भौतिक सुधारणांचा परिणाम म्हणून युद्धे आणि क्रांत्या झाल्या. तेव्हा माणूस शांती आणि आनंद गमावून बसला. यांतून सुटका हवी असेल तर शास्त्र आणि धर्म यात समन्वय हवा. तत्त्वज्ञान आणि धर्म यांच्यामुळे आंतरिक विकास होऊन आंतरिक सुख-समाधान लाभते.

अनुभवांचा प्रवाह म्हणजेच जीवन. वीट ही जसे इमारतीचे (Unit) परिमाण आहे. तिच्या दर्जावरून इमारतीचा दर्जा ठरतो. त्याप्रमाणे अनुभव हे जीवनाचे परिमाण (Unit) आहे. मनुष्य कशा प्रकारे जगला हे त्याच्या अनुभवांवरून कळते. प्रत्येक अनुभवाचे तीन घटक असतात. ज्ञाता, ज्ञेय आणि ज्ञान. अनुभवणाराचे चार प्रकार आहेत. १) शारीरिक, २) भावनिक, ३) बौद्धिक आणि ४) आत्मिक. आयुष्यातील समस्यांवर उत्तर - आपल्या अनुभवांचे शिस्तबद्ध नियंत्रण हेच आहे. म्हणून शरीर, मन, अंत:करण, बुद्धी आणि आत्मा यांच्या समन्वयाने निर्णय घ्यावा. मात्र त्यात ठामपणा हवा.

सर्व माणसांत शरीर, मन, बुद्धी आणि आत्मा उर्फ चित् हे चार घटक असतात. प्रत्येकात शरीर (५ ज्ञानेंद्रिये, ५ कर्मेंद्रिये) सारखेच असते आणि सूक्ष्म तत्त्व - चित् = आत्मा हाही घटक सारखाच असतो. म्हणून मन आणि बुद्धी हेच अनुभव घेणारे आहेत. यातच फरक असतो. मन व बुद्धी यावर नियंत्रण नसेल तर बेतालपणा, कठोरपणा हे दुर्गुण उत्पन्न होतात. मन हे संवेदनांचा पाया आहे. बुद्धी निर्णय घेते. सत्य, असत्य, चांगले, वाईट, बरोबर, चूक ठरविते. दोन्ही बहुतेक वेळा विरूद्ध कार्य करतात. भावनातिरेकात बुद्धी काम करीत नाही. बौद्धिक निर्णयात भावनांना स्थान नसते.माणसे एकमेकांना भेटतात. त्यावेळी त्यांच्या परस्परांच्या मनबुद्धी यांचाच संबंध येतो. शरीर केवळ त्यांच्या परस्परांच्या भेटीचे स्थान असते. यात परस्परात बदल होतो, तेव्हा एकमेकांविषयी अलिप्तता येते. या अंतराकडे दुर्लक्ष होत आहे. धर्म यावर नियंत्रण ठेवण्यास शिकवितो. सूक्ष्म पातळीवर हे सर्व चालते. त्यामुळे अधिक उत्साहित आणि आनंदी जीवन जगणे शक्य होते. त्यासाठी मन आणि बुद्धी यांची शास्त्रसंमत उपासना करावी लागते. त्यांच्याकडे दुर्लक्ष झाले तर व्यक्तिमत्त्व ढासळते.

मन आणि बुद्धीवर व्यक्तिमत्त्व अवलंबून असते. नियंत्रण करून सुधारणा घडवून आणता येते. बुद्धीला सुशिक्षित, सुसंस्कृत करावी लागते, तर मग बदलत्या परिस्थितीशी मेळ घालता येतो. आनंदी आणि समतोल जीवन जगता येते. त्यासाठी प्रथम मन बुद्धीचे स्वरूप जाणावयास हवे. सर्वांना मन, प्रेरणा आणि भावना देते. इतर प्राणी फक्त अंत: प्रेरणेनुसार कार्य करतात. त्यांना त्यामागील कार्यकारण जाणता येत नाही. मानवाला बुद्धी असल्याने तो तिचा उपयोग करून तो त्याप्रमाणे निर्णय घेऊन वागू शकतो. बुद्धीचा उपयोग करून अलिप्तपणे निर्णय घेतले पाहिजेत. आपण भावनांत वाहून जाऊ तर पशू होऊ. धर्म बुद्धीचा उपयोग करण्यास शिकवतो. मन हे Receiving क्लार्क,कारकून आहे.तो स्वतंत्र निर्णय घेत नाही. बुद्धी ही Officer Incharge आहे. जबाबदार अधिकारी आहे. मन, बुद्धी वासनांवर अवलंबून असतात. मन व बुद्धी ही माणसाच्या जीवनाचे सार आहेत. शरीर फक्त पोषाख (गवसणी - आच्छादन) आहे. तत्त्वज्ञान आणि धर्म हे शिल्पकार आहेत. धर्म आरशाचे कामही करतो. तो वासनांना वळवतो अथवा त्यांची पुनर्रचना करतो; व्यक्तिमत्त्वाचा विकास करण्यास तटस्थ मार्गदर्शन करतो. पाच ज्ञानेंद्रिये ह्या पाच खिडक्या आहेत. ती ज्ञान घेतात. कर्मेंद्रिये क्रिया करतात. Traffic of Life जीवनमान थांबले की देहाचा मृत्यू होतो. धर्म हा पूर्णतेकडे वाटचाल करणारा, सहाय्य करणारा मित्रासारखा असणारा पोलीस आहे. मनबुद्धी दोन्ही कार्यक्षम असली तर आपण समस्यांना तोंड देऊ शकतो. मन हे नदीच्या प्रवाहाप्रमाणे असते तर बुद्धी तिच्या तटाप्रमाणे असते. तट भक्कम असावे लागतात. प्रवाह सारखा बदलत असतो. म्हणून मन, बुद्धी दोन्हींची जपणूक करावी लागते.

इच्छा, विचार, आचार यांचा उगम वासनांतून होतो. माणसाला आपल्या आधार, विचार कृतींना दिशा देण्याचे स्वातंत्र्य आहे. आपण मागील वासनांची शिकार आहोत पण भविष्याचे शिल्पकार आहोत. पूर्वीच्या संस्कारांवर मात करून माणूस पूर्णत्वास पोहोचू शकतो. प्रत्येक कृतीच्या मागे वासनापूर्तीची इच्छा कारणीभूत असते. संस्कारातून इच्छा, विचार, आचार उत्पन्न होतात. वासना असतात तोपर्यंत इच्छा होत राहतात. त्या असतात तोपर्यंत असंतोष, चंचलता जाणवतात. वासना याचा अर्थ संस्कृतमध्ये गंध असा आहे. प्रत्येकाचा गंध वेगळा, वैशिष्ट्यपूर्ण, खास त्याचाच असतो. तो म्हणजे वासनांचे मूर्तिमंत स्वरूप असते. वासनांवर नियंत्रण मिळवील त्याची मानसिक अस्वस्थता नष्ट होते. तो दैवी गुणसंपन्न होतो. कापूर जळून जातो, पण त्याच्या प्रकाशात देवतेचे दर्शन होते. सुगंध पसरतो. तसे वासना नष्ट झाल्यावर होते. इच्छा आणि विचार ग्रामोफोनच्या तबकडीसारखे असतात, त्यांतून गाणे, भाषा निघते. तसे त्यांच्यातून कृती घडते. माणसाला निवड करण्याचे स्वातंत्र्य आहे. धर्मग्रंथ दिशा दाखवतात.

धर्म म्हणजे काही काल्पनिक संकल्पनांचे, क्रियांचे कडबोळे नव्हे. ते परिपूर्ण शास्त्र आहे.जीवनोपयोगी शास्त्र आहे. प्रामाणिकपणे अवलंब केला तर जग आनंदी आणि अधिक चांगले बनेल. अनुभवांची शृंखला म्हणजेच जीवन. अनुभवणारा वस्तू आणि व्यक्ती यांच्या संपर्कात येतो आणि सुख, दु:खाचा अनुभव करतो, यश अपयश प्राप्त करतो. त्याच्या मनावर, अंत:करणावर प्रतिक्रिया होतात. एकच जग प्रत्येकास वेगवेगळा अनुभव देते. त्यात कॅलिडिओस्कोप प्रमाणे अनंत प्रकार असतात. शास्त्रज्ञ, शेतकरी, कवी प्रत्येकाची अनुभूती भिन्न असते. अज्ञानामुळे, नकारात्मक दृष्टिकोन बनतो. म्हणून जगाची नीट व्याख्याच करता येत नाही. सामुदायिक जीवनात अर्थशास्त्रज्ञ, राजकीय नेते, भौतिक शास्त्रज्ञ, बाहेरील जगात सुधारणा करण्याचा प्रयत्न करतात. निसर्गावर नियंत्रण करू पाहतात. अंतर्मुख होत नाहीत. पण Master the mind and you will master the world जर आपण मनास जिंकले तर जग जिंकले असे समजावे. अंतरंग सुधारणे महत्त्वाचे आहे. धर्म अंतरंगात सुधारणा घडवून आणण्याचा मार्ग दाखवितो.

खरा धर्म आपल्याला स्वत:स आणि जगास जाणून घेण्यास मदत करतो. जग म्हणजे आपल्या कर्तृत्व भावना आणि वस्तूमय विचारांचे भरभक्कम प्रक्षेपण आहे. अंतर मनाचा विकास, अंतरंग व्यक्तिमत्त्वाचा विकास हाच मार्ग सर्व धर्मग्रंथ सुचवितात. काही विशिष्ट शाश्वत मूल्ये आचरण्यास सांगतात. ही मूल्ये सर्वांना सारखीच आहेत. ती अभ्यास करण्याचा आणि त्याप्रमाणे प्रामाणिकपणे आचरण करण्याचा प्रयत्न करणे आवश्यक आहे. ते निसर्गदत्त नियम मनुष्य आणि त्याचा जगाशी असलेला संबंध यासंबंधी योग्य मार्गदर्शन करणारे आहेत. मुख्य तीन मूल्ये आहेत. १) ब्रह्मचर्य, (शारीरिक नियमन), २) अहिंसा (मानसिक नियमन), ३) सत्यम् (बौद्धिक नियंत्रण) ही तीन्हींना शिस्त लावणारी मूल्ये आहेत. **१) ब्रह्मचर्य** - इंद्रियांना उत्तम विषयभोग हवे असतात. त्यामुळे मानसिक हाव वाढत जाते. मग निराशा, दु:ख वाट्याला येतात. त्यासाठी आत्मनियंत्रण हवे. मात्र संपूर्ण नकारात्मक भूमिका नको. विषय हे उपभोगासाठीच असतात. त्यास शास्त्रग्रंथ बंदी घालत नाहीत पण विषयांनी तुमच्यावर कुरघोडी करता कामा नये. तुम्ही त्यांचे गुलाम होऊ नये. वैषयिक सुखांचा संपूर्ण त्याग हा त्याचा अर्थ चुकीचा आहे. तुम्ही विषयोपभोगात आसक्त होऊ नये. तुम्ही जगाचा उपभोग घ्या, जगाला तुमचा उपभोग घेऊ देऊ नका. तुम्ही अन्न खा, अन्नाने तुम्हाला खाऊ नये. तुम्ही पेय घ्या पण पेयाला तुम्हाला पिऊ देऊ नका. फार बडबडणे किंवा दिवसभर रेडिओ ऐकणे हाही ब्रह्मचर्याचा भंग होईल. हे पाळले गेले नाही तर माणूस सवयीने विषयांचा गुलाम बनतो. सतत बदलणाऱ्या निसर्गाचा आणि परिस्थितीचा दास बनतो. **२) अहिंसा** - कुणाला न दुखावणे. मनात प्रेम असून कधी कधी हिंसेचा अवलंब करावा लागतो. उदाहरणार्थ - सर्जन. शेक्सपियर म्हणतो, "I am cruel only to be kind." **(३) सत्यम्** - प्रामाणिकपणे जगणे. आदर्श असतात पण जीवनात उतरविले जात नाहीत. मोहाच्या प्रसंगी आपण तडजोड करतो आणि इंद्रियांना वश होतो, शिकार बनतो. हे असत्य आहे. False living आहे. आपल्या ध्येयास अनुसरून सदैव वर्तन करणे यातच माणसाचा मोठेपणा असतो. आपण याची अंमलबजावणी करून आपली उन्नती करून घेतली पाहिजे.

आपण गोंधळ आणि ताणतणावात जगतो. आतबाहेर दोन्हीकडे गोंधळ आहे. बाह्य परिस्थितीने दु:ख प्राप्त होते. ऋषी परिस्थितीशी जुळते घेण्यास शिकवितात. शांतपणे तोंड देण्यास सांगतात. अलिप्तपणे काही काळ आपण घालवला की, सकारात्मक दृष्टिकोन होऊन आपण अंतरात शांतीचा अनुभव घेतो. मग बाहेरील आव्हाने अथवा आकस्मिक संकटे आपणावर परिणाम करू शकत नाहीत. बाहेरील जीवघेण्या स्पर्धेच्या वातावरणामुळे सतत युद्ध संघर्ष करावा लागतो. वस्तू आणि व्यक्तीविषयी अगदी अंत:करणात खोलवर आपण डोकावलो तर आपण स्वत:च्या अगणित आणि अनियंत्रित इच्छांचे गुलाम झालो आहोत, हे जाणवते. बाहेरील संघर्ष तर चालूच राहणार. बिकट परिस्थितीवर मात करण्याऐवजी आपण तिची शिकार बनतो. कायर बनतो. तुमच्या अंतरावर तुमचे सुखसमाधान अवलंबून आहे. अहंकार टाकला पाहिजे आणि पूर्णता समजून घेतली पाहिजे. आपले स्वरूप जाणले पाहिजे. जागतिक स्तरावर विचार करण्याची सवय लागली की वैयक्तिक समस्या, मूर्खपणाच्या, अनुचित वाटू लागतात. जीवनात सुसंगति आणि समतोल यांची आवश्यकता आहे.

माणसाच्या उत्क्रांतिवादाच्या चार पायऱ्या आहेत. तत्त्वज्ञान आणि धर्म चवथ्या टप्प्यात सामावले जातात. सर्व शास्त्रीय ज्ञानाची ही पुढची पायरी आहे. ही जाणीव नसल्याने धर्माला लोक पुरातत्त्व, कालबाह्य समजतात. त्यामुळे प्रगती खुंटली, डबके झाले आहे. लोक दु:खी झाले आहेत. प्रारंभीच्या काळात केवळ प्रेरणांवर आणि आकस्मिक उबळीवर जीवन अवलंबून होते. कार्यकारण ज्ञान नव्हते. माणसे अनुकूल परस्थितीत खूष होत. तर प्रतिकूल परिस्थितीत दु:खी होत. बदल करण्याचा विचार कुणी करीत नव्हते. The Age of Perception (आकलन करण्याच्या युगापासून The Age of Observation) निरीक्षण करण्याच्या युगापर्यंत माणूस शास्त्रीय कारणांचा शोध घेऊ लागला नव्हता. नंतर why & where करू लागला. कारणे शोधू लागला. यास Science Age शास्त्रीय युग म्हणू. नंतर Age of Contemplation मनन-चिंतनाचे युग निसर्ग नियमाप्रमाणे चालतो, हे कायदे कोणी केले. त्याचा शोध माणूस घेऊ लागला. कायदे करणारा, सर्वांवर शासन करणारा, सर्व कायद्यांची अंमलबजावणी करणारा, सर्वांचा शेवट करणारा, सर्व कायद्यांचे मूळ, निसर्गातील घडामोडींचे नियंत्रण करणारा कोण आहे, या प्रश्नांची उत्तरे शोधू लागला. ज्ञानाचेही ज्ञान कोणाला होते इत्यादी संबंधी चिंतन करू लागला.

खऱ्या धर्माची दोन अंगे असतात. त्याचे तत्त्वज्ञान आणि त्याचे नियमित आचरण. तत्त्वज्ञानाशिवाय नुसत्या संस्कारास महत्त्व नाही. ते वरवरचे वागणे ठरते. तर केवळ तत्त्वज्ञान संस्काराशिवाय (म्हणजे आचरणात आणले गेले नाही तर) वेडेपणा ठरतो. दोन्ही एकाच वेळी आचरणात आणली गेली पाहिजेत. तत्त्वज्ञानामुळे संस्कारास (बाह्य आचरणास) बळकटी येते. त्याचे कारण कळते आणि आपले ध्येय निश्चित होते. दोन्हीच्या समन्वयाने त्यास अर्थ प्राप्त होतो, त्याचा उद्देश सिद्ध होतो. तत्त्वज्ञान हे सिद्धान्तरूप आहे. शास्त्रीय आणि कार्यकारण परंपरेस धरून आहे. जीवनाचा अर्थ, उद्देश त्यामुळे कळतो. विश्वाचे कोडे उलगडते. विचारास योग्य दिशा मिळते आणि सत्याचा साक्षात्कार होतो. प्रात्यक्षिक संस्कारातून होते आणि प्रत्यक्ष धर्म हे तत्त्वज्ञानाचे आणि संस्कारांचे तार्किक सुखमय फळ आहे हे कळते. **दोन्हींची आवश्यकता आहे तरच खरा धर्म आचरणात येतो. पण मनुष्य चुका करतो. एकाचे आचरण करून दुसऱ्याकडे दुर्लक्ष करतो आणि त्यालाच धर्म समजतो. आणि त्यावरच अपयशाचे खापर फोडतो. खऱ्या धर्माला अपयश माहीतच** नसते. संस्कार म्हणजे केवळ शारीरिक कसरत नव्हे. मन आणि बुद्धी यांचाही सहभाग आवश्यक आहे. ध्यान, नि:संगता, बुद्धीचे कार्य, भावभक्ती, मनाचे कार्य आहे.

**Vitals of Nation - राष्ट्रीय महत्त्वाच्या बाबी** - विशिष्ट भौगोलिक क्षेत्रफळात राहणारी लोकसंख्या, ती केवळ लोकसमुदाय होतो. पण यामुळे राष्ट्र बनत नसते; ज्यावेळी सदस्य एकत्र राहतात, त्यांचा समान कार्यक्रम असतो आणि ते सर्वांच्या हितासाठी समर्पण बुद्धीने कार्य करून आपले समान ध्येय साधण्यासाठी प्रयत्नशील असतात, तेव्हा त्यास राष्ट्रनिर्मिती झाली असे म्हणता येते. जोपर्यंत माणसे विभक्त, आत्मकेंद्रित आणि स्वार्थापुरते पाहणारी असतात आणि समान ध्येयही बाळगत नाहीत त्यावेळी ते राष्ट्र होऊ शकत नाही. शास्त्रीय राजकीय आणि आर्थिक प्रणालींनी वारंवार एकत्वाचा कृत्रिम देखावा निर्माण होतो. पण खऱ्या राष्ट्राच्या उभारणीत त्यांना यश आलेले नाही. भौतिक प्रयोगाचा माणसाशी संबंध येतो. नैसर्गिक परिस्थिती आणि घटनांशी संबंध येतो. व्यक्तीशीही संबंध येतो. राष्ट्र हे व्यक्तीने बनते. त्या त्या व्यक्तींचे चारित्र्य, सामर्थ्य वगैरेवर राष्ट्राचे भवितव्य अवलंबून असते. मग संपत्ती, कायद्यात सुधारणा, शास्त्रीय ज्ञान वगैरेवर कसे अवलंबून असेल ? याचा अर्थ असा नव्हे की या गोष्टींना महत्त्व नाही किंवा त्यांची उपेक्षाच करावी. पण एकतेची

भावना, प्रेम, चारित्र्य, त्याग याशिवाय सर्व व्यर्थ ठरते. तत्त्वज्ञान जीवन जगण्याचे शास्त्र आहे. ते आचरणात आणले गेले म्हणजे त्यालाच धर्म म्हणतात. प्रामाणिक आचरणाने त्याग, प्रेम, सदस्यात सक्रीय त्यागास तयारी, राष्ट्रसेवेची संधी मिळाल्याचा आनंद असे गुण आले तर सत्ता, प्रतिष्ठा आणि सामर्थ्य यांनी मुक्त असा आरोग्यदायी समाज निर्माण होऊन राष्ट्रात शांती आणि उन्नती आढळून येऊ लागते.

## संस्कृती म्हणजे काय ?

संस्कृती हा मानवी (नागरिक) सुधारणांचा मानदंड आहे. असंस्कृत आणि रानटी समाज आणि सुसंस्कृत समाजात फार फरक आहे. कुठल्या मूल्यांचा पाठपुरावा लोक करतात, कशाला महत्त्व देतात त्यावर तेथील संस्कृती अवलंबून असते. जेव्हा काही लोक दीर्घ काळपर्यंत एकाच भौगोलिक प्रदेशात राहून काही तात्त्विक मूल्ये आणि गुण यांचा आदर करतात, तेव्हापासूनच त्यातून जे सार निघते त्याला त्याची संस्कृती म्हणतात. सांस्कृतिक मूल्ये कुठल्या गुणांना महत्त्व दिले जाते यावर ठरत असतात. माणसाचे डोके, धड इतर अवयव सारखे असले तरी वजन, रंग आकारात फरक असतोच. संस्कृतीमध्ये कुठल्या मूल्यांचा आणि गुणांचा आदर केला जातो यावर तिचा दर्जा ठरतो.

प्रारंभिक अवस्थेत भौगोलिक परिस्थिती, हवामान, निसर्ग (वातावरण) यास महत्त्व होते. त्याचा पगडा होता. पाश्चिमात्य देशात म्हणून निसर्गाचा शोध घेणे ही प्रथम गरज ठरली. त्यामुळे लोकांची मनोवृत्ती तशी बनली. पूर्वेला सुपीक जमीन, सुबत्ता, थोड्याशा परिश्रमात विपुल धनधान्य, फुले, फळे उपलब्ध होत होती. नद्या नेहमी भरलेल्या असत. निसर्गाकडूनच धडा घेऊन 'सेवा करणे आणि देणे हीच प्रवृत्ती, संस्कृती बनली,' 'लढणे आणि बळकावणे' या पाश्चिमात्य संस्कृतीच्या विरुद्ध ही संस्कृती शांती, प्रेम देणारी झाली. पाश्चिमात्य संस्कृतीत (देशात) भौगोलिक शोधावर लक्ष केंद्रित केले गेले. आपल्या रोजच्या दैनंदिन आयुष्यातही वागण्यावर संस्कृतीचा प्रभाव कसा असतो हे दिसून येते. झोपडीत गरिबीत राहणारा मुलगा विरोध आणि संघर्ष करताना दिसतो तर श्रीमंत घराण्यातील जास्त सुसंस्कृत आणि सुधारलेला दिसतो. बससाठीच्या रांगेत सुसंस्कृत मुलगा शांत उभा राहतो पण पहिला विरोध करतो, घुसतो, बळजबरीने प्रवेश मिळवितो असे दिसते. संस्कृतीमुळे सुधारणांचा विकास होतो. पण सांस्कृतिक मूल्ये घसरतात तेव्हा समाजातील उन्नतीचा ऱ्हास होतो. उदाहरणार्थ इजिप्त, रोम, ग्रीस साम्राज्ये नाश पावली. या देशातल्या ऋषीमुनींनी वेळोवेळी खूप परिश्रम घेऊन संस्कृतीची जोपासना करून देशाचे रक्षण केले. संस्कृतीचा ऱ्हास होतो तेव्हा क्रौर्य, अनीती वाढतात. तत्त्वज्ञानाचा चुकीचा अर्थ लावला जातो. त्यामुळे लोकांचा गोंधळ उठतो, ते हवालदील होतात. हल्ली जगाची तशीच स्थिती झाली आहे. सांस्कृतिक ऱ्हास रोखणे ही काळाची गरज आहे. थोर तत्त्वज्ञान आणि धार्मिक मूल्ये यांची पुन्हा स्थापना करणे आवश्यक आहे. जगातील कुठल्याही साहित्यात ही मूल्ये इतक्या सुंदर रीतीने परिपूर्णतेने व्यक्त केली गेलेली नाहीत. आपल्या देशाच्या पवित्र धर्मग्रंथातच हे आढळते म्हणून आपले प्रत्येकाचे कर्तव्य आहे की, आपल्या धर्मग्रंथांचा पवित्र संदेश आणि त्यातील तत्त्वज्ञान यावर प्रकाश झोत टाकून सर्व जगास ते आचरण्याची प्रेरणा देऊन त्यामुळे त्यांना सुखी करावे.

**मनुष्य कशाने बनतो ?** – मनुष्य ही ईश्वराची सर्वोच्च निर्मिती आहे. तो सर्व निर्मितीचा मुकुटमणी आहे. याशिवाय जनावरे, वनस्पती आणि आंतर साम्राज्यांचा अंतर्भाव या जगात होतो. तत्त्वज्ञान्यांनी वर्गीकरण केले आहे. स्वानुभवावरून ते सांगतात की उदात्त आणि सर्वोत्तम जे जे काही आहे ते प्रत्येक मनुष्य प्राप्त करू शकतो. हे वर्गीकरण त्याच्या भावनात्मक आणि बौद्धिक क्षमतेवर अवलंबून आहे. अचल वस्तू ज्या जगात आहेत त्यांना केवळ अस्तित्व आहे. उदाहरणार्थ दगड, पृथ्वी, ते प्रतिसाद देऊ शकत नाहीत. त्यांना जाणीवही नसते. काही माणसेही पूर्ण अज्ञानी, संवेदनाशून्य, अलिप्त असतात. त्यांच्यावरही बाह्य घटना अथवा वातावरणाचा परिणाम होत नाही. जगाच्या अस्तित्वाची जाणीव अगदी नावापुरती असल्याने ते म्हणजे मूर्तीमंत आळस आणि अमानुषता असते. उत्साह नसतो. संवेदना नसतात. त्यांना Stone Man पत्थर माणूस म्हणता येईल.

याहून पाषाणापेक्षा वनस्पती अधिक संवेदनक्षम असतात. पण अचल, आपली जागा न सोडणाऱ्या, गलथान असतात आणि त्यांचा जगातील घडामोडीला प्रतिसाद फक्त त्यांच्या स्वतःच्या अस्तित्वापुरताच असतो. एक प्रकारची अलिप्तता असते. फक्त त्यांना सूर्यप्रकाश आणि अंधार, भोजन व विष एवढीच जाणीव असते. जे पाहिजे ते मिळविण्याची धडपड करतात. संवेदनक्षमता नसते. मोठे झाड, लहान झाडांना वाढू देत नाही. जर ते स्वतःच्या विकासाला अडथळा करीत असेल तर (पाणी, खाद्य इत्यादीमध्ये).

मनुष्यांचे निरीक्षण केले तर आपल्याला त्यांच्यातही अनेक तऱ्हा आढळतात, की जे वनस्पती जीवनाची नक्कल करतात. अशी माणसे अगदी अपरिहार्य झाले तरच वरवर प्रतिसाद देतात. ते जास्त मेहनत घेत नाहीत. काही निर्माण करू इच्छित नाहीत. एक प्रकारे अलिप्त असतात. प्राथमिक भावना व संवेदनाही त्यांना नसतात. त्यांना Plant Man वनस्पति माणूस म्हणतात.

परंतु जनावरे अधिक विकसित असतात. भोवतालच्या जगाची अधिक जाण असते. बौद्धिक अलिप्तता वनस्पतिपेक्षा अधिक दिसून येते. निसर्गास, बाहेरील वातावरणास प्रतिसादास सुधारणा आढळते. भक्ष्यासाठी हिंडतात आणि अन्नपदार्थ मिळाले नाही तर वनस्पतीप्रमाणे नाश पावत नाहीत. भावना, प्रेम यांचा जनावरात अधिक विकास आढळतो. स्वतःची व आपल्या पिल्लांची काळजी घेतात. मनुष्यात पशु-मानव अधिक आढळतात. वासनांनी भारलेले, भावनाप्रधान आणि अहंकारी, बौद्धिक अलिप्तता मर्यादित असते. स्वतःसाठी आणि स्वजनांसाठी सतत कार्यरत राहतात. फार मोठे लोक या वर्गीकरणात येतात. त्यांच्या क्रिया त्यांच्या इच्छेवर व भावनांवर आधारीत असतात. अलिप्तता आणि ज्ञान यावर नाही.

चौथे वर्गीकरण मानव-मानव हा निर्मितीचा मुकूटमणी आहे. भावनांची पराकाष्ठा असते आणि सर्व जगास कवटाळू शकतो. बौद्धिक अलिप्ततेला माणसात मोजमाप नाही, मर्यादा नाही, बाह्य जगतातीलच नव्हे तर अंतरांतील त्याच्या व्यक्तिमत्त्वातील सर्व अहंकारांचा त्याग करून तो स्वतः परमात्मस्वरूप होऊ शकतो. जे मानव या ईश्वरदत्त सामर्थ्याचा उपयोग करीत नाहीत ते पूर्वी वर्णन केलेल्या तीनपैकी कशात तरी मोडतात. जरी त्यांना 'माणूस' मानव म्हटले जाते ! पण जे वैश्विक प्रेमतत्त्व जाणतात, आचरतात आणि श्रेष्ठ पुरुषांच्या मार्गदर्शनाखाली कार्य करतात तेच खरे मानव होत. तेच फक्त मानवाच्या प्रतिष्ठा, थोरवी आणि यशावर हक्क सांगू शकतात.

मनुष्याने स्वतःचे स्वरूप जाणून घेतले पाहिजे तर जगाशी त्याचे योग्य आणि निरोगी संबंध राहू शकतात. प्रत्येक माणसास शरीर, मन आणि बुद्धी ही तीन उपकरणे मिळालेली आहेत आणि 'चित्' जाणीव -चैतन्य जे या सर्वांना प्रेरणा देते. प्रत्येकाने स्वतःच्या आत्मस्वरूपाचे ज्ञान करून घेतले पाहिजे.

(सत्, चित् आणि आनंद).

शरीर हे व्यक्तिमत्त्वाचे स्थूल स्वरूप आहे. मन हे त्याहून सूक्ष्मकरण आहे. बुद्धी हे मनाहूनही सूक्ष्मतर करण आहे. तिन्ही मिळून भौतिक देह बनतो. जाणीव = आत्मा = चित् हे सर्वांस प्रेरणा देते, हालचाल करवते, कर्म करावयास लावते. आत्मा या करणांवाचून काहीही करू शकत नाही. या दोन्हींच्या सहजीवनाने, यांच्या सहकार्याने जीवन बनते आणि कार्य घडते. उदाहरणार्थ मानवी शरीर यंत्रणा ही बल्बप्रमाणे असते किंवा चित् विजेप्रमाणे समजावे. या करणांना स्वत:ची शक्ती नाही. तसेच चैतन्याशिवाय शरीर, मन, बुद्धी काहीही करू शकत नाहीत. मनुष्य जेव्हा स्वत:ला देह समजतो तेव्हा तेच्र तो होतो, केवळ शारीरिक स्तरावर मनबुद्धींच्या सहाय्याने तो जगतो आणि सदा वखवखलेला असतो, संघर्ष करतो, संपत्ती गोळा करतो आणि विश्वांतील विषयभोगांच्या मागे, वस्तूंच्या मागे लागतो; वैषयिक इच्छा कधी पुऱ्या होत नाहीत. पूर्ण झाल्या तरी लोभ वाढतो, नवीन इच्छा उत्पन्न होतात. त्यामुळे तो सदा अस्वस्थ, असंतुष्ट असतो.

जेव्हा मानसिक स्तरावर माणूस जगतो तेव्हा जरा जास्त जगतो. मनाच्या मोठेपणामुळे इतरांच्या हिताचा विचार करतो. प्रेम, बंधुत्व भाव यामुळे त्याला जरा जास्त संतोष, सुख होते. ज्यांच्यावर प्रेम करतो त्यांच्यासाठी विषयत्याग करू शकतो. बौद्धिक पातळीवर जगणारास आसक्ती राहात नाही. अलिप्तता येते, त्यामुळे विषयांकडील धाव आणि भावना यांचे नियंत्रण होते. शास्त्रज्ञ किंवा राजकीय पुढारी यांनाही भावनिक लागेबांधे राहात नाहीत. शारीरिक भूकही राहात नाही. कामात असल्यावर तहान-भूक आप्त बांधव सर्वांचा विसर पडतो. मनुष्य आत्मकेंद्रित आहे. त्यामुळे शरीर, मन, बुद्धी यांची कामे चालतात. पण आत्मा जशाच्या तसाच असतो. या आत्मस्वरूपाची ओळख पटली की तो बाह्य परिणामांची शिकार होत नाही. आत्मरूपाने परमात्म्याशी ऐक्य पावतो. अशा माणसाची बौद्धिक धडपड, भावनात्मक लागेबांधे आणि शरीरसुखाची लालसा ही फळे लागल्यावर फुलाच्या पाकळ्या जशा हळूहळू गळून पडतात त्याप्रमाणे हळूहळू विरळ होत जाऊन नाहीशा होतात. हे सर्व कसे साधावे हे धर्म आपल्याला शिकवतो आणि आपल्या खऱ्या स्वरूपाचे ज्ञान होऊन अनंतत्त्वाची जाणीव होऊन ऐहिक जगताबद्दल माणूस पूर्ण अनासक्त होतो.

मानव हा खरे तर दैवी आहे पण हे त्यास माहीत नसते. या ज्ञानावर पडदा पडलेला असतो. इच्छांची आणि वासनांची शृंखला आणि त्या पूर्ण कशा होतील यासंबंधी विचार यामुळे हे पटल आलेले असते. यात जी विविधता आहे त्यामुळे माणसांतही विविधता दिसून येते. ते पटल दूर व्हावे आणि आत्मस्वरूपाचे प्रकटन व्हावे यासाठी शास्त्रग्रंथ मार्गदर्शन करतात.

शास्त्रीय पृथक्काने मनाचे स्वरूप कळून येते. तीन प्रकारच्या विचारांनी मनुष्याच्या जीवनाचे नियंत्रण होते. वेदांतात यांना सत्त्व, सात्त्विक (शुद्ध आणि उच्च), राजस (ममतायुक्त आणि उत्तेजित), तामस (मंद आणि कार्यरहित) अवस्था म्हटले जाते.

या तिन्हींचे मिश्रण निरनिराळ्या प्रमाणात माणसात झालेले असते. त्यावरून त्यांचे व्यक्तिमत्त्व ठरते. तामस अवस्था - निद्रा, आळस, प्रमादयुक्त असते. राजस अवस्था - वासनांनी युक्त संघर्षमय, उत्तेजित, महत्त्वाकांक्षा आणि ममता यांनी युक्त असते. सतत नवनवीन इच्छा, भावना आणि कर्मे यांनी युक्त असते. सात्त्विक अवस्था सूक्ष्मतम असते, समतोल असते. तिच्यातील विचार हर्ष, दु:ख यांना सारखे लेखणारे असतात, पवित्र असतात. यात मानवतेस अनुसरून मनुष्य सर्व भूतांच्या हितासाठी कार्यरत राहतो.

या तीन प्रकारच्या विचारास अनुसरून मनबुद्धी बनतात. मनबुद्धी यांच्यातील फरकांमुळे माणसा माणसात फरक आढळतो. बुद्धी दोन प्रकारची असते. तीक्ष्ण बुद्धी आणि सूक्ष्म बुद्धी, तीक्ष्ण बुद्धी ऐहिक पदार्थांत रमते. ती आत्मतत्त्वास जाणू शकत नाही. सूक्ष्म बुद्धी साक्षी राहून निर्णय करते आणि स्वस्वरूपाचा शोध घेण्याकडे लागते. जनावरे व वनस्पती यांना थोडीफार बुद्धी असते. अलिप्त राहणे व बाह्य जग जाणतात पण सूक्ष्म बुद्धी नसल्याने सत्य-असत्य याची जाण नसते. फक्त मानवाला त्याच्या सूक्ष्म बुद्धिमुळे हे सामर्थ्य उपलब्ध आहे. ज्यावेळी वासनांचा क्षय होतो तेव्हा आत्मतत्त्व प्रकट होते.

सत्त्वगुणानेही आत्मतत्त्व झाकले जाते. पण सत्त्वगुण दूर सारणे सोपे असते. अग्निपासून धूर दूर करण्यास वाऱ्याची एक झुळूक पुरेशी होते, त्याप्रमाणे प्रार्थना, ध्यान यांनीही हे होऊ शकते. आरशावरील मळाप्रमाणे रजोगुण दूर करण्यास जास्त प्रयत्नांची आवश्यकता असते. शास्त्रग्रंथांनी, धर्मानं सांगितलेले उपाय करणे आवश्यक असते. तामस गुणांमुळे हटवादी, उर्मट आणि अहंकारी वासना बनलेल्या असतात. वारेने आवृत्त गर्भाप्रमाणे त्या जाण्यास दीर्घकाळ प्रयत्न करावा लागतो. गर्भाची वाढ होऊन तो बाहेर पडण्यास ज्याप्रमाणे वेळ लागतो त्याप्रमाणे धर्म आपणास वासना नियंत्रित कशा कराव्या, विचारांचे कसे नियंत्रण करावे हे सांगतो. त्यानुसार आपण तामसापासून सत्त्वापर्यंत मार्गक्रमण करू शकतो. मग सत्त्वगुणही नष्ट होऊन आत्मतत्त्व प्रकटते. दुसऱ्या कोठल्याही धर्मात असे व्यावहारिक उपाय दिलेले नाहीत. भारतीयांच्या इतकेच हे ज्ञान सर्व मानवांना आवश्यक आहे.

निर्विचार स्थितीमध्ये आत्मसाक्षात्कार होऊ शकतो. फक्त अस्तित्त्व शिल्लक असते. मनही न-मन होऊन जाते. दिव्यत्व हेच खरे मनुष्याचे स्वरूप आहे, जीवनाचे सार आहे. विचारांमुळे ते झाकले गेलेले आहे. विचार उत्पन्न होण्याचे थांबले की ईश्वरीतत्त्व प्रकट होते. धर्म त्यासाठी निरनिराळे मार्ग सुचवितो. मनाला शांत करून नष्ट करावे लागते.

नदी पाण्याशी संलग्न असते त्याप्रमाणे मन हे विचारांशी संलग्न असते. मन म्हणजे फक्त विचार नव्हे. जसे नदी म्हणजे पाणी नव्हे. नदी म्हणजे पाण्याचा प्रवाह असतो त्याप्रमाणे विचारांचा प्रवाह मन निर्माण करते. हे मन पटल निर्माण करते. त्यामुळे आत्मतत्त्व प्रकटत नाही. धर्मग्रंथ विचारांचा प्रवाह थांबवायचा कसा याचे मार्गदर्शन करतात. तो प्रवाह थांबला की मनाचेही कार्य थांबते आणि जे मुळात असतेच ते आत्मतत्त्व प्रकट होते. प्रवाहामुळेच शक्ती आणि उत्साह निर्माण होतात. केवळ पाण्याचा मोठा साठा कार्य करीत नाही. शांत असतो. जेव्हा पाणी वाहू लागते तेव्हा ते शक्ती आणि उत्साह निर्माण करते. विचारही अत्यंत वेगाने येणारे उत्साही मन निर्माण करतात की, जे आपण शाश्वत समजतो. ते मन जगाचे प्रक्षेपण करते जे आपण अनुभवतो. पेटलेली काडी अंधारात वेगाने फिरवली की वर्तूळ दिसते. चित्रपटातही हेच तत्त्व वापरलेले असते.

मानवी मन सध्या पूर्णपणे अनियंत्रित झालेले असून सर्व बाजूस धाव घेत आहे. नदीला पूर यावा तशी ही स्थिती आहे. हा पूर थांबवून त्याचे नियंत्रण करणे हे प्रथम कर्तव्य आहे. काठ भक्कम केले की प्रवाहाचे नियंत्रण होते. विचारांच्या प्रवाहाचे नियंत्रण बुद्धी करते. म्हणून शास्त्रग्रंथ, धर्मग्रंथाच्या सहाय्याने बुद्धी नियंत्रित केली पाहिजे. विचारांच्या नदीचे मूल्यमापन विचारांची गुणवत्ता व पोत (दर्जा) यावरून ठरते. पाणी गढूळ असेल तर नदी गढूळ; पाणी वेगाने वहात असेल तर नदीला वेग येतो. म्हणजे जसे विचार असतात तसे मन तथा मनुष्य होतो. म्हणून मनुष्यात बदल घडवून आणायचा असेल तर

मनात सुधारणा व्हावयास हवी आणि विचारांचा दर्जा सुधारल्याशिवाय मन सुधारणार नाही. तीन प्रकारे विचारात बदल घडवून आणता येतात. (१) विचारांची संख्या कमी करणे म्हणजेच (कर्मयोग), त्यांचा दर्जा सुधारणे (भक्तीयोग) विचारांना दुसरी दिशा देणे (ज्ञानयोग) याशिवाय हटयोग हाही एक उपाय, ज्यांच्या बुद्धीचा, मनाचा विकास झाला नसेल त्यांच्यासाठी उपयुक्त आहे. यामुळे मनाची शुद्धी होते. ते ध्यानात मग्न झाले की विचार संपतात आणि ते आत्मतत्त्वाशी एकरूप होते. हे चारी योग सर्व मानवांना उपयुक्त आहेत. आत्मतत्त्वाशी एकरूपता ही व्यक्तिगत लाभाची गोष्ट नाही; ती सर्व जागतिक पुनरुत्थापनास आवश्यक आहे.

## वेदांताची मूलभूत तत्त्वे

(यात संस्कृतीसंबंधीचे जे विवरण आले आहे ते सर्व पूर्वी येऊन गेलेले आहे. म्हणून एकदम वेदांच्या निर्मितीपासून विवरण सुरू केले आहे.)

हिंदू धर्म कुणा विशिष्ट व्यक्तीवर अथवा ग्रंथावर घोटाळत राहात नाही. प्राचीन भारतात ऋषीमुनींनी आपले जीवन निसर्गाच्या सौंदर्यपूर्ण आणि समृद्ध वातावरणात व्यतीत केले. पर्वतराज हिमालयातील दरीखोरी, अरण्ये आणि पवित्र गंगामाता यांच्याकडूनच त्यांनी ज्ञान प्राप्त केले. त्यांच्या प्रेरणेने त्यांच्या हृदयात, जी अचेतनास चेतन करते अशा सत्तेविषयी तीव्र जिज्ञासा उत्पन्न झाली आणि त्यामुळे त्यांच्या अंतरंगात जे विचार उठले त्यांना जी अनुभूति आली त्याचे संकलन होऊन वेद निर्माण झाले.

वेद चार आहेत. ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद आणि अथर्व वेद. प्रत्येक वेदाचे तीन विभाग आहेत. १) मंत्र, २) ब्राह्मण आणि ३) आरण्यक म्हणजेच उपनिषदे. ऋग्वेदात निसर्ग सौंदर्याचे काव्यात्मक वर्णन आहे. ब्राह्मणात कर्मे, यज्ञ वगैरेंचे (कर्मकांडांचे) वर्णन असून आत्मशुद्धीसाठी यांची आवश्यकता असते. (आरण्यके) म्हणजेच उपनिषदे यांनाच वेदान्त म्हणतात. ती कुणा एका व्यक्तीकडून लिहिली गेलेली नाहीत: 'मी-माझे' याच्या पलीकडे गेलेल्या द्रष्ट्या ऋषींच्या द्वारे ती प्रकट केली गेली आहेत. म्हणून कुणाही व्यक्तीच्या नावाशी ती जोडलेली नाहीत.

भौतिक शास्त्रज्ञांनी भौतिक (पंचमहाभूतात्मक प्रकृतिचा) सृष्टिचा शोध घेऊन बौद्धिक आणि व्यावहारिक पृथःकरण करून निरनिराळे शास्त्रीय शोध लावून नियम सिद्ध केले. ऋषींनी माणसाच्या अंतरंगाचे संशोधन केले आणि कर्त्याच्या व्यक्तिमत्त्वाचा शोध घेऊन तत्त्वज्ञान आणि धर्म जगाला दिले. दोन्ही संशोधनांच्या क्षेत्रात फरक आहे. उपनिषदात जीवन, त्याचा अर्थ, हेतू इत्यादी संबंधी चर्चा आढळतात.

ज्या वेळी शरीर यंत्रणा बाहेरील कुठल्याही विषयांचा स्वीकार व प्रतिसाद देणे थांबवते तेव्हा आपण त्या शरीरास मृत्यू आला असे म्हणतो. मृत्यू म्हणजे अनुभवाचा संपूर्ण अभाव म्हटले जाते. म्हणून जीवन म्हणजे गर्भस्थ शिशुपासून मृत्यूपर्यंत अनुभवांची अखंड शृंखला - अनुभव धारा होय. म्हणून प्रत्येक अनुभव हे जीवनाचे (युनिट) परिमाण असे. ज्याप्रमाणे प्रत्येक वीट भिंतीचे परिमाण असते आणि विटेच्या दर्जावर भिंतीची गुणवत्ता अवलंबून असते. तसेच व्यक्तीचे अनुभव ज्याप्रकारचे असतील त्यावरून व्यक्ती दुःखी अथवा सुखी हे कळते. व्यक्तीची बाह्य जगाशी संपर्क येणे आणि त्या व्यक्तीची त्यासंबंधी प्रतिक्रिया यास अनुभव म्हणतात. अनुभव घेणारा, ज्याचा अनुभव घेतला तो पदार्थ अथवा व्यक्ती, आणि प्रत्यक्ष अनुभव या तीन गोष्टी अनुभवात अंतर्भूत होतात. ऋषींनी अनुभव घेणाऱ्या संबंधी संशोधन केले. अनुभव घेणारा संबंधीचा शोध म्हणजे तत्त्वज्ञान होय. ज्या वस्तूचा अनुभव घेतला जातो त्या वस्तूंचे संशोधन म्हणजे सायन्स म्हणजेच भौतिक शास्त्र होय.

माणसाचे अंतरंग सुधारून त्याला जगातील घडामोडी व परिस्थितीपासून स्वतंत्र कसे करता येईल याचा त्यांनी शोध घेतला. standard of life जीवनाची पातळी सुधारण्याचा प्रयत्न केला. शास्त्रज्ञांनी जगाला अधिक सुंदर आणि राहण्यासाठी अधिक चांगली जागा कशी बनविता येईल हा प्रयत्न केला आणि standrd of living म्हणजे राहणीमान सुधारण्यासाठी प्रयास केले.अनुभवासंबंधी अधिक विचार केल्यावर त्याच्यात व्यक्तिमत्त्वाच्या निरनिराळ्या प्रकारामुळे भेद दिसून येतात. एखाद्याने चहाचा कप दिला पण आदराने दिलेला नसेल तर मनबुद्धीला ते पटत नाही. तो स्वीकारण्यास मनबुद्धी विरोध करतात. शारीरिक पातळीवर तो आपल्याला स्विकारार्ह वाटला तरी तो नाकारला जातो. ऋषींनी निरनिराळ्या अनुभवांवर संशोधन करून असे ठरविले की माणसात जो तेजाचा स्फुलिंग आहे ज्यास आपण आत्मा म्हणतो तो पंचकोशानी आच्छादित झालेला आहे. कोश म्हणजे आवरण. हे पंचकोश म्हणजे १) अन्नमय कोश, २) प्राणमय कोश, ३) मनोमय कोश, ४) विज्ञानमय कोश आणि ५) आनंदमय कोश हे आहेत.

**१) अन्नमय कोश** म्हणजे आपले स्थूल शरीर. त्याची निर्मिती, स्थिती आणि लय सर्व अन्नावर अवलंबून आहे. यामध्ये पाच ज्ञानेंद्रिये, पाच कर्मेंद्रिये येतात. डोळे, कान, नाक, जिव्हा आणि त्वचा ही पांच ज्ञानेंद्रिये आहेत. वाणी, हात, पाय, उपस्थ आणि गुदा ही पाच कर्मेंद्रिये आहेत.

**२) प्राणमय कोश** - प्राणाचा संबंध हवेशी येतो. म्हणून इंग्लिशमध्ये Vital sheeth असे म्हणतात. यात प्राण, अपान, समान व्यान आणि उदान यांचा समावेश होतो. या प्राणांमुळे शरीराचे नियमन होते आणि ते त्यास आधार देतात.

**३) मनोमय कोश** - प्राणमय कोशाला नियंत्रित करतो, आज्ञा देतो.

**४) विज्ञानमय कोश** - मनोमय कोशाचे नियंत्रण करतो. मनबुद्धीचे पाच प्रकारचे भेद मानले आहेत. ज्ञानेंद्रिये, कर्मेंद्रिये यांच्या द्वारा मन संवेदना स्वीकारते व कर्मेंद्रियांना सूचना देते. पाच ज्ञानेंदियांकडून भिन्न भिन्न संवेदना एकाच वेळी मिळतात.त्या सर्वांचे एकत्रीकरण करून एकच अनुभव मन घेते. पण निर्णय घेण्याचे काम बुद्धी करते आणि मनास आज्ञा करते म्हणून मन हे कारकूनासारखे घेण्या-देण्याचे काम करते. बुद्धी जबाबदार अधिकाऱ्याप्रमाणे पूर्वीच्या अनुभवावरून निर्णय घेते आणि मनाला आज्ञा देते. मन हे भावना संवेदनांचे केंद्र आहे. बुद्धी ही सर्व कल्पनांची, आदर्शांची बैठक आहे. मन हे पाहिलेल्या व ऐकलेल्या गोष्टीच जाणते. पण बुद्धीची झेप त्याच्याही पलीकडे असते. ती अज्ञाताचा शोध घेते. नवीन शोध लावते. मन हे विचारांचा अखंड प्रवाह आहे. अनेक विचार पाठोपाठ आले की मन उत्तेजित होते आणि माणसावर सत्ता गाजविते. बुद्धीकडे अनुभवांचा साठा, संग्रह आहे. ते लक्षात घेऊन नदीच्या तटाप्रमाणे ही विचारांच्या प्रवाहाचे नियंत्रण करते. मन हे उलट-सुलट, संकल्प-विकल्प करते. बुद्धी पक्का निर्णय घेते. मनच बुद्धीमध्ये परिणत होते, पण केव्हा बुद्धी मन बनते म्हणजे संभ्रमित होते.

**(५) आनंदमय कोश** - हा सूक्ष्मतम कोश आहे. हा वासनांचा बनलेला असतो. हा केवळ अज्ञानमय असतो. झोपेत आपण या कोशात असतो. तो आनंदमय म्हटला आहे. कारण स्वप्न वा जागृतीत कोठल्याही स्थितीत आपण असलो तरी गाढ झोपी जातो, तेव्हा माणूस श्रीमंत असो, गरीब असो, यशस्वी झालेला असो वा निराश झालेला असो, निरोगी असो वा रोगी, तरुण असो वा

वृद्ध असो सर्वांना शांतता आणि आनंदाचा अनुभव येतो कारण त्या वेळी मन आणि बुद्धि यांचे कार्य थांबलेले असते. या कोशाचे विज्ञानमय कोशावर नियंत्रण असते. कारण बुद्धी वासनांच्या नियंत्रणाखाली, मार्गदर्शनाखाली कार्य करते. या आनंदमय कोशालाच वासना, अविद्या, स्वस्वरूपाचे अज्ञान, कारण देह, सुषुप्ति, आत्म्याविषयी अज्ञान वगैरे म्हटले जाते. या सर्व कोशांपासून आत्मा अलिप्त असतो, या सर्वांहून तो सूक्ष्म असतो. सर्वांचा गाभा असतो. पंच आवरणे (कोश) ही कपड्याच्या थरासारखी असतात. कपडा वापरणारा त्यापासून भिन्न असतो. आत्मा हा सर्व व्यापक आहे, असे वेदान्त म्हणतो. या सर्व कोशांचा तो गाभा आहे, असे म्हटले. तेव्हा तो या सर्वांहून सूक्ष्म आहे, असा अर्थ होतो. तो सर्व कोशांहून सूक्ष्म असल्याने तोच सर्वांचे नियंत्रण करतो, पोषण करतो. जे जितके सूक्ष्म असते ते तितके अधिक व्यापक असते. उदाहरणार्थ - बर्फापेक्षा पाणी आणि पाण्यापेक्षा वाफ अधिक सूक्ष्म, अधिक व्यापक आहेत. तसेच स्थूल शरीर जास्त व्यापक होऊ शकत नाही. त्यापेक्षा सूक्ष्म शरीर अधिक व्यापक असते. वासना उर्फ आनंदमय कोश सर्व कोशांहून सूक्ष्म आणि व्यापक आहे. या कोशांना स्वतंत्र अस्तित्व नाही. फक्त आपल्याला कळावे म्हणून या प्रकारे वर्णन केले जाते. अन्नमय कोश आणि प्राणमय कोश मिळून स्थूल शरीर बनते. मनोमय कोश आणि विज्ञानमय कोश मिळून सूक्ष्म देह बनतो आणि आनंदमय कोशालाच कारण देह म्हणतात. म्हणून मानवी देह पंचकोश अथवा तीन देहांचा बनला आहे, असे म्हटले जाते.

आत्मा जेव्हा स्थूल देहाशी तादात्म्य पावतो तेव्हा त्याला जागृतावस्थेचा अभिमानी म्हटले जाते. त्या अवस्थेतून निवृत्त होऊन तो सूक्ष्म देहाशी तादात्म्य पावतो तेव्हा तो स्वप्नावस्थेचा अभिमानी समजला जातो. त्यातून निवृत्त होऊन तो कारणदेहाशी तादात्म्य पावतो, तेव्हा तो सुषुप्तिचा अभिमानी समजला जातो. आत्मा हा एखाद्या चुंबकासारखा असतो की जो लोखंड नसतो. त्याहून काहीसा वेगळा असतो आणि लोखंडास आकर्षित करतो. हालचाली करण्यास आत्माच सर्वांस प्रेरणा देतो. वीज ज्याप्रमाणे विविध उपकरणांना प्रेरणा देते त्याप्रमाणे पंचज्ञानेंद्रिय, पंचकर्मेंद्रिये, मन, बुद्धी सर्वांना प्रेरणा देणारा आत्मा त्यांच्याहून सर्वस्वी भिन्न आहे.

मनोमय कोश, विज्ञानमय कोश म्हणजे केवळ विचार असतात. म्हणजे सूक्ष्म शरीर हे केवळ विचार आहेत. सोन्याचे अलंकार म्हणजे ज्याप्रमाणे सोनेच असते किंवा मातीची भांडी म्हणजे जशी मातीच असते त्याप्रमाणेच हे समजावे. पण ह्या विचारांचेच त्यांच्या कार्यानुसार वर्गीकरण केले गेले आहे. मन, बुद्धी, अहंकार आणि चित्त हे चार मिळून आपले अंत:करण बनते आणि स्थूल शरीर दशेन्द्रियांनी बनलेले असते. मन-संकल्प विकल्पात्मक असते. बुद्धी निश्चयात्मिका असते. अहंकार 'मीपणा' आहे आणि चित् (चित्त) हे चैतन्य किंवा जाणीव आहे. याच्यामुळेच इतर सर्वांची जाणीव होते. चिदाकाश हे आत्मतत्त्व सर्वव्यापक आहे. त्याचा शरीरास व्यापून असणारा अंश म्हणजे चित् होय. खोलीतील सूर्यप्रकाशासारखे चित आहे तर बाहेर सर्वत्र पसरलेल्या सूर्यप्रकाशासारखे चिदाकाश आहे. खोलीच्या भिंती पाडल्या तर खोलीतील सूर्यप्रकाश बाहेरील सूर्यप्रकाशाशी एकरूप झाल्यासारखे वाटते. वास्तविक दोन्ही सदैव एकच असतात. त्याप्रमाणे चित् आणि चिदाकाश नेहमी एकच आहेत. विचाराच्या भिंती भक्तीयोगाने मन, ज्ञानयोगाने बुद्धी आणि कर्मयोगाने अहंकार रूपी भिंती पाडल्या की मग चित् चिदाकाशाशी एकरूप होऊन जाते.

मनुष्य हा ज्ञानस्वरूपच आहे. म्हणून बुद्धी जेव्हा एखादी वस्तू जाणण्यास असमर्थ ठरते तेव्हा मन तिच्याशी सहमत न होता त्या वस्तुविषयी वेगळ्याच कल्पना करू लागते. यावरूनच स्थाणु पुरुषाचे रूपक केले जाते. (खांब आणि भूत) ज्यावेळी माणूस खांबालाच भूत समजू लागतो. खांबाचे खरे स्वरूप न जाणल्याने त्यावर भुताचा आरोप करणे, खांबाचे ज्ञान होईल तेव्हाच भूत नाहीसे होते. त्याप्रमाणे आत्मस्वरूप न जाणण्याने म्हणजेच अविद्येमुळे बुद्धीवर आवरण पडते आणि उत्तेजित मन वेगळेच प्रक्षेपण करून त्यातून (विक्षेप) आणि अनेकत्वांनी युक्त जगाचे प्रक्षेपण करू लागते. खऱ्या आत्मवस्तूचे ज्ञान झाले की अविद्येचे पटल (आवरण) नाहीसे होते आणि अनेकत्वांनी युक्त जगाचे प्रक्षेपण होण्याचेही थांबते.

रोजच्या दैनंदिन व्यवहारातही आपल्याला अनुभव येतो की वस्तू जशी अधिकाधिक सूक्ष्म होत जाते, तसे तिचे शब्दात वर्णन करणे अशक्य होऊ लागते. उदाहरणार्थ आपण डोळ्यांनी जी वस्तू पाहतो तिचे वर्णन जसे आपण करू शकतो तसं मनातील भावभावनांचे (त्या सूक्ष्म असल्याने) करू शकत नाही आणि बौद्धिक कल्पना आदि वर्णन करणे तर कित्येकदा अशक्यच होते.

शरीर, मन, बुद्धी यांच्यायोगे अनुभवास येणारे जग म्हणजेच संसार होय. या पलीकडे ॐ म्हणजे आत्मतत्त्व आहे. प्राकृतिक वस्तूंचेच फक्त वर्णन शब्दात होऊ शकते. त्या पलीकडील अनुभवांचे वर्णन करण्यासाठी परिभाषा (सांकेतिक भाषा) च जाणीवपूर्वक वापरावी लागते. ऋषींनी यासाठी संस्कृत या समर्थ भाषेचा इतका चांगला उपयोग केला आहे की आश्चर्य वाटते.

भारतीय तत्त्वज्ञान हे ऋषींच्या अध्यात्मिक अनुभवांतून प्रकट झालेले आहे. आत्म साक्षात्कार हेच त्याचे ध्येय असल्याने त्यास 'दर्शन' 'सत्याचा साक्षात्कार' म्हणण्यात येते. भारतीय तत्त्वज्ञानाच्या अभ्यासकांनी प्रत्येकांनी आपापल्या परीने परमात्म तत्त्वाचा प्रत्यक्ष साक्षात्कार होऊ शकतो, हे मान्य केले आहे. अशा साक्षात्कारी पुरुषाची सर्व प्राकृतिक ताणतणावातून मुक्तता होऊन तो मोक्षसुख उपभोगतो या उलट ज्यास यात यश मिळत नाही तो प्राकृतिक मायाजाळात गुंतून स्वत:लाच हरवून बसतो.

वेदान्त ही भारतीयांची स्वत:ची खास वैशिष्ट्यपूर्ण आणि स्पष्ट अशी तत्त्वप्रणाली आहे. भौतिकशास्त्रांनाही समर्पक उत्तरे देण्याचे आणि धर्माच्या संबंधीच्या महत्त्वाच्या आणि सखोल आवश्यकता पूर्ण करण्याचे सामर्थ्य त्यांत आहे. तर भारतीय तत्त्वज्ञान, वेदांत हा प्रस्थानत्रयीवर तीन महान धर्मग्रंथांवर आधारीत आहे. ते ग्रंथ म्हणजे उपनिषदे, श्रीमत् भगवत् गीता आणि ब्रह्मसूत्रे होत. अगदी स्पष्टरित्या आणि अत्यंत संक्षिप्तरित्या त्यांत तत्त्वज्ञानाची मांडणी अशा खुबीने करण्यात आली आहे की केवळ भारतीयांच्या दृष्टीनेच नव्हे तर मानव जातीच्या दृष्टीने ते नेहमीच मौल्यवान आहे.

वेदांत तत्त्वज्ञानाचा अर्क आपल्याला चार वेदांतील चार महावाक्ये घोषित करून ज्ञात करून देण्यात आला आहे. ती महावाक्ये क्रमाने पुढीलप्रमाणे उत्तरोत्तर महत्त्वाची आहेत.

१) प्रज्ञानं ब्रह्म । (जाणीव हेच ब्रह्म आहे.)
२) तत् त्वम् असि । (तेच तू आहेस)
३) अयम् आत्मा ब्रह्म । (हा आत्मा हेच ब्रह्म आहे)
४) अहं ब्रह्म अस्मि । (मी ब्रह्म आहे)

पहिल्या महावाक्यात ब्रह्माची व्याख्या करण्यात आलीआहे. त्यात घोषित करण्यात आले आहे की, प्रत्येक व्यक्तीमध्ये जो चिद्अंश त्याच्या व्यक्तिमत्त्वास शक्तिशाली आणि क्रियाशील बनवतो तोच सर्व जगांत, सर्व प्राण्यांत व्यापून असणारे ब्रह्म आहे.

दुसरे वाक्य गुरूंनी शिष्यास ज्ञानोपदेश दिल्यानंतर म्हटलेले आहे. ते

महान सत्य उद्घोषित करीत आहेत की, 'अरे ते ब्रह्म तूंच आहेस' तै काही कुठे लांब नाही ते तुझ्यातच तू अनुभवू शकतोस.'

तिसरे वाक्य गुरूकडून आपण स्वत:च ब्रह्म आहे हे कळल्यावरून शिष्य एकांत जागी जाऊन, जगापासून अलिप्त राहून त्या सत्यावर मन एकाग्र करतो व ध्यानाभ्यासाने त्याला लवकरच त्याचा अनुभव येतो की 'आत्मा हेच ब्रह्म आहे आणि अत्यंत आनंदाने त्याचे डोळे चमकत असताना तो स्वत:ला त्याचा प्रत्यक्ष अनुभव आल्याचे सांगतो आणि त्या सततच्या जाणीवेतच तो आता राहील की, मीच ब्रह्म आहे. याप्रमाणे पहिली दोन महावाक्ये सत्याची व्याख्या करून सत्याचा आणि माणसाचा काय संबंध आहे हे सांगतात. तर पुढील दोन वाक्ये आपल्याला आश्वासन देतात. आपण पूर्णत्वाचा साक्षात् अनुभव करू शकतो. तत्त्वज्ञान माणूस आणि त्याचे आणि विश्वाचे खरे स्वरूप दाखवून देऊन त्यांच्या परस्परांशी असलला संबंधही स्पष्ट करते. माणूस सध्या कसा आहे आणि त्याने कसे असायला हवे ते सांगून माणूस आणि ईश्वर यांच्यामधील दुरावा नष्ट करून आनंद साम्राज्याची किल्लीच त्याच्या हातात देते.'

पण तत्त्वज्ञान हे केवळ जीवनासंबंधीचा एक दृष्टिकोन आहे. तर धर्म हा जीवनाचा प्रत्यक्ष मार्ग आहे. धर्माचरणाशिवाय तत्त्वज्ञान व्यर्थ आहे आणि तत्त्वज्ञानाशी फारकत असलेले धर्माचरण म्हणजे पण अंधश्रद्धांचे गाठोडे आहे. धर्म हा आत्मशुद्धीचे शास्त्र असून ते शेवट गाठण्याचे साधन आहे. ज्या साधनाने मनुष्यास त्याचे मूळचे स्वरूप, सामर्थ्य यश प्राप्त होते तो धर्म असे म्हणणे योग्य आहे.

धर्म म्हणजे केवळ संस्कार नव्हेत पण संस्कार महत्त्वाची भूमिका बजावतात, हेही खरे आहे. ते लवकर आत्मसाक्षात्कार होण्यास मदत करतात. आत्म्याचा परमात्म्याशी संयोग हेच खरे धर्माचे ध्येय आहे.

योग शब्द 'युज्' धातुपासून होतो, ज्याचा अर्थ जोडणे असा होतो. अहंकाराचे परम तत्त्वांत मिसळून जाणे (विरघळून जाणे) म्हणजे योग. हे साध्य होण्यासाठी जे मार्ग सांगितले आहेत त्यांनाही योगच म्हणतात. एकूण चार योग हिंदू धर्म शास्त्रात सांगितले आहेत. (१) भक्तियोग - उपासनेचा मार्ग, २) ज्ञानयोग - ज्ञानाचा मार्ग, ३) कर्म योग - कर्म मार्ग आणि हटयोग - अध्यात्म मार्ग. मार्ग वेगळे असले तरी साध्य एकच आहे. व्यक्ती व्यक्तीच्या मनोवृत्ती आणि बुद्धिमध्ये फरक असतो. म्हणून ऋषींनी वर्गीकरण केले आहे. १) भावनाप्रधान माणूस, २) बुद्धीप्रधान माणूस, ३) भावनात्मक आणि बौद्धिकदृष्ट्या सारखीच वाढ झालेला माणूस आणि ४) ज्यांची भावनात्मक आणि बौद्धिक दोन्ही पातळीवर पूर्ण वाढ झालेली नाही अशी माणसे. भावनाप्रधान व्यक्तीसाठी भक्तियोग, बुद्धिप्रधान व्यक्तीसाठी ज्ञानयोग, क्रियाशील व्यक्तीसाठी कर्मयोग आणि अविकसित व्यक्तींसाठी हटयोग उपयुक्त असल्याचे सांगितले गेले आहे. भक्तीमार्गात इष्ट देवतेच्या मूर्तीची प्रेमाने पूजा-अर्चा करताना प्रेमामुळे भक्तांचे चित्त एका इष्ट देवतेसंबंधीच विचार करून त्यात एकाग्र होते आणि आपल्या हृदयांतील भगवानच सर्वत्र आहेत, असा त्याला अनुभव येतो. बौद्धिक माणसांकडे ईश्वरविषयक प्रेम फारसे नसते. तो ज्ञानाचा दिवा घेऊन संशयात जंगलातून वाट काढील. पशुत्वापासून विष्यासक्ती असून बौद्धिक विचारांच्या योगे विरक्त होऊन तो तत्त्वज्ञान आत्मसात् आणि तीव्र ध्यानाभ्यासाच्या द्वारा आत्मसाक्षात्कार करून घेतो. काही माणसे भावना आणि बुद्धी यामध्ये चाचपडत असतात. अशी माणसेच बहुसंख्य असतात. त्यांच्यासाठी कर्ममार्ग सांगितला आहे. त्यात भावनात्मक आनंद आणि बौद्धिक ज्ञान दोन्हींचा संगम असतो. उच्च ध्येयाने प्रेरित होऊन फळाची व यशाची अपेक्षा न बाळगता अहंकाररहित होऊन सदा कार्यरत रहावे लागते. ह्यालाच कर्मयोग म्हणतात. हटयोग हा मार्ग असा आहे की ज्यात अन्नमय कोश आणि प्राणमय कोशांना अशा प्रकारचे वळण लावले जाते की आपोआप मन अंतरात एकाग्र होऊ लागते. अशा प्रकारे मन शुद्ध होते आणि इच्छा आणि विचार नियंत्रित करून निर्विचार स्थिति प्राप्त केली जाते व ध्येय साध्य होते.

चारी योगांमुळे विषयोपभोगापासून मन निवृत्त होऊ लागते. ही मनाने विषयापासून निवृत्त होण्याची स्थिति आहे, तिला उपरति म्हणतात. ही उपरति प्राप्त झाली की मनुष्य अशा चौकात पोहोचतो की जेथून सत्याच्या मंदिराकडे जाणाऱ्या मार्गावर तो येतो. मग प्रथम मन एकाग्र करणे (धारणा धरणे) आवश्यक असते. धारणेमुळे ध्यान साध्य होते आणि त्यातून पुढे समाधी सिद्ध होते. विकासाच्या मार्गावर ध्यानाभ्यास हा महत्त्वाचा टप्पा असून आत्मसाक्षात्काराच्या मार्गावरून ते प्रवेशद्वार असून शेवटी त्याद्वारे मनुष्य आपले उद्दिष्ट साध्य करून घेतो; आत्मानुभवी, ब्रह्मनिष्ठ होतो.

या प्रमाणे प. पू. श्रीगुरूदेवांनी वेदांताची आधुनिक काळास अनुसरून जी मांडणी केली आहे, त्या मांडणीच्या सुलभतेमुळे, नाविन्यामुळे आणि शास्त्रीय दृष्टिकोणामुळेच समाजातील तरुण पिढीही तत्त्वज्ञानाकडे आकृष्ट झाली, हे लक्षात घेऊनच हा दीर्घ लेख लिहिण्याचे धाडस केले आहे. सर्वांचे कल्याण होवो !

हरि: ॐ तत् सत्

**डॉ. कमलताई वैद्य**
ब्लॉक नं. ३, गव्हर्मेंट मेडिकल कॉलेज प्रोफेसर्स कार्टर्स,
मिरज ४१६४१०

# ध्यान जीवन

**श्री. वसंतराव गंधे**

*डी.जी.एम. पदावरून २००० साली फिनोलेक्स कंपनीतून निवृत्त. १९८०-८२ पत्राद्वारे वेदांत कोर्स पूर्ण केला. १९९१ साली चिन्मय मिशन अध्यक्ष. गेली १० वर्षे चिन्मय मिशन भगवद् गीता पठन स्पर्धेचे मुख्य समन्वयक. अभ्यास वर्ग व बालविहारतर्फे सेवक म्हणून काम करतात.*

प. पू. गुरूदेव उर्फ स्वा. चिन्मयानंद यांचे 'ध्यान आणि जीवन' (मूळ इंग्रजी पुस्तक मेडिटेशन ॲण्ड लाईफ) ह्या अतिशय महत्त्वपूर्ण पुस्तकाचा अभ्यास केला. ध्यानधारणा हा एक सर्वांचा जिव्हाळ्याचा असा विषय आहे. ह्या पुस्तकाच्या अभ्यासातून एक लक्षात येते की, आपण जेव्हा अध्यात्मिक दृष्टिकोणातून विचार करू लागतो, तेव्हा आश्चर्य वाटते की आपल्या ऋषींनी फार पूर्वी यावर शास्त्रीय पद्धतीने संशोधन केलेले आहे, आणि ते संशोधन साररूपाने उपनिषदांच्या रूपाने आपल्याला उपलब्ध करून ठेवले आहे. हे ज्ञानाचे प्रचंड भाण्डार ऋषींनी त्यांच्या वेळच्या पद्धतीनुसार इतरांना उपलब्ध करून दिले. तीच परंपरा गुरूदेवांनी चालू ठेवून उपनिषदांचे / भगवद् गीतेचे ज्ञान सर्वसामान्यांसाठी सोप्या, अधिक सोप्या भाषेत आपल्या आजच्या पिढीसाठी उधृत केलेले आहे, फरक एवढाच की ते त्यांनी इंग्रजी भाषेतून केले कारण ते मूळचे केरळ प्रांतातील असल्यामुळे, त्यांच्या स्थानिक भाषेशिवाय इंग्रजी भाषेतून केले. ज्ञानयज्ञाद्वारे प्रचार केला व संस्कृत भाषेतील मूळ वाङ्मय हळूहळू सामान्यांपर्यंत पोचवले. त्यांच्या ज्ञान-यज्ञांतून आणि पुस्तकांच्या रूपाने आपण थोडे समजावून घेण्याचा प्रयत्न करू या.

भोगवाद ही सध्याच्या युगाची शोकांतिका आहे. कारण सध्या पुस्तकी ज्ञान आणि आकडेवारी डोक्यात कोंबून भौतिक जग सुखाची अपेक्षा करते आहे. आजचे युवक प्रस्तूत युगात वैभवाची हाकाटी करतात. परंतु तो विषादाच्या भावनेपासून लांब पळतो आहे. (अंतर्यामी वाटत असलेल्या विषादापासून)

साधने आणि पद्धती यांचा शोध विज्ञानाने जरूर लावला आहे. जीवनातील आवश्यक गोष्टींची विपुलता ऐषोआराम इ. हे आजकाल सर्वसामान्यांच्या आवाक्यात आले आहेत. तरीसुद्धा तो दुःखी आहे व सुखाच्या मागे धावतो आहे आणि स्वानंदापासून दूर पळतो आहे. मानवाने स्वतःवरील आत्मप्रभुत्व गमाविल्यामुळे तो अयशस्वी ठरतो आहे. निसर्गावर विजय मिळविण्याच्या प्रयत्नांत स्वतःच्या अंतर्गत शक्तीकडे दुर्लक्ष करतो आहे. आपल्या स्वतःच्या आंतरिक जगतानुसार आपण आपले बाह्य जग जगतो. व्यक्तीचे व्यक्तिमत्त्व व चारित्र्य त्याला बाह्य जगतात प्राप्त होणाऱ्या अनुभवांची निश्चिती करतात आणि जर आपण आंतरिक जीवनावर स्वामित्व मिळविण्याचा अभ्यास केला नाही तर बाह्य जीवनाची रचना कितीही कार्यक्षम आणि निर्दोष केली गेली असली तरी ती त्या व्यक्तीला फक्त शोक आणि दुःखच प्राप्त करून देईल. ह्या मूलभूत कारणाची दुर्दैवाने उपेक्षा केली गेली आहे. ह्या युगाचा हा विरोधाभास हास्यास्पद आहे. एकीकडे सर्व भौतिक सुखे उपलब्ध परंतु मनुष्य प्राणी अंतर्यामी, दुःखी-निराश-असहाय्य असा झाला आहे. गुन्हेगारीची कृत्ये राष्ट्रीय पातळीवर शौर्यशाली आणि स्तुत्य ठरत आहेत. थोडक्यात भौतिक जडवाद स्वतःच केलेल्या कायद्यानुसार गुन्हेगार ठरून नाश होत मृत्यू पावत आहे.

परंतु पुरातन मानव धर्माचे विवरण केलेल्या धर्मग्रंथांकडे आपण वळतो, तेव्हा ते आपला उद्धार करण्यासाठी आजही समर्थ आहेत. या सर्व धर्मग्रंथांमधून ज्ञानाची आणि सर्व संकेतांची सूत्रे आढळतात की, ज्यामुळे व्यक्ती सत्यतत्त्वाशी मेळ घालून स्वतःवरील स्वामित्त्व आणि आंतरिक मांगल्य यांचा वारसा प्राप्त करून घेऊ शकेल.

स्वतःवर स्वामित्व असलेले निर्धारित जीवन जगण्यासाठी आपल्याला जर कोणत्या ना कोणत्या रीतीने शिक्षित करता आले तर त्या 'जीवन मार्गाला' 'धर्म' असे संबोधतात. त्या कार्यपद्धतीला चांगले जीवन म्हणतात आणि त्यात अनुसरल्या जाणाऱ्या 'जीवनमूल्यांना' 'तत्त्वज्ञान' म्हणतात.

या तत्त्वज्ञानाच्या द्वारे स्व-स्वामित्व मिळविता येते. हे आत्मप्रभुत्व मानवाला परिस्थितीच्या गुलामगिरीतून मुक्ती देते. ह्याच आत्मप्रभुत्वाच्याद्वारे तो जणू शरीराच्या पातळीच्या वर उदात्त उंचीवर जाऊन शांती, समाधान मिळवितो.

जगातील सर्व धर्मग्रंथांची पद्धत एकच असते कारण ते आपल्याला आत्मप्रभुत्वाप्रत नेणारी - आत्मोन्नतीची निरनिराळी साधने आहेत. वास्तव जीवन जगण्याचे शिक्षण देणाऱ्या सर्वश्रेष्ठ ग्रंथात विवरण केलेली आत्मप्रभुत्वाची पद्धती मानवाला 'जीवनापासून' पलायन करायला सांगत नाहीत तर ती 'जीवनाचा मार्ग' सुबुद्धपणे चोखाळण्यास सांगते. तसेच ती आपल्या आयुष्यातील सर्व आंतर / बाह्य वस्तुस्थितीचा दक्षतेने आणि हितकारक उपयोग करून घेण्यास सांगते. (धर्माचे आचरण केवळ देऊळ / देवघर, पर्णकुटी, गुहा येथे करावयाचे नसते. धर्म जर खरोखर कार्यक्षम होऊन आपल्याला स्वानंदाचे वरदान देणारा असेल तर त्याचे पालन सर्व ठिकाणी केले पाहिजे.)

आपल्या धर्मग्रंथांमधून 'ध्यानधारणेचा' मानवाच्या सर्वात श्रेष्ठ जीवनमार्ग म्हणून गौरव केला आहे ज्यायोगे मानव आपली उत्क्रांती त्वरित करू शकेल. मन-बुद्धींच्या मर्यादांच्या पलीकडे जाऊ शकेल, अशी क्षमता फक्त मानवाचे ठिकाणी आहे. ह्या मन-बुद्धीच्या बंधनावर मात केली तर तो पूर्णावस्थेच्या अधिक श्रेष्ठ क्षेत्रांत प्रवेश करू शकेल.

ध्यानधारणा म्हणजे काय हे समजल्याशिवाय आपण ध्यानधारणा कशी करू शकणार ? याच विषयावरील सांगोपांग अशी शास्त्रशुद्ध पद्धती प. पू. गुरुदेवांनी या ग्रंथाद्वारे आपणा सर्वांसाठी उघड केली आहे.

आपले मन-बुद्धी यांना त्यांच्या विचारांमध्ये भटकू न देता क्षणभरही कुणीही राहू शकणार नाही. प्रथम विचारांच्या निर्मितीवर बंधन घालून विचार कमी करणे, नंतर निर्धारपूर्वक विचारांचे प्रमाण कमी करण्याची शक्ती वाढविणे, नंतर येणाऱ्या विचारांना योग्य वळण लावण्याचे प्रभुत्व मिळविणे असे घडू लागले की आपण पूर्ण विकसीत झालो असे म्हणावयास हरकत नाही. केवळ काळजीपूर्वक जाणीवपूर्वक प्रयत्नाने मन-बुद्धी ही सुसंगठीत-विकसित करू

शकतो. ह्या मनबुद्धी उपकरणांची निकोप जोपासना करणे हीच अध्यात्मिक साधनेची सुरुवात असते. मन-बुद्धी एकमेकांना सुनियंत्रीत करीत करीत त्यांच्यामध्ये पूर्ण विकसित क्षमतामान असे व्यक्तिमत्त्व निर्माण करीत असतात, की ज्यायोगे त्याचे मन न चुकता बुद्धीच्या नियंत्रणाखाली आलेले असते. अशा प्रकारे स्वयंविकास वा आत्मपुनर्शोधन, ज्याला 'ध्यानधारणा' म्हणतात त्या पद्धतीच्या योगे साधता येते.

सौ. [illegible] गांधी
फ्लॅट नं. १६, मोती व्ह्यू, सानेवाडी, औंध, पुणे ४११००७.

---

# युगप्रणेते स्वामी चिन्मयानंदचरणी वंदना

जय भारती ! जय हिंदभू ! जय आर्य संस्कृति उत्तमा !
वेदान्त गंगामाउली दे स्तन्य धृति पुरुषोत्तमां ॥१॥

ते धन्य पराशर व्यास वाल्मिकी ऋषि-संस्कृति-उद्‌गाते
देववाणीव्रत महान मंगल अक्षय ज्ञान प्रणेते ॥२॥

आचार्य संपदा थोर सृजनक्षम स्वधर्म उत्थापनी
ज्ञानरूप उत्तुंग हिमालय शैल शैल भूषणी ॥३॥

उंच शैल त्यामध्ये धवलतम गुरुवर चिन्मय स्वामी
'ज्ञानयज्ञकर' 'युगप्रणेते' संस्कृति - पुनरुत्थानी ॥४॥

उच्चकुलस्थित, विद्याभूषित समृद्धही सर्वार्थी
ओढ परी मनी संन्यासाची अंतिम कल्याणार्थी ॥५॥

शिवानंदगुरु उत्तरकाशी, गंगोत्री सहवासी
संन्यासाची दीक्षा घेऊन झाले जगप्रवासी ॥६॥

'श्रीगणेश' जणु नवकार्यांचा सुवर्णाक्षरी पहिला -
शतदिवसांचा 'ज्ञानयज्ञ' ह्या पुण्यपत्तनी घडला - ॥७॥

''सुसंस्कारक्षम तरुण पिढीने आत्मपरीक्षक व्हावे,
सद्‌धर्माची उपासना अन् स्वाध्यायात रमावे'' ॥८॥

जगसाम्राज्ञी इंग्रजीच मग कार्यवाहिनी केली
बघता बघता देशोदेशी 'चिन्मय-केंद्रे' फुलली ॥९॥

अध्यात्माच्या साम्राज्यामधि ॐकाराची साद
उपनिषदांच्या उद्‌घोषातुन शांति-शक्ति अगाध ॥१०॥

निराकार अन् निर्गुण ऐशा चैतन्याची साक्ष
अर्जुन व्हावे आणि बघावे विश्वरूप प्रत्यक्ष ॥११॥

''घ्या 'सत्संगा' - स्वत: राबवा सेवाप्रकल्प काही
विश्वात्मक व्हा ! ज्ञानदीप व्हा !'' स्वयंशिस्त ही ग्वाही ॥१२॥

'देवी-वर्ग' जणू नारी प्रतिष्ठा !'' 'आई घडविते गृहा' -
मुले उद्याची 'राष्ट्रसंपदा !' 'बालविहारी' महा ॥१३॥

'सांदीपनी साधनालयातिल' ध्वज ॐकारांकित
धन्य गुरु अन् धन्य शिष्य ही परंपरा सांगत ॥१४॥

बोधचिन्ह हे 'हंस समईसह' सूचक आणि सुबोध
नीरक्षीरविवेकही सुंदर ! सवे आत्मबोध ! ॥१५॥

अहोरात्र जनजागरणाचे धर्मकार्य करताना -
अथक श्रमांनी प्रकृतिचीही तमा न बाळगताना - ॥१६॥

ज्ञानयज्ञ अव्याहत केला थकली ना गुरुवाणी
'सिद्धबारी'चा कणकण रमतो अजुन 'पूर्णचिंतनी' ॥१७॥

समस्त जनकल्याणी रत जे अहर्निशी करुणार्द्र
''जयतु जयतु देव - सद्‌गुरु - चिन्मयानंद !'' ॥१८॥

॥ हरि ॐ तत्सत् ॥

॥ हरि ॐ तत्सत् ॥

॥ हरि ॐ तत्सत् ॥

सौ. शैला सुहास पटवर्धन
डी-३, प्राजक्ता अपार्टमेंटस्, १/१४ कर्वेनगर,
पुणे ४११०५२. फोन : ६५२१८५३१

# ... गुरूदेव स्वामी चिन्म...

## गजानन दत्तात्रय सप्रे

*रिटायर्ड डेप्युटी सुप्रिंटेंडन्ट ऑफ पोलीस (१९८५). १९८६ पासून चिन्मय मिशनचे काम करतात.*

प. पू. गुरूदेव स्वामी चिन्मयानंद हे काय होते ? व काय आहेत. हे शब्दात सांगणं तसं तर अवघडच आहे. त्यांना जवळून पाहून अन् अनुभवूनच ते सांगता येईल. निदान त्यासाठी त्यांनी आखून दिलेला भगवत् गीतेचा व उपनिषदांचा सखोल अभ्यास करूनच त्यांना जाणता येईल. तसे जीवन प्रामाणिकपणे अनुभवणे व जगणे हाच तो मार्ग आहे. या लेखाद्वारे चिन्मयानंद स्वामींच्या काही ढोबळ आठवणी लिहून त्यांतूनच मी काही अंशी वर्णन करण्याचा अल्पसा प्रयत्न करीत आहे.

**शेवटची झेप** - मानवाचे खरे स्वरूप 'सत् चित् आनंद' हेच आहे. पूर्वीच्या ऋषीमुनींना हे पूर्णपणे अवगत होते की, बहीर्गामी वृत्तीचा त्याग करून अंतर्दृष्टी प्राप्त केल्याविना त्याला आपल्या स्वरूपाप्रत जाणे केव्हाही शक्य नाही. मनाचे 'अमन' करूनच केवल हा द्वैत पसारा संपवून भवसागर पार करता येतो. श्रीरामचंद्रांनीही लक्ष्मणाला 'श्रुत्वाथ सौमित्री वचोखिलं तदा प्राह प्रपन्नार्तिहरः प्रसन्नधीः । विज्ञानं ज्ञानतमः प्रशान्तये श्रुति प्रपन्नं क्षितीपाल भूषणः ॥' लक्ष्मणाचे सर्व म्हणणे ऐकून घेतल्यावर सर्व सम्राटांचे भूषण असे श्रीराम, जे दुःखितांचे दुःख हरण करणारे होते त्यांनी, अत्यंत उत्सुक अशा लक्ष्मणाला अज्ञानांधकार नाश करण्यास ज्ञान दिले. शिष्य जेव्हा, तेजस्विता, परिपक्वता, भक्तिभाव यांनी युक्त व परिपूर्ण होतो असे गुरूला वाटते तेव्हाच गुरू प्रसन्नतेने व उत्साहाने शिष्यावर अनुग्रह करतो. गुरू हेच अखंड, अनंत, आत्मसत्तेचे प्रतिक आहे. शिष्य जेव्हा मन, बुद्धी शुद्ध करतो, त्याचे विचार स्थिर होतात, विक्षेप संपतात तेव्हा ध्यानाने व चिंतनाने, जीवात्मा व परमात्मा यांच्यातील अंतिम सारभूत सत्य तत्त्वाचे योग्य पृथःकरण करतो व तेव्हाच ज्ञान हेच साधन व साध्य बनते.

उपनिषदांतील ज्ञान आपणास अध्यात्मिक जाणिवेच्या उच्चतम श्रेष्ठ अवस्थेप्रत नेऊन पोहोचविते. हीच सत्याचे ज्ञान मिळविण्याची जाणीवेची - मर्यादाची अमर्यादाकडे नेणारी म्हणजेच सांताची अनंताकडे जाण्याचा अनुभव घेणारी, मर्त्याची, अमृतावस्थेकडे नेणारी, ह्या मार्गातील, शेवटची झेप आहे असे गुरूदेव म्हणतात -

अनुभूति संबंधी स्वामी चिन्मयानंदांचे मार्गदर्शन हीच कसोटी आहे. केनोपनिषदांत ते म्हणतात, की वेदांत हा विरक्तीचा मार्ग आहे, म्हणजे काय ? मिठागरात राहणाऱ्या मुंगळ्याला त्याच्या साखरकारखान्यात रहाणाऱ्या मित्रमुंगळ्याप्रमाणे आनंदात राहता येत नव्हते. आमंत्रणावरून जेव्हा तो मिठागरातील मुंगळा साखर कारखान्यातील मित्राच्या आमंत्रणावरून त्याच्याकडे सहलीस गेला परंतु त्याला साखरेची गोडी माहीत नव्हती व त्याच्या तोंडात अजून मिठाचे काही कण शिल्लकच होते. त्यामुळे तो दुःखी, मलूल असा होता. जेव्हा मित्राच्या सांगण्यावरून त्याने सर्व मिठाचे कण थुंकून टाकले तेव्हा, सर्व अंगांनी गोड असलेली साखर त्याला चाखता आली. अशाच प्रकारे आपल्या सर्व भय, त्रुटी, निराशा संपवून आपल्या 'सत् चित् आनंद' स्वरूपाची अनुभूती घेऊन आनंदमय, अमर्याद, आशादायी, जीवन उपभोगा. विरक्ततेच्या धर्माची वेदांताची ही हाक आहे. ज्या स्वामी चिन्मयानंदांनी उपनिषदाद्वारा अनंत 'आत्मतत्त्वा'स सीमित शब्दांच्या जाळ्यात पकडण्याचा प्रयत्न केला होता, त्या स्वानुभूति घेऊन आयुष्य जगलेल्या त्यांच्या ईशावास्योप-निषदात ते म्हणतात - हे उपनिषद शुक्ल यजुर्वेद संहितेचे शेवटचे प्रकरण आहे व ते निश्चित व ज्ञात संहितेचा एक अखंड असा भाग असल्याने त्यास संहितोपनिषद व छंदोबद्ध असल्याने मंत्रोपनिषद असे म्हणतात. हे अत्यंत प्रसिद्ध व अप्रतिम सुंदर असे उपनिषद आहे. त्यांतील श्लोक नं १ ॐ ईशावास्यमिदं सर्व यत्किंचिच्च जगत्यां जगत् । तेन त्यक्तेन भुञ्जीशा मागृधः कस्य स्विद् धनम् ॥ असा आहे.

अर्थ - जे काही जड-चेतन जगत् आहे ते सर्व स्वतः तर ईश्वराने व्यापलेले, आच्छादिलेले आहे. त्याचा तू त्यागाने भोग घ्यावास. कोणाच्याही धनाची आकांक्षा धरू नकोस.

या मिथ्या जगत् भ्रांतिचा अंत करा. ईश्वरी दृष्टीची अनुभूति घ्या. असे हे आवाहन आहे.

मांडुक्य उपनिषद हे आकाराने लहान असले तरी वेदांत वाङ्मयात ते उच्च स्थान पटकावते. याचे कारण, त्यांत अद्वैत सिद्धांताची (शंकराचार्य) दृढ कथने आहेत. सखोल ध्यानाकरता गणल्या जाणाऱ्या ४ महावाक्यातील एक सर्वं खलु इदं ब्रह्म - हे अथर्व वेदांतील, साधनेत अनुसंधान राखण्यास उपयोगी आहे.

स्वामी चिन्मयानंदांनी भवगत् गीतेवरील १ ते १८ अध्याय संकलन करून सोप्या भाषेत पण मार्मिक चर्चा करून लिहिले आहेत. त्याचप्रमाणे कैवल्य उपनिषद, मुंडकोपनिषद, कठोपनिषद, दक्षिणामूर्ती स्तोत्र व इतर उपनिषदे व इतर ग्रंथाद्वारे या जगताच्या मागे असणाऱ्या सत्य स्वरूपाचे ज्ञान करून देऊन, त्याच्या प्राप्तीच्या मार्गाचेही दिग्दर्शन केले आहे. चिन्मयानंदांच्या बाबतीत असे म्हणता येईल, की त्यांच्या सारख्या आदर्श व मूर्तीमंत संन्याशाच्या तपश्चर्याप्रधान जीवन प्रवाहातून त्यांची विलक्षण संन्यासवृत्ती, आयुष्यात केलेले अथक प्रयत्न, भाषेवरील प्रभुत्व, मनाची श्रीमंती व सर्वांबद्दल प्रेम व सहानुभूती, त्यांची भावणारी आकर्षकता यावरून त्यांच्या विभूतीमत्त्वाची कल्पना येईल.

या दृष्टीने एका कॉलेज विद्यार्थ्याने त्यांच्याकडे पत्राद्वारे संपर्क साधून त्यांना तुमचा बायोडेटा - जीवन चरित्र द्या म्हणून विनंती केली होती. त्याला त्यांनी दिलेले उत्तर मी उद्धृत करतो. आत्मस्वरूप दोस्ता - हरि ॐ. माझा जन्म केरळातला पण वाढलो मात्र उत्तरेत. पंजाबमध्ये मी कणखर बनलो. उत्तर काशीत विनम्र झालो. सर्व बाजूंनी माझ्यावर टीकेची झोड उठवली गेली. काही ठिकाणी कौतुक झालं. पण महत्त्वाचं म्हणजे प्रत्येकानं मला मी आहे तसा स्वीकारला अन् माझ्यावर प्रेम केलं. मी म्हणजे मला स्वतःला पडलेलं एक कोडं आहे. बडबड करणं हा माझा धंदाच समज. सध्या माझा उद्योग प्रवचन देणं हाच आहे. प्रत्येक ठिकाणी मी खूप काही कमावलं पण ते सर्व समाजाला वाटून टाकलं. जे शिक्षण मला मिळाले त्यामुळे मी एक धार्मिक

माणूस आहे. अनुभवाने वेदांती आहे. सहज प्रवृत्तीनं मी भक्त आहे. स्वभावत:च मी कर्मयोगी आहे. समाजवाद माझ्या मनाला पटला आहे. माझा लोकशाहीवर विश्वास आहे.व्यवहारात मी अखंड योगी आहे. सर्वांवर प्रेम करावं या व्यावहारिक दृष्ट्या अशक्य वाटणाऱ्या सिद्धांतावर माझी पूर्ण श्रद्धा आहे. मी गेंड्याच्या कातडीचा व हाडाने चिवट आहे व हास्याचे कवच माझ्या अंगावर असल्यामुळे माझे मस्तक व हृदय दोन्ही सुखरूप रहातात. त्यामुळे निंदेचे बाण माझ्या देहाला बोचत नाहीत. भाले मला घायाळ करू शकत नाहीत. मी खातो-पितो. रोज स्नान करतो व भरपूर झोपतोही. हो मी कपडे करतो पण केसांचा भांग पाडत नाही. मी रोज १८-१९ तास काम करतो. गोरा व काळा सावळा माणूस माझ्यावर प्रेम करतो. मी अजन्मा आहे. प्रेम व ॐसह चिन्मयानंद. ईश्वरी व मानवी अशा दोन प्रकारची व्यक्तिमत्त्वे आपल्यात असतात. अपूर्णता व मरण हे मानवाचे जन्मसिद्ध हक्क आहेत. ईश्वरत्व हे स्वभावत:च अमर्याद व अमर असते. आपल्यातील मानवाशी असलेली आपली आसक्ती हेच दीनपणाचे कारण आहे. म्हणून मानवत्वापासून 'अलग' व्हा म्हणजे आपले ईश्वरत्व परत मिळवाल, हा वेदांताचा सिद्धांत आहे.

उपनिषदांचा प्रयत्न आपल्यातील 'मानव' संपला तर आपल्याला 'ईश्वरप्राप्ती' होते हे पटवून देण्याचा आहे. आपला जीवभाव संपवा व दु:खही संपवा. त्याच बंधनात टाकणाऱ्या बेड्या आहेत. हाच गुरूसंदेश आहे.

हरि: ॐ इति

गजानन दत्तात्रय सप्रे
पुष्कराज ४१६, सेक्टर, २४ प्राधिकरण, निगडी, पुणे ४४.
चिन्मय मिशन, पिंपरी-चिंचवड.

# …वांनी सांगितलेला क…

'श्री. बाळासाहेब कुलकर्णी

निवृत्त उपायुक्त, केंद्रिय सीमा शुल्क, सेवक, चिन्मय मिशन, मुलुंड.

परमपूज्य स्वामी चिन्मयानन्दजी (गुरूदेव) हे या युगातील एक थोर कर्मयोगी होते. गुरूदेवांनी श्रीमद् भगवद् गीतेचा समग्र अभ्यास केला होता आणि त्यावर प्रभुत्व मिळविले होते. जीवनात त्यांनी गीता तत्त्वज्ञानाचा अनुभव घेतला होता. जगभर त्यांनी त्याचा प्रचार व प्रसार केला. ते गीता जगले व अनेकांना त्यांनी गीता जगण्यास शिकविले. त्यांनी लिहिलेले गीतेवरील भाष्य हे आधुनिक काळातील एक उच्चतम भाष्य म्हणून गौरविले गेले. त्यांच्या लेखनास अनुभूतीची जोड आहे. म्हणून ते अनुकरणीय ठरले आहे. त्यांच्या लिखाणात त्यांची लोककल्याणाची तळमळ दिसून येते. त्यांचे भाष्य केवळ भारतीयांसाठी मर्यादित नव्हते, तर जगातील कोणत्याही धर्मातील व्यक्तिसाठी जीवनात आनंद निर्माण करणारे ते एक परिपूर्ण शास्त्र ठरले. खऱ्या अर्थाने ज्ञान-विज्ञान (तत्त्वज्ञान आणि प्रात्यक्षिक) अतिशय सुलभ रीतीने सांगितलेले आहे आणि म्हणूनच ते सर्वांना आचरण करण्यास योग्य आहे याची त्यांनी प्रचिती आणून दिली. जीवनभर त्यांनी जगभर केलेल्या प्रवासात त्यांना मिळालेल्या प्रतिसादात त्याची पावती होती. ते अनेक प्रचारक, ब्रह्मचारी व स्वामी निर्माण करू शकले आणि गीता ज्ञानाचा प्रसार करू शकले. त्यांच्या जीवन कार्याचा आढावा घेतल्यास त्यांच्या कर्मयोगी आचरणाची प्रचिती येऊ शकते. शेवटच्या श्वासापर्यंत त्यांनी आपले गीता ज्ञान प्रचाराचे कार्य अविरत चालू ठेवले, यातच त्यांची गीता निष्ठा व कर्मयोगी आचरण यांचे दर्शन घडते.

इंग्रजी साहित्यात एम.ए.ची पदवी मिळाल्यानंतर बाळकृष्ण मेनन (गुरूदेवांचे पूर्वाश्रमीचे नाव) यांनी 'नॅशनल हेराल्ड' या दैनिकात उपसंपादक म्हणून काही काळ काम केले. त्यावेळी त्यांचा बराच प्रवास झाला आणि त्यांना तत्कालीन भारतीय समाजाचे बरेचसे दर्शन झाले. समाजातील अनेक विकृतींवर त्यांनी वृत्तपत्रांद्वारा प्रकाश टाकला. अंधश्रद्धा व भोंदूगिरीवर त्यांनी लिखाणाद्वारे हल्ला चढविला. साधूंच्या आश्रमांतून काय चालले आहे, याचाही ते अभ्यास करीत होते व त्याबद्दल लेखमाला प्रसिद्ध करण्याचा त्यांचा विचार होता. ऋषिकेशच्या 'डिव्हाईन लाईफ सोसायटी'व तिचे संस्थापक स्वामी शिवानंद यांच्याबद्दल त्यांनी बरेच वाचले होते व ऐकले होते. त्यांच्याविषयी अधिक माहिती प्रत्यक्ष मिळविण्यासाठी त्यांनी ऋषिकेशला जाण्याचे ठरवले आणि एक दिवस स्वामी शिवानंदांना भेटण्यासाठी आश्रमात दाखल झाले. आश्रमात त्यांचे स्वागत झाले आणि स्वामी शिवानंदांची भेटही झाली. त्यांना एक-दोन दिवस राहून तेथील वातावरणाचा अभ्यास करावयाचा होता. स्वामी शिवानंदांनी त्यांची राहण्याची सोय केली आणि कितीही दिवस तेथे मुक्काम करण्याची मोकळीक दिली. स्वामीजींची रोज भेट आणि चर्चा, तेथील ब्रह्मचारी व साधक यांचा प्रेमळ व निःस्वार्थी दिनक्रम, स्वामीजींची निष्काम सेवा इ. गोष्टींचा बाळकृष्णाचे मनावर चांगलाच प्रभाव पडला व त्यांनी तेथील मुक्काम वाढवला. आपल्या धर्मग्रंथातील जीवन पद्धतीबद्दल त्यांना आकर्षण वाटू लागले व अभ्यास सुरू केला. स्वामी शिवानंदांनी त्यांना वेदांताची तोंडओळख करून दिली आणि काही ग्रंथ अभ्यासासाठी दिले. तेथील रोजच्या सत्संगामध्ये त्यांना काही विषय देऊन त्यावर बोलण्याचे प्रोत्साहन दिले. काही काळ वास्तव्यानंतर बाळकृष्ण मेनन यांची स्वामी शिवानंदांवरील श्रद्धा दृढ झाली आणि एक दिवस त्यांनी संन्यास घेण्याबद्दल स्वामींजवळ विचारणा केली. स्वामी शिवानंदांना माणसांची चांगलीच पारख होती. त्यांनी मेननना घरून परवानगी मिळविण्यास सांगितले आणि परवानगी प्राप्त झाल्यावर शिवानंदांनी बाळकृष्ण मेनन यांना संन्यास दीक्षा देऊन त्यांचे 'स्वामी चिन्मयानन्द सरस्वती' असे नामकरण केले. तीव्र बुद्धिमत्ता, कष्ट-साधना करण्याची चिकाटी पाहून स्वामीजींनी चिन्मयानंदांना ज्येष्ठ गुरू स्वामी तपोवन महाराज यांचेकडे पुढील सखोल वेदान्त अध्ययनासाठी उत्तरकाशी येथे पाठविले. स्वामी तपोवन महाराज वेदान्त शास्त्राचे पारंगत ब्रह्मनिष्ठ गुरू होते. त्यांनी चिन्मयानंदांचा शिष्य म्हणून स्वीकार केला आणि त्यांना प्रस्थानत्रयी - गीता, उपनिषदे, ब्रह्मसूत्रे यांमध्ये अनुग्रहीत केले. विद्याग्रहणाचा काळ अत्यंत खडतर तपश्चर्येचा होता.

विद्या संपादनानंतर गुरूंची अनुज्ञा घेऊन गुरूदेवांनी १९५१ साली भारतभ्रमण यात्रा केली. भारतीयांची अध्यात्मिक व सामाजिक स्थिती अत्यंत खालावलेली अशी त्यांनी पाहिली. आपल्या धर्मशास्त्रात थोर जीवनपद्धती दिलेली असूनही केवळ अज्ञानामुळे समाजाची ही दुर्दशा झालेली आहे आणि वेदान्त शिक्षणाची ओळख समाजाला करून देणे अत्यंत जरूरीचे आहे, असे त्यांचे मत झाले. उत्तरकाशीला परतल्यावर त्यांचे गुरू स्वामी तपोवन महाराज यांचे बरोबर चर्चा केली आणि गीता-उपनिषदे यांवर ठिकठिकाणी जाऊन मैदानातून प्रवचने करण्याचा आपला मानस सांगितला. त्यांच्या गुरूंचे मत अनुकूल नव्हते. 'हिमालयात साधना करून, स्वतःचा उद्धार करून घे, तुला श्रोते मिळविणे कठीण जाईल. कारण या विषयांबद्दल समाजात फारच थोडे लोक रस घेणारे आहेत' असे सांगून त्यांना परावृत्त करण्याचा प्रयत्न केला. गंगा मातेवर गुरूदेवांची दृढ श्रद्धा होती. तीचे सान्निध्यातच त्यांनी वेदान्ताचा अभ्यास केला होता. गंगा माता त्यांना सांगत होती, 'पुत्रा मी हिमालयातच जन्म घेतला पण थांबले नाही. धावत राहिले आणि माझ्या भोवतालचा प्रदेश सुजलाम्-सुफलाम करीत शेवटी सागराला अर्पण झाले. तूही थांबू नकोस. तुझ्या ज्ञानाचा उपयोग मानव जातीच्या उद्धारासाठी ज्ञानदानाने कर.' गंगामातेकडून गुरूदेवांनी प्रेरणा घेतली आणि त्यांनी विचार केला की, आपण धर्मग्रंथातील हे गुह्य ज्ञान, जीवन पद्धती केवळ आश्रमातील काही ऋषी-मुनी आणि विद्यापीठांतील काही तत्त्वज्ञानाचे अभ्यासक यांच्यातच सीमीत झाली आहे आणि जोपर्यंत ती सर्वांसाठी उपलब्ध होत नाही तोपर्यंत सामान्य माणसाचा उद्धार होणार नाही. आपल्या ज्ञानाचा उपयोग यासाठी होऊ शकेल व त्यासाठी गंगामातेप्रमाणे हिमालय सोडून खाली जाणे अगत्याचे आहे. गीतेच्या १८ व्या अध्यायात भगवंतांनीही हेच सांगितले आहे की, 'माझ्यावर गाढ भक्ती ठेऊन जो हे सर्वोच्च रहस्य माझ्या भक्तांना शिकवील तो निःसंशय मला येऊन मिळेल. तसेच त्याच्याहून प्रिय असा मला जगात दुसरा होणार नाही.' शेवटी गुरूंचा

आशीर्वाद घेऊन त्यांनी हिमालय सोडला आणि 'ज्ञानयज्ञ'द्वारा वेदांत शास्त्राचा प्रचार करण्याचे व्रत घेतले. गुरूदेवांच्या ज्ञानप्रसाराचा प्रारंभ पुणे येथे डिसेंबर १९५१ पासून पहिल्या ज्ञानयज्ञाने झाला. केनोपनिषदावर गुरूदेवांनी १०० दिवस प्रवचन (ज्ञानयज्ञ) केले आणि त्यांना चांगला प्रतिसाद मिळाला. दिवसेंदिवस श्रोत्यांची संख्या वाढतच राहिली. आपल्या ज्ञानयज्ञाची माहिती त्यांनी पत्राद्वारे स्वामी तपोवन महाराज व स्वामी शिवानंद यांना कळविली व त्यांचेही प्रोत्साहन देणारे आशीर्वादाचे उत्तर आले. आपला मार्ग योग्य असल्याचे समाधान त्यांना झाले. 'संन्यासी होऊन हिमालयात केवळ आत्मोद्धारासाठी ध्यानधारणा करण्यापेक्षा निःस्वार्थ बुद्धीने समाजाच्या उद्धारासाठी पूर्ण समर्पण भावाने धर्म प्रचाराचे कार्य करणे हे केव्हाही श्रेयस्कर होय', याबद्दल त्यांची श्रद्धा दृढ होती. आपल्यातील अहंकाराला पूर्णपणे तिलांजली दिल्याशिवाय ध्यानधारणा होऊ शकत नाही आणि सर्वसामान्यांना अहंकाराशिवाय जीवन जगणे शक्य होत नाही. म्हणून त्यांच्यासाठी 'कर्मयोग' हाच मार्ग आहे याची त्यांना कल्पना होती. आपण स्वतः कर्मयोगाचे आचरण केल्याशिवाय इतरांना धडे देणे योग्य नाही याची त्यांना जाणीव होती म्हणूनच त्यांचे आचरण खऱ्या कर्मयोग्याचे होते. ज्ञानयज्ञांद्वारा त्यांनी कर्मयोगाचे आचरण केले. वर्षातील ३६५ दिवस आणि रोज १६ ते १८ तास गुरूदेव आपल्या कार्यात व्यस्त असत. त्यात प्रवचने, सत्संग, पत्रव्यवहार, ग्रंथवाचन-लेखन, जनसंपर्क व नवीन प्रकल्पांची आखणी इत्यादींचा समावेश असे. साधकांशी संवाद साधताना त्यांची तळमळ, प्रेमळ, मधुर वाणी, प्रोत्साहनपर उपदेश तसेच योग्य आचरणाबद्दल नियम इ. दिसून येत. सर्वांचा सामाजिक, अध्यात्मिक विकास व्हावा, हेच त्यांच्या कर्मयोगाचे ध्येय होते. चिन्मय मिशनची स्थापना केल्यावर त्यांनी ध्येय वाक्य निश्चित केले होते - 'अधिकाधिक लोकांना अधिकाधिक काळासाठी अधिकाधिक सुख देणे' तसेच 'चिन्मय मिशन प्रतिज्ञा' तयार केली ज्यामध्ये कर्मयोग्यांसाठी उचित उपदेश आहे.

आपला देश बहुभाषिक असल्यामुळे त्यांनी विविध प्रांतातील जिज्ञासू साधकांना मातृभाषेतून वेदान्त शिक्षण देण्यासाठी विविध भाषा-माध्यमाची सांदिपनी साधनालये सुरू केली व आपापल्या प्रांतात मातृभाषेतून प्रशिक्षित ब्रह्मचारी वेदान्त प्रचार कार्यासाठी तयार केले. त्याचा योग्य परिणाम दिसून आला. आज भारतात २०० च्या वर चिन्मय मिशन केंद्रे व भारताबाहेर ५० चे वर केंद्रे कार्यरत आहेत. गुरूदेवांनी ५०० वर ज्ञानयज्ञ केले. त्यांच्या धोरणात्मक दृष्टिकोनामुळे २५० प्रचारक (स्वामी - ब्रह्मचारी) कार्यरत आहेत. हजारोंच्या संख्येने अभ्यासवर्ग, देवी वर्ग, युवा केंद्रे आणि बालविहार यांचे द्वारा लाखो साधकांना ज्ञान प्रदान होत असते. गुरूदेवांनी प्रथमच साधना शिबिरांची कल्पना प्रत्यक्षात आणली आणि आज दर महिन्याला अशी साधना शिबिरे घेतली जातात व त्यात साधकांना अध्यात्मिक वातावरणात साधना करण्याची संधी प्राप्त होते व मार्गदर्शन होते.

श्रीमद् भगवद् गीतेतील कर्मयोगाचे विवरण दुसऱ्या अध्यायातील सत्तेचाळीसाव्या श्लोकापासून सुरू होते आणि शेवटच्या अध्यायापर्यंत तोच उपदेश भगवंतांनी वेगवेगळ्या पद्धतींनी केलेला दिसून येतो. प्रथम या मूळ श्लोकाबद्दल गुरूदेवांचे विचार आपण पाहू.

*कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन ।*
*मा कर्मफलहेतुर्भूर्मा ते संङ्गोस्त्वकर्मणि ॥२.४७॥*

(कर्म करण्यापुरताच तुझा अधिकार आहे; त्याच्या फलावर कधीही नाही. कर्मफल हा तुझा हेतू असू नये (कर्माच्या फलाची इच्छा करणारा तू होऊ नकोस); कर्म न करण्याविषयी तुझी आसक्ती नसावी. कर्मयोगाची चार मूलतत्त्वे या श्लोकात दिलेली आहेत; ती अशी -

१. कर्म करणे एवढेच आपले काम आहे.

२. फळाशी आपला काहीही संबंध नाही.

३. विशिष्ट कर्माचे ठराविक फळ मिळावे असा हेतू (कर्म करीत असताना) बाळगू नये.

४. याचा अर्थ असा नव्हे की काहीही काम न करता त्याने आळशासारखे बसून रहावे.

जोपर्यंत मनुष्य जिवंत आहे त्याचेकडून कर्म घडणारच. कर्म हेच माणसाचे पारितोषिक आहे. क्षणभर देखील आपण कर्माशिवाय राहू शकत नाही. गुरूदेव म्हणतात, मनुष्य त्याच्यातील तीन स्वाभाविक गुणांच्या प्रभावामुळे विक्षेपीत होतो; आणि तो सत्त्वगुण प्रेरित, रजोगुण प्रेरित किंवा तमोगुण प्रेरित कर्मे करतो. कर्माचा अभाव हा अचेतन वस्तूंचा स्थायी भाव आहे. शरीराद्वारा स्थूल कर्म जरी घडले नाही, तरी मन-बुद्धीद्वारा सूक्ष्म कर्म (विचार) घडतच असते. मुळीच कर्म न करणे म्हणजे निसर्ग नियमांची अवज्ञा होण्यासारखे आहे. म्हणूनच गीता मनोभावे जोमाने कर्म करण्याचा उपदेश करते. केवळ इंद्रियांचे बळेच दमन करून निष्क्रीय होण्याचा प्रयत्न केल्यास मन विषयांचे चिंतन करीत असते. अशा पुरुषास गीता मिथ्याचारी (ढोंगी) म्हणते. निष्क्रियता आपणास कोठेही नेऊ शकत नाही, म्हणून इंद्रियांना मनाने संयमीत करून आसक्त न होता कर्मेंद्रियांद्वारा ताबा मिळविल्याने आपण कर्मातील बरीचशी शक्ती वाचवू शकतो. या शक्तीचा उपयोग कर्मेंद्रियांना योग्य कार्यक्षेत्राकडे वळवून केला पाहिजे परंतु हे कर्म अनासक्त होऊन केले पाहिजे. शिवाय कर्म केल्यानेच शरीराचा उदरनिर्वाह होत असतो.

जर कर्म प्रत्येकाला अनिवार्य आहे तर ते कसे करावे ? याबद्दल गुरूदेव सांगतात, की सर्व कर्मे यज्ञ भावनेने करावीत. 'यज्ञ' याचा अर्थ, सर्वांच्या कल्याणार्थ समर्पण भावाने व स्वार्थ त्यागपूर्वक अंगीकारलेले कोणतेही कर्म. अशा प्रकारचे कर्म हे अहंकाररहित असते आणि मोक्षदायी ठरते. 'यज्ञ' या संज्ञेचा कर्मकांड असा ओढून ताणून अर्थ लावणे, हे व्यर्थ - खोडसाळपणाचे आहे, असे गुरूदेव बजावतात. अशा प्रकारे यज्ञ भावनेने केलेल्या कर्मामुळे देवांना संतुष्ट करा व मग ते देव तुम्हाला संतुष्ट करतील. गुरूदेव म्हणतात, येथे देवता म्हणजे दुसरे काही नसून, दिलेल्या कार्यक्षेत्रातील ती 'संभाव्य उत्पादन क्षमता' (Productive Potential) होय. ही उत्पादनक्षमता सुप्त असते, तिचे आवाहन माणसाच्या प्रयत्नांनीच करता येईल. सामान्यपणे प्रत्येक ठिकाणी सुप्तावस्थेत असणारी ही उत्पादन क्षमता हीच यज्ञ कार्याद्वारे संतुष्ट करावयाची देवता होय आणि खरोखर हीच देवता कार्य करणाऱ्यांवर अनुग्रह करण्यासाठी प्रसन्न होऊन प्रकट होते. अशा प्रकारे एकमेकांना संतुष्ट करून माणसाला कल्याण साधता येते. हा सेवाभावाचा नियम सृष्टीतील प्रत्येक सचेतन-अचेतन वस्तूकडून सहज प्रवृत्तीनुसार पाळला जातो. फक्त मनुष्य प्राण्यालाच त्याच्या मनाप्रमाणे वागण्याचे स्वातंत्र्य दिलेले आहे. या विश्वव्यापी नियमाचे म्हणजेच 'यज्ञ भावनेचे' ज्या प्रमाणात तो उलंघन करतो त्याप्रमाणात तो दुःख भोगतो.

म्हणून कर्म हे अनिवार्य आहे व प्रत्येकाने ते यज्ञ भावनेने इंद्रियांवर व मनावर नियंत्रण ठेवून - अनासक्त होऊन निःस्वार्थ वृत्तीने करणे म्हणजेच कर्मयोगाच्या पहिल्या पायरीवर चढणे होय.

आता कर्मयोगाचा दुसरा भाग म्हणजे 'फळाशी आपला काहीही संबंध नाही'. आपण कर्म करतो म्हणजे प्रत्यक्षात कशाचीही निर्मिती करीत नाही. फक्त ईश्वरनिर्मित सृष्टीतील वस्तूंवर प्रक्रिया करीत असतो. ह्यातील कशावरही आपली मालकी असूच शकत नाही. आपली कर्मशक्तीही त्याचीच देणगी आहे.

नियमानुसार प्रत्येक कर्मातून फळाची निर्मिती होणारच, पण त्याच्याशी माझा संबंध काय ? जर फळाशी संबंध नसेल तर कर्मच का करावे ? गुरूदेव म्हणतात, फळाची अपेक्षा न धरता आयुष्यात कर्म करीत रहाणे हे सामान्य माणसाला अगदी अशक्य वाटेल. गरीबाने गरीब म्हणून रहावे व श्रीमंतांनी गरीबांवर जुलूम करीत जावे याला धर्माची पवित्र संमती आहे, असेच वाटू लागेल. परंतु तीच व्यक्ती जेव्हा त्याचा नीट अभ्यास करून जीवनाच्या खुल्या क्षेत्रात पदार्पण करून या मार्गाचे प्रत्यक्ष आचरण करण्याचा प्रयत्न करील, तेव्हा खऱ्या यशाची गुरुकिल्ली हीच आहे, असे समजून येईल. फळाची इच्छा सोडून एकाग्रतेने कर्म केल्यास त्याने घडून येणारी अंत:करणशुद्धी अध्यात्मिक जागृतीसाठी पूर्वतयारी असते.

फळ हे भविष्यात मिळणारे असते. भविष्य काळ हा आताच्या क्षणामधून आकाराला येत असतो. गुरूदेव म्हणतात, उद्याचे पीक हे आजच्या नांगरणी-पेरणीवर अवलंबून असते. परंतु पिकाच्या बाबत संभाव्य संकटांना घाबरून जर एखाद्या शेतकऱ्याने पुरेशी नांगरणी-पेरणी योग्य वेळी केलीच नाही, तर त्याच्या हाती काहीच पीक लागणार नाही हे निश्चित. आताचे क्षण विचारपूर्वक व योग्य तऱ्हेने गुंतवले म्हणजे त्यातून अधिक चांगला भविष्य काळ लाभू शकेल. भूतकाळ गतप्राण झालेला असतो. भविष्य काळ जन्माला आलेला नसतो. जर कोणी वर्तमान काळात अकुशल राहिला तर त्याला उज्ज्वल भविष्य काळाची आशाच नसेल. आणखी गुरूदेव म्हणतात, की गीतेच्या भाषेत सांगावयाचे झाल्यास जर यश हवे असेल तर फलाच्छेच्या चिंतेत व भीतीत मनाच्या शक्तीचा अपव्यय न करता प्रयत्नशील व्हा. खोलवर विचार केल्यास समजून येईल की, कर्मफळ निराळे नसतेच. वर्तमानातील कर्मच भविष्याच्या संदर्भातील कर्मफळ होते. तेव्हा भविष्याच्या चिंतेत वर्तमान वाया न दवडता ते कर्मात वापरा व यशस्वी व्हा, असा गुरूदेवांनी उलगडलेला गीतेतील भगवंतांचा संदेश आहे.

प्रश्न असा येतो की, कर्म जर फलाच्छेने प्रेरित होऊन करावे तर मग ते कसे करावे ? यावर गुरूदेव म्हणतात, सर्व काही ईश्वर निर्मित आहे व त्यालाच समर्पण भावाने वर्तमानातील कर्मात पूर्णपणे अंत:प्रेरणेने गढून जावे. यशापयशाची चिंता करण्यामुळे कर्मात संपूर्ण लक्ष केंद्रित होण्याची शक्यता दुरावते. त्यासाठीच भगवंतांचा, कर्मफलाचा ध्यास न घेण्याचा संदेश.

वासनांच्या दबावामुळे मन विक्षेपीत होते आणि त्याच्याशी तादात्म्य पावल्याने अहंकार उद्भवतो, जो कर्मफलाची चिंता निर्माण करतो. परंतु जेव्हा अहंकार व कामना यांचा त्याग करून अनासक्त होऊन कर्माकडे लक्ष पुरविले जाते तेव्हा कर्माद्वारेच वासनांचा क्षय होतो व अशा व्यक्तीला कर्तव्य उरत नाही. तो केवळ लोककल्याणार्थ कर्म करीत रहातो. अशा जीवन मुक्ताला पुनर्जन्म नसतो. अशा रीतीने वासना तृप्तीसाठी व कर्मफलाच्या आसक्तीने कर्म न करता वर्तमानात राहून अंत:प्रेरणेने निष्काम कर्म निश्चितच उच्च दर्जाचे आणि कल्याणकारक होते.

कर्मयोगाचे तिसरे अंग म्हणजे विशिष्ट कर्माचे ठराविक फळ मिळावे असा हेतू मनात ठेऊन कर्म करणे. याचा परिणाम त्या कर्माच्या एकूण गुणवत्तेवर होतो. त्या कर्माची पूर्ण जाण करून त्यात संपूर्णपणे झोकून देण्याऐवजी मनातील फळ कसे असावे याकडे लक्ष केंद्रित होऊन, कामावर दुर्लक्ष होऊन त्यात विघ्ने निर्माण होण्याची शक्यता जास्त व त्यासाठी उपाय शोधण्यात काळाचा अपव्यय. परिणामी कर्म म्हणजे एक कोडे आणि संकट वाटू लागते. दु:खदायी होते. भगवंतांनी फळासाठी कर्म करणाऱ्यांना 'कृपण' म्हटले आहे. वर्तमान काळात गढून ठराविक फळाची अपेक्षा न धरता पूर्ण सामर्थ्याने कर्म केले तर जीवनातील सर्व अपयशे संपुष्टात येतील. फळाची अपेक्षा धरल्याने नवीन वासना निर्माण होतात. अहंकार बळावतो व कर्मे बंधनकारक बनतात. शिवाय कर्मातील कौशल्य म्हणजे योग किंवा सफलता याची अनुभूती येण्याची शक्यता दुरावते व मनशक्ती ठराविक फळ शोधण्यात खर्च होते व कुशलते शिवाय कर्म सिद्ध होऊ शकत नाही. शेवट दु:खात होतो.

कर्मयोगाचा अंतिम भाग म्हणजे कर्म टाळणे किंवा कर्मपलायन होणे. गुरूदेव म्हणतात, 'कर्माचा आरंभच न केल्याने नैष्कर्म्य अवस्थेला पोहोचताच येत नाही. जेव्हा सर्व पापकर्मांचा नाश होतो, तेव्हा मानवामध्ये ज्ञानाचा उदय होतो आणि तेव्हाच स्वच्छ आरशात बघावे त्याप्रमाणे स्वत:त आत्मतत्त्वाचा प्रत्यय दिसतो आणि म्हणूनच पूर्व कर्मामुळे निर्माण झालेल्या व अस्तित्वातील संस्कारांचे निर्मूलन योग्य कर्मानेच होऊ शकते. मनाचे उथळपण अशा प्रकारे कमी झाले की, मन आत्मोन्नतीच्या मार्गाकडे झेप घेते आणि ज्ञानयोगाच्या वाटचालीने परमेश्वराप्रत पोहोचते. थोडक्यात कर्म योग हा असा मार्ग आहे की, ज्यायोगे सर्वसामान्य मलीन मन व बुद्धी ज्ञानासाठी योग्य होतात. कर्म सर्वस्वी टाकून कोणी नैष्कर्म साध्याची प्राप्ती करू शकत नाही. 'नैष्कर्म्य' ह्या शब्दाचा गैरअर्थ लावून घरातील व बाहेरील कर्तव्य कर्मे दक्षतेने न करणे म्हणजे निष्क्रियता. जर निष्क्रियतेत जगायचे असेल तर आरोग्यदायी शारीरिक अस्तित्वही शक्य होणार नाही. निष्क्रियता ही राष्ट्राचा, समाजाचा व गृहाचा नाश घडवते आणि अशा व्यक्ती जर सुस्तपणे जीवन जगत राहिली तर स्वत:च्या आळसाचा बळी होऊन शारीरिक दुर्बलता व बौद्धिक ऱ्हास भोगतील असे गुरूदेव बजावतात.'

केवळ 'कर्माच्या संन्यासाने' परिपूर्णता मिळणे शक्य नाही. जीवनातून पळून जाणे हा काही उत्क्रांतीचे सर्वश्रेष्ठ ध्येय गाठण्याचा मार्ग नव्हे. या उलट निष्काम कर्माद्वारे अंत:करण शुद्धी साधून साधक ज्ञानमार्गाची वाटचाल करून अध्यात्मिक ध्येय साध्य करू शकतो.

जनक महाराजांनी आसक्तिरहित व आत्म समर्पणाच्या भावनेने कर्म करून कर्मयोगाद्वारे सिद्धी प्राप्त केल्या आणि स्वत:च्या निष्कलंक, सेवामय व यशस्वी जीवनाद्वारे आदर्श घालून दिला. गुरूदेवांचे जीवन म्हणजे श्रेष्ठ कर्मयोग्याचे जीवन होते. त्यांच्या जीवनातून कर्मयोगाची चतु:सूत्री साकार झालेली आहे. त्यांच्या गुरूंचे मतानुसार त्यांना हिमालयात राहून संन्याशाचे जीवन व्यतीत करून एकांतात आत्मोद्धार प्राप्त करणे शक्य होते. पण त्यांनी लोककल्याणाचे ध्येय समोर ठेऊन भगवान श्रीकृष्ण आणि जनक महाराज यांचे कर्मयोगी आचरण स्वीकारले. आयुष्याच्या शेवटच्या क्षणापर्यंत त्यांनी त्या व्रताचे पालन केले. सतत कार्यरत राहून कसलीही फलासक्ती धरली नाही. समाजाला निष्क्रियतेतून जागे केले आणि समत्व व कुशलतापूर्वक कर्मयोग साध्य केला.

गुरूदेव म्हणतात, 'मनुष्य जेव्हा, हा कर्ममार्ग पूर्णपणे समजून घेऊन त्याची योग्यता जाणील तेव्हाच तो त्या मार्गाचे अनुसरण करण्यास प्रोत्साहीत होईल. परंतु या कर्ममार्गाच्या सिद्धांताकडेच जर दोषयुक्त दृष्टीने पाहिले तर तो मान्य करण्यास बुद्धी कधीही अनुकूल होणार नाही. म्हणून एखाद्या सिद्धांताकडे दोष दृष्टीने पहाणे हे बुद्धीने तो नाकारण्याची खूण आहे. एकदा एखाद्या व्यक्तीने एखादी तत्त्वप्रणाली नाकारली की ती व्यक्ती ते तत्त्वज्ञान जगण्यासाठी प्रयत्न करणे अशक्य आहे. 'कर्मयोग' हा जीवन जगण्याचा मार्ग आहे. त्याचा लाभ करून घ्यायचा असेल तर त्याचे पालन केले पाहिजे. तो जगला पाहिजे.' म्हणून गुरूदेवांनी प्रत्यक्ष कर्मयोग जगून तो जगाला शिकवला.

जय गुरुदेव हरि: ॐ

**श्री. बाळासाहेब कुलकर्णी**
६, 'श्री उमा', महात्मा फुले रोड, मुलुंड (पूर्व),
मुंबई ४०००८१.

# स्वामी चिन्मयानंदांचा भक्तियोग

**डॉ. उषा गुणे**

*डी.ए.एस.एफ. सांगली सिव्हील हॉस्पिटल १५ वर्षे मेडिकल ऑफिसर म्हणून नोकरी. कुटुंब नियोजन कार्य.*
*१९६८ पासून चिन्मय मिशन सेविका, सांगली. ७-८ वर्षे चिन्मय बाल विश्व संपादन. देवी युक्ती ग्रुप चालवितात. ज्ञानेश्वरी आवडता ग्रंथ व व्यासंग.*

वेदांताचे तत्त्वज्ञान आपल्या अस्खलीत व अमोघ वाणीने सर्वसामान्य माणसांपर्यंत पोहोचविण्याचे जीवनव्रत घेतलेले स्वामी अशीच स्वामी चिन्मयानंदांची ओळख व ख्याती आहे. उपनिषदे व गीतेचे तत्त्वज्ञान घराघरांत पोहोचविण्याकरता त्यांनी आजन्म अखंड प्रयत्न केले व त्याकरिता गीता उपनिषदांनी पुरस्कृत केलेल्या सर्व मार्गांचा उपयोग केला. श्रीमत् भगवत् गीता ज्या प्रमाणे ज्ञान, ध्यान, भक्ती आणि कर्म अशा सर्व मार्गांचा समन्वय करते त्याचप्रमाणे पू. स्वामीजींनी सर्व मार्गाचा समन्वय व पुरस्कार करून एक परिपूर्ण मानव घडविण्याकरता अथक प्रयत्न केले. त्यामुळेच त्यांनी कुठल्याही एका मार्गाला जास्त महत्त्व दिले नाही किंवा कमीही लेखले नाही. सर्वसाधारण समजूत अशी दिसते की, गीता, उपनिषदांचे तत्त्वज्ञान सांगणारे स्वामी केवळ ज्ञानयोगालाच महत्त्व देत असणारे आणि साधनेही त्याच योगाची सांगणार ! परंतु माणसाला प्राप्त झालेले शरीर, मन, बुद्धी हे तीनही घटक परमार्थसाधनेला सारख्याच योग्यतेने आवश्यक आहेत व ते सर्व उपयोगात आणूनच मनुष्याचा पारमार्थिक विकास समतोल रीतीने होतो, असे त्यांचे ठाम प्रतिपादन असे. त्यामुळे जितका ज्ञानयोग महत्वाचा तितकेच इतरही योग महत्त्वाचे व आवश्यक आहेत असे ते सतत सांगत असत. आणि गीतेनेही असाच समन्वय केला आहे ना !

***मय्येव मन आध्वत्स्व मयि बुद्धिं निवेशय ।***
***निवसिष्यसि मय्येव अत ऊर्ध्वं न संशयः ॥ गी. १२.८***

परंतु प्रत्येक माणसाची प्रकृती व प्रवृत्ती जशी असेल त्याप्रमाणे त्याला कुठलातरी एक मार्ग जास्त उत्कटतेने चोखाळावा लागतो. त्याच वेळी इतर मार्गांचेही सहाय्य त्याला घ्यावे लागते. ही मार्गक्रमणा करताना सुरुवातीलाच मार्ग खडतर एकदम चढाचा किंवा घोटाळ्याचा असला तर पांथस्थ पुढे जाण्याचा विचारच सोडून देईल. याकरिता त्याला सुगम वाटेल व आपली प्रगती थोडीतरी मोजता येईल असा मार्ग सुचविणे आवश्यक असते. सर्व संतांप्रमाणे पूज्य स्वामीजीही भक्तिमार्गाची आवश्यकता व सुगमता अतिशय आग्रहाने मान्य करतात.

प्रेमाची भावना माणसाला शिकवावी लागत नाही. कारण ती असतेच. परंतु सर्वसाधारणपणे ती संकुचित असते. तिचे क्षेत्र सीमित असते. तिला व्यापक भूमिकेवर नेण्याकरताच सर्व उपासना व तत्त्वज्ञानाची गरज असते. म्हणूनच स्वामीजी म्हणतात, भक्ती अगर श्रद्धा यांचेही खरे ज्ञान असणे आवश्यक आहे. अंधश्रद्धा अगर भोळीभाबडी, अशास्त्रीय पायांवर उभी असलेली भक्ती आपल्याला कुठेच नेऊ शकत नाही. त्यांनी स्वतः आपल्या आयुष्यात धर्मभोळेपणा, भाबडा विश्वास या भावनांना कधीच थारा दिला नाही. उपासनेच्या नावाखाली खूप कर्मकांडांचे अवडंबर अगर उत्सवाचे स्वरूप त्यांना कधीच मान्य झाले नाही. त्यामुळे चिन्मय मिशनच्या सर्व केंद्रातून भजन-पूजन अगदी भक्तियुक्त अंतःकरणाने चालत असले तरी त्याला उत्सवाचे अगर जत्रेच्या जल्लोशाचे स्वरूप त्यांनी येऊ दिले नाही.

त्यांची भक्तीची व्याख्याही अपरिचित व नाविन्यपूर्ण वाटते. स्वामीजी म्हणतात, 'खरी भक्ती अगर प्रेम म्हणजे आपुलकीने केलेले निष्काम कर्म !' आपल्या अंतःकरणात असलेले अमूर्त प्रेम मूर्त स्वरूपात आणावे लागते ते काहीतरी कृतीतून अगर प्रेमविशिष्ट कर्मातून ! शब्दाने व्यक्त करणे, आराधना करणे, सेवाकरणे, सहवासात रहाणे या सर्व प्रेम व्यक्त करण्याकरिता केलेल्या कृतीच असतात व त्या कृती आपली प्रेमभावना दुसरी व्यक्ती, गुरु, समाज व शेवटी परमेश्वरापर्यंतही पोहोचवतील अशी आपली योग्य धारणा असते. खरे तर आपल्या भावना व्यक्त करण्याकरिता आपल्याजवळ त्याखेरीज साधन तरी कुठले आहे ?

परंतु ही कृती करतानाच अज्ञानामुळे सगळा घोटाळा व्हायला लागतो. मनाचे चंचलतेमुळे बदलणारे नित्य नवे नवे रागरंग, शरीराचा कधी अति उत्साह तर कधी आळस, औदासिन्य, बुद्धिची संभ्रमित अवस्था व त्यातून निर्माण होणारे विकल्प खऱ्या प्रेमभक्तीभावनेला विद्रूप करून टाकतात ! म्हणून खरी भक्ती कशाला म्हणायचे ह्याचे आपल्याला चांगले ज्ञान असले पाहिजे. तसेच भक्तीने जे साध्य करावयाचे आहे तेही निश्चित केले पाहिजे. त्याचे स्वरूपही पूर्ण अवगत करून घेतले पाहिजे. त्यासाठी करावयाची साधना, उपासना, प्रयत्न व्यवस्थित रीतीने समजून घेतले पाहिजेत व मग त्याचे निश्चयाने आचरण झाले पाहिजे. अशा रीतीने भक्तीच्या पहिल्याच पायरीवर ज्ञान, भक्ती व कर्म यांचा समन्वय स्वामीजींनी प्रतिपादिला आहे. त्याकरिता गीतेतील वचनांचा ते आधार घेतात -

***सततं कीर्तयंतो मां यतन्तश्च दृढव्रताः ।***
***नमस्यन्तश्चमांभक्त्या नित्ययुक्त्या उपासते ।***
***ज्ञानयज्ञेन चाप्यन्ये यजन्तो मामुपासते ॥ गीता. ९.१४.१५***

भगवंताच्या अगाध प्रेमभक्तीने अंतःकरण भरून आल्याने सतत त्याची कीर्ती, गुणवर्णन करणारे, त्याला नमन करणारे, त्याच वेळी भगवंताच्या कार्यात सहभागी झालेले दृढव्रती यत्नशील भक्त माझीच प्राप्ती करून घेतात. माझे स्वरूप स्वतःला व इतर मानवांना चांगल्या तऱ्हेने समजावे म्हणून ते ज्ञानयज्ञाचाही अवलंब करून यजन करतात व माझी उपासना करतात.

***'मच्चित्ता: मद्गत प्राणा: बोधयन्त: परस्परम् ।***
***कथयंतश्चमांनित्यं तुष्यन्तिच रमन्तिच ॥' गी. १०.९***

त्यांनी अशा तऱ्हेचे सतत प्रीतीपूर्वक केलेले प्रयत्न पाहून मलाही प्रेमाचे भरते येते. त्यांना मी आपला बुद्धीयोग देऊन अगदी आपलेसे करून घेतो.

***तेषां सतत युक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम् ।***
***ददामि बुद्धियोगं तं येन मां उपयान्ति ते ॥ गी. १०.१०***

इथे स्वामीजी आपल्याला पुन्हा सावध करतात. सततं भजतां प्रीतीपूर्वकम् म्हणजे केवळ उपासनेला उपयुक्त अशी नामस्मरण पूजा-अर्चा, तीर्थयात्रा इत्यादी कर्मे नव्हे तर सर्वच कर्मे भक्तीयुक्त अंतःकरण व निष्काम भावनेने करणे आवश्यक आहे. कोणतेही कर्म करताना आपली मानसिकता काय आहे इकडे भक्ताने जागरूकतेने लक्ष दिले पाहिजे. बहुतेक वेळा इतर नित्यकर्माप्रमाणेच उपासनेचीही एक परंपरा होऊन बसते व त्यात एक यांत्रिकता

येवू लागते. त्यातील भक्तिभाव हळूहळू गायब होतो व त्याचेच एक बंधन तयार होते. हा दोष इथेच थांबत नाही, तर त्याच उपासनेतून एक अहंगंड निर्माण होतो ! आपण आपली तुलना इतरांच्या साधनेशी, उपासनेशी करू लागतो व कित्येक वेळा स्वत:चे खोटेच समाधान तरी करून घेतो किंवा कमीपणा वाटून निराश तरी होतो. हा दोष टाळण्याकरता स्वामीजी म्हणतात, 'उपासनेचेच नव्हे तर प्रत्येक कर्म हेतूरहित, आदरयुक्त भावनेने व सहजतेने केले म्हणजे त्याचा कुठलाही 'कर्मबंध' निर्माण होत नाही. 'कर्मबंध' निर्माण न होवू देता समर्पित भावनेने केलेले कर्म म्हणजेच भक्ती !

*मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्याध्यात्मचेतसा ।*
*निराशीर्निर्ममो भूत्वा युध्यस्व विगतज्वर: ॥ गी. ३.३०*

अगदी स्वत:च्या खाण्यापिण्यासारख्या सामान्य जीवनव्यवहारापासून ते भगवंताच्या प्राप्तीकरता करावयाच्या प्रयत्नांपर्यंत सर्व त्यालाच अर्पण झाल्यानंतर भक्ताचा 'मी' रहातोच कुठे ? कर्म करविता आणि अर्पण करविताही भगवंत अंत:करणांत विलसत असतो ना !

*यत् करोषि यदश्नासि यज्जुहोसि ददासि यत् ।*
*यत् तपस्यसि कौंतेय तत् कुरुष्व मदर्पणम् ॥ गी. ९.२७*

अशा वेळी भगवंताला साधे पत्र, पुष्प अर्पण करा की मोठमोठी व्यापक कार्ये अंगावर घेऊन ती सहजतेने भगवंताला वाहून टाका । खुद्द स्वामीजींनी आपल्या आयुष्यात अशी जगड्व्याळ कामे अंगावर घेवून यशस्वी रीतीने पार पाडली ती परमेश्वरावरील अपार श्रद्धेनेच ! सर्व दूर पसरलेली असंख्य चिन्मय मिशनची केंद्रे, अनेक चिन्मय विद्यालये, आश्रम, दवाखाने, हॉस्पिटल्स् ही सर्व त्यांनी केलेली उपासनाच नव्हे काय ? 'सर्वभूतहितरत' असे संत अशा कार्यातून जनार्दनाची भक्तीच करीत असतात ना ? हाच त्यांचा बुद्धियोग, हाच भक्तीयोग व हाच कर्मयोगही !

या आपल्या भक्तियोगात त्यांनी असंख्य भक्त व साधकांना सहभागी करून घेतले व त्यांना मार्गदर्शन करून उपकृत केले. त्याकरता त्यांनी कुठलाही अधिकार, योग्यता यांची चाळणी लावली नाही. जातीभेद, धर्मभेद, वर्णभेद, उच्चनीचता, श्रीमंतगरीब, स्त्रीपुरुष असे कुठलेही भेद त्यांनी आपल्या कार्याच्या आड येवू दिले नाहीत. 'स्त्रीयो वैश्यास्तथाशूद्रास्तेपियान्ति परांगतिम् ।' यावर भाष्य करताना स्वामीजी म्हणतात, 'स्त्रिया, वैश्य, शूद्र हे कुठलेही जातीवाचक अगर वर्गवाचक शब्द नाहीतच. ते दाखवितात साधकाची मानसिकता ! जो साधक मनाने हळवा, भावनाविवश, थोडासा भित्रा असेल तर तो त्याच्या या 'स्त्री' सदृश मानसिकतेमुळे अध्यात्मात खंबीरतेने, दृढतेने प्रगती करू शकणार नाही. ज्याला भगवंताकडून सततच स्वत:ची अपेक्षापूर्ती करून घ्यायची आहे असा वाणिज्य वृत्तीचा साधक 'वैश्य' होय आणि जो सुखासीन साधक सहज जाता जाता थोडकीच उपासना करून लगेच फलाची मागणी करतो तो 'शूद्र' होय ! आहे ना क्रांतीकारी आणि अपूर्व विचार ! सर्व वादविवादांवर त्यांनी एकदम पडदा तर टाकलाच पण प्रत्येक साधकालाही सावध केले की, पहा तू स्त्री आहेस की वैश्य आहेस की शूद्र आहेस ? हे सर्व कमकुवत विकल्प दूर सारून आपल्या सर्वांनाच केवळ 'ब्रह्ममध्येच आचरण करणारे' असे 'ब्राह्मण' व्हावयाचे आहे व ते ही पुण्यशील भक्त बनून !

असा 'अनन्य भक्त सतत माझेच चिंतन-मनन करत असतो. यावर विवेचन करताना स्वामीजी म्हणतात,'त्याचे पूजा कर्म' हे एक विशेष कर्म असते. "worship is a technique by which in essence the entire 'thought flow' in the worshiper is mobilised and tuned to flow towards a 'divine point' of contemplation, ever seeking a total identification with 'The Truth'

अशा तऱ्हेची अनन्य भक्ती करणाऱ्या व म्हणूनच भगवंताला अत्यंत प्रिय झालेल्या भक्ताचे हृदयंगम वर्णन खुद्द गीतेतच आपल्याला पहावयास सापडते. पूज्य स्वामीजींना गीतेचा १२ वा अध्याय खूप आवडत असे. उपासनेच्या सर्व पायऱ्या, त्या ओलांडताना येणाऱ्या अडचणी व त्यांच्यावर मात करण्याचे उपाय सांगत सांगत आपले ध्येय गाठणाऱ्या भक्ताचे वर्णन इथे भगवंत स्वमुखाने सांगत आहेत.असा ज्ञानी भक्त होणे हे स्वामीजींच्या आयुष्याचे ध्येय होते व ते त्यांनी अथक प्रयत्नांनी आपल्या ह्याच आयुष्यात प्राप्त केले ! त्यामुळे एक समाधान, शांती व निखळ आनंद त्यांच्या वागण्या-बोलण्यातून दृग्गोचर होत असे.

*संतुष्ट: सततं योगी यतात्मा दृढनिश्चय: ।*
*मय्यर्पितमनोबुद्धिर्यो मद्भक्त: स मे प्रिय: ॥ गी. १२.१४*

आपले सर्व मन बुद्धीचे सामर्थ्य पणाला लावून इतकेच नव्हे तर पुढे पुढे शरीर सामर्थ्यही पणाला लावून लोक प्रबोधनाचे कार्य शेवटपर्यंत ते करीत राहिले. ते करताना येणाऱ्या अडचणी, मानापमान, सुखदु:खे सर्वांवर त्यांनी मात केली. अगदी स्थिर मती - स्थितप्रज्ञ होवून !

*तुल्यनिंदास्तुतिमौनी संतुष्टो येनकेनचित्*
*अनिकेत: स्थिरमतिर्भक्तिमान्मे प्रियो नर: ॥ गी. १२.१९*

भगवंताचा आवडता ज्ञानीभक्त कसा असतो याचे साक्षात् दर्शन आपल्याला त्यांच्या जीवनाकडे पाहिले असता होते. त्यांच्या मार्गदर्शनाचा लाभही आपल्याला होत रहातो म्हणून आपलेही जीवन कृतज्ञतेने व धन्यतेने भरून जाते ! अशा पूज्य गुरूदेव स्वामी चिन्मयानंदांना वारंवार विनम्र प्रणाम !

**डॉ. उषाताई गुणे**
गुणे बंगला, शिवेच्छा हॉटेल मागे, मार्केटयार्ड समोर, सांगली ४१६ ४१६

# आपली क्षमता ओळखा

**सौ. स्नेहलता वि. जोशी**

*हुजुरपागा मध्ये शिक्षिका. उत्तम लेखिका. ४-५ कथा प्रसिद्ध.*

(स्वामी चिन्मयानंदांच्या 'अपनी क्षमता पहचानो' या पुस्तकावर आधारित पुस्तकातील विवेचनावरून हा लेख लिहिण्याचा प्रयत्न केला आहे.)

एकदा तत्त्वज्ञानाच्या तासाला एका प्राध्यापकांनी विद्यार्थ्यांना अचानक प्रश्न केला, 'समजा तुम्हाला परमेश्वर भेटला तर तुम्ही त्याच्याकडे काय मागाल ?' विद्यार्थी थोडे भांबावले. कोणी फर्स्ट क्लास फर्स्ट नंबर मागितला, तर कोणी खूप पैसा तर कोणी विश्वाची शांती.एक विद्यार्थी मात्र शांत बसला होता. सरांनी त्याला तोच प्रश्न विचारला, तेव्हा तो धीरगंभीरपणे म्हणाला, ''सर, देव भेटल्यावर मागायला उरतंच काय आणि कोण ? मी वेगळा शिल्लक न रहाता देवच नाही का होऊन जाणार ?'' खरंच आपल्या सर्वांना असंच निर्गुण निराकाराच्या भेटीला जायचं असतं. पण होतं काय की, एखादं भाबडं मूल दप्तर पाठीवर घेऊन शाळेला जाण्यासाठी निघतं आणि वाटेतच डोंबाऱ्याचा खेळ बघण्यात रंगून जातं. शाळेत जायला निघालो होतो हेच विसरतं. माणसाचंही अगदी असंच होतं. जीवनप्रवासात भेटणाऱ्या इतर भौतिक गोष्टीत तो इतका गुरफटतो की, त्या गोष्टी मिळवणे, आणखी मिळवणे हेच ध्येय आहे, असे त्याला वाटायला लागते. जीवन जगण्यासाठी आवश्यक साधने कोणती आणि जीवनाचे साध्य काय यात प्रचंड गल्लत होते. खूप प्रवास झाल्यावर लक्षात येतं की, अंतिम समाधान मला मिळालंच नाही. परमेश्वराच्या जवळ जाणं म्हणजे आपल्यातल्या लपलेल्या दैवी गुणांना, परमेश्वराच्या अंशाला जास्तीत जास्त वर काढणं. अशा वेळी थोर लोकांचे ग्रंथ आपल्याला दीपस्तंभाप्रमाणे मार्ग दाखवतात. 'अपनी क्षमता पहचानो' हे स्वामी चिन्मयानंदांचे पुस्तक त्यापैकीच एक आहे.

या पुस्तकात स्वामीजी आपल्याला 'स्वतःला ओळखायला' शिकवितात. माणूस ही शरीर, मन, बुद्धी, वासना, भावना, विचार या सर्वांची मिळून झालेली गुंतागुंतीची परमेश्वरी रचना आहे. नदीची गुणवत्ता ज्याप्रमाणे तिच्या पाण्याच्या निर्मळपणावर किंवा गढूळपणावर असते तशी माणसाच्या मनाची गुणवत्ता बऱ्या-वाईट विचारांवर अवलंबून असते. कारण हे विचारच पुढे कृतीत उतरतात. हा गढूळपणा दूर करण्यासाठी धर्माच्या नियमांच्या गाळणीचा उपयोग होतो. अनुशासन म्हणजे आपली आत्मशक्ती, स्वयंपूर्णता मिळविण्यासाठी एक दिशा निश्चित करून वाटचाल करणे. यात योग्य काय, अयोग्य काय याचे मार्गदर्शन धर्म करतो. धर्म पण एक गोष्ट निश्चित. धर्माचे काम माळ्यासारखे आहे. माळ्याने कितीही प्रेमाने जोपासना केली तरी फुलाला स्वतःलाच आपून फुलायचे असते.

माणसाचे व्यक्तिमत्त्व संतुलित होण्यासाठी सकारात्मक विचारांची गरज असते. माणूस स्वतःच स्वतःच्या भविष्याचा शिल्पकार होऊ शकतो. घडायचे का बिघडायचे या निवडीचे त्याला स्वातंत्र्य असते. बाहेरच्या संकटांवर आणि मनाच्या कमजोरीवर मात करायची असेल तर माणसाने स्वतःच्या क्षमता ओळखायला हव्यात. आपल्या आंतरिक शक्तींचा आपणच शोध घ्यायला हवा. हा शोध कसा घ्यावा याचे मार्गदर्शन करताना स्वामीजी म्हणतात, प्रथम आपली इतरांबरोबर तुलना करणे थांबवा. कारण प्रत्येक माणूस परमेश्वराची एकमेवाद्वितीय अशी रचना असतो. या तुलनेने नकारात्मक भावना व न्यूनगंड माणसाच्या मनाला व्यापतो. चिंतेने मन व्यापून जाते. प्रत्यक्ष परिस्थितीचे नीट आकलन झाले नाही तर अज्ञानातून अवास्तव भय वाढत जाते. माणूस स्वतःच स्वतःभोवती निराशेच्या भिंती उंच उंच उभ्या करतो. त्यांच्या सावलीत आपले व्यक्तिमत्त्व हरवून बसतो. एक लक्षात ठेवा 'इच्छा तिथे मार्ग' म्हणून तुलना स्वतःच्या पूर्वीच्या यशापयशाशी करा. दुसऱ्यांच्या नाही. सकारात्मक विचार बाळगा.

आपले मन स्थिर व बळकट होण्यासाठी वारंवार मनाची चाचणी घ्या. ज्या मूल्यांवर माझा विश्वास आहे त्यांना जपताना माझ्यात आत्मविश्वास टिकून रहातो का ? माझी हिम्मत, विवेक शाबूत राहतात का ? समोरच्या परिस्थितीला मी सहज तोंड देऊ शकतो का ? भयापासून, निराशेपासून दूर रहाण्यात किती यशस्वी होतो हे प्रश्न विचारले पाहिजेत. अर्थात आपण सर्वकाळ परिस्थितीवर मात करू शकत नाही. मोठ्या विजयासाठी तात्पुरती माघार कुठे, कशी घ्यावी हे कळावे लागते. उदा: शिवाजी महाराजांनासुद्धा राज्य टिकविण्यासाठी, मोठ्या कष्टाने जिंकलेले सत्तावीस किल्ले शत्रूला परत करावे लागले होते.

मनाच्या सामर्थ्याची ओळख होण्यासाठी व ती ओळख टिकून राहण्यासाठी प्रार्थनेसारखे सुंदर साधन नाही. नदीपार सहज नेणाऱ्या नावेसारखी प्रार्थना आपल्याला तारून नेते. प्रार्थनेतून तिमिराचा, अज्ञानाचा नाश करण्यासाठी देवाजवळ शक्ती मागा. या जीवनप्रवासात आपला मानभंग करणारी, निंदा करणारी माणसे भेटणारच. पण माझ्यावर टीका करणारा स्वतः किती थोर आहे, याचा विचार केलात तर तुम्ही क्षणभरही विचलीत होणार नाही. या बाहेरच्या शत्रूंबरोबरच स्वतःचे राग-द्वेष या आंतरिक शत्रूंनाही प्रार्थनेने जिंका. मन आकाशाइतके विशाल करा व म्हणा की, 'जेव्हा मी रडतो तेव्हा माणूस प्रकट होतो व जेव्हा मी हसतो तेव्हा भगवान प्रगट होतो ।'

**सौ. स्नेहलता वि. जोशी**
९, सुमीत, स्वानंद, रस्ता क्र. १
सहकारनगर, क्र. २, पुणे ९.
फोन : २४२२४५५४

रुपयौवनसंपन्ना विशालकुलसंभवाः ।
विद्याहीना न शोभन्ते निर्गन्धाः किंशुका इव ॥

# यानंद यांचे कठोपनिष

श्री. गजानन विष्णू जोगळेकर

*निवृत्त उपविभागीय अधिकारी पाटबंधारे विभाग, महाराष्ट्र शासन. विश्वस्त ओंकार ट्रस्ट.*

उपनिषदे म्हणजे वेदांच्या पुरविण्या. यात प्रामुख्याने तत्त्वज्ञानविषयक माहिती आढळते. वेदांच्या शेवटी म्हणून वेदांत.

वैदिक ग्रंथाचे चार विभाग असतात.

१) मंत्र विभाग, २) ब्राह्मण, ३) आरण्यके, ४) उपनिषदे.

१) मंत्र विभाग - यात निसर्गसौंदर्य, सृष्टितील असामान्य शक्ती यांचे वर्णन व स्तवने.

२) ब्राह्मण विभाग - कर्मकांड व विधिनिषेध यांचे वर्णन

३) आरण्यके - उपासनेच्या, ध्यानाच्या पद्धती

४) उपनिषदे - सृष्टीच्या उत्पत्तीचे शाश्वत कारण आणि जीवनाचे श्रेष्ठ ध्येय यांच्यासंबंधी गुरूशिष्य यांच्यातील तात्त्विक चर्चा. उपनिषद याचा अर्थ सद्गुरूकडे जाऊन आदराच्या व भक्तीच्या भावनेने 'खाली' बसून व गुरूचे विवरण लक्षपूर्वक ऐकणे. हे वाङ्मय 'परमतत्त्वाची' अनुभूती देऊन 'सत्यतत्वाच्या' आपल्या सध्याच्या अज्ञानाचा नाश करते. अभ्यासकाला 'परम श्रेष्ठ ज्ञानाच्या जवळ जाण्यास किंवा ते प्राप्त करण्यास मदत करते.'

एकूण २८० उपनिषदे असून १०८ उपनिषदांना मान्यता प्राप्त आहे. या १०८ पैकी ११ उपनिषदांवर श्री शंकराचार्य, श्रीरामानुजाचार्य, श्रीमध्वाचार्य आदींनी भाष्ये लिहिली आहेत. प्रस्तुत कठोपनिषद यापैकीच एक आहे. त्याचा अभ्यास आपण आता करणार आहोत.

स्वामी चिन्मयानंदांनी हिंदू धर्मावर होणारे अंतर्गत व बाह्य हल्ले पाहिले. आजसुद्धा या परिस्थितीत बदल नाही. बाह्य हल्ले आपण समजू शकतो कारण मूळ सनातन धर्माचे आपापसातील गैरसमजुतीमुळे झालेले हे भाग आहेत. विश्वनिर्मितीनंतर आता दिसतात, हे धर्म नव्हते. त्यामुळे एक भाग दुसऱ्यावर हल्ला करतो त्याचे कारण एकाचे झालेले अनेक भाग. उदाहरण द्यायचे झाले तर १९४७ पूर्वी आता दिसतात इतके पक्ष नव्हते. आता किती आहेत ते आपण पहातोच आहे. हिंदू धर्मातील अंतर्गत पोटभाग किंवा अंधश्रद्धा असणारे व नसणारे काही लोक सतत एकमेकांवर हल्ले करीत असतात. त्यामुळे निष्ठावान, श्रद्धावान लोकांना सतत त्रास सहन करावा लागत असतो. म्हणून अंधश्रद्धा वगैरे प्रकार जर मुळातूनच दूर केले तर हिंदू धर्माचे पुनरुज्जीवन होऊ शकेल असे स्वामींना वाटले व त्यांनी काही उपनिषदांवर प्रवचने आंग्ल भाषेत केली. आंग्ल भाषेत करण्याचा उद्देश एवढाच असावा की., जगातील सर्व भाषीक लोकांना हिंदू धर्माबद्दल आत्मियता वाटावी. चिन्मय प्रकाशनाने (मराठी विभाग) प्रवचनांचा अनुवाद मराठी भाषेत केला. सर्वसामान्य भक्तांना ही प्रवचने सहज प्राप्त व्हावीत म्हणून याचा सर्व खर्च कार्यकारी समितीने व्यक्तिशः केला आहे.

'मी' म्हणजे देह नसून आत्मा आहे ही जाणीव म्हणजे 'ज्ञान', व देह म्हणजे मी हे अज्ञान. या अज्ञानामुळे सदैव दुःख भोगावे लागते, याचा उहापोह अतिशय सुबोधपणे यात केला आहे.

सुरुवातीला शांतीपाठ आहे. ज्ञान म्हणजे काय याचा आपण दोघे (म्हणजे श्रोता आणि वक्ता किंवा सत्‌शिष्य व सद्गुरू) शोध घेण्याचा प्रयत्न करू या असे यात म्हटले आहे.

नचिकेता फक्त नऊ वर्षांचा पण त्याच्या बुद्धीची झेप खूपच होती. त्याचे वाडवडील दानशूर होते. आपणाजवळ जे जे आहे ते ते दान करावे अशी भावना असणारे होते. नचिकेताचे वडील परंपरेनुसार विश्वजित यज्ञ करीत होते व त्यानिमित्ताने दान करीत होते. पण या दानात आसक्ति व स्वामीत्वाची भ्रामक जाणीव होती. त्यांनी शास्त्रोदेश व भावना यांची तडजोड केली. वांझ गाईंचे दान ते करीत होते. अशा गाईंचे दान केले तर पुण्य सोडाच पण आनंदहीन अशा लोकी जावे लागेल हे एवढ्याशा नचिकेताने आपल्या वडिलांच्या लक्षात आणून दिले. (दान करताना वस्तूंचा उपयोग होईल असे पहावे. सध्याच्या युगात आपण पहातो की, काही अपवाद वगळता अतिशय जीर्ण कपडे, निकृष्ट धान्य, निरूपयोगी पदार्थ दान दिले जातात. पुजेसाठी लहान सुपाऱ्या वापरतात इत्यादी इत्यादी) व म्हणाला, 'तात आपण मला कोणाला देणार ?' (कोणत्याही पित्याला पुत्राचे दान देण्याचा अधिकार नसतो. पण विश्वजीत यज्ञानंतर स्वतःजवळचे सर्व दान करावे लागते.) प्रथम पित्याने दुर्लक्ष केले. पण नचिकेताने पुनःपुन्हा विचारणा केल्यामुळे पित्याने चिडून उत्तर दिले. 'मी यमाला म्हणजे मृत्यू देवतेला तुझे दान देणार आहे.' या ठिकाणी स्वामीजींनी अवघ्या ९ वर्षांच्या मुलाच्या मनःस्थितीचे वर्णन छान केले आहे. आजच्या किंवा कोणत्याही वेळेच्या काळात अशा मुलाची स्थिती काय झाली असती हे सर्वांना ठाऊक आहेच. स्वामीजी म्हणतात, 'एखाद्या अस्सल परिपक्व बुद्धिमान माणसासारखा तो चिंतन आणि विवेक करू लागला. (आजच्या पिढीतील एखादा मुलगा घाबरून रडू लागला असता किंवा पित्याशी उद्धटपणे वागला असता.) कारण तो जसा पित्याचा पुत्र होता तसा सद्गुरूचा सत्‌शिष्य होता. त्याला वाटले की, माझ्या गुरूने म्हणजे पित्याने मला मृत्यूदेवतेकडे पाठवून कोणते महान कार्य करावयाचे ठरविले आहे.' स्वामीजी पुढे म्हणतात हा शिष्योत्तम सद्गुरूवर न रागावता, सद्गुरूच माझ्या देहामार्फत कोणते तरी महत् कार्य घडविणार आहेत असे समजून सद्गुरूचे शब्द व्यर्थ न घालविता त्यांची आज्ञा पाळून मृत्यूदेवतेकडे गेला. तो सतत असा विचार करीत होता की, भविष्यात असे कोणते कार्य माझ्या सद्गुरूला घडवून आणावयाचे आहे ? इतका तो अधिर झाला होता. मूळ मंत्र १-१-५ पाहिला तर त्याचा शब्दशः अर्थ असा की, 'नचिकेताने विचार केला की, मी अनेक शिष्यांत पुढे असणाऱ्यांपैकी एक आहे. मग अशा रीतीने यमराजाला दिलेल्या माझ्याकडून त्याचा कोणता कार्यभाग होणार आहे ?' यावरून स्वामीजींनी उपनिषदांचा किती सखोल अभ्यास केला होता, हे दिसून येते.

व्यवहारात कसे वागावे, वागताना कोणते धोरण असले पाहिजे याचे

दिग्दर्शन पुढच्याच (१-१-६) मंत्रांत पहायला मिळते. एखादा प्रसंग उभा ठाकला तर त्यास पूर्वजांनी कसे तोंड दिले किंवा चालू काळातील लोक कसे वागतात ते पहा. मर्त्य मानव शेतातील धान्याप्रमाणे नाश पावतो व धान्याप्रमाणेच पुन्हा जन्म घेतो. यावरील भाष्यांत स्वामी म्हणतात, 'जन्म कुठल्या कुळात व्हायचा ते प्रत्येकाच्या प्रारब्धावर अवलंबून आहे. अनेक पूर्व जन्मांतील जी कर्मे किंवा कर्मांची फळे भोगण्याजोगी झाली आहेत त्याला अनुसरूनच जन्म योग्य त्या कुळात होतो. कुणी उच्च कुळात तर कुणी महारोग्यांच्या कुळात जन्म पावतो. आपले जीवन म्हणजे आपल्या प्रारब्धाचा परिपाक, येणारा भविष्यकाळ यांचा दुवा आहे. (इतकेच नव्हे तर यापूर्वीचे व पुढे होणारे जन्म याच प्रक्रियेमुळे होतात.) आत्म्याच्या शाश्वत अस्तित्वातील एक घटना म्हणजे हा जन्म. अनेक पिढ्या जन्माला येत असतात. त्यांची त्यांची फळे भोगून नष्ट होतात व पुढच्या पिढ्यांना जागा करून देतात. जीवन क्षणभंगुर आहे, हे एकदा लक्षात आल्यानंतर पित्याने नेहमी उच्च पातळीवरील जीवन न जगता एवढ्या खालच्या पातळीवर का यावे असे नचिकेताला वाटले. (पिढ्यांना धान्याची उपमा दिली आहे कारण धान्यापासून पीक कालांतराने पक्व दशेला आले की, मरून जाते व बीजरूपाने नवीन पिकाला जागा करून देते.) या मंत्रावरील भाष्यांत स्वामीजी पुढे म्हणतात व्यवहारात जे प्रसंग उभे ठाकतात ही चालू परिस्थिती पूर्वीच्या पिढ्यांचे वेळी नव्हती. उदाहरणार्थ ट्राम बस आगगाडी यापूर्वी नव्हत्या. म्हणून पूर्वज कसे वागले त्याचबरोबर चालू युगातील आपले ज्येष्ठ लोक कसे वागले याचाही अभ्यास करावा.'

जन्माला आलेल्या पिढ्या मृत्यू पावल्या किंवा चालू पिढ्या मृत्यूकडे धाव घेतात अशा दोन्ही प्रकारच्या आयुष्यांचा अभ्यास आपण करावा असे स्वामीजी म्हणतात.

मृत्यू ही काही गूढ किंवा अप्रिय घटना न मानता ती एक सहज घडणारी घटना आहे, असे मानावे. आपण जन्माला आलो म्हणजे काय ? आपले जीवन कसे घालवावे व मृत्यूकडे शांत चित्ताने कसे सामोरे जावे यावर स्वामीजींनी सुंदर भाष्य केले आहे.

श्रवण, मनन व चिंतन यावर स्वामी म्हणतात. भगवत गीता हा अर्जुन व भगवान श्रीकृष्ण यांचा संवाद आहे. त्याचा उद्देश आमच्यासारख्या सामान्य लोकांनी बोध घ्यावा असा आहे. त्याचप्रमाणे हे उपनिषद नचिकेता व यमदेव यांचा संवाद आहे. पण यात फरक असा की, अर्जुन मोहात पडला आहे व भगवंत त्याला त्यातून बाहेर काढतात. या उलट यमदेवांनी नचिकेताला अनेक आमिषे दाखवून मोहात पाडावयाचा प्रयत्न केला आहे. पण ज्ञानी नचिकेत प्रत्येक आमिषाला सडेतोड उत्तर देत आहे. अखेर यमदेवांनी त्याला आत्मज्ञान दिले. नचिकेताने ते श्रवण केले. श्रद्धा असल्यामुळे मनन व चिंतन केले आणि स्वतःचा उद्धार करून घेतला.

ज्ञानेश्वर माऊली किंवा एकनाथ महाराज यांच्या काळात आत्मज्ञान करून घेणे म्हणजे उच्च कुळातील लोकांचा मक्ता मानला जायचा. पण स्वामीजींनी असे दाखवून दिले आहे की, प्राचीन काळी उच्च कुळाबरोबर इतरांनीही आत्मज्ञानाचे अध्ययन केले आहे म्हणून स्वामींनी सर्व जगाला मान्य असणारी किंवा सर्व जगाला सहज कळणारी अशी आंग्ल भाषाच उपनिषदांवरील प्रवचनांत वापरली. त्यामुळे आत्मज्ञान सर्वांसाठी खुले होऊ शकले. ते म्हणतात, हे ज्ञान गुपीत ठेवू नका. प्रवचनाद्वारा खुले करा. स्वामीजींना असा अनुभव आला की, त्यांची प्रवचने ऐकायला सर्व लोक येतात असे नाही. यावर ते म्हणतात, प्रवचनाला जावे अशी इच्छा ज्याच्या-त्याच्या सुकृतावर अवलंबून आहे. बळजबरीने काही लोक आले तरी त्यांचे चित्त प्रपंचावर असल्यामुळे प्रवचने एकाग्र चित्त देऊन ते ऐकू शकत नाहीत. केवळ मीसुद्धा प्रवचन ऐकायला येतो असा (इतर लोकांना बरे वाटावे म्हणून) देखावा करतात.

आत्मज्ञान करून घेण्यासाठी असामान्य बुद्धी व बौद्धिक सूक्ष्मता लागते. नचिकेताकडे ही पात्रता होती हे मृत्युदेवाने जाणले होते म्हणून नचिकेताला आत्मज्ञान दिले. अशी पात्रता आपल्यापाशी असणे ही मोठ्या भाग्याची गोष्ट आहे पण ही पात्रता नसणाऱ्यांसाठी कर्म, उपासना व सद्‌गुरूंचे उचित मार्गदर्शन आहे. या मार्गाने साधक आपला दर्जा उंचावू शकतो. (समर्थ रामदासांनी दासबोधात मुमुक्षू - सिद्ध दशेपर्यंत जाऊ शकतो हेच सांगितले आहे.) स्वामीजी पुढे म्हणतात, मानवामध्ये सूक्ष्म देवत्व असतेच पण ते विकसित करणे आवश्यक असते. आत्मशुद्धीच्या आणि विकसनाच्या शास्त्रीय प्रक्रियेद्वारा सूक्ष्म देवत्वाची नैतिक पातळी आणि व्याप्ती, शक्ती आणि सामर्थ्य, विद्वत्ता आणि परिपूर्णत्व यामुळे विकसित होऊ शकते.

मृत्युदेव व नचिकेत हे सद्‌गुरू व सत्‌शिष्य होते. म्हणून सत्‌शिष्याला सद्‌गुरूकडून परम संतोषाने ज्ञान प्राप्त झाले. स्वामीजी म्हणतात, हल्लीच्या काळात सद्‌गुरू व सत्‌शिष्य फारच थोडे आहेत पण बहुतेक वेळा असे दिसते की, पगाराकडे पाहून शिक्षक शिकवतात, विद्यार्थीसुद्धा शिक्षकांना पगारी नोकर मानतात. त्यामुळे त्यांच्यात सद्‌गुरू व सत्‌शिष्य हे नाते दृष्टीस पडत नाही.

आत्म्यासंबंधी सूक्ष्म व स्थूल हे शब्द प्रचारात येतात. स्वामी म्हणतात, शुद्ध चैतन्यतत्त्व हे शाश्वत तत्त्व, सर्वव्यापी सारतत्त्व आहे आणि कल्पना करता येईल इतक्या सूक्ष्म अवकाशातही हेच महान तत्त्व व्यापून असते. १-२-२० या मंत्रांत म्हटले आहे की, सूक्ष्मापेक्षा सूक्ष्म व मोठ्यापेक्षाही अधिक मोठा असणारा आत्मा हृदयात असतो. तो जाणणारा इच्छा आणि कामना यांपासून मुक्त असतो. याचा अर्थ असा की, विषय वस्तुविषयी वाटणारी कामना साधकाची शक्ती बाधा घालवते व त्यामुळे ती व्यक्ती आत्मज्ञान प्राप्तीसाठी अपात्र होते म्हणून कामनांचा त्याग म्हणजे सहजमुक्ती होय. आत्मज्ञानाची प्राप्ती होत नाही म्हणून साधकाला चिंता वाटते म्हणजे हीसुद्धा कामनाच. साधकाने साधना करताना ही कामना सोडावी असे स्वामीजी म्हणतात. ते पुढे म्हणतात, आत्मज्ञानाची प्राप्ती होणे ही परमेश्वराची इच्छा मानावी. साधकाने साधना करताना विशिष्ट हेतु न धरावा. परमेश्वर साधना करवून घेत आहे. आत्मज्ञान प्राप्त होईल किंवा नाही हे तोच ठरविल अशी ठाम श्रद्धा, साधना करताना ठेवावी.

आत्मज्ञान होते म्हणजे काय याबाबत स्वामी म्हणतात, मन आणि ज्ञानेंद्रिये यावर ताबा जर मिळविला तर मन आणि ज्ञानेंद्रिये अंतर्मुख होतील. आत्मा म्हणजे शरीर, मन व बुद्धी नाही, ही भावना उत्पन्न होईल. दुःख व वेदना या शरीर व मनाच्या असल्याने साधकाला जाणवत नाहीत. स्वामी म्हणतात, परमेश्वराने आपल्या इंद्रियांना शापित केले आहे म्हणून ती सदैव बहिर्मुख असतात. ध्यानामुळे साधकाची मन, बुद्धी एकाग्र होतात व इंद्रियांची कर्मे थांबतात व इंद्रिये अंतर्मुख होतात.

ज्ञानी आणि अज्ञानी यांतील फरक सांगताना स्वामी म्हणतात, अनित्य व अमृततत्त्व जाणणारे ज्ञानी असतात. त्यांची इंद्रिये सदैव अंतर्मुख असतात. त्यामुळे नाशवंत गोष्टींचा त्यांचेवर परिणाम होत नाही. या उलट बहिर्मुख इंद्रिये असणारा अज्ञानी नाशवंत गोष्टींचा त्याचेवर परिणाम होतो व त्यामुळे कर्म, कामना, भोग, संचित, प्रारब्ध व क्रियमाण यांची साखळी उत्पन्न होते. साहजिकच ते जन्म-मृत्यू या साखळीत अडकतात पण ज्ञानी मात्र मुक्त झालेले असतात या देहाचा

शेवटचा श्वास झाला की, त्यांचा देह पडतो व ते या साखळीत अडकत नाहीत.

कठोपनिषदामध्ये सहा अध्याय व एकूण ११९ मंत्र आहेत. (कठोपनिषद स्वामी चिन्मयानंद ६ प्रकरणे, एकूण ११९ मंत्र) या सर्वांवर स्वामीजींनी सखोल विवेचन केले आहे. त्यातील फारच थोड्या मुद्यावर विचार केला आहे. विस्तार भयामुळे उर्वरित मुद्यावरील विचार मांडलेले नाहीत.

कठोपनिषदावर अनेक विद्वानांनी भाष्य केले आहे. आद्य श्रीमत् शंकराचार्यांनी केलेले भाष्य स्वामीजींनी डोळ्यांपुढे ठेवून प्रवचने केली आहेत.

प्रस्तुत विशेषांकामध्ये फक्त स्वामीजींचेच विचार लक्षात घ्यावेत ही अपेक्षा आहे म्हणून त्यांच्याच प्रवचनांतील थोड्या मुद्यावर विवेचन केले आहे.

अखेरीस स्वामीजी म्हणतात, मानव प्राण्यांतील सर्व शारीरिक, मानसिक आणि बौद्धिक क्रियांचा जो नियामक आणि 'संचालक' ते शुद्ध चैतन्य होय. आत्मतत्त्व 'आत्मा' आपण तो शुद्ध आणि अमर्त्य आहे, असे समजावे. भगवान यमराजांनी सांगितलेली संपूर्ण ब्रह्मविद्या आणि योगविधी प्राप्त करून नचिकेता धर्माधर्म शून्य (विराज) आणि मृत्यूहीन होऊन ब्रह्मभावास प्राप्त झाला. आपणही तसेच होऊ शकू.

*ॐ सहनाववतु । सह नौ भुनक्तु । सह वीर्यं करवावहै*
*तेजस्विनावधीतमस्तु । मा विद्विषावहै ।*
*ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः !!!*
*हरि ॐ तत् सत्*

ग. वि. जोगळेकर
'श्रीपाद' २१/११ प्रेमनगर सहकारी गृहरचना संस्था मर्यादित,
पुणे ४११०३७. फोन : २४२१०६०४

# युवा व राष्ट्रीयत्वाची जाणीव

स्वामी चिन्मयानंद

आपले पिता कोण, आपली माता कोण हे माहीत नसलेला, आजतागायत अनाथाश्रमात वाढलेला एक अनाथ, तेथून बाहेर पडतो. त्याला आधार देणारे कुणीच नसते, आपले म्हणावे असे कुणी नसते. त्याने ज्याच्यावर प्रेम करावे किंवा त्याच्यावर ज्याने प्रेम करावे, असेही कुणी नसते. अशी व्यक्ती स्वत:चे पोट भरण्याकरिता सरळ अथवा वाम मार्गाने, कसेही पैसे मिळवायचे प्रयत्न करील. स्वाभिमानाचा अभाव असल्यामुळे आपल्या ध्येयपूर्तीकरता तो आवश्यकता भासल्यास लूटमार करील, जाळपोळ करील, एखाद्याला गोळ्या घालून मारेलसुद्धा !

तेच ज्या व्यक्तीला आपले माता-पिता माहीत आहेत, कौटुंबिक वातावरणात ज्याची वाढ झाली आहे, आपल्या कुटुंबाची परंपरा ज्याला ज्ञात आहे, अशी व्यक्ती स्वत:ची उपासमार होत असतानासुद्धा लुटण्याचा, फसविण्याचा, लुबाडण्याचा वा चोरीचा विचार करणार नाही. किंबहुना, सुखसोयीचे जीवन जगण्याकरिता काही विधायक मार्ग निवडेल. गरजा तातडीने भागविण्याचा दबाव असल्यामुळे कदाचित ती व्यक्ती थोडी तडजोड करील. परंतु त्याचीसुद्धा एक लक्ष्मणरेषा असेल. कारण माझ्या पित्याविषयी मला आदर आहे, मी अमुक-अमुक कुटुंबाचा घटक आहे - या प्रकारची मर्यादा आपोआपच त्या व्यक्तीच्या वर्तमानात येईल.

ज्या संस्थेचे अथवा संघाचे आपण घटक आहोत उदाहरणार्थ वर्ण, जात, धर्म, राष्ट्र वा समाज त्याविषयी आपल्याला किती आदर आहे यावर आपल्या वर्तनाचा दर्जा अवलंबून आहे. माझे जन्मदाते कोण व त्यांचे कर्तृत्व काय हे मला माहीत असायला हवे. ते माझ्या आदरभावनेस पात्र आहेत का ? त्यांनी माझ्याकरिता काही त्याग केला आहे का ? जर मला ते माहीत नसेल तर मी एक अनौरस संतान आहे, मी अनाथ आहे. पिता माहीत नाही, मातेविषयी आदर नाही अशा व्यक्तीला या जगात एकाकी वाटते. आपले वर्तन योग्य की अयोग्य हे पडताळून पाहायला नैतिक मूल्यांचा आधारच नसतो.

आज हे खरं आहे की नाही, की जेव्हा आपण आपली कोणतीही समस्या सोडविण्याचा प्रयत्न करतो, तेव्हा नैतिकतेचा मुद्दा उपस्थितच केला जात नाही. पंजाबी माणसाला पंजाब मिळायलाच हवा, त्याला तशी मागणी करण्याचा अधिकार आहे. परंतु एखादा समाजकंटक काय करतो पहा - सामान्य जनतेच्या सार्वजनिक वाहनांमध्ये स्फोटके ठेवतो आणि तेसुद्धा दिल्ली शहरात, खुद्द राजधानीत. कोण मरतंय् याची त्याला पर्वाच नाही. आपल्या विकृत मेंदूला हाच उपाय सापडतो का ? याचे कारण असे की, आमच्या मनात आपुलकीची भावनाच नाही. शिखांना वाटतं की, हिंदू निरुपयोगी आहेत. हिंदू कोण आहेत ? यांचेच तर माता-पिता. शिखांचा पंथ ढगातून अवतरला नाही. हिंदू मातांचीच तर ती संतान आहे. एका हिंदू मातेने हिंदुत्वाच्या रक्षणार्थ आणि या थोर चळवळीकरता आपला पुत्र समर्पित केला - विचार करा...

श्री. कामतांनी सांगितल्याप्रमाणे ही विघटनात्मक शक्ती संपूर्ण देशात कार्यरत आहे. फक्त शीख जबाबदार आहेत हे म्हणणे असमंजसपणाचे ठरेल. **राष्ट्र कोसळण्यापूर्वीची पहिली अवस्था म्हणजे विघटन.** एखाद्या इमारतीतून जसे धुराचे लोळ दिसणे म्हणजेच त्या इमारतीला आगीने गिळंकृत करायला सुरुवात केली आहे - तशीच ही नाशाची सुरुवात आहे. मी काही भाकित करीत नाही, भविष्य वर्तवित नाही. इतिहास मला असे शिकवितो. मोगल साम्राज्य असो किंवा अन्य कोणतेही साम्राज्य असो - जेव्हा त्यांची स्थापना झाली, तेव्हा ते सर्व एकत्रित होते, एकसंध होते, एकात्म होते. सत्तेचा काही काळ उपभोग घेतल्यानंतर साम्राज्याचे तुकडे पडायला लागले - त्या राजघराण्याच्या अंताची हीच तर नांदी !

अनेक जण इतिहास हा विषय त्याकरिताच निवडतात. त्यात उत्तीर्ण होणे फार सोपे असते. कोणत्याही साम्राज्याचा विस्तार होण्याची, प्रगती होण्याची कारणे आणि अवनतीची कारणे यासारखी असतात. चंगळवाद फोफावला, सत्ताधारी ऐहिक सुखात गुरफटले, स्वयंकेंद्रित बनले, स्वार्थी झाले आणि म्हणून जी शेजार राष्ट्रे तुलनेने एकात्म होती त्यांनी या राज्यांवर कब्जा केला. ग्रीस असो, रोम असो किंवा इजिप्त असो - जगात सर्वत्र हीच पद्धत दिसून येते.

तरीही माझ्या युवामित्रांना भोवतालच्या परिस्थितीचे भान नसल्याबद्दल अथवा राष्ट्रप्रेम नसल्याबद्दल मी दोषी धरू शकत नाही. स्वातंत्र्योत्तर काळानंतरही जे निकृष्ट प्रकारचे शिक्षण आपण त्यांना दिले आहे, त्याची ही फळे आहेत. शिक्षण सुधारण्याचे प्रयत्नही भ्रष्टच होते. आपल्या संस्कृतीचा, आपल्या देशातील मुलांची नाळ आपल्या संस्कृतीशी जोडण्याचा, 'भारत' या शब्दातच प्रेरणा निर्माण करण्याचा साधा विचारही आपल्या राज्यकर्त्यांनी कधीच केला नाही.

शतकानुशतके आपल्या देशाला हिणवून आपण अशा स्थितीला पोहोचलो आहोत की आपल्याला देशाबद्दल आदरही नाही, आपुलकीही नाही. आम्हाला एकच गोष्ट माहीत आहे की, लोकसंख्या वाढत आहे आणि सर्व राजकारणी सांगत आहेत की लोकसंख्येवर नियंत्रण ठेवा. चीनने आपल्यावर आक्रमण करायचे ठरविले तर काय होईल, याचा त्यांनी कधी विचार केला आहे का ? किमान माणशी माणूस उभा राहण्याइतपत तर आपली संख्या असायला हवी. राजकीय निकड काय आहे, याबद्दल मी बोलतोय्. लोकसंख्येवर अंकुश ठेवून भागणार नाही. आपण सर्वांना पोसू शकत नाही काय ? भरपूर जमीन आपल्यापाशी आहे. खेडी ओस पडली आहेत. म्हातारे जमीन कसतायत आणि शिकलेले शहरांकडे धाव घेत आहेत. अस्तन्या सावरून शारीरिक श्रम त्यांना करावयाचे नाहीत. त्यांना फक्त एक नोकरी हवी, वातानुकूलित खोलीतील, ऐषारामाची नोकरी. म्हणून तर सर्वजण वेड्यासारखे संगणकाचे प्रशिक्षण घेत आहेत. सर्वजण जर वातानुकूलित खोल्यांमध्ये बसले तर राष्ट्राचे

काय होईल ? राष्ट्राकरिता घाम कुणी गाळायचा ? त्यागाशिवाय निर्मिती होऊ शकेल काय ?

घामातून, श्रमातून संपत्ती निर्माण होते. राष्ट्राचे श्रेष्ठत्व त्यागातून निर्माण होते - हा खरा समाजवाद. निष्क्रियतेला प्रशंसनीय मानणे म्हणजे समाजवाद नव्हे. लोकसंख्येची वाढ हे आपल्या सद्य:स्थितीला जबाबदार नसून आपल्या उत्पादनशीलतेतील घट हे त्याचे कारण आहे. एखादा पाश्चिमात्य इसम भारतात येतो, सर्व गोष्टींचा अभ्यास करतो आणि परत जाऊन म्हणतो - परमेश्वर नक्की आहे. कारण भारत अशा परिस्थितीत अजूनही जिवंत आहे ! आर्थिक पातळीवर आपण तग धरून आहोत व राजकीय दृष्ट्या अजूनही राष्ट्रैक्य टिकवून आहोत याचे, परमेश्वर कृपेवाचून अन्य कोणतेही कारण नाही. विचार करा...

आपली शिक्षण पद्धती अत्यंत चुकीची आहे. इतिहासाला त्यात योग्य स्थानच नाही. मला माझ्या देशाची गौरवशाली परंपरा माहीत असल्याशिवाय मी देशावर कसे प्रेम करीन ? राष्ट्रनिर्माणाकरिता तरुण पिढी त्याग करायला तयार नसेल तर कोण हे कार्य करणार ? राजकीय पक्ष ? खचितच ही जबाबदारी तुमच्या खांद्यावर आहे. आपले भविष्य घडविण्याची जबाबदारी तरुण पिढीच्याच खांद्यावर आहे. तुमच्या आई-वडिलांनी तुमच्याकरिता हे करावे म्हणून वाट पाहू नका. त्यांना मोकळं सोडा, त्यांच्या वृद्धापकाळात आम्ही त्यांची काळजी घेऊ, त्यांना खाऊ-पिऊ घालू. तुमच्या ठायी असलेले उत्तमोत्तम गुण अभिव्यक्त करणे तुमच्याच हाती आहे. तुमची कमाल क्षमता वापरून कसून अभ्यास करा. तुमचे मन व बुद्धी विकसित करा आणि राष्ट्राच्या पुनर्बांधणी करिता त्याचा उपयोग करा. समाजाकडून मला काय मिळेल यापेक्षा मी माझ्या धाकट्या भावंडांना काय देऊ शकतो याचा विचार करा.

आजचे चिन्मय युवा केंद्र सदस्य ब्रह्मचारी होऊ शकतात. आपण हिंदू आहोत. आपला पुनर्जन्मावर विश्वास आहे. आपले विवाह पुढील जन्माकरिता आपण राखून ठेवू. माझी मूल्ये, माझा समाज व माझे राष्ट्र यांच्या पुनर्रचनेकरिता हा जन्म आहे, असे समजूयात. राष्ट्राच्या उभारणीकरिता मी त्याग करायला तयार आहे, आवश्यक असल्यास प्राणत्यागही करायला तयार आहे, अशी त्यांची वृत्ती हवी.

त्यागाविना चीनचे अस्तित्त्व टिकले असते का ? नेपोलिय न चीनबद्दल म्हणाला होता, "झोपलेली कुत्री तशीच पडून राहू देत. त्यांना जागे करणे भयानक ठरेल. आपण त्यांच्या विरोधात उभे राहू शकणार नाही."

आपण मात्र दीर्घकाळ निद्रिस्तच आहोत.

तुम्हाला जागे करण्याकरिता, तुम्हाला समजेल अशा भाषेत आपल्या देशाचे गौरवगान आम्ही करीत आहोत. तुमच्या व्यक्तिमत्त्वाची पुनर्रचना कशी करावयाची हे सांगत आहोत. पण त्यामुळे चांगला अभ्यास करण्याची क्षमता व जीवनात यशाचे शिखर गाठण्याची कला तुम्हाला प्राप्त होईल. ते पुरेसे नाही. ही सर्व मानसिक व बौद्धिक ऊर्जा अंतता राष्ट्राच्या पुनर्निर्माणाकरिता समर्पित करायला हवी. याकरिता प्रचंड त्यागाची आवश्यकता आहे. विदेशी लोक आणि आपल्याच देशातील बांधव तुम्हाला पाहून खिजवितांना, तुमच्या कल्पनांचा उपहास करताना, त्यांच्या विरोधात उभे राहून कार्य करण्याचे धैर्य तुमच्या ठायी असायला हवे. थोरांची श्रेष्ठता यातच आहे.

'अहिंसा-चळवळ' सुरू करण्याचा विचार गांधीजींनी जेव्हा मांडला तेव्हा वल्लभभाई पटेलांसहीत अनेक जण हसले होते. दांडी यात्रेवर निघाले तेव्हाही ते एकटेच होते. काही गावे त्यांनी पार केली आणि बघता बघता मोठा जनसमुदाय पाठीशी होता. काही उत्सुकतेने तर काही कळप वृत्तीने. वार्ताहरांनी गर्दी केली. मुंबईला पोहोचेपर्यंत ज्यांनी सुरुवातीला खिल्ली उडविली ते गांधींचे परम भक्त झाले होते. कोणीतरी विधायक कार्याची सुरुवात करणे आवश्यक आहे. आपल्या देशात इतर कोणत्याही पिढीच्या वाट्याला न आलेली संधी, तुमच्याकरिता चालून आली आहे. तुम्ही उंबरठ्यावर आहात - एक तर तुम्ही कोलमडणार किंवा पुनर्जीवित होणार. हे पुनर्जीवन तुमच्या हाती घ्या. स्वाभिमान, देशाकरिता निस्सीम प्रेम व आदराची भावना असणे गरजेचे आहे. असे कोणते उर्जास्रोत आहेत जेथून मला आवश्यक ती शक्ती मिळेल ?

एखाद्या ध्येयाने किंवा आदर्शाने तुम्ही प्रेरित असल्याशिवाय उपहासकर्त्या लोकांसमोर तुम्ही उभेच राहू शकणार नाही. भूतकाळाची महती माहीत असल्याशिवाय, भविष्य घडविण्यासाठी तुम्ही वर्तमानात कार्य कसे कराल आणि त्याग कसा कराल ? भूत, वर्तमान व भविष्य हे तिन्ही काळ खंडीत नाहीत. मूलत: ते अखंडित आहेत. भूतकाळांतून प्रेरणा घेऊन आपण वर्तमानातील आव्हानांना सामोरे जातो. दुर्दैवाने, पाश्चिमात्त्य लोकांनी लिहिलेला आपल्या देशाचा इतिहास आपल्याला शिकविला जातो. त्यामुळे तर या स्थितीस आपण पोहोचलो ! विभाजन शक्तीचा एक राक्षस निर्माण केला आहे आपण. मराठी माणसाला महाराष्ट्र हवा. अन्य भाषिकाला त्याचा प्रांत हवा. प्रांतस्वतंत्रता ही आर्थिक दृष्ट्याही व्यवहार्य बाब नाही. आपण समग्रतेची दृष्टी ठेवायला हवी. विज्ञानाची पावले त्याच दिशेने चालली आहेत. पदार्थ म्हणजे केवळ अणु, अणू म्हणजे गतिमान ऊर्जा. थोडक्यात सर्व सृष्टीत एकता आहे, भिन्नता नाही असे विज्ञान समजावून सांगते. परंतु आपल्या वर्तणुकीत विघटनाचे प्रयत्न दिसून येतात.

या विघटनातून फक्त युवाच आपला देश वाचवू शकतील. एका गांधीजींनी कित्येकांना प्रेरणा दिली, आपले चिन्मय युवा सदस्य निश्चितच अनेक युवकांना प्रेरणा देतील. आत्मविश्वास, स्वाभिमान, देशाभिमान, राष्ट्र उभारणीकरिता उंच माथा आणि कार्यप्रवण हातपाय, त्यागाची तत्परता - असे जीवन पुरेसे आहे. हळूहळू इतर तरुण अनुकरण करतील. चुडीदार-कुडता राजीव गांधीने परिधान करताच सर्व युवकांनी तसे केले. बहुसंख्य लोकांमध्ये कल्पकता नसते, ते अनुकरण प्रिय असतात. तुमच्यामध्ये असे साहस हवे की तुम्ही एक वेगळं, श्रेष्ठ जीवन जगाल. कुणी पृच्छा केली तर तुम्ही तुमच्या वाटचालीची छातीठोकपणे कारणे सांगू शकाल. अनेकांना तुमचे बोलणे समजणार नाही. तुम्ही मार्गक्रमण करीत रहा. प्रश्न असा आहे की, मांजराच्या गळ्यात घंटी बांधायची कुणी ?

आज सभोवतालचे अवलोकन करताना मला दिसते की एका बाजूला दुराग्रही, कडवे हिंदू आहेत ते काहीच करू शकणार नाहीत. दुसरीकडे एकांगी राजकीय विचारसरणी असलेले लोक आहेत - ते देश वाचवू शकणार नाहीत. आपल्या साध्या, सरळ चिन्मय युवा सदस्यांपाशी ती ध्येयदृष्टी आहे, सामंजस्य आहे आणि कार्य हाती घेतल्यास त्यागाची तयारी आहे.तुम्ही हे करावे, असा आग्रह मी धरावा, अशी ही गोष्ट नव्हे. तुमच्या पत्नीवर तुम्ही प्रेम करा हे मी सांगण्याची आवश्यकता नाही. तुमच्या पत्नीकरिता मी प्रेम कसे देणार ? तुम्ही तुमच्या हृदयी ते शोधायचे आहे. तुमचे निकटचे नाते आहे. प्रेम तुमच्या अंतरंगातून सहज, आपोआप बाहेर पडायला हवे. विचार करा...

**माझ्या देशाला मी काय देऊ शकतो याचा ध्यास घ्या.** पुढाऱ्यांकडून अपेक्षा बाळगू नका. इंग्रजांच्या बेड्यांतून त्यांनी आपल्याला मुक्त केले आणि त्यानंतर आपापसात लूट वाटून घेतली आणि राष्ट्राची नासाडी केली.

या सर्व विवेकशून्य अंदाधुंदीत, चिन्मय युवा हेच सूज्ञ आहेत, समजूतदार

आहेत. तुम्ही योग्य दिशेने, तुमच्यातील अनिवार्य प्रेरणेने मार्गक्रमण करा. तुमच्या मागे अभूतपूर्व गर्दी असेल. जुनी पिढी आता संपली. नवे तरुण नेतृत्व आले आहे. लोकाधार मिळविण्याचे आणि जनमानस जिंकण्याचे प्रचंड सामर्थ्य या नेतृत्वात आहे. या घटकेला आपण सुरुवात केली तर सरकारसुद्धा आपल्याला साथ देईल. आपले अनुकरणही करील. आपण आपली किती शक्ती पणाला लावू त्यावर सर्व अवलंबून आहे. ध्येयावर निष्ठा असल्याशिवाय आवश्यक ती शक्ती प्राप्त होणार नाही. टागोर आणि भारतीसारख्या महाकवींनी कंठरवाने भारतमातेचे गुणगान केले - तो वैभवशाली भारत पुन्हा साकारणे हे आपले ध्येय असायला हवे. भारताबद्दल अमेरिकन काय म्हणाले, इंग्रज काय म्हणाले - हेच आपल्याला माहीत. काय म्हणतात ते ? ते म्हणतात, 'भारत हे राष्ट्रच नव्हे, हा तर केवळ जनसमूह आहे. लोकांची जत्रा ! हिंदुत्व हा धर्म नाही तो एक जीवन मार्ग आहे.' धर्म आणि जीवनप्रवास भिन्न असतात काय ? जीवन जगण्याच्या पद्धतीविना धर्माला काहीच अर्थ नाही. किंबहुना **धर्म म्हणजेच जीवन जगण्याची कला, योग्य जीवन पद्धती.**

**व्यापक दृष्टी बाळगा.** गेल्या छत्तीस वर्षातील आपल्या प्रगतीचा आढावा घ्या. आपण कोठवर आलो - हे आपल्याला आकलन झाले तरी खूप झाले. पुढचा मार्ग दृष्टीस आपोआप दिसेल. तुम्ही करंटे आहात, तुमची पिढी शापीत आहे आणि या देशाला भवितव्य नाही - हे मी मानत नाही. देशातील लोकच तर राष्ट्र घडवितात. सध्या भारत हा फक्त देश आहे, राष्ट्र नाही. प्रत्येक जण आपापल्या समस्या पाहतो - पंजाब प्रश्न, आसाम प्रश्न, अहमदाबाद प्रश्न, संपूर्ण देशाचा एकसंध विचार कुणी करीत नाही. राष्ट्र आहे म्हणून राज्याला मान्यता आहे, हे समजून घ्यायला कुणी तयार नाही. प्रशासनाची सोय म्हणून प्रांतीय रचना अथवा राज्यनिर्मिती असते.

तुम्ही युवकांनी या मर्यादांचे उल्लंघन करावे अशी माझी मनापासून इच्छा आहे. एका कटाक्षात भूतकाळ, वर्तमानकाळ आणि संभाव्य भविष्यकाळ याचा वेध घ्या. हिमालयापासून ते कन्याकुमारीपर्यंतचा भूभाग हा माझा देश आहे. ख्रिस्ती असो, इस्लामी असो - सर्व माझे बांधव आहेत. भारतीय **समाजाचे दोनच घटक आहेत - जे पूर्वी हिंदू होते आणि जे आजही हिंदू आहेत.** भारतीय परंपरा ही हिंदू परंपरा आहे. कारण ८२ टक्के लोक हिंदू आहेत. हिंदूंचा अभ्युदय तो देशाचा अभ्युदय, हिंदूंचे पुनर्जीवन ते देशाचे पुनर्जीवन, हिंदूंचे सामर्थ्य तेच देशाचे सामर्थ्य, हिंदूंची प्रतिष्ठा तीच राष्ट्राची प्रतिष्ठा !

देशातील आजच्या गलिच्छ परिस्थितीला राजकारणी जबाबदार आहेत. परंतु त्यावर अश्रू ढाळण्यात आपण वेळ दवडणार नाही. आपल्याला या स्थितीतून बाहेर पडायचे आहे. तुम्ही आपल्या देशाचे भविष्य घडवायचे आहे. तुम्ही जबाबदार आहात. मी पुरेसे बोललो आता उरलेले तुमच्या कृतीतून दिसायला हवे.

धन्यवाद !

(पूज्य स्वामी चिन्मयानंद यांनी दि. २३ मे १९८५ रोजी 'युवक मेळाव्यात' केलेले भाषण).

अनुवाद : नरेन्द्र मधुकर नाथडू



# यानंदांच्या दृष्टीतून वि

प्रा. डॉ. अंजली माधव पर्वते

*एम.ए. पीएच.डी. (संस्कृत) विषय, आध्यात्म रामायण एक चिकित्सक अभ्यास, गीताव्रती. गीता धर्म मंडळ. किसन वीर कॉलेज वाई, संस्कृत प्रपाठक. विवेकचुडामणी, नागानंद व प्रबोध चंद्रोदय (महाराष्ट्र राज्य साहित्य पुरस्कार) प्रतिमा व प्रसन्न राघव - टी.म.वि.चा कमल ताम्बे पुरस्कार. प्रसाद मासिकात संस्कृत साहित्यिकांच्या संदर्भात स्फुट लेख. आकाशवाणी सांगली 'प्रकाश किरण' व सातारा 'अक्षर धन' कार्यक्रमाचे लेखन. शंकराचार्य, समर्थ रामदास, कालिदास, रामायण, महाभारत यांवर विविध ठिकाणी भाषणे, शिवाजी विद्यापीठाचा गुणवंत पुरस्कार, संस्कृत भाषेच्या महत्त्वाविषयी विविध शाळांत भाषणे.*

## प्रास्ताविक

सुमारे दहा वर्षांपूर्वी आद्य शंकराचार्यांच्या विवेकचूडामणिचे मराठीत भाषांतर व भाष्य केल्याबद्दल परांडा येथे चिन्मय मिशनच्या प. पू. स्वामी तेजोमयानंदजींच्या हस्ते माझा सत्कार झाला. त्यावेळी कळले होते की स्वामी चिन्मयानंदांनीही इंग्रजीमध्ये विवेकचूडामणि साधकांना समजावून दिला आहे आणि चिन्मय मिशनच्या दृष्टीने 'विवेकचूडामणि'चे महत्त्व 'प्रस्थानत्रयी' इतकेच आहे. साधकाने आपल्या नित्योपासनेत विवेकचूडामणितील विचारांचे, श्लोकांचे चिंतन करावे अशी स्वामींची खास सूचनाही आहे. स्वामींचा विवेकचूडामणिबाबतचा हा आदर, आग्रह खूप छान वाटला होता तेव्हा आणि खूप महत्त्वाचाही ! त्यामुळेच त्यांनी केलेले 'विवेकचूडामणि'चे विवेचन पाहावे, अशी इच्छा होती. प्रत्यक्षात तो योग मात्र आला नव्हता. आता 'कल्याणी'च्या 'चिन्मय विशेषांकासाठी' काही लिहिण्याचा विचार झाला, तेव्हा तो योग आला. अर्थात् स्वामींचे मूळ इंग्रजीतले भाषांतर वा भाष्य मला पहायला मिळाले नाही पण मिशनच्या वतीने त्यांचे मराठीत झालेले भाषांतर पहायला मिळाले आणि त्यातून स्वामींची त्याकडे पाहण्याची जी दृष्टी कळली ती वेगळी वाटली म्हणून त्याबद्दल थोडेसे लिहिण्याचा हा प्रयत्न !

## ग्रंथाचे महत्त्व व चिन्मयानंदांची भूमिका

स्वामींनी प्रस्तावनेतच या ग्रंथाचे स्वतःला जाणवणारे महत्त्व सांगितले आहे. वेदान्ताच्या प्रस्तावनावजा लिहिलेल्या महान ग्रंथांपैकी आचार्यांचा हा ग्रंथ आहे आणि या ग्रंथाचा विस्तृत व काळजीपूर्वक केलेला अभ्यास प्रगतीच्या मार्गावरील सर्व खाचखळगे टाळण्यास सहाय्यभूत होणार आहे, असा अभिप्राय देताना स्वामींनी वापरलेले 'विस्तृत व काळजीपूर्वक' हे दोन शब्द अतिशय महत्त्वाचे आहेत. स्वामींना साधकांनी 'विवेकचूडामणि' वरवर वाचावे, जाता जाता पहावे असे वाटत नाही. त्यांना ग्रंथाचे overlooking अपेक्षित नाही तर सखोल व विस्ताराने अभ्यास, जाणीवपूर्वक काळजीने त्यातील विचार जाणून घेण्याचा प्रयत्न साधकाने करावा अशी त्यांची इच्छा आहे. कारण असा नेटाने अभ्यास झाला तरच खाचखळगे टळू शकतात याची त्यांना जाणीव आहे. म्हणूनच प्रत्येक श्लोकाचा वाच्यार्थच नव्हे तर त्याला साह्यभूत ठरणाऱ्या व विपूल माहिती देणाऱ्या श्लोकांचा लक्षणार्थही आपण आवर्जून दिला असल्याचे त्यांनी नमूद केले आहे. साधकांना, जिज्ञासूंना नेमका विचार कळावा हा हेतू असल्यामुळे संस्कृत श्लोकांचा मुक्त अनुवाद व त्यावरील धावते भाष्य देताना काही श्लोकांच्या क्लिष्ट शाब्दिक अर्थांवर आपण अडून राहिलेलो नाही हेही त्यांनी स्पष्ट केले आहे. दररोज साधकाने या ग्रंथातील तीन ते चार श्लोकांवर संसारातील कर्मे चालू असतानाच काळजीपूर्वक चिंतन करावे अशी सूचना करून स्वामींनी, आपण ग्रंथाच्या अनुवादात फक्त रूपरेखा दिली आहे, खरे समाधान हे साधकाला स्वतःच्या चिंतनातून प्राप्त होणार आहे, असे स्पष्ट शब्दांत सांगितले आहे. जणू आपली भूमिकाच प्रांजळपणे मांडली आहे. या वेदान्तविषयक सविस्तर ग्रंथात उपनिषदांचे व भगवद् गीतेचे सार आले असून जीवनासंबंधीचा एक नवीन दृष्टिकोन मांडला गेला आहे. 'सिद्धी' व 'साधना' या दोहोंचे विस्तृत विवरण यात आहे. त्यामुळे जो या ग्रंथाचे अध्ययन करील त्याला आत्मविकसनाच्या मार्गदर्शनाकरिता अन्य कशाचीही गरज नाही, असा विश्वास स्वामींनी प्रस्तावनेत व्यक्त केला आहे.

## शीर्षकाचे स्पष्टीकरण किंचित वेगळे

'विवेकचूडामणि' या शीर्षकाचे स्पष्टीकरण स्वामींनी 'विवेकाचा मुकूटमणि' असे केले आहे. ते इतरांहून किंचित वेगळे आहे. 'चूडामणि' या शब्दाचा अर्थ एरवी 'चूडा' म्हणजे 'मस्तक' व 'चूडामणि' म्हणजे 'मस्तकावर आभूषण म्हणून वापरले जाणारे रत्न' असा दिला जातो. स्वामींनी 'चूडा'चा 'शिरोभूषण' हा अर्थ स्वीकार्य मानून 'मुकुट' असा अर्थ केला आहे व 'चूडामणि' म्हणजे 'मुकुटावरील मणि' असा अर्थ दिला आहे.

## स्वामींचा वेगळा विचार

प्रारंभीच्या श्लोकांमध्ये गुरूला जे वंदन आचार्यांनी केले आहे, त्या वंदनाबाबत सांगताना स्वामींनी हे वंदन २ प्रकारचे असल्याचे मत व्यक्त केले आहे. हे वंदन मर्त्य शिष्याने मानवी गुरूला केलेले वंदनही आहे व एका विद्वान् माणसाने परम सत्त्व अशा तत्त्वाला केलेले आध्यात्मिक स्वरूपाचे वंदनही आहे, असा स्वामींचा अभिप्राय आहे. साधकामधील 'अहं' केंद्रित जीवभावाचा सत्यतत्त्वाशी अनन्यत्व शोधण्याचा जो प्रवास, त्या प्रवासातला पहिला टप्पा म्हणजे हे वंदन असे स्वामींचे मत येथे जाणवते. 'तीन गोष्टी दुर्लभ' म्हणून आचार्य ज्या सांगतात त्यात माणसाचा जन्म, त्यातही पुरुषाचा जन्म आणि त्यातही 'विप्रत्व' अशा ३ गोष्टींचा समावेश आहे. त्यापैकी 'पुंस्त्व' किंवा 'पुरुषजन्म (किंवा पौरुष) व 'विप्रत्व' या बाबत स्वामींनी वेगळे मत नोंदवले आहे. पौरुष व स्त्रीत्व हे गुणांवर अवलंबून आहे, देहांवर नाही. देह पुरुषाचा असणे महत्त्वाचे नव्हे तर पुरुषाकडे आढळणारे धैर्यादी गुण, जे परमार्थसाधनेला उपकारक ते असणे प्राप्त होणे महत्त्वाचे, असे स्वामींना वाटते. 'विप्रते'बाबतही स्वामींचे मत असेच आहे. 'विप्रा'कडे असणारी सहिष्णुता, क्षमाशीलता, उदारधीही परमार्थसाधनेच्या दृष्टीने महत्त्वाची, जातीपेक्षाही या गुणांची आवश्यकता आचार्यांना या शब्दांतून प्रतिपादन करायची आहे, असे मत

स्वामींनी नोंदवले आहे.

## मानवाच्या तीन श्रेणी

मानव जन्माबाबत बोलताना स्वामींनी मानवाच्या ३ श्रेणी केल्या आहेत. 'पशु-मानव, मनुष्य-मानव व देव-मानव' आणि आचार्यांना पशु-मानवाचा, देव-मानवापर्यंत होणारा विकास अपेक्षित असल्याचे म्हटले आहे. एका अर्थी आत्मविकसनातील टप्पे संगतवार सांगत असताना, 'डार्विनने अर्धवट जाहीर केलेल्या उत्क्रान्तीच्या सिद्धान्ताची न लिहिलेली प्रकरणे आचार्य थोडक्यात आपल्यापुढे मांडत आहेत' -- अशी मार्मिक टिप्पणी स्वामींनी याबाबत केली आहे. 'दुर्लभं त्रयम्' या आचार्यांच्या शब्दावर भाष्य करताना 'दुर्मिळ सुदैवाची ३ वर्तुळे' असा विशिष्ट शब्द चिन्मयानंदांनी वापरला आहे.

## रूढ शब्दाचे वेगळे अर्थ

'ईश्वरी कृपा' वा 'देवानुग्रह'चा अर्थही चिन्मयानंदांनी असाच थोडा वेगळा केला आहे. 'त्या त्या व्यक्तीने उदात्त व महान् सत्त्वशील कर्मांनी भरलेल्या आपल्या अनेक पूर्वजन्मांतरी मिळवलेल्या निकोप व विवेकी जीवनातील प्रतिक्रियांची बेरीज' असा अर्थ स्वामी देतात. त्यावरून 'ईश्वरी कृपा म्हणजेच आपल्यान्य पूर्व सत्कर्मांचे फळ' असे त्यांचे मत असल्याचे जाणवते. पुढेही विवेचनात 'संत' म्हणजे शुद्ध अस्तित्वाच्या जाणीवेत पक्का स्थिर असणारा 'दर्शन' म्हणजे 'तत्त्वज्ञान' दृष्ट्या जग पाहणे असा १ अर्थ आणि अलिप्तपणे व विवेकाने 'आहे तसे जग' पाहणे म्हणजेही 'दर्शन'च ! 'योग' म्हणजे निम्न मूल्यांतून अधिक निरोगी आणि अधिक दिव्य जीवनापर्यंत स्वतःला उन्नत करण्याचा मनाचा प्रयत्न होय. अशा प्रकारे 'संत', 'दर्शन', 'योग' अशा विविध शब्दांच्या रूढ व्याख्यांपेक्षा वेगळ्या व्याख्या चिन्मयानंद देतात. या सर्व व्याख्यांमधून त्यांची चिंतन करण्याची वेगळी पद्धत जाणवते. रूढ अर्थापेक्षा साधकाला अधिक पटेल असा अर्थ सांगून त्या शब्दाच्या जवळ त्याला पोचवणे आणि त्याच्याकडून त्या प्रकारची साधना करून घेणे हा त्यांचा त्यामागील हेतू स्पष्ट आहे.'

## मननीय टिप्पणी

विद्वान म्हणजे बाह्य जगाचे उत्तमपैकी लौकीक ज्ञान आणि स्वतःच्या बौद्धिक व मनोवैज्ञानिक मनोरचनेबाबत पुरेशी अंतर्दृष्टी असणारा, अशी एके ठिकाणी त्यांनी केलेली विद्वान शब्दाची टिप्पणी सझोज आहे. ते स्वतः असे विद्वान होते असे म्हणता येते. 'श्रद्धा' शब्दाचाही श्रुति ग्रंथांतील सूत्रे लक्षणार्थासह प्रयत्नपूर्वक समजून घेण्याची क्षमता असा अर्थ चिन्मयानंदांनी दिला आहे. 'तितिक्षा' म्हणजे 'निःशब्द सहिष्णूता' किंवा 'मनाच्या सर्व सहनशीलपणे स्थित्यंतरांशी जमवून घेणे व मार्गात येणाऱ्या कोणत्याही अडथळ्यांकडे दुर्लक्ष करण्याची मनाची क्षमता' असे तितिक्षेचे वेगळे स्पष्टीकरण चिन्मयानंद देतात. ते मननीय आहे.

मात्र अशा वेगळ्या व्याख्या, वेगळी स्पष्टीकरणे देण्यात आपले वेगळेपण सिद्ध करण्याचा भाव स्वामींचा नाही. आपली विद्वत्ता प्रकट करण्याचा अभिनिवेश त्यात नाही पण तितिक्षा वैराग्यादी शब्दांचे चुकीचे अर्थ लावून साधकाने, शरीरक्लेशादी चुकीचे मार्ग अवलंबू नयेत. जगापासून तुटून दुःखी होऊ नये. यासाठी त्या शब्दांच्या नेमक्या अर्थाकडे लक्ष वेधण्याचा त्यांचा प्रयत्न आहे.

## दुष्प्रवृत्तींवर परखड टीका

सर्वत्रच भाष्य करताना स्वामींनी केवळ आचार्यांच्या शब्दांतून काय अर्थ प्रतीत होतो एवढेच न सांगता त्या शब्दांचे चुकीचे अर्थ लावण्याच्या प्रवृत्तींमधून परमार्थ मार्गात ज्या अपप्रवृत्ती निर्माण झाल्या आहेत त्यांच्यावर जोरदारपणे, परखड शब्दांत टीका केली आहे. वेदांत लोकांना निवृत्ती मार्गाकडे नेतो. प्रपंच सोडून संन्यासी व्हायला लावतो, असे नसून तो प्रपंचात राहूनच परमात्म चिंतन करायला कसे शिकवतो ते अनेक ठिकाणी त्यांनी दाखवून दिले आहे. काही वेळा 'सरळ मार्गी, प्रामाणिकपणे जीवन जगणे; यथाशक्य दानधर्म करणे' हा आत्मज्ञानाचा, मोक्षाचा मार्ग असे सांगितले, मानले जाते. त्याचाही स्पष्ट शब्दांत निषेध केला आहे. आत्मज्ञानासाठी तीव्र तळमळ (जिज्ञासा), कडकडीत वैराग्य, शमदमादींचे आचरण व प्रखर पावित्र्य आवश्यकच असल्याचे आग्रही प्रतिपादन केले आहे. परमार्थ तसा काही सोपा नाही हे स्पष्ट केले आहे. अलीकडे जो 'गुरूडम' वाढला, परमार्थाचा बाजार वाढला त्याबाबतची तीव्र नाराजीही चिन्मयानंदांनी, आचार्यांनी विवेकचूडामणित जे गुरूवर्णन केले आहे त्याबाबत भाष्य करताना व्यक्त केली आहे. थोडक्यात, केवळ आचार्यांच्या विचारांचे प्रतिबिंब दाखवणे, दर्शन घडवणे एवढेच काम स्वामींनी केलेले नाही. त्यांनी केलेले 'विवेकचूडामणि'चे भाषांतर, त्यावर केलेले भाष्यही आचार्यांच्या विचारांची ध्वनिमुद्रित आवृत्ती नव्हे, तर आचार्यांच्या विचारांवरील ती साक्षेपी समीक्षा आहे. चिन्मयानंदांमधील लोकशिक्षक हे करताना सतत जागा आहे. एखादा उत्तम शिक्षक एखादी कविता शिकवताना त्यातल्या प्रतिमा आणि रूपके आपल्या ओघवत्या भाषेत जशी उलगडत जातो, तसा आचार्यांचा समग्र ग्रंथ चिन्मयानंदांनी जिज्ञासूंसमोर हळुवारपणे उलगडला आहे.

## विवेचनाची वैशिष्ट्ये

शिक्षक जसा संदर्भांच्या जंजाळात विद्यार्थ्यांना न अडकवता सलीलपणे एखादा विषय सांगत जातो तसेच चिन्मयानंदही आचार्यांनी दिलेले श्रुतींचे संदर्भ मुळातून सांगत न बसता सोप्या पद्धतीने त्या श्रुतिवचनांचा आशय साधकांपर्यंत पोचवण्याची व्यवस्था करतात. काही ठिकाणी तळटीपांमध्ये मुण्डक, छांदोग्यातले संदर्भ दिले असले तरी बहुसंख्य संदर्भांची जंत्री ते देत बसत नाहीत. सतत येणारे काही शब्द त्यांनी अनेक वेळा short - form मध्ये वापरले आहेत हे त्यांचे आणखी एक वैशिष्ट्य. 'श.म.धी.' 'दृ.भा.वि.' व 'द्र.भा.वि.' हे त्यांचे 3 short forms 'विवेकचूडामणि'त सर्वत्र सारखेच येतात. त्यांचे स्पष्टीकरण वेगळे दिलेले नाही. बोलण्याच्या, विवेचनाच्या ओघातच कधीतरी कळते की, 'श. म. धी.' म्हणजे 'शरीर-मन-बुद्धी', 'दृ.भा.वि.' म्हणजे 'दृश्य-भाव-विकार' व 'द्र.भा.वि.' म्हणजे 'द्रष्टा, भावक व विचारक' होय.

## संकल्पना वेगळ्या प्रकारच्या

स्वामी चिन्मयानंदांनी काही ठिकाणी 'प्रार्थना म्हणजे दयेची याचना नव्हे' 'मृत्यू म्हणजे मरण वा विनाश नव्हे.' 'सद्गुरू उपासना म्हणजे विपण्ण असमाधानाने केलेली गुलामासारखी देहशुश्रुषा नव्हे.' अशी काही परखड व ठसठशीत विधाने केली आहेत. 'कृपा' शब्दाला इंग्रजीत नेमका प्रतिशब्द नाही, असे म्हटले आहे. हा परखडपणा, ही निश्चयात्मकता त्यांचे या संकल्पनांबाबतचे वेगळे मत दाखवणारी आहे. ते केवळ निषेध करून थांबत नाहीत तर 'प्रार्थना म्हणजे अहंभावनेचे समर्पण, नमते घेऊन कार्य साध्य करण्याची युक्ती' असे ते सांगतात. 'मृत्यू' म्हणजे अनिश्चितता, परिवर्तन' अशी कल्पना मांडतात. 'आदराने व प्रेमाने देहभान विसरून सर्व प्रकारे व सर्व काळ केलेली सेवा' म्हणजे सद्गुरू उपासना असे चिन्मयानंद सांगतात आणि 'कृपे'ची त्यांची व्याख्या तर खूपच अलंकारिक पण तरीही हृद्य आहे. ते म्हणतात, 'कृपा म्हणजे दयारसात शिजवलेली, प्रेमाने माधुरी आणलेली, बुद्धीच्या सोनेरी थाळीत वाढप केलेली आपलेपणाची, जिव्हाळ्याची वृत्ती !' (शिदोरी)

## उपसंहार

ही अशीच कृपावृत्ती स्वतः चिन्मयानंदांच्या मनात सदैव जागी होती. ते

स्वतः कित्येक शिष्यांचे 'गुरूदेव' होते. त्यामुळेच त्यांनी या कृपेचा वर्षाव करत विवेकचूडामणितील गूढ ज्ञान आपल्या शिष्यापर्यंत सहजगत्या पोचवण्याचा प्रयत्न केला. ठराविक श्लोकांमध्ये कोणता विषय हे कळावे म्हणून त्या श्लोकांच्या गटाला विषयदर्शक नावे देऊन (उदा. शरीर निंदा, सूक्ष्म शरीर विचार, पंचकोशनिरास इ.) विवेचन सोपे केले. शेवटी, आचार्यांनी गुरूंचे वर्णन केले आहे. त्यानुसार 'वसंत ऋतू' सारखे होते. वसंत ऋतू आला की, जशी आपोआप सृष्टी चैतन्याने, आनंदाने बहरते, चिन्मयानंदांबाबतीतही असेच घडत गेले. ते सहजपणे ओघवत्या प्रासादिक शैलीत विवेचन करत गेले आणि शिष्यांना वर्ण्यविषय आपोआप कळत गेला. केवळ 'विवेकचूडामणि' तल्याच विवेचनाबाबत नव्हे, त्यांच्या सर्वच ग्रंथातील विवेचनाचे हे वैशिष्ट्य आहे. म्हणूनच देशीच नव्हे तर परदेशीही नागरिक त्यांचे अनुयायी बनले. 'नारायण वासना वाढवा'. 'जीवन्मुक्ताची लक्षणे सांगणारे श्लोक इतरांच्या मूल्यमापनासाठी नव्हेत, आत्मनिरीक्षण करण्यासाठी आहेत.' समाधी अवस्था प्राप्त होईपर्यंत साधना चालू ठेवायची आहे, असे स्पष्ट शब्दांत पण कळकळीने सांगणारे चिन्मयानंद खरे गुरू होते. आचार्यांच्या शब्दांत सांगायचे तर खऱ्या अर्थाने 'श्रोत्रिय', अहेतुकदयासिन्धु आणि शिष्यहिताय उद्यतः सततम् असे परमकारुणिक गुरू होते. त्यांच्या कृपेचा अनुभव घ्यायचा असेल तर विवेकचूडामणिचे त्यांनी केलेले विवेचन मुळातूनच वाचायला हवे. इथे मी जे आपल्यासमोर ठेवण्याचा प्रयत्न केला आहे तो, 'गागर में सागर' भरण्याचा अल्पसा प्रयत्न आहे.


प्रा. डॉ. अंजली माधव पर्वते

बी-५, शिवसाई कॉम्प्लेक्स, पो. आनंद नगर,

सिंहगड रोड, पुणे ५१. दूरध्वनी : २४३४७६०१

# साधना - पंचकम्

**सौ. वसुधा वि. देशपांडे**

*एम.ए. बी.एड्, शिक्षिका.*

अगदी लहान मुलाला शिक्षक प्रथम आकडे शिकवतो ते वस्तू दाखवून म्हणजे एक गोटी, दोन गोट्या वगैरे. मग संख्या, मग बोटावर मोजणे, लिहून बेरीज, वजाबाकी, गुणाकार करता करता शेवटी अभ्यासाने तो कुमार मोठी गणिते एकदम तोंडी करू लागतो. ज्ञानाचा प्रवासही असाच असतो. स्थूलाकडून सूक्ष्माकडे, मूर्ताकडून अमूर्ताकडे आणि द्वैताकडून अद्वैताकडे. म्हणूनच अमूर्ताकडे नेणाऱ्या, पूर्णत्वाकडे पोचवणाऱ्या कर्मांच्या पायऱ्याही अतिशय महत्त्वाच्या आहेत. हा अभ्यास कसा करावा हे शंकराचार्यांनी 'साधना पंचकात' सांगितले आहे व त्यावर गुरूदेव स्वामी चिन्मयानंदांनी सुबोध भाष्य केले आहे.

वेदान्त साधनेचा अभ्यास एकूण चाळीस बाबीत करता येतो. त्यांचा क्रमाने उल्लेख या पंचकात आहे. त्याचे साधारणपणे सार पुढीलप्रमाणे देण्याचा प्रयत्न केला आहे.

द्वैताच्या म्हणजे 'मी पूजक व परमेश्वर मूर्ती पूज्य' या प्राथमिक अवस्थेत पूजा, आवाहन-यज्ञ या गोष्टी अंतर्भूत असतात. या अभ्यासातून पुढे जीवाशिवाचे ऐक्य होत जावे व साधकाची प्रगती होऊन त्याने कर्मकांड विरहीत होऊन विश्वात्म्याशी एकरूप व्हावे, हा अद्वैताचा पल्ला आहे. हा मार्ग साधकांना 'साधना पंचकाद्वारे' खुला केला आहे. ते श्लोक पुढीलप्रमाणे :

***वेदो नित्यमधीयतां तदुदितं कर्म स्वनुष्ठीयतां***
***तेनेशस्य विधीयतां अपचितिः काम्येमतिस्त्यज्यताम् ।***
***पापौघः परिधूयतां भवसुखे दोषोऽनुसंधीयतां***
***आत्मेच्छा व्यवसीयतां निजगृहात्तूर्णं विनिर्गम्यताम् ॥१॥***
***संगः सत्सु विधीयतां भगवतो भक्तिर्दृढाऽऽधीयताम् ।***
***शान्त्यादिः परिचीयतां दृढतरं कर्माशु संत्यज्यताम् ।***
***सद्विद्वानुपसृप्यतां अनुदिनं तत्पादुके सेव्यतां***
***ब्रह्मैकाक्षरमर्थ्यतां श्रुतिशिरोवाक्यं समाकर्ण्यताम् ॥२॥***
***वाक्यार्थश्च विचार्यतां श्रुतिशिरः पक्षः समाश्रीयतां***
***दुस्तर्कात्सुविरम्यतां श्रुतिमतस्तर्कोऽनुसंधीयताम्***
***ब्रह्मास्मीति विभाव्यतां अहरहो गर्वः परित्यज्यतां***
***देहेऽहमतिरुज्झ्यतां बुधजनैर्वादः परित्यज्यताम् ॥३॥***
***क्षुद्व्याधिश्च चिकित्स्यतां प्रतिदिनं भिक्षौषधं भुज्यतां***
***स्वाद्वन्नं न तु याच्यतां विधिवशात् प्राप्तेन संतुष्यताम् ।***
***शीतोष्णादि विषह्यतां न तु वृथा वाक्यं समुच्चार्यताम् ।***
***औदासिन्यमभीप्स्यतां जनकृपा नैष्ठुर्यमुत्सृज्यताम् ॥४॥***
***एकान्ते सुखमास्यतां परतरे चेतः समाधीयताम् ।***
***पूर्णात्मा सुसमीक्ष्यतां जगदिदं तद्बाधितं दृश्यताम् ।***
***प्राक्कर्म प्रविलाप्यतां चितिबलान्नाप्युत्तरैः श्लिष्यतां***
***प्रारब्धं त्विह भुज्यतां अथ परमात्मना स्थीयताम् ॥५॥***

(१) वेदांचा अभ्यास रोज करावा. त्यात सांगितलेली कर्मे अनुष्ठान वृत्तीने करून ती 'इदं न मम' म्हणून कृष्णार्पण करावीत. 'अपेक्षा तिथे दुःख' हे लक्षात ठेवावे. एका इंग्रजी नाटककाराने म्हटले आहे, 'There are two types of tragedies in this world; one is not getting what one wants and the other is getting it.' आधी इच्छित वस्तू मिळत नाही म्हणून दुःख आणि मिळाल्यानंतर त्यातला रस निघून जातो, नवीन इच्छेचा जन्म होतो म्हणून दुःख. सर्व कर्मे करून सुद्धा त्यापासून मिळणाऱ्या लाभ-हानीचा विचार दूर ठेवणे म्हणजे भौतिकाच्या जाळ्यातून सुटका करून घेणे. थोडक्यात शरीराने कर्म करणे जितके महत्त्वाचे तितकेच मनाने कर्मरहित रहाणे महत्त्वाचे. यातूनच आत्मतत्त्वाचा शोध लागतो.

(२) महाजनो येन गतः सः पंथः । असे वचन आहे. ज्ञानी, सिद्ध, गुरू, महात्मे यांच्या सहवासात रहावे. अनन्य भावे त्यांच्या पायांची सेवा करावी. ॐकार साधना व श्रुतीतील महावाक्यांचे चिंतन-मनन नित्य करावे. निरासक्त भक्ती करावी व शांतीसारखे सद्गुण जोपासावेत.

(३) अविद्या - मायेचा मनाला वारा लागू नये म्हणून मीपणाचा, अहंकाराचा त्याग करावा कारण 'मी' म्हणजे शरीर नाही, तर 'ब्रह्मांडस्वरूप परमेश्वराचा पिंडात प्रगटलेला मी अंश आहे', हे लक्षात ठेवावे. उपनिषदाने विचारमंथनाने परिश्रमपूर्वक जे ज्ञान साररूपाने आपल्याला दिले आहे, तो एक तर्कशुद्ध विचार आहे. शब्दच्छल करणारे, अज्ञानी लोक आपल्याला वितंडवादासाठी आव्हान देतात. त्या वादात कधीही पडू नये. कारण जिथे भौतिक शास्त्रांच्या प्रांताची अंतिम सीमा असते तिथपासून पुढे अध्यात्माचा प्रांत सुरू होतो, हे सर्व थोर शास्त्रज्ञांनीही मान्य केलेले आहे.

(४) अन्न हे क्षुधेच्या यातनांतून सुटण्यासाठी घ्यावे. मुद्दाम मिष्टान्न, जिभेचे लाड करणारे अन्न मागून न घेता भिक्षावृत्तीने जे समोर येईल ते प्रसाद म्हणून स्वीकारावे कारण खाण्यासाठी जगायचे नसून जगण्यासाठी खायचे असते. शीत-उष्ण यांसारखी द्वंद्वे सहन करावीत. नेहमी उदासीन म्हणजेच विकाररहीत राहण्याचा प्रयत्न करावा. इतर लोकांची दया, सहानुभूती, भीक यांपासून स्वतःला वाचवून आत्मसन्मानाने जगावे. 'सुख-दुःखे समे कृत्वा, लाभालाभौ, जयाजयौ' असे म्हणून दोन्ही टोकांचे भोग समस्थितीने सोसावेत. शेवटी जगाने आपल्याला जे दिले त्यापेक्षा कितीतरी जास्त समाजाला परत करावे.

(५) पाचव्या श्लोकात 'जनात' राहूनही 'विजनाचा' म्हणजे एकांताचा अनुभव कसा घ्यावा हे स्वामी सांगतात. ध्यानाने मन शांत होते. विकारांच्या लाटा नसलेल्या मनाच्या शांत डोहात आत्मतत्त्वाचा तळ स्वच्छ दिसेल. पूर्वकर्मांची फळे cause & effect या थिअरीप्रमाणे आता समोर येतात म्हणून वर्तमान उजळ असावा म्हणजे भविष्य थोरच असेल.

असे थोडक्यात मला भावलेले साधनापंचक मी यथामती आपल्यासमोर मांडले आहे.

सौ. वसुधा विजय देशपांडे

# ...ा अध्याय १ ते ६ चि...

सौ. सुनीता पद्माकर बावळे

एम.ए. बी.एड,

*गीतेवर अनेक ज्ञानयज्ञ - साधक हीच भूमिका. गुरूदेवांच्या इंग्रजी पुस्तकांचे मराठी भाषांतर करणाऱ्या समितीच्या सभासद*

(गुरूदेव स्वामी चिन्मयानंद यांच्या गीतेवरील व उपनिषदातील अनेक ज्ञानयज्ञात हजर राहण्याची संधी मिळाली. त्यानंतर आवड निर्माण होऊन जे समजले ते समाजातील सत्प्रवृत्त व्यक्तींना सांगण्याच्या संकल्पनेमधून गीतेवर अनेक ज्ञानयज्ञ करण्याची सुरुवात केली. अद्यापही साधक हीच भूमिका आहे. गुरूदेवांच्या इंग्रजी पुस्तकांचे मराठीत भाषांतर करण्याच्या समितीमध्येही होत्या.)

कधी न कधी गीतेतील वाक्यांचा, संदेशाचा अर्थ उमगण्याची वेळ प्रत्येक व्यक्तीच्या जीवनात येत असते. विशेषत: व्यक्तीचे विचार जीवनाच्या नकारात्मक प्रकाराकडे वळायला लागतात. माझ्या सारख्या साधकाला गुरूदेव स्वामी चिन्मयानंद यांचे गीतेवरील अनेक ज्ञानयज्ञात हजर राहून गीता-चिंतन करण्याची संधी मिळणे हीच मोठ्या भाग्याची गोष्ट आहे. वेदान्तप्रणीत भारतीय सनातन धर्माची परंपरा अत्यंत अपूर्व व महान आहे. वेदांना अपौरुषेय मानतात कारण वेदांची रचना कोणी मानवाने केलेली नाही. वैदिक ऋषी हे स्वत:स मंत्राचे द्रष्टे समजतात. ते मंत्र रचणारे स्वत:स मानीत नाहीत. वेदव्यास यांनी हिंदू धर्मामध्ये महान क्रांती घडविली. त्यानंतर बौद्ध धर्मियांनी नीतीतत्त्वाचा पुरस्कार केला पण वेदांना प्रमाण मानले नाही व ते वेद व उपनिषदांना गौण मानू लागले व त्यावेळी श्रीमद् शंकराचार्यांनी पुन्हा बौद्ध धर्मातील तत्त्वांचे खंडन करून पुन्हा वेदातील उपनिषदप्रणीत हिंदू धर्माचे सर्व भारतभर प्रतिपादन केले. त्यानंतर स्वामी विवेकानंद यांनी वेदान्त तत्त्वज्ञानाचा पुरस्कार संपूर्ण जगभर केला व अशा परिस्थितीत १९४७ साली भारताला स्वातंत्र्य मिळाले व प. पूज्य गुरूदेव स्वामी चिन्मयानंदांनी आपल्या कार्यास सुरुवात केली. सर्व तऱ्हेची प्रलोभने-वैभव-संपत्ती याचा त्याग करून 'आत्मनो मोक्षाय जगत् हिताय्च' हेच जीवनाच्या गीताचे सूत्र लक्षात घेऊन प. पूज्य स्वामी चिन्मयानंदांनी परमपूज्य स्वामी तपोवन महाराज यांचेकडे कठोर तप व साधना व प्रचंड अभ्यास करून ३१.१२.१९५१ रोजी गीता ज्ञानयज्ञ सुरू केला व सतत ४२ वर्षे संपूर्ण जगभर एकच काम केले. गीतेतील पहिल्या अध्यायातील 'अर्जुनविषाद योग' यावर गुरूदेव स्वामी चिन्मयानंद दररोज १॥ तास असे सात दिवस बोलत. विषादाचे कारण - मूळ कारण मामका: या विशिष्ट शब्दात सामावले आहे. मी माझे हेच तर सर्व दु:खाचे मूळ आहे. मी व माझे या भावनांचा उगम वृत्तीचा म्हणून या अहंकारात आहे आणि हाच व्यक्तीच्या आत्मोन्नतीच्या मार्गावरील फार मोठा अडसर आहे. येथपासूनच अर्जुनाच्या प्रश्नचिन्हांना सुरुवात आहे. मी-माझे आप्तस्वकीय गुरूजन वगैरे वगैरे सर्व वर्तुळात तो फिरत राहिला आहे. गुरूदेव स्वामी चिन्मयानंद यांनी पहिल्या अध्यायातील ४७ श्लोकांवर जे भाष्य केलेले आहे ते मूळ इंग्रजी भाषेत असल्याने संपूर्ण जगभर भारतीय धर्माच्या मूळ तत्त्वांचा प्रचार झाला आहे. पुराणकाळी धर्मग्रंथाच्या प्रत्येक अध्यायाचा शेवट एखाद्या खुणेने दाखविला जात असे. गीता म्हणजे सर्व उपनिषदांचे सार. श्रीमत् भगवत गीतेलाच उपनिषद समजले गेले व गीतेचा प्रत्येक अध्याय म्हणजे एक उपनिषदच आहे व या दिव्य गीतातील पहिले उपनिषद म्हणजे अर्जुनविषाद योग. श्रीकृष्ण म्हणजे प्रत्यक्ष परमेश्वर व मर्त्य मानव म्हणजे अर्जुन व संपूर्ण गीता हा परमेश्वर व मानव यातील संवाद. गीतेचा अभ्यास करण्यासाठी - अर्जुन स्थिती - विषाद योगाची सुरुवात होते. गीतेचा दुसरा अध्याय म्हणजे सांख्ययोग. गुरूदेव स्वामी चिन्मयानंदांचे वैशिष्ट्य म्हणजे त्यांनी प्रत्येक अध्यायाच्या प्रस्तावनेतच खूप सुंदर त्या त्या अध्यायातील संपूर्ण तत्त्वज्ञानाचे धावते समालोचन केले आहे. आमच्या मान्यताप्राप्त अनेक तत्त्ववेत्त्यांचे तत्त्वज्ञान याचे विवेचन केले आहे. ख्रिस्तपूर्व ५००० वर्षे हिंदू संस्कृतीचे चुकीचे अर्थ लावल्याने समाज अधोगतीत गेला व त्यामुळे तीच धर्मशास्त्रे त्या त्या वेळच्या लोकांना समाजातील अशा भाषेत सांगणे ही काळाची गरज आहे व त्याप्रमाणे ७०० वर्षांपूर्वी ज्ञानेश्वरांनी त्या काळातील लोकांना समजेल असे गीता तत्त्वज्ञान सांगितले. विवेकानंदांनंतर गुरूदेव चिन्मयानंदांनी विसाव्या शतकातील समाजाला समजेल अशा तऱ्हेने गीतेतील भाष्ये केली. गीतेचा दुसरा अध्याय म्हणजे सांख्य योग. सांख्य तत्त्वज्ञानाची मांडणी अत्यंत शास्त्रशुद्ध आहे व ती हल्लीच्या आधुनिक मानवाला व विज्ञान युगाला सर्वात जास्त पटण्यासारखी आहे. सांख्य तत्त्वज्ञानाचेही दोन विभाग - एक कपिल व दुसरा पतंजली. या अध्यायात गुरूदेवांनी गीतेतील संपूर्ण तत्त्वज्ञानाचे सारच सांगितले आहे. पहिल्या दहा श्लोकात अर्जुन श्रीकृष्णाला शरण जातो व ११ व्या श्लोकापासून ते ४६ श्लोकांपर्यंत सांख्य तत्त्वज्ञानाचा सारांश आढळतो व कर्मयोगाची संपूर्ण रूपरेखा ४७ ते ६० श्लोकामध्ये पहावयास मिळते व ६१ ते ७० श्लोकात भक्तिमार्गाचे दर्शन घडते. भगवान श्रीकृष्ण दुसऱ्या अध्यायात या वर्तुळाचा आणि परिघाचा आणि तुझा कसा संबंध आहे, केंद्रबिंदू कोण आहे हे सांगताना तू स्वत:ला तू समजतोस तसा नाहीस तर तू आत्मस्वरूप आहेस आणि त्या निमित्तानी भगवान श्रीकृष्णांनी अत्यंत सुरेख शब्दात समर्पक शब्द योजले आहे : 'न जायते न म्रियते' हा श्लोक बघा. आपल्याला जन्म नाही - मरणही नाही मग मरण कुणाला तर देहाला ओळखणारा तू या देहापासून भिन्न आहेस. वस्तूला ओळखणारा हा त्या वस्तूहून निराळा असतो, हा सिद्धान्त आहे. देह सोडताना जुना देह टाकून नवा देह घेतला जातो. त्यात दु:ख वाटून घेण्यासारखे काय आहे. कपडा जुना झाल्यावर, जीर्ण झाल्यावर आपण किती सहजतेने हौसेने दुसरा घेतो. तसेच हा आत्मा नवीन देह धारण करतो. जो जन्माला आला तो कधीतरी मरणार आहे आणि जो मरणार आहे तो परत जन्माला येणार, हे निश्चित. सृष्टीचा तो नियम आहे. उपजणारे असते ते नाश पावणारे आहे. देहात रहाणारा परमात्मा हा नेहमी अस्ती स्वरूपात आहे. देह बदलल्याने आत्मा बदलला असे होत नाही. कारण त्यात बदलही नाही व वाढही नाही. हेच

तत्त्वज्ञान भगवान श्रीकृष्ण अनेक मार्गांनी पटवून देत आहेत. कर्म करणे हा तुझा अधिकार. कर्मफळाची आशा किंवा त्याबद्दल अमूक प्रकारचे फळ किंवा आशा ठेवता येणार नाही. कारण फलदाता ईश्वर आहे. प्रत्येक शतकात त्या त्या वेळच्या समाजाला समजेल अशा भाषेत अनेक संतांनी गीतेचे अर्थ लावले. गुरूदेव चिन्मयानंदांनी तिसऱ्या अध्यायात कर्मयोग यावर रूचेल-पचेल व समजेल अशाच प्रकारे कर्मयोगावर मार्गदर्शन केले आहे. गुरूदेव चिन्मयानंद म्हणतात, भारताच्या तत्त्वज्ञानाचे शिक्षण हे गुरू व शिष्य ह्यांच्या संवादरूपाने व्हावे. जगातील इतर कोणत्याही धर्मात शिष्याला गुरूबद्दल मतभेद व्यक्त करण्याचे, चर्चा करण्याचे स्वातंत्र्य नाही. परिपूर्णतेचा अनुभव येण्यासाठी निश्चित कोणत्या मार्गाचा अवलंब करावा हा प्रश्न. कर्म करण्यास कोण प्रवृत्त करते. व्यक्तीला कर्म करायला कोण भाग पाडते. भगवान श्रीकृष्ण सांगतात की प्रकृती तुम्हाला सर्व कर्म करण्यास लावते. कर्म न करता कोणीही राहू शकत नाही. या कर्मफळाच्या योगाने व्यक्ती निरनिराळे देह धारण करते. आपले हित साधून घ्यावयाचे असेल तर हे नैष्कर्म स्वरूपात आले पाहिजे. त्यासाठी सर्व कर्म-अकर्म-विकर्म-नैष्कर्म्य आदींचे स्पष्टीकरण या अध्यायात आहे. 'गीतेच्या या अध्यायात एकूण ४३ श्लोक आहेत. गीतेची शिकवण ही जीवनाची योग्य रितीने जीवन जगण्याची कला असे गुरूदेव चिन्मयानंद म्हणतात.

गीतेचा ४ था अध्याय म्हणजे ज्ञानकर्म संन्यास योग असा आहे. या अध्यायात एकूण ४२ श्लोक आहेत. गुरूदेव स्वामी चिन्मयानंद यांनी या अध्यायाची प्रस्तावनाच मोठी विस्मयकारक अशी केली आहे. तिसऱ्या अध्यायात श्रीकृष्णांनी कर्मयोगाच्या स्वरूपात एक क्रांतीकारक विचार अर्जुनाला सांगितला. हा सांगिलेला विचार नवीन नसून आपल्या सनातन-पवित्र-वैदिक शास्त्राचा पुन्हा अर्थ लावून तो सांगितला आहे. अर्जुनाच्या दृष्टीने भगवान श्रीकृष्ण हे केवळ त्याचे आत्येबंधू-मित्र होते. अर्जुनाच्या मनात सारथी बनलेल्या श्रीकृष्णाबद्दल आदर व पूज्य भाव उत्पन्न करावयाचा आहे. या दृष्टीने सर्वज्ञ व सर्व शक्तीमान ईश्वरी स्वरूप दाखवून अर्जुनाला उपदेश करणारे श्रीकृष्ण यांनी या अध्यायात ज्ञानमार्गाची शिफारस केलेली आहे. तेच कर्म ज्ञानाने जाणून घेऊन कसे करावयाचे यासाठी ज्ञानकर्म संन्यास योग सांगितला. आता एक एक पायरीने हळूहळू अर्जुनाच्या मानसिक स्थितीत बदल घडवून आणीत आहेत. प्रथम कर्म करण्यास सांगतात. नंतर अकर्म - नैष्कर्म्य नंतर ते सर्व जाणून उत्तम प्रकारे कर्म करण्यास सांगतात. येथपर्यंत देह धारण करावयास लावणारे प्रमुख कारण कर्म आणि नंतर या नरदेहात येऊन आत्मोन्नती करून घेण्याचा मार्ग सांगतात आणि तेच श्रेयस्कर असे सांगण्यास अर्जुनाने श्रीकृष्णांना विनंती केली. जाता जाता एक सिद्धान्त सहजसोप्या भाषेत अर्जुनाने सांगितला. 'शिष्यस्ते हम् शाधि याम् प्रपन्न' आपल्या संस्कृतीचा महान दंडक ज्ञान मिळविण्याचा.

पाचवा अध्याय कर्मसंन्यास योग. यामध्ये २९ श्लोक असून गुरूदेव स्वामी चिन्मयानंद यांनी जे भाष्य केले आहे ते खूपच सुंदर व भावातीत आहे. कर्मयोग आणि संन्यास दोन्ही मार्ग भिन्न नाहीत. कोणत्याही एकाचे आचरण केले असता मिळणारे फळ एकच आहे आणि तोच उद्देश साधला जातो. अध्यात्मिक साधनेच्या जीवनात कर्माला काही स्थान आहे किंवा नाही, कर्मयोग व संन्यास योग या दोन्हीपैकी कोणता मार्ग अधिक चांगला - अधिक उदात्त व श्रेष्ठ आहे अशी विचारणा अर्जुनाने केली आहे. अर्जुनाला कर्म म्हणजे यज्ञ-याग-होम-हवन आणि वैदिक कर्मकांडे आणि संन्यास म्हणजे सर्वसंगपरित्याग करून हिमालयासारख्या गिरीकंदरात जाऊन कर्म न करता आत्मक्लेशाचे जीवन जगणे असे वाटत होते. गुरूदेव चिन्मयानंद यांनी श्लोकांचे विवेचन करताना जी उदाहरणे दिली ती अतिशय अप्रतिम आहे. भगवद् गीतेतील प्रत्येक श्लोक जीवन सुंदर तऱ्हेने जगण्याची कला शिकवतो. जेव्हा फूल पक्क होऊन फळ बनते तेव्हा फुलाचा निश्चितच नाश असतो. खरोखर फळाच्या मूलतत्त्वाने काढलेली परिपूर्णता म्हणजेच फळकर्माचा संन्यास मनाने झाला पाहिजे. बाह्यतः कर्म टाकले म्हणजे संन्यास झाला असे नाही.

सहावा अध्याय म्हणजे ध्यान योग. यात ४७ श्लोक आहेत. गुरूदेव चिन्मयानंद म्हणतात, या ६ व्या अध्यायाने आपण गीतेतील एका विचार योजनेच्या शेवटाशी येत आहे. अठरा अध्यायाचे सहा सहा अध्यायाचा एक असे तीन गट पाडले आहेत. ध्यानाच्या प्रक्रियेने हे सर्व कसे केले जाते हा सहाव्या अध्यायाचा मुख्य विषय आहे. प्रत्येक श्लोकातील विचार त्यांचे विश्लेषण विवेचन समजावून घेऊन आपल्यातील समजलेल्या उणीवा टाकून देऊन आपण सद्गुणी आणि समर्थ जीवनात वृद्धिंगत होऊ, अशी साधने देण्याचे आश्वासन हा अध्याय देतो, असे गुरूदेव सांगतात. यातील एकच महत्त्वाचा श्लोक विचारासाठी घेऊ या.

*'उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत*
*आत्मैव ह्यात्मनो बन्धुरात्मैव रिपुरात्मनः' (गीता ६-५)*

मानवाने स्वतःचा उद्धार स्वतः आत्म्यानेच करावा आणि त्याने स्वतःला अधोगतीत आणू नये. कारण हा आत्माच केवळ आपला स्वतःचा मित्र व आत्माच केवळ आपला शत्रू आहे.

ह्यासाठीच तर आचार्यांचे सर्व विवेचन झाले. आत्मसंयमन करून आपली उन्नती आपणच करत श्रेयत्वाची प्राप्ती ह्याच देहाने करून घ्यावयाची आहे.

गीतेचे हे सहा अध्यायाचे अगदी थोडक्यात मला समजलेले विचार गुरूदेव कृपेने मांडण्याचा प्रयत्न केला आहे. पूर्वतयारी म्हणून हे सहा अध्याय खूप महत्त्वाचे आहेत. तसा विचार केला तर संपूर्ण गीता हे जगण्याचे शास्त्र आहे. तत्त्वज्ञान आहे आणि तत्त्वज्ञान आचरणात आणण्याचे उपाय सांगितले असल्याने गीता ही आपल्या सर्वांसाठीच आहे, हाच विचार मनात दृढ होतो. सहाव्या अध्यायाचा वारंवार अभ्यास केल्यास खऱ्या साधकाला ध्यानाच्याद्वारे सर्वोच्च पदापर्यंत पोहोचण्यास खरोखरीच यथोचित मार्गदर्शन मिळू शकते व म्हणून या अध्यायास 'ध्यानयोग' असे नांव दिले आहे असे परमपूज्य गुरूदेव स्वामी चिन्मयानंद म्हणतात.

'ॐ तत सद्' हरि ॐ ।

**सौ. सुनीता प. वावळे**

संदर्भ : Holy Geeta

चिन्मयानंदांचे इंग्रजी पुस्तक १ ते ६ अध्याय. मराठी भाषांतर केलेले भाषांतर (गुरूदेवांच्या पुस्तकाचे)

पादपानां भयं वातात् पद्मानां शिशिराद् भयम् ।
पर्वतानां भयं वज्रात् साधूनां दुर्जनाद् भयम् ॥

नास्ति विद्यासमं चक्षुर्नास्ति सत्यसमं सुखम् ।
नास्ति क्रोधसमं दुःखं नास्ति त्यागसमं सुखम् ॥

# गुरूदेव स्वामी चिन्म... अध्याय ७ ते १२ वरी...

श्री. नारायण रामचंद्र अवसणे

*रेडिओ इंजिनिअर एम.ए. (इतिहास). C. W. P. R. S. मधून निवृत्त. भारत इतिहास संशोधन मंडळ गेले ३० वर्षे कार्यरत. विज्ञान भारती, भारत इतिहास संकलन समिती, अनेक संस्थांमध्ये कार्यरत. ५ पुस्तके प्रकाशित. विद्यालय, महाविद्यालय यांत अनेक व्याख्याने.*

## अध्याय सातवा : ज्ञानविज्ञान योग

श्रीमद्‍भगवतगीता ही एकूण १८ अध्याय व ७०० श्लोकामध्ये विभागलेली आहे. या अध्यायाचे परिशीलन केले असता वैचारिक दृष्ट्या तिचे स्थूलपणे प्रत्येकी सहा अध्यायाचे असे तीन विभाग पडतात. अध्याय १ ते ६ हा पहिला विभाग. अध्याय ७ ते १२ हा दुसरा विभाग व तेरा ते १८ हा तिसरा विभाग. यापैकी गुरूदेव स्वामी चिन्मयानंद यांनी भाष्य केलेल्या त्यांच्या 'Holy Geeta' यावरील अध्याय ७ ते १२ या दुसऱ्या विभागावर गुरूदेवांचे मूळ इंग्रजीमध्ये सांगितलेले विचार मी अगदी साररूपाने मांडण्याचा अल्पसा प्रयत्न करीत आहे.

गुरूदेव स्वामी चिन्मयानंदांनी गीतेच्या प्रत्येक अध्यायाची प्रस्तावना इतक्या अद्‍भुत रीतिने लिहिली आहे की, ती वाचताच सर्व अध्याय अभ्यास करण्याचा मोह प्रत्येकाला निर्माण व्हावा, असे गुरूदेव चिन्मयानंद म्हणतात. या गीतेमध्ये भगवंतानी जे तत्त्वज्ञान प्रतिपादले आहे ते वेद-उपनिषदे-श्रुती-पुराणे इत्यादी वाङ्मयामधून आधीच सांगितले गेलेले आहे. भगवत गीता या ग्रंथाचे महत्त्व काय ? याचे उत्तर गुरूदेव चिन्मयानंद अगदी यथार्थपणे व चपखळपणे देतात. ते म्हणतात, त्या प्राचीन ग्रंथाच्या गाभ्याचे एक प्रकारे पुनर्बोधन केलेले आहे. वेदोपनिषदातील ठिकठिकाणी विखुरलेले तत्त्वज्ञान त्यांनी ह्याचे एकत्रीकरण करून सुसंगत व प्रसंगोपात्त असे सांगितले आहे. वेदकाळातील संस्कृत भाषा व संस्कार काळाच्या ओघात प्राय: लुप्त होत चालले होते. या शिवाय समाजाच्या सर्व वर्गाला मुक्तपणे ते मिळताही नव्हते. या सर्व त्रुटी ध्यानात घेऊन ते तत्त्वज्ञान स्त्री-शुद्रादी सर्वांना भेदभाव न बाळगता भगवंतांनी अर्जुनाला निमित्त करून सांगितलेले मूळ संस्कृतामधील तत्त्वज्ञान गुरूदेव चिन्मयानंदांनी इंग्रजी व सर्वांना समजेल-रुचेल-पटेल अशा सोप्या भाषेत सांगून संपूर्ण जगभर-गीतेचा प्रचार केला. हे दिव्य गीत ते तूच आहेस तत्-त्वम्-असि ह्या महावाक्यातील सत्य व्यक्त करते.

महावाक्ये एकूण चार. ती प्रत्येक वेदातून एक अशी घेतलेली आहेत. ह्यापैकी ते तूच आहेस या वाक्याला उपदेश वाक्य म्हणतात. पहिल्या सहा अध्यायात तू (त्वम) याचे महत्त्व सांगितले आहे. दुसऱ्या सहा अध्यायात ते (तत्) याचे स्पष्टीकरण सापडते व तिसऱ्या सहा अध्यायात आहेस (असि) या संज्ञेचे स्पष्टीकरण येते. भगवत गीता ही स्वयं भगवंताच्या मुखातून स्रवली असल्यामुळे ती वेदाहून अधिक पवित्र आहे. हे ज्ञान सर्वांना खुले करण्यास गुरूदेवांनी जी सुरुवात केली त्या तत्कालीन किंवा नंतरही काही दुढाचार्यांनी या कृतीला आव्हान दिलेले नाही. गुरूदेव चिन्मयानंदांनी पूर्वीच्या काळात घेतल्या गेलेल्या आक्षेपांचा त्यांच्या प्रवचनांमधून व ग्रंथांमधून सविस्तर व समाधानकारक उत्तरे देऊन पूर्वी घेतले गेलेल्या आक्षेपाचे पूर्ण निरसन केले. म्हणूनच गुरूदेव स्वामी चिन्मयानंद हे प्राचीन ऋषीप्रमाणेच द्रष्टे होते, यात काहीच संशय नाही.

६ व्या अध्यायामध्ये भगवंतानी अर्जुनाला ध्यान व एकाग्रता यांच्या सहाय्याने आत्मसाक्षात्कार करून घेण्याचा मार्ग दाखविला. सर्वांत श्रेष्ठ साधक कोण ? यावर भगवंतानी स्वत:चे मत सांगितले. त्यानुसार भिन्न भिन्न मार्ग अनुसरणाऱ्या निरनिराळ्या साधकात श्रेष्ठ तोच की जो आत्म तत्त्वास एकाग्र करण्याचा प्रयत्न करणारा व ध्यानी हा सर्व इंद्रीयभोगांचा अव्हेर करणाऱ्या तपस्यापेक्षा किंवा अध्यात्मिक ग्रंथाचे सखोल व सुबुद्ध परिशीलन करणाऱ्या ज्ञान्यापेक्षा किंवा नि:स्वार्थपणे समाजसेवेला वाहून घेतलेल्या कर्म (योग्या)पेक्षा अधिक श्रेष्ठ असतो. पूज्य गुरूदेव यावर भाष्य करताना पुढे म्हणतात, 'की अनित्य सीमित, अपूर्ण व मर्त्य मनबुद्धी असलेला मनुष्य अनंत-अमर्याद अशा तत्त्वाला कधीतरी कवटाळू शकेल काय ?' अशी शंका अर्जुनाला येईल हे जाणून सातव्या अध्यायाची सुरुवात 'मय्यासक्तमना' त्याला हे पार्था माझ्या ठिकाणी मन आसक्त ठेवून व माझ्या आश्रयाने योगाचे आचरण करीत असताना तू मला पूर्णपणे व नि:संशय कसे जाणू शकशील याचेच सविस्तर विवेचन सातव्या अध्यायातील ३० श्लोकात केलेले आहे.

या अध्यायाचा उपसंहार करताना असे थोडक्यात म्हणता येईल की, वेदकाळात जे समाजाच्या उपयोगी तत्त्वज्ञान सांगितले त्याचा प्रभाव महाभारत काळापर्यंत पुढे क्षीण झाला होता व म्हणून वेदांताच्या परिपूर्णतेसाठी साधकांनी कसे जगावे व काय करावे हे ह्या अध्यायात सांगितले आहे व म्हणूनच याचे नाव ज्ञानविज्ञान योग असे सांगितले आहे.

## अध्याय आठवा

## अक्षरब्रह्म योग

गुरूदेव स्वामी चिन्मयानंदांची या अध्यायांची प्रस्तावनाच मोठी मनोहर अशी आहे. ते म्हणतात शाश्वत अशा परमतत्त्वातील श्रेष्ठ व कनिष्ठ प्रकृति यांच्यामधील विवेक जो जगतो, परा प्रकृतिशी तादात्म्य पावतो नश्वर जगातील भीती व दु:खे यातून जो मुक्त झालेला असतो असा ज्ञानी पुरुष या पृथ्वीतलावरील साक्षात ईश्वर होय. असा ज्ञानी मनुष्य घडविणे हेच वेदांताचे ध्येय आहे, असे ७ व्या अध्यायाच्या विवरणामध्ये सविस्तरपणे सांगून हीच संगती ८ व्या अध्यायात पुढे चालू ठेवलेली आहे. असा माणूस परिपूर्ण होतो ते केवळ त्याला आत्मतत्त्वाचे ज्ञान झाल्यामुळे व त्याच्या अनुभूतीमुळेच नव्हे तर यामुळे त्याचे जीवन सर्वच स्तरांमधून व त्याचा जगाशी येणारा संपर्क यामधून त्याचे परिपूर्ण व एकसंघ व्यक्तिमत्त्व पूर्णत्वास पोचून कोणत्याही परिस्थितीत, कोणत्याही स्थळी व कोणत्याही काळी असा माणूस स्वत:ची क्षमता व समतोलत्व सहज सिद्ध करू शकतो. याचा त्याला दैनंदिन जीवनात अत्यंत उपयोग होतो. तो यशस्वी होतो. हे सामान्य मनुष्याला पटविण्यासाठी खुद्द भगवंताचे उदाहरण मोठे चपखल आहे. जसे गोकुळात गाई वळण्याचे काम असो वा गोपींबरोबर क्रीडा असो वा रुक्मिणीहरण असो, कंसचाणूर मर्दन असो, कृष्ण शिष्टाई असो, आते भाऊ शिशुपालाचा वध असो वा महाभारत युद्धातील नरसंहार असो भगवंताने सर्वांना मुक्ती दिली आहे. त्यामध्ये व्यक्तिदोष

आणलेला नाही. याचे कारण 'समत्वं योगमुच्यते' हे नुसते पांडित्य नाही तर त्याचा तो विनीयोग आहे व सर्वांमध्ये भरलेले आत्मतत्त्व हे एकच आहे हे व जाणून हा निर्विकारपणा आलेला आहे व म्हणूनच या आठव्या अध्यायाच्या ५ व्या श्लोकातील गुरूदेवांचे विवरण मोठे सुंदर आहे.

'अन्तकाळे च मामेव' अध्याय ८, ५ वा श्लोक ही युक्ती भगवान अर्जुनाला उपदेश करून सांगतात. तसेच अर्जुनाने या अध्यायाच्या सुरुवातीस ब्रह्म-अध्यात्म कर्म अधिभूत-अधिदैव-अधिमंत्र व प्रयाण काळाच्या समर्थाच्या संबंधी प्रश्न विचारले. त्याचे सविस्तर उत्तर भगवंतांनी या अध्यायात सांगितले आहे. तसेच मृत्यूसमयी दक्षिणायन, उत्तरायण, शुक्लपक्ष, कृष्णपक्ष इत्यादी व देह विसर्जन झाल्यावर मनुष्याला कोणती गती प्राप्त होते याचे विवरणही केले आहे. मृत्यू जवळ आला असता मनुष्याने नेमके काय करावे याचे मार्गदर्शन या अध्यायाच्या दहाव्या श्लोकात 'प्रयाणकाले मनसाचलेन' या श्लोकाद्वारे केले आहे.

तसेच २८ श्लोकांच्या या अध्यायाचा उपसंहार करताना भगवंतांनी अर्जुनाने विचारलेल्या प्रश्नाची उत्तरे परमेश्वरातील दिव्य प्रेरणेच्या उत्कृष्ट स्तरावर जावून शरीर त्यागाच्या समयीच्या दिव्य अनंत तत्त्वाशी कशी एकरूपता साधावी याचे सुरेख वर्णन केले आहे. त्याचप्रमाणे केवळ देहांतराच्या क्षणी कित्येक वेळा असे स्मरण राहत नाही म्हणून हे विस्मरण होऊ नये यासाठी आपली जीवनशैलीच अशी ठेवावी म्हणजे हे स्मरण नित्यनेमानेच करावे म्हणजे विस्मरणाची शक्यता अत्यंत कमी होते व मग जीवाला अशाश्वत अशा दुःखालयात घेऊन जाणारा दुसरा जो क्षर मार्ग आहे तो टळेल व मनुष्य 'अक्षर ब्रह्म' योगाप्रत पोचेल असे सांगितले आहे.

## अध्याय ९ वा

## 'राजविद्या राजगुह्य योग'

या नवव्या अध्यायात एकूण ३४ श्लोक असून गुरूदेव स्वामी चिन्मयानंदांनी नेहमीप्रमाणेच याची प्रस्तावना गीतेची गोडी उत्तरोत्तर वाढत जावी अशा दृष्टीनेच केलेली आहे. या अध्यायाचे विवेचन गुरूदेवांनी खूपच प्रभावी होईल असे केले आहे. ते म्हणतात, 'महाभारत काळ हा रामायण काळानंतर सुमारे एक हजार वर्षांनी असावा याचे एक कारण म्हणजे महाभारताच्या विशाल संहीतेमध्ये प्रभू रामचंद्रांची चाळीसावी पिढी या युद्धात दाखल झाली असा उल्लेख आहे.' सातव्या अध्यायापासून पुढे श्रीकृष्ण आपल्या वचनांनी दृढ वचनांचे वाढते धैर्य कसे जोडावे व आपला नवा धर्म कसा आचरावा हेच अर्जुनाला सांगत आहेत. त्यांनी जे सांगितले त्याला अंधविश्वास ठेवावा असा कोठेही आग्रह धरलेला नाही. उलट वैदिक निष्ठा व वेदान्ताने पुरस्कारलेल्या परिपूर्णतेच्या मार्गासंबंधी का व कसे या बाबतीत तर्कशुद्ध युक्तीवाद या नवव्या अध्यायातून कठोर मूल्यमापन करून चालू ठेवला आहे.

या रामायण काळानंतरच्या दीर्घ काळपर्यंत वेदोक्त धर्म जरी लुप्त झाला नव्हता तरी त्याला एक प्रकारचे क्षीणत्व, मलीनत्व वा शैथिल्य प्राप्त झाले होते. कृत-त्रेता-द्वापार युग संपून कलीयुग जवळ आले होते. भगवत गीतेच्या मांडणीनंतर भारतातील समाजजीवनात पुन्हा एकदम जे चैतन्य बरेचसे विस्कळीत झाले होते त्याचे कारण महाभारत युद्धातील व यादवांच्या यादवी युद्धातील प्रचंड नरसंहार व त्यानंतर पुन्हा एक प्रकारे पुनरुत्थान सुरू झाले असे म्हणावे लागेल.

मन्मना भव मद्भक्तो हा शेवटचा या अध्यायातील श्लोक हा या संपूर्ण अध्यायाचा सारांश आहे. गुरूदेव स्वामी चिन्मयानंद या अध्यायाचा उपसंहार करताना भाष्य करतात की, श्रीकृष्ण अर्जुनाला अभिवचन देतात की, याप्रमाणे जेव्हा तू मला आपले सर्वश्रेष्ठ ध्येय म्हणून मानशील तेव्हा तू माझ्याप्रत येशील त्यानुसार या अध्यायाला राजविद्या (श्रेष्ठ विद्या) व राजगुह्य (श्रेष्ठ व गहनतम विद्या) असे अगदी समर्पक नाव दिले आहे. उपनिषदात यालाच दुसऱ्या ठिकाणी ज्ञानाचे ज्ञान असे म्हटले आहे.

## अध्याय दहावा विभूति योग

या विभूतियोग नावाच्या दहाव्या अध्यायाला ४२ श्लोक असून गुरूदेव चिन्मयानंदांनी आपल्या प्रासादिक व ओघवत्या भाषेत प्रतिपादन केले आहे. ते अध्यायाच्या प्रस्तावनेत म्हणतात की, आपण वेळोवेळी पाहिले की, श्रीमद् भगवत गीतेतील प्रत्येक अध्यायात वेगवेगळी नावे असली तरी सर्वांमधील विचारांचे सूत्र एकच एवढेच नव्हे तर प्रत्येक अध्यायाच्या उपसंहारातून पुढील अध्यायातील प्रतिपादित विषयाची बीजे रुजलेली आहेत. इतकी पद्धतशीर मांडणी गीतेमध्ये आहे की, जणूकाही एखाद्या आधुनिक प्रबंधाचीच मांडणी आहे व अठरा अध्याय म्हणजे अठरा रत्ने एकाच सूत्रात ओवलेली जणू रत्नांची माळच आहे.

या पद्धतीला अनुसरून नवव्या अध्यायामध्ये अनंताचे श्रेष्ठत्व व कनिष्ठ प्रकृतीचे वर्णन, तसेच मीच (भगवंत) या चराचा विश्वाचा निर्माता, पालनकर्ता व संहारकर्तापण आहे व माझ्यापलीकडे काहीही नाही असे भगवंत सांगतात. हे सर्व चराचर विश्व माझ्यामध्येच आहे. माझ्याशिवाय या विश्वाला अस्तित्वच नाही, असे प्रतिपादन करतात. वेदान्ताने प्रतिपादलेल्या ईश्वर तत्त्वाचा सिद्धान्त जेव्हा अशा प्रकारे पूर्णपणे समजावून घेतला जातो तेव्हा तो सर्व बुद्धीमान प्राण्यातील विवेक शक्तीला जावून भिडतो. परंतु हे सर्व सांगत असताना एखादे वेळेस अर्जुनाच्या आकलनाच्या पलीकडे जाईल कारण त्याला प्रत्यक्ष प्रमाण नाही.

म्हणून भगवंताच्याही मनात येते, तेवढ्यात अर्जुनच प्रश्न विचारतो, 'हे भगवान आपणच सर्व विश्वामध्ये चराचर सृष्टीचे कर्ते-धर्ते-संहारकर्ते आहात तर मग मी हे नित्य ध्यान करीत असता कसे जाणावे (केषु केषु च भविषु चिन्दोड ति भगवन्तया) (अध्याय १०, श्लोक १७) व मी कोणाला भजावे हे मला सांगावे.

यावर भगवंत खुलासेवर त्याला सर्व सांगतात व त्याच्या प्रतिनिधीक स्वरूपाचे वर्णन करतात. थोडक्यात सर्व भूतमात्रामध्ये आत्मतत्त्व हे मीच आहे, जसे आदित्यामध्ये विष्णु-नक्षत्रामध्ये चंद्र इत्यादी इत्यादी सांगत सर्व चराचर विश्वाचे बीज मीच आहे असे प्रतिपादन करतात.

अशा या विभूती योगाच्या सविस्तर कथनामधूनच अर्जुनाला हे सर्व चराचर त्याचा आदि-मध्य-अंत इत्यादी भगवंतामध्ये प्रत्यक्ष पहाण्याची इच्छा निर्माण झाली व पुढे ती पूर्ण केली. जगाचा अनेकविध प्रकारचा अनुभव घेत असताना मनुष्य सत् तत्त्वाचा शाश्वत स्वरूपाशी सतत संपर्क कसा साधू शकेल ? या अर्जुनाच्या प्रश्नाला या अध्यायात अनंत तत्त्वाच्या संबंधी अनेक श्लोक सांगून ते सर्व अर्जुनाला समजावून सांगितले आहे.

या अध्यायातील आणखी एक विशेष म्हणजे चराचरातील प्रत्येक वस्तूचा नामनिर्देश करून त्याचे पृथःकरण करून मी सर्वात आहे हे त्या रणधुमाळीत सांगणे व अर्जुनाच्या तथाकथित बुद्धीवाद व आकलन शक्तीचा विचार करता त्याला पटवून देणे अवघड आहे. हे जाणून प्रसंग-स्थळ-काळ परिस्थितीचा विचार करून त्यांनी त्याला शेवटी बहुनैतेन किं ज्ञानेन तवार्जुन ।। अध्याय ॥१॥ श्लोक ४२ ॥

असे सांगून या अध्यायाचा समारोप केला आहे.

## अध्याय अकरावा

## 'विश्वरूप दर्शन योग'

गुरूदेव स्वामी चिन्मयानंद त्यांच्या 'होली गीता' या इंग्रजीमधून केलेल्या प्रवचनात प्रतिपादन करतात की, मागील विभूती योगाच्या कथनाच्या दरम्यान अर्जुनाची विश्वरूप दर्शनाची जिज्ञासा पराकोटीची वाढली होती व भगवंतांनीसुद्धा

हे ओळखले होते. तसेच त्याली जर विश्वरूप दर्शन दिले तर त्याचा जबरदस्त मानसिक परिणाम होईल व अर्जुन भगवंताच्या पूर्णपणे अधीन होईल, हे ओळखले होते व म्हणून भगवंतसुद्धा अर्जुनाला विश्वरूप दर्शन दाखविण्यात उत्सुक होते. गुरूदेव म्हणतात, मागील अध्यायात आत्मतत्त्व हेच विविधतेच्या जगताचे अधिष्ठान आहे, हा महत्त्वाचा सिद्धान्त सिद्ध केला आहे. या विश्वरूप दर्शन योग अध्यायात सर्व काही आत्मतत्त्वामध्येच अस्तित्वात असते. याचे व्यावहारिक/प्रात्यक्षिक ज्ञान अर्जुनास देण्याचा प्रयत्न केलेला आहे. त्यासाठी घटाकाश-मठाकाश हे सारतत्त्व सांगितले आहे.

गुरूदेव म्हणतात, संपूर्ण चराचर विश्व हे एकाच तत्त्वाचे आहे व भगवान श्रीकृष्ण हेच त्याचे उत्पत्तीस्थान, स्थिती व लय याचे कारण आहेत. ही संकल्पना केवळ मनोकल्पनेद्वारे समजावून घेण्याइतपत उन्नत अवस्था अजून अर्जुनाची झालेली नव्हती. याशिवाय भगवान जरी अर्जुनाला सखा-मित्र इत्यादी अत्यंत लाडीक व जवळच्या स्नेहाने संबोधित होते तरीसुद्धा अर्जुनाला श्रीकृष्णाच्या विराट सामर्थ्याची एक झलक दाखविणे हे अंतिम परिणामत: साधण्याच्या व हिताच्या दृष्टीने आवश्यक आहे असेच भगवंताच्या मनात होते.

भगवंताच्या विश्वरूप दर्शनाशी व्याकूळ झालेल्या व त्यासाठी वारंवार प्रार्थना करीत असलेला अर्जुन व विश्वरूप दर्शनादरम्यान भयचकीत होऊन व्याकुळ झालेला अर्जुन तसेच नंतर भगवंताच्या प्रती लाडालाडाने बोलणारा अर्जुन यात किती जमीन-अस्मानाचा बदल झाला त्याचे तपशीलवार वर्णन स्वामी चिन्मयानंदांनी अत्यंत थोडक्यात पण परिणामकारक शब्दप्रभावाने केले आहे. अर्जुनाला स्वत:च्या पूर्वीच्या वागण्याची शरम वाटून तो पुन्हा पुन्हा क्षमा मागू लागला व हे विश्वरूप आवरून तुम्ही मला नेहमीसारखे दर्शन द्या, असे अर्जुन वारंवार म्हणू लागला.

भगवंतांनी विश्वरूप दर्शन सुरू केले पण ते त्याला दिसत नव्हते, मग भगवंतांनी अर्जुनाला दिव्य दृष्टी दिली, तेव्हा ते अर्जुनाला दिसू लागले. ज्ञानचक्षु उघडताच सत्य ज्ञान जाणता येते हा महत्त्वाचा सिद्धान्त या पासून लक्षात घेतला पाहिजे. चराचा सृष्टीचाच आपण होऊन भाग आहोत व हे सर्व तत्त्व एकच आहे आणि ते तत्त्व म्हणजेच 'आत्मतत्त्व' सत्-तत्त्व. त्याचप्रमाणे विराट पुरुषाची कल्पना सर्वसाधारण बुद्धिवादी मनुष्यास पटत नाही, त्यासाठी त्याला असे प्रत्यक्ष दर्शन व अनुभूतीची गरज असते. ती त्रुटी सर्वांच्या बाबतीत असल्याने ती पूर्ण झाल्यामुळे अर्जुन जसा बदलतो तसेच मानवाने बदलले पाहिजे.

व्यास महर्षींच्या या काव्यात या अध्यायामुळे इतकी नाट्यमयता व परिपूर्णता या वहाव्या अध्यायामुळे आली आहे. अर्जुनामधील आश्चर्य, विस्मय भय, आदर, भक्ती, पश्चात्ताप इत्यादी सर्व मानवी भावनांचा कमालीचा परिपोष अत्यंत उत्तम रीतीने साधला असून या अध्यायातील एकंदरीत संकल्पना मांडणी निवडक वेचक व वेधक शब्द रचना - मधूर शब्दसमूह, भाषा सौंदर्य उत्तम व उत्कृष्ट काव्यवृत्त इत्यादी गुणांनी गुरूदेव स्वामी चिन्मयानंदांनी व्यासांच्या या काव्याचे स्वरूप सर्व जगाला दाखविले आहे व त्यातही खऱ्या अर्थाने 'विश्वरूप दर्शन' म्हणणे योग्य आहे.

व्यष्टी स्थूल शरीराशी तादात्म्य पावलेले आत्मतत्त्व हेच जागृत अवस्थेतील घटनांचे अनुभव घेत असते व वेदान्तामध्ये या आत्मतत्त्वालाच 'विश्व' असे संबोधले आहे. त्यानुसार येथे भगवंतानी अती विराट स्वरूप दाखविले म्हणूनच या अध्यायास विश्वरूपदर्शन हेच नाव योग्य आहे, असे गुरूदेव स्वामी चिन्मयानंद यांनी प्रतिपादले आहे.

## अध्याय बारावा - भक्तियोग

गुरूदेव स्वामी चिन्मयानंद गीतेच्या भक्तियोग नावाच्या १२ व्या अध्यायाच्या प्रस्तावनेत म्हणतात की, मागील ११ व्या अध्यायाच्या शेवटी अर्जुनाच्या अंत:करणात राजाला उचीत अशी महत्त्वाकांक्षा जागृत केली. खऱ्या राजाला अधिक महान वैभव प्राप्त करून घेण्याचे आव्हान नाकारणे कठीण असते. अध्यायातील प्रत्येक श्लोकांच्या विस्तृत्व विवरणापेक्षाही गुरूदेव स्वामी चिन्मयानंद यांनी प्रत्येक अध्यायाची प्रस्तावनाच इतक्या विलक्षण रीतीने प्रस्थापित केली आहे की गीतेचा प्रत्येक श्लोक अभ्यास करण्याची इच्छा ती प्रस्तावना वाचणाऱ्याला होते. मागील म्हणजे अकराव्या अध्यायाच्या शेवटी या बाराव्या अध्यायाचे बीजारोपण केले आहे तो श्लोक असा आहे -

*'भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन*
*ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च परंतप ॥५४॥'*

या श्लोकात श्रीकृष्ण अर्जुनाला सांगतात की, हे परंतपा अर्जुना अशा प्रकारचा मी अनन्य भक्तीने जाणणारा व पाहणारा आणि माझ्या ठायी प्रवेश करण्यात ज्यामुळे शक्य आहे ते म्हणजे अनन्य भक्तीच.

हाच धागा पकडून पुढील १२ व्या अध्यायात भगवंत भक्तीयोगाचे पूर्ण निरूपण करतात. अध्यायाच्या पहिल्याच श्लोकात अर्जुनाने भगवंतांना प्रश्न विचारला,

*'एवं सततयुक्ता ये भक्तास्त्वां पर्युपासते*
*ये चाप्यक्षरमव्यक्तं तेषां के योगवित्तमा: ॥१॥१२'*

जे भक्त अशा प्रकारे सतत स्थिरचित्त आहेत व तुझी भक्ती करतात ते आणि त्याचप्रमाणे जो अविनाशी अव्यक्त तत्त्वाची उपासना करतात ते यापैकी कोणते योगी अधिक श्रेष्ठ आहेत ? अर्जुनाने हा प्रश्न अत्यंत सुबद्धपणे मांडला आहे. त्याला भगवंत उत्तर देतात की, आपले मन माझ्या ठिकाणी ठेवून जे सतत युक्तचित्त होऊन माझी उपासना करतात ते श्रेष्ठ भक्त आहेत. या अध्यायातील २० श्लोकांवर गुरूदेव स्वामी चिन्मयानंद यांनी केलेली टीका-टिपणी हा सर्वच भाग अत्यंत अद्‌भुत आहे. तो विस्तारभयास्तव देता येत नाही. यानंतर कर्मफळ त्यागाचे महत्त्व व तत्त्वज्ञान भगवान अर्जुनाला सांगताना म्हणतात की,

**'श्रेयोहि ज्ञानअभ्यासाज्ज्ञानाध्यानं विशीष्यते**
**ध्यानात्कर्मफल त्याग ---' ॥१२-१२॥**

अभ्यासापेक्षा ज्ञान असणे हे खरोखर अधिक चांगले. ज्ञानापेक्षा ध्यान अधिक योग्यतेचे. ध्यानापेक्षाही कर्मपरायण अधिक श्रेष्ठ कारण कर्मफलत्यागाने तत्काळ शांती प्राप्त होते. जरी या अध्यायाला भक्तियोग नाव दिले असले तरी तो वारंवार आत्मसात करणे म्हणजेच ईश्वराच्या खऱ्या भक्तीची मनात धारणा करणे. गुरूदेव चिन्मयानंद म्हणतात की, 'भक्तिमार्ग म्हणजे केवळ भावनात्मक विस्फोट नव्हे किंवा त्याचे भावनात्मक प्रदर्शन आपल्या कल्पनेप्रमाणे करणे नव्हे किंवा उच्छृंखल उन्मादही नव्हे तर कर्मफल त्यागाच्या भावनांच्या समर्पणाने व चिंतनाच्या उत्स्फूर्त क्षणांनी नूतन चैतन्य प्राप्त करून घेणे व स्वत:च्या व्यक्तिमत्त्वाचे आंतरिक विभाजन करून भगवंताला समर्पित होणे होय व असे भक्त भगवंताला प्रिय असतात.'

मी मांडलेले सर्व विचार सद्‌गुरू स्वामी चिन्मयानंद यांच्याच 'होली गीता' व त्याचे मराठी भाषांतर श्रीमद्‌भगवत गीता यामधून घेतलेले आहेत. सागरातून घेऊन सागरालाच समर्पण करण्याची माझी ही कृती आहे. माझी ही कृती परमपूज्य स्वामी चिन्मयानंद यांचे चरणीच समर्पित करीत आहे.

॥ ॐ तत् सत् ॥

श्री. ना. भा. अदमणे
शिवनाथ ४/१३१०, शुक्रवार पेठ, पुणे ४११००२.

# ानंदांच्या रोजनिशी

**प्रा. डॉ. अंजली माधव पर्वते**

*एम.ए. पीएच.डी. (संस्कृत) विषय, आध्यात्म रामायण एक चिकित्सक अभ्यास, गीताव्रती. गीता धर्म मंडळ. किसन वीर कॉलेज वाई, संस्कृत प्रपाठक. विवेकचुडामणी, नागानंद व प्रबोध चंद्रोदय (महाराष्ट्र राज्य साहित्य पुरस्कार) प्रतिमा व प्रसन्न राघव - टी.म.वि.चा कमल तांबे पुरस्कार. प्रसाद मासिकात संस्कृत साहित्यिकांच्या संदर्भात स्फुट लेख. आकाशवाणी सांगली 'प्रकाश किरण' व सातारा 'अक्षर धन' कार्यक्रमाचे लेखन. शंकराचार्य, समर्थ रामदास, कालिदास, रामायण, महाभारत यांवर विविध ठिकाणी भाषणे, शिवाजी विद्यापीठाचा गुणवंत पुरस्कार, संस्कृत भाषेच्या महत्त्वाविषयी विविध शाळांत भाषणे.*

## प्रास्ताविक

रोजनिशी - diary ही प्रत्येक व्यक्तीची सामान्यत: अगदी खाजगी मालमत्ता समजली जाते. कारण तिच्यामध्ये माणूस खाजगी जीवनातले काही प्रसंग, त्यावरील स्वत:च्या अगदी परखड प्रतिक्रिया नोंदवत असतो. अर्थात डायरीत फक्त एवढेच नसते तर काही आवडलेले विचार, काही वाचताना, विचार करताना मनात उठलेले भावतरंगदेखील डायरीत उतरविले जातात. काही महत्त्वाची टिपणे काढली जातात. अशा रीतीने डायरी ही केवळ व्यक्तिगत बाबींची नोंदवही न राहता खूप विषय अंतरंगात बाळगणारी 'विचारमंजूषा' देखील होऊ शकते. सामान्य माणसांच्या बाबतीत कधी कधी ती फक्त वैयक्तिक आयुष्याबाबत बोलणारी असली तरी मोठ्या माणसांच्या संदर्भात डायरीला सामाजिक, सांस्कृतिक, नैतीक अशा अनेक बाबींवरील त्यांचे चिंतन नोंदवणारी 'चिंतनिका' असते. त्यामुळेच ती त्यांची, त्यांच्यापुरती न राहता ती इतरांनाही मार्गदर्शक होऊ शकते. त्यांचा मोठेपणा कशात ? हे सांगणारी, उलगडून दाखवणारी, त्यांच्या स्वभावाच्या विविध पैलूंवर प्रकाश टाकणारी 'प्रकाशिका'ही ठरू शकते. Scraps and Bits या नावाने १९९१ साली चिन्मयानंदांच्या शिष्या श्रीमती नीरु यांनी प्रकाशित केलेली स्वामी चिन्मयानंदांची डायरी हे याचे उत्तम उदाहरण आहे.

स्वामी चिन्मयानंद - 'चिन्मय मिशन'चे संस्थापक. हिंदू धर्माचे आणि तत्त्वज्ञानाचे गाढे अभ्यासक, तत्त्वचिंतक म्हणून सर्वांना परिचित आहेत. संस्कृत भाषेतील तत्त्वज्ञान त्यांनी इंग्रजीमधून जगात सर्वदूर पसरविले. व्याख्यानांच्या आणि ग्रंथांच्या माध्यमातून हेही आपल्याला ठाऊक आहे. आ-बाल्यात, नवीन पिढीला हिंदुत्व व तत्त्वज्ञान कळावे यासाठी बालविहार स्थापणारे, चिन्मयानंद लोकांना ज्ञात आहेत. पण त्यांच्या डायरीतून भेटतात ते चिन्मयानंद प्रसन्न शैलीत, खेळकरपणे, खुसखुशीत शब्दांत ईश्वर, श्रद्धा, धर्म, शिक्षण, संस्कृती या विषयावर भाष्य करणारे अभ्यासक म्हणून !

## शैक्षणिक विचार

स्वत: उत्तम शिक्षक असल्यामुळे आणि शिक्षण कशाला म्हणतात याबाबतची स्पष्ट कल्पना असल्यामुळे सध्याच्या शिक्षण पद्धतीबाबतची त्यांची नाराजी डायरीत स्पष्ट होते. 'सध्याचे शिक्षण हे खरे शिक्षण नव्हेच. ते आहे केवळ Instruction या स्वरूपात ! शिक्षक हे शिक्षक (Teachers) न होता Instructurs केवळ सूचना देणारे होत आहेत', हे सांगताना ते परखडपणे म्हणतात, 'Today's Education is a fraud' याचमुळे आजच्या शिक्षकांना विद्यार्थ्यांकडून पूर्वीसारखा आदर दिला जात नाही, हे ते सखेद नमूद करतात. विद्यार्थ्यांना स्वत:वर संयम ठेवायला शिकवणे, त्यांच्या मनातल्या चुकीच्या कल्पनांची जाणीव त्यांना देणे, आपले गुण, दोष आणि मर्यादा ओळखायला शिकवणे या गोष्टी शिक्षकांनी करायला हव्यात अशी त्यांची अपेक्षा त्यांनी Scraps and bits मध्ये स्पष्टपणे व्यक्त केली आहे. स्वत:च्या उणीवांचे समर्थन करण्यासाठी आजचे शिक्षक 'धर्मशिक्षण नको' 'Scriptural study' नको असे सांगतात. Secularism चा निधर्मीपणाचा पुरस्कार करतात, अशी परखड टिप्पणी त्यांनी डायरीत केली आहे.

## शिक्षकाकडे आवश्यक गुण

'Mind to mind controntation is the secret of Education' असे सांगून विद्यार्थ्यांनी शिक्षकाकडून आपल्या शंकांचे निरसन आणि प्रश्नांची उत्तरे मिळवण्यासाठी त्यांच्या मागे लागले पाहिजे, अशी अपेक्षाही चिन्मयानंदांनी व्यक्त केली आहे. 'विवेकचूडामणी'वरील भाष्यातही तसे आग्रही प्रतिपादन त्यांनी केले आहे. शिक्षकाने विद्यार्थ्यापेक्षा आपण फार श्रेष्ठ आहोत, विद्वान आहोत असा दबादबा विद्यार्थ्यांच्या मनात निर्माण करण्यापेक्षा विद्यार्थ्यांना विषयाचे आकलन होण्यासाठी आवश्यक तो उत्साह स्वत:मध्ये निर्माण करण्याकडे लक्ष देणे त्यांना अधिक महत्त्वाचे वाटते. हाच विषय समजून घेण्याचा उत्साह शिक्षकाने विद्यार्थ्यांनाही संक्रमित करणे चिन्मयानंदांना आवश्यक वाटते. असा उत्साह ज्याच्याकडे आहे तो शिक्षक कोणत्याही प्रकारच्या बौद्धिक स्तरावरच्या विद्यार्थ्याला कितीही रुक्ष विषय असला तरी तो अतिशय कौशल्याने आणि प्रामाणिकपणे शिकवू शकतो हा त्यांचा विश्वास आहे. शिक्षकाने स्वत: वर्गातला सर्वात निष्ठावान विद्यार्थी असले पाहिजे असे ते आवर्जून सांगतात. शिक्षकाने स्पष्टवक्ता असले पाहिजे. बुद्धीला पटतील अशी ज्ञानसाधने त्याने विद्यार्थ्यांपुढे ठेवली पाहिजेत आणि विद्यार्थ्यात उत्साह जागवला पाहिजे, अशी त्यांची अपेक्षा आहे. ते स्वत: या प्रकारचेच शिक्षक असल्यामुळे 'आधी केले मग सांगितले' अशी त्यांची त्यामागची भूमिका आहे.

## संस्कृतीची संकल्पना

आत्मसंयम, नैतिकता या मूल्यांचे शिक्षण शिक्षणपद्धतीत दिले जाण्याची आवश्यकता वाटणाऱ्या चिन्मयानंदांनी संस्कार, संस्कृती यांचेही महत्त्व खूप वेगवेगळ्या प्रकारे सांगितले आहे. Scraps and Bits मधील त्यांचे 'संस्कृती' संदर्भातले विचार केवळ त्यांचेच नाही तर इतर तत्त्वज्ञांनी 'संस्कृती' बाबत काय विचार मांडले आहेत तेही त्यांनी diary त नोंदवले आहेत. 'संस्कृती'च्या खूप व्याख्या त्यांनी नोंदवल्या आहेत. 'Culture is a learned set of habits, ways of thinking and acting or lifestyles.' संस्कृती

म्हणजे सवयींची, रीतींची, विचारपद्धतींची, आचारांची आणि जीवनशैलींची सुव्यवस्थित, सुविहित मांडणी / चौकट अशी व्याख्या ते देतात तर 'संस्कृती म्हणजे अनेक महत्त्वाच्या घटकांपैकी असा घटक जो आपल्याला (माणसांना) एकत्र एका सुविहित समूहात राहण्याची संमती देतो. आपल्या विविध प्रश्नांना तयार उत्तरे / उपाय सुचवितो. दुसऱ्यांच्या वर्तनांचा अंदाज बांधायला मदत करतो आणि इतर लोकांना आपल्याकडून ते कशाची अपेक्षा करू शकतात याची कल्पना देतो', असेही मत व्यक्त करतात. याशिवाय इतर छोट्यामोठ्या व्याख्या देताना स्वामींनी हे ही नोंदवून ठेवले आहे की Krober व Klucholin यांनी या संस्कृतीबाबत जे जे चिकित्सक सर्वेक्षण केले त्या दरम्यान त्यांना 'संस्कृती' शब्दाच्या १६४ वेगवेगळ्या व्याख्या मिळाल्या.

## संस्कृतीचे ज्ञान

संस्कृती जाणून कशी घ्यायची ? हे सांगताना स्वामींचे उत्तर आहे - like a good language is learnt. जशी एखादी उत्तम भाषा शिकायची तशी संस्कृतीही जाणून घ्यायची. भाषेची उत्पत्ती, व्याकरण, उच्चारण, त्यातील वाक्‌प्रयोग, म्हणी, शैली वगैरे बारकावे जसे भाषाभ्यासात महत्त्वाचे तसेच संस्कृतीचीही उत्पत्ती, व्याप्ती, नियम, रीती-भाती अशा सर्व बारकाव्यांचा अभ्यास करणे आवश्यक आहे, असेच स्वामींना त्यातून सुचवायचे आहे. 'Ethos' या ग्रीक शब्दाचे रीती, सवयी वा चारित्र्य असे अर्थ सांगून हा संस्कृतीचा गाभा आहे. यालाच 'मूल्ये' असे नाव इतिहासकार आणि तत्त्वज्ञ देतात असे स्वामी नमूद करतात. प्रत्येक संस्कृतीची मूल्ये वेगळी असतात हे सांगताना चिन्मयानंदांनी अमेरिकन संस्कृतीत व्यक्तिस्वातंत्र्याला महत्त्व देतात आणि चिनी संस्कृती कुटुंबाला वा समाजाला महत्त्व देते असा मार्मिक फरक जाता जाता नोंदवला आहे.

## ईश्वराबाबतची मत मतांतरे

ईश्वर आहे की नाही ? ईश्वर कसा ? त्याच्यापर्यंत पोचण्याचा प्रवास कसा ? अशा सर्व बाबतीत चिन्मयानंदांचे काही विचार अतिशय मार्मिक आहेत. ईश्वराच्या अस्तित्वाबाबतच्या अनेक तत्त्वज्ञांच्या मतांची नोंद त्यांनी केली आहे. 'नित्शे' हा विचारवंत अहंकाराच्या आहारी जाऊन आत्मविश्वासाचा आव आणणाऱ्या उद्धट माणसांकडून ईश्वराची हत्या झाली आहे असे म्हणतो, तर एक जर्मन उपदेशक Kierkegard असा इशारा देतो की, जेव्हा जग व ईश्वर मित्र होतील तेव्हा ईश्वराचे महत्त्व नाहीसे होईल.' अशी मते नोंदवून स्वामी जो आणखी एका नास्तिकतेचा नमुना सांगतात तो त्यांच्याच शब्दांत वाचण्यासारखा आहे. ते म्हणतात - People are also too damn busy to worry about God at all. बिली ग्राहम ईश्वराचे अस्तित्व आपल्या व्यक्तिगत अनुभवाच्या आधारे मानतो, असे सांगून चिन्मयानंदांनी एका रोमन कॅथलिक नाटककाराचे मत नोंदवले आहे. त्याला जे लोक 'ईश्वर नाही' असे सांगतात ते सहा वर्षांच्या लहान मुलांसारखे वाटतात. ज्या मुलाला (passionate love) वैषयिक प्रेमा-सारखी गोष्ट त्याने अनुभवली नसल्यामुळे नाहीच असे वाटते. हे वाचत असताना स्वामी स्वतःही या त्याच्या मताशी सहमत असावेत, असे जाणवते. 'ईश्वर हा विश्वातील सर्व विषमतांच्या, विरोधाभासांच्या ओझ्याने दबलेला आहे.' असा विचार करणे अवघड वाटणाऱ्या एका ज्यू विचारवंतांचे मत स्वामींनी नोंदवले आहे. तो म्हणतो, 'It is easier for me to think of a world without creation than a creator loaded with all the contradietions of the world.'

## स्वामींची ईश्वरविषयक कल्पना

स्वामींनी स्वतः एके ठिकाणी 'ईश्वर हा आम्रवृक्ष आहे आणि संत हे आम्रफले आहेत. आम्रफलांची टोपली म्हणजे आम्रवृक्ष नव्हे. आम्रवृक्ष हा आम्रफळांचा निर्माता असतो. ईश्वर हाही असाच संतांचा निर्माता असतो', असे अतिशय खुसखुशीतपणे सुचविले आहे. त्यांचे शब्द आहेत - "God is the Mango tree. I am the mango in the basket before you. Why not call the basket of mangoes, a mango tree ! Nobody does. The Saint is the fruit infront of you. God is the tree in the garden that produces the fruits.' ईश्वराशी भांडणे शक्य नाही हे सांगताना ते सहज प्रश्न करतात 'चित्र कधी चित्रकाराशी भांडू शकेल ? भांडेल ?' आणखी एके ठिकाणी त्यांनी लिहिले आहे की, 'एक मुलगा रडतो की मी लपलो पण माझा मित्र मला शोधण्याचा जराही प्रयत्न न करता त्याच्या घरी पळून गेला. ईश्वरदेखील हेच म्हणतो की मी लपलेलो आहे पण कुणालाच मला शोधावेसे वाटत नाही.'

## ईश्वराची भूमिका

अशा ईश्वराचा स्पर्श झाला की अहंभाव आपोआप नाहीसा होतो हे सांगताना स्वामी सूर्योदय होताच नाहीसे होणाऱ्या धुक्याचा दृष्टान्त देतात. काही वेळा उपासनेने ईश्वराजवळ पोचत असताना अचानकपणे अडथळा आल्यासारखे, अडखळल्यासारखे होते. त्याचे कारण सांगताना चिन्मयानंदांनी जे उदाहरण दिले आहे ते मार्मिक आहे. हृद्य आहे. वडील जसे मुलाला चालायला शिकवण्यासाठी त्याच्यासमोर उभे राहून त्याचे दोन्ही हात धरून तो पडू नये अशा बेताने त्याला पावले टाकायला शिकवतात. तो मुलगा अगदी आपल्या जवळ आला की ते त्याचे हात सोडून पुन्हा थोडे पुढे होतात व पुन्हा पुन्हा ही कृती करतात. कारण त्यामुळे आपला मुलगा चांगल्या प्रकारे चालू लागेल हे त्यांना ठाऊक असते. ईश्वरही नेमके असेच करतो असे स्वामींनी सुचवले आहे. ईश्वर व त्याची प्रार्थना वेगळी आहे, असे मानणाऱ्या माणसाला स्वामी राजासमोर याचना करणाऱ्या याचकाची उपमा देतात आणि ईश्वर व ईश्वराची प्रार्थना वेगळी नाही असे मानणारा माणूस त्यांना राजाच्या त्या मुलासारखा वाटतो. जो त्यांच्या वडिलांच्या खजिन्यातून त्याला हवे ते घेऊ शकतो. ईश्वराला प्रत्येक जण आपआपल्या पद्धतीने वा स्वभावानुसार पाहू शकतो. कुणी प्रार्थनेतून, कुणी स्तुतीमधून तर कुणी रडण्यातूनही ! असे स्वामी सांगतात. ईश्वर हा साऱ्या जगाचे पवित्र असे आश्रयस्थान आहे. 'तद्धाम परमम्' असेही ते नमूद करतात. ईश्वराला किंबहुना परमात्मतत्त्वाला जाणायचे ते with bare hands उघड्या हातांनी, मोजे घातलेल्या हातांनी नव्हे ! मोजे घातलेल्या हातांनी जशी एखादी वस्तू व्यवस्थित पकडता येत नाही तसा ईश्वर हा परमात्माही गढूळ मनाने जाणून घेता येत नाही हेच यातून स्वामींनी मार्मिकतेने सुचवले आहे.

## श्रद्धा व धर्म

'श्रद्धा' म्हणजे मालकी हक्क नव्हे तर ती एक आकांक्षा आहे, आशा आहे. Its an attitude of Serenity amd lucidity धर्म म्हणजे काही विशिष्ट गोष्टींकडे पाहण्याचा एक मार्ग नव्हे तर तो सर्वच गोष्टींकडे पाहण्याचा विशिष्ट मार्ग आहे. असे स्वामी सांगतात, त्याचवेळी वेदान्तानुसार धर्म म्हणजे 'माणसाला पूर्णपणे जीवनाला सामोरे जाण्यासाठी तयार करणे' आहे हेही नमूद करतात. स्वतःच्या धर्माचा सखोल अभ्यास करणे आणि त्यातच स्थिर राहणे हा प्रगतीचा मार्ग आहे आणि त्यातूनच अन्य धर्मांना समजून घेणे, त्यांच्यातील चांगल्या तत्त्वांचा आदर करणे शक्य आहे, असे ते प्रतिपादन करतात. कुठलाही

धर्म कमी-अधिक महत्त्वाचा नाही. साऱ्यांचे ध्येय एकच आहे हे सांगताना ते वडाचे झाड व गुलाबाचे रोपटे असे उदाहरण देतात. दोन्हीही वृक्ष वेगवेगळ्या स्वरूपाचे असले तरी त्यांची वाढ वरच्याच दिशेने होते तसे सारे धर्म स्वरूपाने वेगळे असले तरी मुक्तीकडेच त्यांची वाटचाल असते. चिन्मयानंदांची अशी मार्मिक उदाहरणे त्यांचा विचार सहजपणे मनापर्यंत पोहोचवतात.

## हिंदुत्व व वेदान्त याबाबतचे प्रेम

हिंदुत्व आणि वेदान्त याबाबत स्वामींना अतिशय आदर आहे आणि प्रेमही! म्हणूनच हिंदुत्व ही एक जीवनपद्धत आहे, तो संसारापासून, जीवनापासून पळून जायला शिकवणारा मार्ग नव्हे असे ते आवर्जून सांगतात. वेदान्तामध्ये शब्दांचे खेळ नाहीत. उगीच संभ्रमित करण्याची पद्धत नाही आणि मानभावीपणाचा आवही नाही. तो मेलेल्याला उठवत नाही तर आसक्ती आणि अज्ञान यांनी युक्त जगाबाबत जीवाला मृतवत् करणारा, निर्लेप करणारा आहे असे आग्रही प्रतिपादन करून त्याला 'Big-think' असे म्हणतात. उपनिषदातील मंत्रांना निरर्थक मानू नये कारण ते पवित्र अध्यात्मिक विद्वत्तापूर्ण उद्‌गार असतात. ते पुन्हा एकदा समजून घेण्याचा प्रयत्न करायला हवा असे चिन्मयानंदांना मनापासून वाटते. Try again please ! या शब्दांतून त्यांची त्याबाबतची कळकळ व्यक्त होते.

चिन्मयानंदांच्या डायरीतील विचारांचा असा मागोवा बारकाईने घेत गेलो तर खूप विविध विषयांवर त्यांनी खूप महत्त्वपूर्ण विचार मांडलेले दिसतात. त्यात Ecology आहे. Cognition, Action असे विषयही आहेत. शिक्षण, धर्म, ईश्वर हे त्या सर्वात महत्त्वाचे विषय आपण पाहिलेच. एकूण ३२५ च्या आसपास असणाऱ्या विचारशलाकांमध्ये आणखीही काही चमकदार शलाका मला आढळल्या त्याही आपल्यापुढे ठेवण्याचा मोह मला टाळता येत नाही.

## काही चमकदार विचार

'स्वातंत्र्य म्हणजे आपल्याला जे आवडते ते करणे नव्हे तर आपण जे करतो ते आवडणे होय.' हा स्वामींचा विचार स्वातंत्र्याचा नव्याने विचार करायला लावणारा आहे. 'परिपूर्ण मानवाचे मन एखाद्या आरशासारखे असते, ते प्रत्येक गोष्ट परावर्तित करते. कोणत्याच गोष्टीला नाकारत नाही. ते प्रत्येक गोष्ट ग्रहण करते तर काहीच ठेवून घेत नाही.' स्वामींचा हा विचारही लक्षणीय आहे. या जगात गुंतलो नाही तर हे जग खूपच छान आणि तेजस्वी आहे असे वाटते पण तेच जर त्यात आपण गुंतलो असू तर अतिशय दुःखी आणि वाईट वाटते. हा विचार आसक्तीमुळे होणारा तोटा सूचित करणारा आहे. विश्वाच्या कल्याणाची कामना ज्यामध्ये नाही ती प्रार्थना खऱ्या अर्थाने प्रार्थना नव्हे, असे सांगणारे स्वामी 'चिंता करतो विश्वाची' असे उत्तर देणाऱ्या समर्थांच्याच जातकुळीतले जाणवतात. 'चिलखत घातले की, कडकडून आलिंगन देणे शक्य नसते. आपल्या व्यक्तिमत्त्वाला अहंकाराचे चिलखत असते म्हणून ते चिलखत काढून टाका आणि आपल्याच व्यक्तिमत्त्वाला खऱ्या अर्थाने उराउरी भेटा' हा स्वामींचा संदेश त्यांच्यातील उत्तम शिक्षकाचा परिचय देणारा आहे.

## वेगळा विचार

'adam is alone' या वाक्यावरून स्वामींनी एके ठिकाणी एक खूपच वेगळा विचार मांडला आहे. 'चांगुलपणा एकटा असला की त्याचा परिणाम जाणवत नाही. वाईट गोष्टींनी चांगुलपणाला विरोध करायला हवा. असा विरोध वाईट गोष्टींनी केला की माणसाला चांगुलपणाला विजयी करण्याची संधी मिळते. वाईट गोष्टींना नाकारून चांगुलपणाचा स्वीकार केला की तो खऱ्या अर्थाने पूर्णतः टिकतो' असे स्वामींनी लिहून ठेवले आहे. एके ठिकाणी स्वामींनी लिहिले आहे, 'विचार शब्दरूप घेतात आणि लगेचच कृतीरूपही घेतात. तेव्हा 'Be careful of thoughts !'' स्वामींची ही जी शैली आहे ती प्रसन्न आहे, खुसखुशीत आहे. काही ठिकाणी किंचित मिश्किलता तर काही ठिकाणी समीक्षकाची मार्मिकता ! ज्या उपमा, जे दृष्टान्त ते सहज मनाला भिडणारे, विचार नेमकेपणाने पोचवणारे !

## उपसंहार

प्रस्तावनेत स्वामीजींच्या शिष्या निरूनी लिहिले आहे की, त्यांना जेव्हा स्वामींची ही डायरी मिळाली तेव्हा त्यावर 'Think-Tank' असे लिहिले होते. खरेच स्वामींनी दिलेले ते सार्थ नाव होते, असेही डायरी वाचताना सतत जाणवत राहते. कारण त्यात केवळ तत्त्वज्ञान, केवळ सामाजिक मूल्ये, केवळ संस्कृती अशा विषयांवरील विचार नाहीत, त्यात एके ठिकाणी joint pain वर औषधही लिहून ठेवले आहे. मुल्ला नसरुद्दिनच्या आवडलेल्या, काही एक वेगळा विचार देणाऱ्या कथा आहेत. काही रहस्यमय गुरुशिष्य संवाद आहेत. विचारांचा छानसा अथांग जलाशयच आहे हा ! अथांग जलाशयात जसे हवे तितके डुंबावे तसे स्वामींच्या या Think-Tank मधे मन मानेल तसे डुंबता येते. डुंबताना बरीच चिंतनरत्ने, विचारमौक्तिके हाती लागतात. प्रत्येक रत्न वेगळ्या प्रकारचे, आगळ्याच तेजाने झळाळणारे आणि ज्याच्या हाती लागेल त्याचेही तेज वाढवणारेच आहे. बघा तर खरं एकदा मनसोक्त डुंबून !

**प्रा. डॉ. अंजली माधव पर्वते**

बी-५, शिवसाई कॉम्प्लेक्स, पोस्ट आनंद नगर, सिंहगड रस्ता, पुणे ५१.

# चिन्मयानंद आणि ध्यान

श्री. अनिल द. सोहोनी

*मेकॅनिकल इंजिनिअर. फिलिप्स इंडिया व टाटा मोटर्स ३० वर्षे नोकरी. वयाच्या १८ वर्षापासून चिन्मय मिशन संपर्क. गुरूदेवांकडून उपनिषद व गीता यांचा अभ्यास केला गेला. गणपती अथर्व शीर्षावर पुस्तक. गीता व नारदभक्ती सूत्रावर लिखाण. गेले २० वर्षे गीतेचा अभ्यास वर्ग.*

मेकॅनिकल इंजिनिअर. फिलिप्स इंडिया व टाटा मोटर्स ३० वर्षे रिटायर्ड. वयाच्या १८ व्या वर्षापासून चिन्मयमिशनमध्ये. गुरूदेवांकडून उपनिषद व गीता यांचा अभ्यास. गणपती अथवशीर्षावर पुस्तक. गीता व नारद भक्ती सूत्रावर लिखाण. २० वर्षे अभ्यासवर्ग.

## श्री गुरूभ्यो नम:

जीवनाच्या प्रवासात प्रत्येक पावलागणिक गुरूची म्हणजेच मार्गदर्शकाची गरज प्रत्येक मानवाला लागते. मग तो गुरू म्हणजे माता असो वा केवळ पत्ता सांगणारा वाटेवरचा वाटसरू असो. गुरूचे महत्त्व अनन्य आहे. सर्व महात्मे, संत व वेद-पुराणे ठासून सांगतात - गुरूवाचून तरणोपाय नाही. केवळ गुरूच संसारसागरात तरून नेतो.

केवळ पूर्वसुकृतामुळे म्हणा किंवा ईश्वरकृपेने म्हणा किंवा केवळ योगायोगाने म्हणा आम्हाला श्री चिन्मयानंदांसारखे सद्‌गुरू योग्य वेळी लाभले. त्यांचे ऋण कधीही फेडता येणार नाही. सद्‌गुरूंनी केवळ भक्तांच्या प्रेमापोटी अध्यात्मविद्या सोपी करून सांगितली व कायम संदर्भ मिळावा म्हणून गीता, उपनिषदे व इतर महत्त्वाच्या विषयांवर पुस्तके लिहिली. त्यापैकी 'ध्यान व जीवन' (Meditation and Life) हे एक महत्त्वाचे पुस्तक आहे. ह्या पुस्तकाच्या माध्यमातून सद्‌गुरूंचे व्यक्तिमत्त्व विषद करण्याचा हा एक अल्प प्रयत्न आहे. तसं पाहिलं तर ईश्वर काय किंवा सद्‌गुरू काय यांचा मोठेपणा कोणत्याच फूटपट्टीने मोजता येत नाही. तरीपण हा प्रयत्न म्हणजे सद्‌गुरूंची ही एक अल्पशी पूजा समजा.

'ध्यान आणि जीवन' या पुस्तकाच्या प्रस्तावनेत गुरूदेव म्हणतात, 'जिवंत रहाण्यासाठी घाई-घबराट आणि नैराश्य याच्या आहारी न जाता प्राप्त परिस्थितीला कार्यक्षमतेने व चातुर्याने तोंड देण्यास तो समर्थ असला पाहिजे.'

गुरूदेवांना प्रत्येक माणसाला नेभळट किंवा दैवाधीन दुबळा न बनवता एक कार्यक्षम, चतूर व सुजाण मानव बनवायचे आहे. प्रत्येकाची आपण यशस्वी, आनंदी व्हावे हीच इच्छा असते ना ? मग हे ध्यान केवळ साधू व महात्म्यांसाठी आहे का ? नव्हे. गुरूदेवांच्या मते अध्यात्मिक शास्त्रे ही सर्व मानवासाठी आहेत व ती त्यांचे जीवन सुखकर करतात.

गुरूदेव आधुनिक विज्ञानाला कमी लेखत नाहीत. ते म्हणतात, 'विज्ञान आणि मानवाने लावलेले वैज्ञानिक शोध तसेच यांत्रिक निर्मितीच्या आणि परीवहनाच्या नवीन पद्धतीला आणि कार्यक्षमतेला नावे ठेवणाऱ्यांपैकी मी नाही. ज्याच्या योगाने मानवाच्या दैनंदिन जीवनातील वाट्याला येणारे काबाडकष्ट जवळ जवळ नाहीसे झाले आहेत अशी साधने व पद्धती यांचा शोध नि:संशय विज्ञानानेच लावला आहे.'

पण आपण जाणतो की सर्व आधुनिक सुखसाधने असूनही मानव सुखी नाही तर सर्व मानवजात विनाशाच्या कड्यावर उभी आहे.

गुरूदेव म्हणतात, 'मी दोष दाखवणारा अगर निराशावादी नाही तर स्वामित्वाच्या अभावामुळे विकल झालेल्या मानवाचे दृश्य आपण पहातो. ज्या व्यक्तीने स्वत:वर ताबा मिळवला, तीच गुलामगिरीतून मुक्त होते.' गुरूदेव पुढे सांगतात, 'मी हे केवळ हिंदूंसाठी लिहीत नाही. जे आपल्या चुकीच्या कल्पनांनी स्वत:च्या धर्माला दोष देतात व स्वत:ला पापी व अपराधी ठरवतात त्या सर्व बांधवांना अनुलक्षून मी हे निवेदन करत आहे.'

ह्या पुस्तकांत तर्कशास्त्रानुसार ध्यानसाधनेचे महत्त्व मी सांगणार आहे. जो कोणी हे ध्यानाचे तर्कशास्त्र आत्मसात करील व त्यानुसार साधना करील त्याला जीवनाची पवित्रता कळेल व अंतत: दिव्यत्वाच्या श्रेष्ठ अनुभूतिचा प्रत्यय येईल.

गुरूदेव ह्या शास्त्राचा अभ्यास अत्यंत मुलभूत स्वरूपात करतात.

**१) आत्मनिष्ठ संशोधन (Subjective Research)** गुरूदेव प्रथम जीवन म्हणजे काय हे विषद करतात. जीवनाची व्याख्या अशी - जीवन ही अनुभवांची मालिका आहे व ह्यामध्ये तीन घटक असतात.

१. अनुभव घेणारा - अनुभावक २. अनुभव घ्यायचा ती वस्तु, व्यक्ती अथवा परिस्थिती ३. ह्या दोघांच्या संबंधाने तयार होणारा अनुभव.

तेव्हा ह्या तीनही घटकांचा प्रथम नीट अभ्यास केल्याशिवाय हा अभ्यास पूर्ण होणार नाही. गुरूदेव स्पष्ट करतात की यापैकी युक्तिवादाच्या आधारे विज्ञान अनिवार्यपणे अपूर्ण असल्याने मानवाची त्याच्या दु:खातून मुक्तता घडवण्यास अपुरे पडते कारण ते केवळ वस्तू जगताचे (object) विवेचन करते.

पण अध्यात्म हे व्यक्तीचे, त्याच्या मन ह्या उपकरणाचे व त्याच्या अनुभव घेण्याच्या क्षमतेचे विवेचन करते. गुरूदेव पुढे सांगतात, 'जीवनाचे मूल तत्त्व आहे आत्मतत्त्व व त्याबाहेर पाच कोष असतात.

१. अन्नमय कोष - स्थूल शरीर.

२. मनोमय कोष - संवेदना ग्रहण करणारी यंत्रणा

३. प्राणमय कोष - हालचाल घडवणारी शक्ती

४. विज्ञानमय कोष - तारतम्य करणारी बुद्धी

५. आनंदमय कोष - अभाव ना अविद्या.

**२. आनंदाचे उत्पत्ति स्थान**

गुरूदेव वेगवेगळ्या उदाहरणांनी समजावून देतात की, आनंद वस्तू वा व्यक्ती प्राप्तीतून नसतो तर ती एक मनाची शांत अवस्था आहे. गुरूदेव सोप्या शब्दांत सांगतात की आनंद म्हणजे मनाची शांत व निरिच्छ अवस्था ज्यात कामना, इच्छा नसतात. हेच कैवल्य आहे. हेच ईश्वर दर्शन आहे.

गुरूदेव स्पष्ट करतात की, अंतरीचा शांत अनुभव घेण्याच्या म्हणजेच शाश्वत आनंदाच्या निवासाकडे जाण्याचा खरा मार्ग धर्म सांगतो व तो तुम्ही आचरावात असे आम्हाला वाटते. विचार करा ! विचार करा ! विचार करा !!

दिव्य जीवन जगण्यासाठी प्रथम प्रत्येकाने दैनंदिन जीवनाचे साक्षीभावाने सिंहावलोकन करावे. हेच आत्मपरीक्षण होय. गुरूदेव म्हणतात, आत्मपरीक्षण करा. गुणदोषांचे संशोधन करा. दोषाचा निषेध करा. सद्गुण अंगी बाळगा, उन्नत व्हा आणि सुखी व्हा.

ध्यानसाधना का करावी ह्याबद्दल गुरूदेव अत्यंत तर्कशुद्ध विचार मांडतात. आपले मन व बुद्धी यांचे समायोजन नसते. मन वाटेल त्या कामनांची इच्छा बाळगते पण बुद्धी ही वाईट इच्छांची पूर्ती करू नको म्हणून सांगते व ह्या विरुद्ध प्रवाहात मानवाला दुःख होते. केवळ ध्यानसाधनेनेच मन व बुद्धी ह्यांचा मिलाप होऊ शकतो.

ध्यानाची पूर्वतयारी म्हणजे शरीराने स्वस्थ बसण्याचा अभ्यास. गुरूदेव सांगतात की, प्रथम पाठीचा कणा ताठ ठेवून केवळ बसण्याचा अभ्यास करावा व सर्व अवयव व इंद्रिये शिथील करावीत. हा अभ्यास नियमित दीर्घकाळ करावा. त्याचबरोबर ईश्वराची प्रार्थना करावी. 'माझ्या उणीवा अनेक आहेत. माझ्या जीवनात तडजोडीची ठिगळे आहेत. मला आनंदाची स्वप्ने नकोत. तुझे सहाय्य मला हवे आहे. प्रभो, तुझ्या कृपेची व वैभवाची मला प्रचिती येऊ दे.'

स्थिर आसनाच्या सरावाबरोबर विचारांचे मालीश करावे. म्हणजे श्रुति ग्रंथांच्या अभ्यासाप्रमाणे विचार करावा. मी म्हणजे हा स्थूल देह नाही. मी दिव्य चैतन्य आहे. हे विचार, इच्छा, कामना ह्या सर्व स्थूल देहातील मनाचे विकार आहेत. मी केवळ एक अविनाशी आनंदमय चैतन्य आहे. मनाच्या प्रशिक्षणासाठी गुरूदेव योजना सांगतात. देवाची भक्तियुक्त पूजा करावी, नियमित आवडेल तो जप करावा, सत्कर्म करावे. असा दीर्घकाळ प्रयत्न केला की मन स्वच्छ होईल. पण ह्या मनात रिकामी जागा न ठेवता पुन्हा उच्च विचारांचे रोपण करायला हवे. स्वच्छ झालेल्या मनात ध्यान साधनेच्या वेळी ईश्वरभाव रोपित करा.

गुरूदेव ध्यान साधनेला सहाय्य म्हणून वीस कलमी उपाय योजना सांगतात ती अशी --

१) किती तास झोपलो ?
२) किती वाजता उठलो ?
३) निदिध्यासन किती वेळा केले ?
४) सध्या कोणते धार्मिक ग्रंथ वाचतो ?
५) सज्जनांच्या सहवासात किती काळ घालवला ?
६) निष्काम सेवा किती करता ?
७) किती जपमाळा नियमित करता ?
८) किती उपनिषद मंत्र वाचता ?
९) किती मंत्र लिहून काढलेत ?
१०) किती तास मौन पाळले ?
११) किती उपवास नियमित करता ?
१२) किती दानधर्म करता ?
१३) किती वेळा खोटे बोललात ?
१४) किती वेळा रागवलात ?
१५) वेळ किती व्यर्थ घालवलात ?
१६) किती वेळा ब्रह्मचर्य पाळलेत ?
१७) कोणत्या सद्गुणांची जाणीवपूर्वक वाढ केलीत ?
१८) कोणत्या दुष्ट गुणांचे निर्मूलन केलेत ?
१९) दुष्ट सवयी ताब्यात ठेवण्यात किती वेळा अयशस्वी झालात व त्याबद्दल कोणती शिक्षा घेतलीत ?
२०) केव्हा झोपी गेलात ?

गुरूदेव सुचवतात वरील वीस कलमांची रोज रोजनिशी लिहावी.

गुरूदेव उपसंहार करतात --

आत्मपरीक्षण व्यक्तिमत्त्वाला लवचिकपणा प्राप्त करून देते. प्रयत्नांची पराकाष्ठा करा. काळजी करू नका. भीती वाटून देऊ नका. धाडसी व वीराला उचीत असलेल्या अंतःकरणाने ध्यानसाधना करा. आणि अंतर्गत व बाह्य ईश्वरीय शांती व आनंदाच्या चित्तथरारक अनुभवाची परिपूर्ती करून घ्या.

गुरूदेव हे खरोखरच उत्तम शिक्षक आहेत. त्यांच्या प्रत्येक शब्दांत कळकळ व प्रेम भरले आहे.कोठेही आग्रह नाही पण भक्तांनी आपले ऐकावे अशी प्रेमाची इच्छा आहे.

असा प्रेमळ, श्रोत्रिय व ब्रह्मनिष्ठ गुरू ज्यांना लाभला त्यांचे जीवन खरोखर उज्वल झाले आहे.

आपण देखील गुरूदेवांचे ध्यान व जीवन हे पुस्तक प्राप्त करून त्यानुसार ध्यानसाधना करून आपले जीवन आनंदमय कां करू नये ? सद्गुरू चरणी प्रार्थना !


**अनिल द. सोहोनी**
टेल्को हाऊसिंग सोसायटी नं. १४,
सेक्टर २४, निगडी, पुणे ४११०४४.
फोन : (०२०) २७६५५५०१




## भावांजली

जय जय गुरू चिन्मय, आनंद तू खरा ।
दिव्य तुझ्या पदस्पर्शे धन्य ही धरा ॥ ध्रु. ॥
उपनिषदे आणि गीता वसति आननी,
जणु शंकर आचार्यचि प्रकटले जनी,
तीव्र तपे स्वामी तुम्ही मुक्तिला वरा ॥१॥
करुनि गीताज्ञानयज्ञ शिकविले जना ।
प्रेमाने धाकाने वळविले मना ।
स्वये उद्धरूनि तुम्ही जना उद्धरा ॥२॥
बाल-युवा-वृद्ध जना सेविले तुम्ही
चिन्मय-मिशन रूपे अमर हो तुम्ही,
जाति लिंग वर्ण भेद ना घेतला विचारा ॥३॥
जादूगार शिल्पकार मिशनचे तुम्ही
पाच दशक लोटले कार्या आरंभुनी
नमिते तुम्हा प्रेमाने जुळुनि मी करा ॥४॥
लोक देशोदेशीचे आज पातले,
अर्ध शतक मेळावा म्हणुनिया आले,
अशीच व्हावी शतक-पूर्ती प्रार्थु प्रभुवरा ॥५॥
शुभं भवतु
- हरिः ॐ तत् सत् -
(मिशनच्या सुवर्ण महोत्सवा निमित्त २००२)

# ...ाता - एका महान सं...

*(२ डिसेंबर १९९२ रोजी राष्ट्रकुल संघांत पू. गुरुदेवांनी (स्वामी चिन्मयानंद) केलेले भाषण)*

मित्र हो !

सर्व जगात आज अनेक समस्या आहेत. त्यांची उत्तरे आपल्याला का सापडू शकत नाहीत ? खरं तर आज आपल्याकडे काय कमी आहे ? जगात शांतता स्थापन करण्याकरता संयुक्त राष्ट्र संघासारख्या संस्था आजपर्यंत कधीही एकत्र आल्या नव्हत्या.

प्रगत तंत्रज्ञानामुळे जागतिक दळणवळण सुलभ झाले आहे. ज्ञान व शास्त्र जबरदस्त वेगाने विकसित झाले आहे. गुहेत राहणाऱ्या आदिमानवाप्रमाणे आपण आता पूर्ण अज्ञानी व अविकसित राहिलो नाही. पृथ्वी आणि अंतरिक्षावर आपण आता स्वामित्व मिळवले आहे. परंतु ही सर्व प्रगती करूनही लोक मात्र दु:खीकष्टी असून हाल सोशीत आहेत. समस्येवर समस्या निर्माण होत आहेत. आजपर्यंत जग अशा परिस्थितीत कधीच नव्हते. डोळे बंद करून जगाच्या नकाशावर आवडेल तेथे तुमचे बोट ठेवा.परस्परातील हिंसाचार व दुष्काळ यामुळे तो भाग अशान्त आहे असेच तुम्हाला आढळेल. दुष्काळ आहे म्हणून अन्न तिथे पोचवले तरी सर्वांना सारखे वाटले जात नाही, अशी परिस्थिती आहे. हिंसाचार पाहून तिथे सैन्य पाठवले जाते, पण सैन्य हे या प्रश्नाचे उत्तर आहे का ? भुकेलेल्यांना अन्न पुरवणे हे त्या समस्येचे निरसन आहे का ? मग त्याचे दुसरे काय उत्तर असू शकेल ? जरासा विचार करा.

या महान संस्थेत, गेले अनेक वर्षे आपण प्रयत्न करीत आहोत. परंतु आपल्या या प्रयत्नांचा एकंदर परिणाम काय ? आपण राजकारणाचा उपयोग केलात, घटना बदलल्यात, काही कायदे बदललेत, व्यवहार कौशल्य वापरलेत - आपण केलं नाही असं काही राहिलंय ? आपण प्रगती केली आहे असे आपण नुसते म्हणतो. ठीक आहे. पण ही प्रगती नेमकी काय आहे ? कशात आहे ? बाह्य जगातील रचना बदलतो आहोत व त्यातून व्यक्तीगत समाधानाची परिपूर्णता अपेक्षित आहोत. आपली अपेक्षा तर हीच होती ना ? मग आपल्याला ते साध्य झालं का ? पूर्वकालीन इतिहासात डोकावलं तर तो गुहेत राहणारा माणूस जास्त सुखी होता असे आढळेल की नाही ?

सध्या आपल्याजवळ सर्व काही आहे. चांगल्या वस्तू, रोटी, कपडा सर्वच अधिक चांगले आहे. पण या बाह्य सुबत्तेच्या जगात तुम्ही-आम्ही सर्व गाद्यागिरद्यावर बसून रडत आहोत - मग तो गरीब, श्रीमंत, सत्ताधीश अगर सत्ताहीन - कुणीही असो. कुठलाही समाज, जमात सुखी नाही. खरं तर जगातील कुठलाही भाग आनंदात जगत नाही असेच चित्र आहे. असं का ? समस्या कोणती आहे ते शोधून काढतो आहोत व नंतर ती तात्पुरती निस्तरायची आणि परिस्थिती ठीक करायची ह्या शोधांत आपण असतो. परंतु या समस्यांचे मूळ उगमस्थान कुठे, कशात आहे ? त्याचा शोध घेत नाही. असे कां ? एखाद्या डॉक्टरने मूळ चाचण्या न पाहता औषध द्यावे, तसे हे आहे. वरवर तपासणी करून तो उपचार करतो, तसे काहीसे हे आहे. ताप दिसला, तापावर औषधे देतो, घसा बसला असला तर त्यावर उपचार करतो. पण हे रोग ज्या बिघाडामुळे निर्माण झाले, त्या मूळ कारणाचा विचार करीत नाही. आज आपणही तसेच करीत नाही का ? लाखो लोक आजवर असेच करीत आले आहेत. आधुनिक तंत्रज्ञानातील प्रगतीमुळे जागतिक दु:खाचे निराकरण करण्याचे नवीन नवीन उपाय आपण योजत आहोत. पण या सर्व योजनांनी आपण जगात शांतता व समाधान आणू शकलो का ? जगातल्या एका भागातील प्रश्न सोडवला की लगेच दुसऱ्या भागांत आणखी दहा प्रश्न उद्‌भवतात अशी परिस्थिती आहे. आपण किती काळ या अशा त्याच त्याच तंत्राने प्रश्न सोडवीत राहणार आहोत ? अर्थशास्त्र, राज्यव्यवस्था, क्रान्त्या, कला, साहित्य अशा सर्व ठिकाणी अनेक मार्ग चोखाळले. निरनिराळे धर्म, चर्च, मशिदी, मंदिरे असेही मार्ग योजिले आणि आता तेच परस्पर वैमनस्याचे मूळ बनले आहे.

आपण सध्या किती हलाखीच्या परिस्थितीत जगतो आहोत हे तुमच्या ध्यानात यावे म्हणून माझा हा प्रयत्न आहे. आपण तरी या जागतिक परिस्थितीवर समाधानी आहात का ? निरनिराळ्या प्रसिद्धी पत्रकात, तुमचे व माझे अभिनंदन होत आहे. ते ठीक आहे. पण खरंच आपण समाधानी आहोत.

'या स्फोटाचे मूळ काय' याचा विचार अधिक खोल झाला पाहिजे. वेदान्ताने हा विचार आधी केला आहे. ते व्यक्तिनिष्ठ शास्त्र असल्याने निरनिराळ्या समस्यांचे निराकरणाकरता ते वेगवेगळे उपाय सुचवीत नाही, करीत नाही. मग तो प्रश्न व्यक्तिगत असो, जातीचा, राष्ट्रीय, जागतिक कोणताही असो. वेदान्त अधिक खोलांत जाऊन या समस्यांचे मूळ कारण शोधून काढण्याचा प्रयत्न करते.परिणामत:, साधू, संत, ऋषी या नावाने संबोधिले जाणारे व्यक्तिशास्त्रज्ञ अगदी वैदिक काळापासून याबाबत एकमुखाने आक्रोश करीत आहेत. ते सर्व म्हणतात की, 'जाणिवेच्या एका नव्या पातळीवर व विचारक्षेत्रांत आपण जाण्याची आता वेळ येऊन ठेपली आहे. हे जरी मी एका वाक्यात सांगतो आहे, तरी आता पुढे त्याचे स्पष्टीकरण देण्याचा प्रयत्न करीन.'

ही नवीन जन्माची प्रसववेदना आहे. माता व बालक हसतखिदळत असताना नवीन जन्म कधी शक्य नाही. नव्हे नाहीच. नवीन जन्माच्या वेळी दोघेही रडतात-ओरडतात. अगदी तसेच आताचे जग वेदना व यातना यांत बुडालेले नाही का ? आणि तरीही आपण नवीन दिशेने जाण्याचे नाकारीत आहोत. आतापर्यंत काय कमी पडले हे आपल्याला उमजत नाही आहे; कारण सवयीच्या गोष्टी करणे सोपे असते म्हणून आपण तेच तेच मार्ग चोखाळत आहोत. इतिहासात असे अनेक कालखंड झाले आहेत की जेव्हा जग सुधारले. आपल्यालाही नवीन परिस्थिती आत्मसात करून सुधारण्याचा काळ आता येऊन ठेपला आहे. नाहीतर नैसर्गिक नियमांना दयामाया नसल्याने ते आपल्याला संपूर्ण गाडून टाकतील. उदाहरणार्थ भोवतालच्या परिस्थितीशी जुळवून न घेता

आल्याने जगातील अनेक पक्षी, पशु, वनस्पती नामशेष झाले आहेत. आपल्या भोवतालच्या बदलत्या परिस्थितीबाबत माणूस जर पुरेसा जागृत नसेल व त्याने नवीन परिस्थितीप्रमाणे आपल्यात योग्य तो बदल करून जुळवून घेतले नाही, तर त्याचेही हेच भवितव्य आहे. निसर्गाचे नियम सर्व गोष्टींना नामशेष करण्याकरता राबत असतात हा केवढा दैव दुर्विलास ! रोमन साम्राज्य गेले. पूर्णत: नाहीसे झाले की नाही ? मेसापोटेमियाही नामशेष झाले. ह्या सर्व संस्कृती महान होत्या व ही सर्व माणसेही थोर होती. तिथे त्या काळी सर्वात उत्तम साहित्य निर्माण झाले, अनेक शूरवीर होऊन गेले त्यांचे काय झाले ? कुठे गेले ते सारे ? ते असे धुळीला का मिळाले ? कारण त्या काळी एक नवीन व्यवस्था उदयाला येत होती, त्याप्रमाणे त्यांना स्वत:ला बदलता आले नाही.

मानवाच्या दु:खावरचे उपचार आता यापुढे जुन्या पद्धतीने करता येणार नाहीत अशी आता वेळ आलेली आहे, असे आपल्याला नाही का वाटत ? विचार करा. कारण आताच्या या समस्यांचे मूळ निराळे आहे. ते शारीरिक, मानसिक किंवा बौद्धिक नाही. या प्रश्नाचे उत्तर भौतिक शास्त्रज्ञ AID (मदत, मदत आणि मदत) या पातळीवरून काढण्याचा प्रयत्न करीत आहेत. तरीही आपण या जगात वेगवेगळी दु:खे, आर्थिक चढउतार, दारिद्र्य, रोग, एकमेकातील हत्या का होत आहेत याचा नीट विचार करावा लागेल. सध्या कुठलेही दोन देश एकमेकांकडे क्रोधाशिवाय पाहूच शकत नाहीत. असे का ? 'कुठल्याही कार्याच्या कारणाचा शोध घेणे' म्हणजे आपल्या भोवतालच्या जगात त्याला समजून घेऊन त्याचे बौद्धिक पृथ:करण करणे होय. 'कारणाचा शोध घेणे' हा मानवी बुद्धीचा स्वभाव आहे. (कार्यकारण संबंध लावणे). या मानवी स्वभावामुळेच सर्व शास्त्रे विकसित झाली. सतत श्रम करूनही आपण दु:खी का आहोत ? (खरं तर आपले सर्वांचे जीवनध्येय 'सुखी होणे' आहे असे स्पष्ट आहे.) त्याकरता आपण आटोकाट प्रयत्नही करीत आहोत. मानवाच्या इतिहासात पूर्वी कधी झाले नाहीत इतके प्रयत्न आता होत आहेत. पण तरीही आपण एका समस्येतून बाहेर पडतो न पडतो तो आणखी दहा समस्या समोर उभ्या ठाकत आहेत. या सर्व समस्या व अनेक दु:खे या सर्वांचा मूळ उगम कुठे आहे, याचा शोध घ्यायला हवा. ह्या गोष्टीचे आपण परीक्षण केले की एक अद्‌भुत नवीन सत्य समोर येते. पण ते आधुनिक भौतिकवादी व शास्त्रज्ञ यांना लगेच पटणारही नाही. **'बाह्य जगत हे आपल्या आंतरिक मनाचा प्रतिध्वनि व प्रतिबिंब आहे.'** हेच सत्य होय. विचार करा.

आता तुमच्यासमोर एक स्वामी बोलतो आहे आणि आपण सर्व बुद्धिमान लोक ते ऐकत आहात. आपल्या प्रत्येकाची समज सारखी आहे असे मी म्हणू शकतो का ? असे असणे शक्य नाही. आपापल्या बौद्धिक कुवतीप्रमाणे तुम्ही माझे विचार ग्रहण करून त्याचा अर्थ लावाल. नेहमीच तुमचे बाह्य जगत तुमच्या मनाच्या ठेवणीनुसार ठरत असते. मनाची घडण, त्याचे नियंत्रण, त्याची आज्ञा याप्रमाणे त्या व्यक्तीचे जग बदलत जाते. 'हे जग म्हणजे नरक आहे' असे काही लोकांनी म्हणताना तुम्ही ऐकले असालच आणि दुसरे काही लोक 'जग स्वर्ग आहे' असे म्हणतात. जीवनात यशस्वी झालेले लोक 'जग हे फार छान आहे' असे म्हणतात. उलट असफल झालेल्या लोकांना मरावेसे वाटते. असे का ? सूर्य, चंद्र, तारका वातावरण इत्यादी बाह्य घटक तर तेच असतात. पण तेच जग एखाद्याला छान वाटते व दुसऱ्याला अत्यंत दु:खमय वाटते. एखाद्या घरात आईवडील दोघेही घरी असताना, घरातील मोठ्या मुलाला घर स्वर्गतुल्य वाटते आणि धाकटा मुलगा ! 'कधी मी एकदा १८ वर्षांचा होऊन या दळभद्री आईवडिलांपासून दूर होतो.' याची तो वाट पाहात राहील. खरं तर त्या दोघांनाही माता-पित्याचे सारखेच प्रेम मिळत असते. अगदी खूप प्रेम मिळत असते आणि तरीही धाकट्या चिरंजीवांना आपण नरकात असल्यासारखे वाटते. हे सर्व मनाचे खेळ आहेत. असंस्कृत मनाची ही अस्वस्थता आहे. ती मनाच्या नैसर्गिक प्रवृत्ती व तात्कालीक आवेगाप्रमाणे वागण्यास आपल्याला प्रेरित करीत असते. या प्रवृत्ती अत्यंत स्वार्थी असतात. 'बाह्य जगापासून मला प्रत्येक गोष्ट मिळालीच पाहिजे', असा तिचा हट्ट असतो. मग ती कितीही निर्दयपणे घेता आली तरी चालेल. मिळवणे, संग्रह करणे, उपभोग घेणे व मजा करणे एवढेच त्यांचे ध्येय असते. असे लोक अगदी एखाद्या जनावरासारखे वागतात आणि सध्याच्या काळात आपण सर्व अशाच मानसिक स्तरावर जगतो आहोत.

'आपण काहीतरी चुकीचे करीत आहोत' हे स्पष्टपणे कळण्याएवढी सदसद्विवेकबुद्धी आपल्यापैकी प्रत्येकाला खचितच असते, परंतु तसे वागण्याचे धाडस आपल्यात नसते. 'दारू पिणे' हे वाईट व्यसन आहे, 'आपण नीतीभ्रष्ट आहोत', 'सिगरेट ओढणे हे आत्मघातकी आहे', हे माहीत नाही असा एखादा कुणी आहे ? पण तरीही आपण त्यांना 'तू असे का करतोस ?' असे विचारतो व तो म्हणतो 'मला त्याचे परिणाम माहीत आहेत. परंतु मी ते सोडू शकत नाही.' प्रत्येकजण असाच आहे. फसवणूक, खोटेपणा, क्रोध, क्रूरता, गुन्हेगारी स्वभाव हे सर्व वाईट आहे हे प्रत्येकाला माहीत आहे. परंतु आपण म्हणतो, 'क्षमा करा, मला त्यापासून दूर राहता येत नाही. असे वागणे मला भाग पडते आहे', याचा विचार करा.

मित्र हो, प्रत्येक व्यक्ती ही या विश्वाचा एक भाग आहे. व्यक्तींचा समुदाय म्हणजे समाज, राष्ट्र अगर जग. व्यक्तीला वगळा-जग नाहीच. सर्वांची मने एकत्र येऊन बाह्य जग बनत असते. एकही अपवाद नाही. एखाद्या समाजातील बहुतांश मने जर गर्विष्ठ, पराकाष्ठेची स्वार्थी, अहंकारी, उद्धट, ग्राम्य, चारित्र्यहीन असतील तर तो समाजही तसाच असतो. राष्ट्रही तसेच असते. मग ते राष्ट्र नसतेच – जनतेचे एक राहण्याचे ठिकाण असते. त्यांत राहणाऱ्या लोकांत एकत्वाची भावना नसते आणि जगातही त्यांना मान्यता मिळत नाही. **प्रत्येक व्यक्तीच्या पूर्ण विकासानेच जगाच्या पूर्णावस्थेची आकांक्षा बाळगता येईल.** जगातील सर्व धर्मग्रंथांमध्ये आपल्या विचारवंत पूर्वजांनी हाच निष्कर्ष काढला आहे. मी फक्त वेदान्त अगर भारतीय ग्रंथाबद्दल बोलत नाही. बायबलमध्ये हेच नाही का सांगितलंय ? कुराणातही तेच सांगितले आहे. बौद्ध लोकांच्या धम्मपदामध्येही हेच नाही का सांगितले आहे ? तुमच्या स्वत:च्या मनातील 'अपूर्णता व अस्वस्थता' हेच या जगातील दु:खाचे कारण आहे. असे यावर चिंतन, मनन करणाऱ्या सर्व माहात्म्यांच्या लक्षात आले आहे.

गेल्या चवदा वर्षांपासून 'पर्यावरण' नावाचे एक नवीन शास्त्र उदयाला आले आहे. 'जग हे अत्यंत सुंदर व पवित्र आहे. अनादराने त्याला सोडून न देता त्याची काळजी घेतली पाहिजे.' असा अचानक साक्षात्कार त्यांना झाला आहे. 'माणसाच्या लोभापायी जगाचा नाश होता कामा नये, त्याची लुटालूट थांबवली पाहिजे व आपण निसर्गाला अत्यंत पूज्य बुद्धीने वागविले पाहिजे, इत्यादी इत्यादी अशा त्यांच्या मतांचा निसर्गप्रेमी प्रचार करीत असतात.'

वेदकालीन 'पुरुष सूक्त' असे सांगते की सर्व वस्तुजात व प्राणीमात्रांनी भरलेले हे जग म्हणजे एक पूजनीय व्यक्ती आहे – सजीव आहे. ती निर्जिव प्रेत नव्हे. ती जिवंत गतिमान आहे. तिच्यावर आदरयुक्त प्रेम करावे – त्या प्रेमाला मर्यादा नसावी. कारण निसर्ग जे आपल्याला देत आहे ते आकाशासारखे अमाप आहे. आपल्या भोवतालच्या वातावरणातील स्वस्थता, शांतता ही आपल्याला काम करण्यास, महत्त्वाकांक्षेने प्रेरित होऊन प्रयत्नाने यश प्राप्त करून घेण्यास

योग्य असे क्षेत्र बनवतात. पण आता ही परिस्थिती मोडून पडली आहे.

'गंगानदी स्वच्छ करायची' असा निर्णय नुकताच भारत सरकारने घेतला. त्याकरता भरपूर पैसाही खर्च झाला. पण ते ही गोष्ट विसरले की सर्व नद्या सर्वकाल स्वच्छच असतात. तिच्या किनाऱ्यावर बसणारे तुम्ही-आम्ही लोक ती नदी गलिच्छ करीत असतो - ते काही आपण थांबवीत नाही. उलट नदीच स्वच्छ करायला बघतो. नदीला घाण व दूषित करायचे जर आपण थांबवले तर ती स्वत:लाच शुद्ध करील. नदीत सतत ताजे पाणी येत राहिल्यामुळे नदीतील दूषित द्रव्ये आपोआपच पुढे ढकलली जातील व ती शुद्ध होत राहील. त्याचप्रमाणे माणसाच्या मनातील आत्यंतिक लोभामुळे सामाजिक अगर राजकीय क्षुब्धता, आर्थिक गुलामगिरी, नकारात्मक प्रवृत्ती हे सर्व निर्माण होते व आपले जीवन कष्टमय होते.

एकाच घरात राहणारे दोन भाऊ एकदा रात्री जेवणाच्या टेबलाशी जेवायला बसले. भारतीय पद्धतीप्रमाणे घरातल्या सुनेने स्वयंपाक केला होता. दुसऱ्या दिवशी पहाटे दोन वाजता धाकटा भाऊ जागा झाला आणि त्याला ओकारी झाली. त्यातून सर्व अन्न बाहेर पडले. असं सतत दोन-तीन दिवस झालं. त्याच्या बायकोला वाटलं की जाऊबाईंनी त्याच्या अन्नात विष कालवलं असेल ? आणि मग ताटांची अदलाबदल करण्यास तिने नवऱ्यास सुचवले. दुसऱ्या दिवशी त्यानी तसे केले. तेव्हा मोठा भाऊ म्हणाला, 'तू अजून अगदी बालीश आहेस बघ ! ताटांची अदलाबदल काय करतो आहेस ?' आणि तरीही दुसऱ्या दिवशी उलटी झालीच. त्याच्या नेहमीच्या डॉक्टरने त्याला दंतवैद्याकडे जाण्यास सांगितले. दंतवैद्य म्हणाले, 'तुझ्या दातात येवढा पू आहे की, तू अजून जिवंत कसा आहेस याचे आश्चर्य वाटते. तुझ्या पोटात बाहेरून विष गेले नाही, तर तुझे दातच म्हणजे तू स्वत:च अन्नाचे विष बनवत आहेस.' म्हणून त्या डॉक्टरने त्याचे सर्व दातच काढून टाकले.

आजही हे जग पवित्र, सुंदर आहे. आपल्या प्रत्येकाच्या मनाची एक विशिष्ट घडण असते. अशा मनात जेव्हा ते सुंदर जग प्रवेश करते, तेव्हा त्यातील चुकीच्या विचारांनी, कल्पनांनी, भ्रामक मूल्यांनी ते दूषित होत असते. वनस्पती, प्राणी इत्यादी जीव आपल्या भोवतालच्या जगाशी व्यवहार करताना, त्यांच्या प्रतिक्रिया व्यक्त करीत असतात - त्यालाच जीवन म्हणतात. आपणही प्रत्येक क्षणी जगाचा स्वीकार करून प्रतिक्रिया व्यक्त करीत असतो. शारीरिक स्तरावरील या प्रतिक्रियांना कर्म (क्रिया) म्हणतात. आपण सर्वजण जिवंत असतो म्हणून क्रियाशील व गतिशील असतो. परिस्थिती एकच असली, मग ती आनंदाची, भीतीची, कशीही असो - तरी प्रतिक्रिया व्यक्तिगणिक भिन्न असतात - असे का ? कारण प्रतिक्रिया या माझ्या विचारांनी मार्गदर्शित व ठरवलेल्या असतात - म्हणून त्या व्यक्तिगत असतात. **आपली सर्व कर्मे ही आपल्या मनाचे प्रकटीकरण असते.** तुम्ही हसता, ओरडता, दुसऱ्याचे नाक धरता म्हणजे तुमचा विचारच कृतीत आलेला असतो - मग तो विचार चांगला, वाईट, उदासीन कसाही असो ! कुणी म्हणेल की स्वामीजी गंमत करीत आहेत ! खरं तर ईश्वर क्रोधाचा विचार मला देतो व मी क्रोधी होतो. आपल्याला यश मिळते तेव्हा देव यशस्वी होतो की मी ? कुकर्माबद्दल तुरुंगवास होतो, तो कुणाला ? देवांनी कुकर्माचा विचार दिला म्हणून त्याला की मला ? असं सगळं देवावर सोपवणं म्हणजे पळपुटेपणा आहे. शास्त्रीय दृष्टिकोणातून विचार केला तर असं आढळेल की, माझ्या मनात येणाऱ्या विचारांची गुणवत्ता व संस्कार ही माझ्या व्यक्तिकरणाची रूपरेषा ठरवतात व त्याप्रमाणे पुढे माझे आचरण ठरते व प्रतिक्रिया व्यक्त होत असतात.

यावर असा प्रश्न एखाद्याला पडतो. तो म्हणतो, 'तुम्ही म्हणता'ते खरं असले तर माझ्या मनात नेहमीच घाणेरडे विचार का येतात ? आणि निलाजरेपणाने मी ते व्यक्तही करीत असतो. असा मी गलिच्छ माणूस आहे म्हणून लोक मला हसतातही. याउलट माझ्या भावाचे विचार व कृती सुंदर असल्यामुळे लोक त्याचे कौतुक करून अभिनंदन करतात. सर्वजण त्याच्यावर प्रेम करतात. असं का ? त्याचे विचार सकारात्मक व माझेच नकारात्मक का म्हणून ? खरंच हा प्रश्न मोठा गंभीर आहे. आता तुम्ही स्वत:चाच विचार करा. लोभ, भोग, मत्सर असे नकारात्मक विचार माझ्या मनात का येतात ? हे विचार मलाही त्रास देतात व इतरांनाही दु:ख देतात. याउलट इतर काही जणांच्या मनात सतत प्रेम, हळुवारपणा, दयाळूपणा असे सकारात्मक विचार येतात. हे सर्व विचारच असतील व त्याची गुणवत्ता हेच सुकर्माचे कारण असेल तर असा प्रश्न उभा राहतो की मग माझ्या मनातच सतत नकारात्मक विचार का ? आणि माझ्या भावाच्या मनात सतत चांगले विचार कसे ?

हा प्रश्न गंभीर आहे. ऋषीमुनींनी मनुष्याच्या व्यक्तिमत्त्वाचे निरीक्षण केले आहे. सर्व माहिती गोळा करून त्याचे विश्लेषण करून सर्वांगाने त्याचा अभ्यास केला आहे व ते एका विशिष्ट निर्णयाप्रत आले आहेत. तो निर्णय असा - **प्रत्येक माणसाच्या मनात उदय पावणाऱ्या विचारांची प्रकार व गुणवत्ता ही त्याच्या कृतीतील दृढ विश्वासावर अवलंबून असतात.** लहानपणापासून जर माझा विश्वास असेल की, 'मला पैसा हवा, मी कोट्याधीश झालो की सुखी होईन' तर मग त्याला पैसा, पैसा हाच ध्यास लागतो. असा मनुष्य माझ्यासारख्या संन्याशाला जरी भेटायला आला तरी त्याच्या मनात असेच विचार असतील की, स्वामींजवळ किती पैसा असेल ? कोणत्या मार्गाने ते पैसे मला मिळतील ? समजा एखाद्याच्या मनात सतत स्त्रीबद्दल विचार असतील, तर तो कितीही चारित्र्यवान खंबीर असला, तरी एखाद्या सुंदर युवतीशी हस्तांदोलन करताना त्याच्या मनात येईलच की नाही की, 'ठीक आहे, अगदी वाईट नाही.' मी गंमत करीत नाही. म्हणून मी म्हणतो की, **माणसाच्या विचारांची गुणवत्ता ही त्याचा बौद्धिक घडणीवर, निष्ठेवर अवलंबून असते.** 'दारूशिवाय जगण्यात काय गंमत ?' असे दारूडी माणसे आपल्याला सांगतातच की ! 'दारूशिवाय जीवन म्हणजे दु:खच दु:ख' - 'माणूस दारू पीत नाही म्हणजे खरं जीवन जगतच नाही' - त्याची खात्री आहे की, दारू पिणे म्हणजेच खरं जीवन ! दुसऱ्या एखाद्याचे सत्ता हेच सर्वस्व असते. तो कशाही भल्याबुऱ्या मार्गाने सत्ता मिळवतो. मग त्यात लाखो लोकांचे बळी गेले तरी त्याला त्याची पर्वा नाही. मग ती सत्ता राजकीय असो, एखाद्या कंपनीची अगर संस्थेची असो ! सर्व ठिकाणी सत्तेचीच हाव !

आपल्या प्रत्येक विचाराचा उगम आपल्या बुद्धीतील दृढ विश्वास व निर्णयानुरूपच होत असतो व तो विचार आपल्यातून व्यक्त होतो. यालाच जीवनमूल्ये म्हणतात. गेले काही वर्षे अमेरिकेत हा शब्द फार लोकप्रिय झाला आहे. जसे जीवनमूल्यावर आधारित व्यवस्थापन, अर्थव्यवस्था, राजकारण, कौटुंबिक जीवन इत्यादी इत्यादी. निवडणुकीच्या थोडे आधी या सर्व गोष्टी उजळल्या जातात व नंतर त्या विसरल्याही जातात. पण अनेक विद्यापीठांतून मूल्यांवर आधारीत सभा, चर्चासत्रे भरवली जातात. गेल्या काही वर्षांत कित्येक विद्यापिठांनी यासंबंधी भाषण करण्यास मला निमंत्रित केले होते. तिथले प्राध्यापक पुस्तकांचे व फाईल्सचे गठ्ठे घेऊन बाहेरचे ज्ञान संपादन करतात. पण ते ज्ञान आंत नसते. (Bookish knowledge) आपल्या दोन्ही बाजूस कायद्याची पुस्तके ठेवून वकील जसे बोलतात तसे ते प्राध्यापक एकामागून एक -

सकाळपासून संध्याकाळपर्यंत बोलतच राहतात आणि लोक ऐकतात. सबंध दिवस एके ठिकाणी बसून सर्व काही ऐकण्याच्या या त्यांच्या सहनशीलतेचे कौतुक वाटते ! परंतु दिवसाअंती त्यांना त्यातले काय कळले असेल देव जाणे ! अठरा तास सतत बसल्यानंतर डोके तरी काय चालणार म्हणा ! श्रोते दमतात, पण बोलणे थांबत नाही - सबंध दिवसाच्या शेवटी शेवटी मला बोलावून चार शब्द सांगायला सांगतात. एकदा मी व्यासपीठावर जाऊन म्हटले, 'विद्वत् जन हो ! आपल्या सारख्यांच्या समोर मी काय बोलणार ? गेले तीन दिवस आपण 'मूल्ये' या विषयावर बोलत आहोत. पण जीवनमूल्ये म्हणजे नेमके काय ? मी आपल्याला प्रामाणिकपणे सांगू इच्छितो की सहाही विद्यापीठातील चर्चा ऐकल्यावर मला धक्काच बसला. मला असं वाटत होतं की, या चर्चेतून निदान 'मूल्ये' याची व्याख्या तरी व्हायला हवी होती. तसा प्रयत्न तरी कमीत कमी व्हायला हवा होता.'

सर्व श्रोते एकमेकांकडे पाहात, कुजबूज करू लागले. 'काय गंमतीचा प्रश्न विचारला ना ? आपण इथं चर्चासत्राला जमलो आहोत.' 'मूल्य' शब्दाची व्याख्या करून काय साधणार आहे ? इत्यादी इत्यादी 'मूल्यावर, कुणाला विचार करावासा वाटत नाही', ही मोठी खेदाची गोष्ट आहे.

## पण 'मूल्य' याचा विचार असा आहे.

**कोणत्याही वस्तूला स्वत:चे असे मोल नसते, हे विचार करण्यासारखे** आहे. रस्त्यावर पडलेल्या एखाद्या लाकडाच्या तुकड्याला काय किंमत असते ? पण एखाद्या माणसाने तो उचलून त्याची सुंदर बाहुली बनवली आणि एखाद्या गरीबाच्या मुलीला दिली, तर ती मोलाची असते. तसंच रस्त्यावरच्या एखाद्या गंजलेल्या लोखंडी तुकड्याला मुळात काही किंमत नाही. पण एखाद्याने त्यांची लाकडी मुठीची सुरी बनवली तर ! केवढी त्याची किंमत ? म्हणजे वस्तूवर घेतलेली मेहनत तिला किंमत देत असते. जगातील कच्च्या मालाला स्वत:ची अशी फार किंमत नसते. पण आपल्या तांत्रिक कौशल्याने त्यापासून समाजोपयोगी गोष्ट बनवली तर त्याचे मूल्य अनेक पटींनी वाढते. चर्चासत्रात नुसते वाचून अगर ऐकून मूल्ये मिळत नसतात. वाचन, श्रवण यानंतर खूप मनन केले पाहिजे. **योग्य मूल्ये निर्माण होण्याकरता आपल्या स्वत:वर त्याचा प्रयोग केला पाहिजे.**

हे साधण्यास मुलांना त्यांच्या वाढत्या वयात निरोगी वातावरण मिळाले तर बरीच मदत होईल. कारण लहान मुले प्रात्यक्षिकाने, अनुकरणाने शिकत असतात - शब्दांनी नव्हे. पालकांच्या पाशी जर मूल्ये असतील आणि ते सुशिक्षित असतील तर ती मूल्ये त्यांच्या वर्तणुकीत दिसतील व मुले सदैव त्यांच्या सहवासात असल्याने त्यांच्याही वागणुकीत उतरतील. म्हणून नुसते मातापिताच नव्हे, तर शिक्षक, शाळेतील वातावरण, सर्वच बदलायला हवे. हजारो वर्षे आपण या गोष्टीची हेळसांड केली आहे. त्याकडे दुर्लक्ष केले आहे. त्यामुळे सर्व जगातील विचारपद्धतीच बदलली आहे. आपत्तीयुक्त शोकान्तिकेच्या दिशेने चालली आहे. या विचारसरणीने या जगात अधिकाधिक समस्यायुक्त परिस्थिती निर्माण होत आहे.

## म्हणून म्हणतो 'बदला' !

ज्या वनस्पती, जनावरे वातावरणाप्रमाणे बदलली नाहीत, त्या नामशेष होतात असे मी मागेच सांगितले आहे. फार काय रोम, ग्रीस, मेसापोटेमिया यासारख्या महान संस्कृतीही नष्ट झाल्या. आता चिनी संस्कृतीही याच मार्गावर आहे. आवश्यक ती शिस्त न पाळण्याचा हा परिणाम आहे. 'स्वामीजी, पण ते शक्य नाही' असे म्हणत असाल तर ठीक आहे. पण ते माझे काम नव्हे परंतु या सर्व व्यवस्थेचा पुनर्विचार व्हायला हवा, एवढे खरे. तरच सध्याचे प्रश्न सुटतील.

हा 'AID' अेड-मदतीचा मार्ग फलदायक नाही हे कुठल्याही बुद्धिमान माणसाला वाटते आहे. कारण त्यांत मानवी प्रयत्न, मानवी आयुष्ये, लष्करातील जवानांचे मृत्यू - सर्व फुकट जात आहे. हल्लीच्या समस्या सोडवण्याचा हा मार्ग योग्य नाही. खरा मार्ग म्हणजे तुम्हाला त्यांच्या मानसिकतेत बदल घडवून आणावा लागेल. दक्षिण आफ्रिकेतील लोकांची मानसिकता जर बदलली असती तर तिथे एवढे लोक मेले असते का ? मी फक्त एक उदाहरण देत आहे. लेबेनॉन, इराक, इराण - कुठलाही देश असो, तिथे लोकांच्या नीती मूल्यामध्ये बदल झाला असता तर लोकांचे विचार सुधारले असते व त्यांच्या हातून उत्तम कार्ये घडली असती व सर्व समाज निरोगी झाला असता. त्या देशातील आर्थिक सुधारणा व संपत्ती वाढीबद्दल मी हे बोलत नाही आणि त्याची जरूरही नाही. कारण सर्व साधुसंतांना परम सत्याचा शोध घेऊनच परमानंद मिळाला. या सर्वांनी स्वत:हून गरीबी पत्करली होती, हे खरे नाही. 'दु:खाचे कारण दारिद्र्य असते', असे म्हणणे हे वरवरचे निरीक्षण आहे. खरं तर **'देशातील संपन्नता'** हे दु:खाचे खरे कारण आहे, असेही मी म्हणू शकतो. दारिद्र्य हे दु:खाचे कारण नसून कशालाही चिकटून ठेवणारी आसक्ती हे त्याचे खरे कारण आहे. 'जर तुमची मूल्ये उच्च असतील तर जीवन जगण्याकरता फार थोड्या गोष्टी पुरतात. जीझसला पोपसारखा राजवाडा कुठे होता ? तो तर एका पुलाखाली रहात होता ! शिष्यांबरोबर बसायला जागाही नव्हती. सार्वजनिक बागेतील बाकड्यावर ते बसत असत. 'तो सुखी नव्हता' असं तुम्हाला म्हणायचं आहे का ? त्यांनी जगाला केवढी मोठी देणगी दिली ? त्याच्याजवळ युनो नव्हती की सल्लासमित्या नव्हत्या ! केवळ विचारांचे धन व सौंदर्य होते - विचार करा.'

मित्र हो ! हे मानसिक पुनरुज्जीवन व्हायला हवे. त्याकरता अधिक जागरूकता यायला हवी. जाणिवेच्या वरच्या स्तराचा शोध घेण्याकरता आपण आता जणू ढकलले जात आहोत. ज्याप्रमाणे गर्भातील अर्भकाची पूर्ण वाढ झाल्यानंतर, त्या मातेच्या गर्भाचा स्नायू न् स्नायू अर्भकाला बाहेर फेकण्याच्या प्रयत्नांत असतो ना ? शिवाय त्या अर्भकालाही बाहेर यायची ओढ असते. जर ते नीट बाहेर येऊ शकले नाही तर शस्त्रक्रिया करावी लागते. त्याप्रमाणे आता निसर्गही सर्वांनाच पिळवटून टाकत नाही आहे का ? मग तो श्रीमंत असो वा गरीब, सत्ताधारी अगर सत्ताहीन असो ! राष्ट्रे प्रगत अगर अप्रगत असोत - प्रगतीपथावर असोत - फरक पडत नाही. सर्व जगच पिळवटून निघते आहे. का ? कारण या यातना व कष्ट नवीन जन्माच्या आहेत. 'भौगोलिक संपन्नता व भोग याबद्दलची धाव' या स्तरावर आपण आता आहोत. पुढे आपल्याला अधिक चांगल्या व उच्च जाणीवेच्या अवस्थेत जायचं आहे. त्या जाणीवेच्या उच्च स्तरावर पोचण्याच्या मार्गावर पुढे सरकायचे आहे. त्या स्तराला आपण परमेश्वर म्हणू शकता. माझी काही हरकत नाही. मी काही ईश्वराचा विरोधक नाही. पण जगतातील सर्व दु:खांना आपल्या खांद्यावर घेणारी ती जबाबदार शक्ती असावी. जगातील सर्व दु:खाचे मूळ कारण 'मी' आहे असे सांगणारी.

तुम्ही बदला म्हणजे जग आपोआप बदलेल. आपल्या सुखाकरता जगाने बदलावे अशी प्रत्येकाची नेहमी इच्छा असते. ह्याला भौतिक दृष्टिकोण म्हणतात. याच पद्धतीने आपण हजारो वर्षे जगत आलो आहोत आणि स्वत:चे आंतरिक सौंदर्य न वाढवता जग सुंदर बनवण्याचा खटाटोप करीत आहोत. अशा विचारांनी आपल्याला सडत ठेवलं आहे. अशी सडकी माणसे या जगात आता राहात आहेत आणि त्या जगालाही कुजके, घाणेरडे करून टाकत आहेत. तुमच्या घराच्या दिवाणखान्यात समजा, रात्रभर डुकरे आणून सोडली तर दुसरे दिवशी त्याची काय अवस्था होईल ? तो एक मोठा डुकरवाडाच बनेल. ती जागा

अत्यंत घाणेरडी होईल. अशा या जगात घाणेरडे लोक राहतात आणि 'जगाचं काही खरं नाही' अशी भाषा बोलतात. पण खरं तर जगात वाईट काहीच नाही. सूर्य, चंद्र, तारका, पशु, पक्षी, वनस्पती ह्यांना कुणालाही जगाशी व्यवहार करताना प्रश्न पडत नाही. हा प्रश्न बुद्धीचे दिवाळे वाजलेल्या माणसालाच पडतो. नैसर्गिक नियमानुसार माणसाला राहता येत नाही, कारण त्याला आपल्यावर बंधने नको आहेत. मनाप्रमाणे वागायला हवं आहे. इथेच सर्व संकटांचा उगम ... मग यांत आपल्याला बदल कसा करता येईल ? शिक्षण पद्धती बदलून ... हे काम एक माणूस अगर एक स्वामी करू शकणार नाही. राष्ट्रकुल ...च्या किंवा तत्सम दुसऱ्या आंतरराष्ट्रीय संस्थांनी हे काम केले पाहिजे. ...त बदल' असं जेव्हा मी म्हणतो तेव्हा नुसती पुस्तके बदलून तीही ... व पाजी लोकांनी लिहिलेली नव्हे. नुसती पुस्तके बदलून हे साधणार नाही. शिक्षण पद्धतीत बदल व्हायला हवा. मी शैक्षणीक वातावरणाबद्दल बोलतो आहे. ते वातावरण सुंदर व प्रसन्न असले पाहिजे. मुलांना सौंदर्याचा आस्वाद घेण्यास शिकविले पाहिजे. त्याकरता पालकांनी त्यांना वस्तूसंग्रहालय पाहायला न्यावे. नाहीतर मुले नुसती शरीराने वाढतात पण त्यांना सौंदर्यदृष्टी येत नाही.ती दृष्टी पालकांनी त्यांना दिली पाहिजे. सूर्योदय, सूर्यास्ताचे सौंदर्य त्यांना दाखवले पाहिजे. हे सर्व आत्यंतिक प्रेमाने केले पाहिजे म्हणजे योग्य ते वातावरण निर्माण होईल. यामुळेच मुलांच्या मनात व आचरणात नवीन मूल्ये रुजतील व मूल्याधिष्ठित जीवन पद्धती निर्माण होईल.

हे बंदुकीच्या धाकाने साध्य होणार नाही. कम्युनिस्ट लोक असा प्रयोग गेले पंचावन्न वर्षे करीत आहेत. आता तर तिथे प्रत्येकाजवळ बंदूक आहे. तसं न करता मुलांना हळूहळू शिकवले पाहिजे तर या प्रवृत्तीत बदल होईल. ही काही पंचवर्षीय अथवा दशवर्षीय योजना नाही. भरकटलेल्या माथेफिरू जगाला योग्य त्या ठिकाणी आणण्याची ती दीर्घकालीन योजना आहे. योग्य विचार व आचार होण्याकरता त्या जगाला पूर्वपदावर आणलं पाहिजे. ह्या गोष्टी करण्यास बराच काळ लागतो. हे असे का व कसे केले पाहिजे याबद्दलचे संपूर्ण तंत्र व त्यामागची तार्किक विचारसरणी वेदांमध्ये सविस्तर दिलेली आहे. तीच माहिती फक्त आधुनिक माणसाचे समाधान करू शकेल. कारण आधुनिक माणूस आपल्या वाडवडलांसारखा 'होय बा' नाही. आपले आजोबा 'बायबलने प्रार्थना करा' असे म्हटले आहे की करीत असत. 'रामायण, महाभारत यांत सांगितलं आहे' म्हटलं की त्यावर प्रश्न विचारले जात नसत. तेवढे त्यांना पुरेसे असे.

पण आत्ताच्या काळात हे येवढे पुरेसे नाही. तुमच्या मुलाला जर तुम्ही सांगितलंत की, 'प्रार्थना कर' तर तो कमीतकमी दहा तरी प्रश्न विचारील. 'का म्हणून ?' हा पहिला प्रश्न - पुढे विचारतील, 'प्रार्थना म्हणजे काय - कोणाची करायची - तो परमेश्वर काय आहे - कुठे आहे' इत्यादी इत्यादी. तुमच्याजवळ याची उत्तरे नाहीत. ''ही पिढी फार भयंकर आहे.' असे म्हणून त्याला घालवून देता. कारण त्याची उत्तरे आपल्यालाच माहीत नसतात. 'चर्चमध्ये जा', असे आईने सांगितले तर मुलगा म्हणतो, 'आई, तू तर म्हणतेस की परमेश्वर सर्वव्यापी आहे, मग तो या घरात नाही का ?' माझ्या शेजारघरात नाही का ? आणि माझ्या खोलीत जर तो असेल तर माझ्या पांघरुणातही तो असेलच ना ? मग मी इथून उठून चर्चमध्ये कशाला जायचं ? तो जर सर्वत्र असेल तर माझ्या आतही तो आहे ! असले प्रश्न ऐकल्यावर माताजी एवढेच म्हणतात, 'आताची मुले अगदी भयंकर राक्षस झाली आहेत. मी अगदी बुद्धू असल्यासारखी ती माझ्याशी बोलतात. अशा मुलांना समजावून सांगण्याची पद्धत बदलली पाहिजे. त्यांना सांगावे 'हे बघ बाळा ! दूध हे गाईचे सार आहे की नाही ? खरं तर ते गाईच्या सर्व अंगभर असतं ना ? मग आपल्याला जेव्हा दूध हवं असते तेव्हा आपण तिचे नाक, कान, शेपटी यांपासून ते काढू शकतो का ? काढू म्हटलं तरी कितीही प्रयत्नाने तिथून दूध मिळणार नाही. ते मिळवण्याकरता गाईच्या आंचलालाच हात घालावा लागेल. त्याचप्रमाणे परमेश्वर जरी सर्व व्यापी असला तरी चर्च, मशीद, मंदिर या ठिकाणीच त्याचे अस्तित्व स्पष्टपणे समजू शकते. कारण तिथे आपल्या मनाचे वातावरण शांत, गंभीर व ध्यान योग्य असते. हे वातावरणच तुम्हाला जाणीवेच्या वरच्या स्तरावर घेऊन जाते. अशा रीतीने जर तुम्ही मुलांना समजावून सांगितलेत तर तुमचा तरुण मुलगा मान्य करील की नाही ? विचार करा. 'मुलांना नीट पटेल असे उत्तर आपण देऊ शकत नाही', ही खरी समस्या आहे. मुलांचा दोष नाही. आपली पिढी जणू हे सर्व विसरलेली आहे.

त्याकरता आपण आधी धर्मग्रंथ वाचले पाहिजेत. फक्त वेदान्त वाचा असे मी म्हणत नाही. तुमची बुद्धी चौकस असेल व या 'कां व कसे ?'ची तर्कयुक्त मीमांसा जाणून घ्यायची तळमळ असेल तर वेदान्ताचा अभ्यास करा. कारण वेदान्त हे शास्त्रीय दृष्टीने या गोष्टींचे विवरण करते. तसं तर इतरही सर्व धर्मग्रंथ आपल्यात असलेल्या या सत्य तत्त्वाचेच (परमेश्वराचे) निर्देशन करतात. त्याला अपवाद नाही. म्हणून कुठलाही धर्मग्रंथ या उच्च ठिकाणी नेऊन पोचवतील. पण त्याकरता स्वतःच स्वतःवर प्रयोग करायला हवा. कारण हे कर्तृतंत्र (व्यक्तिगत) शास्त्र आहे. माझे पिताजी फार थोर व प्रसिद्ध संगीतकार होते म्हणून ते मला संगीत शिकवू शकतील असे नाही. कारण संगीत म्हणजे इकडेतिकडे फिरवण्याचा चहाचा कप नव्हे. शिकवण्याकरता एक विशिष्ट वातावरण लागतं आणि शिकणाऱ्यालाही खूप मेहनत घेऊन ते वाढवावं लागतं. कारण संगीत ही संपूर्ण व्यक्तिगत कला आहे. त्याप्रमाणे आध्यात्मिक विकास हाही स्वप्रयत्नानेच करावा लागतो. आपण मुलांना फक्त योग्य ती माहिती व वातावरण देऊ शकतो. म्हणून लहानपणापासून मुलांना त्यामागचे तर्कशास्त्र हळूहळू शिकवा आणि एकदा का त्यांना ते समजले की एखादे बदक पाण्याकडे भरभर जाते तसे ते आत्मविकासाच्या मार्गावर अगदी जलद गतीने प्रगती करीत जातील - इतकी की आश्चर्याने पाहातच राहावं !

आधुनिक तरुण हा फुकट गेलेला प्राणी आहे, असे म्हणणे खरे नाही. आपल्याच मनात गोंधळ असल्याने आपण त्यांना नीट मार्गदर्शन करीत नाही. त्यामुळे तो फुकट जातो आहे. अशा वेळी वेदान्त आपल्याला योग्य ते ज्ञान देते. मी म्हणतो तो हा सर्व काल्पनिक ध्येयवाद नाही. मी स्वतः लहान मुलांवर हा प्रयोग केला आहे. आमच्या ६२ शाळांमधील थोडी मोठी मुले, युवक केन्द्रातील तरुण यावरही प्रयोग चालू आहेत. या सर्व शाळांमध्ये तत्त्वज्ञानाच्या अभ्यासावर भर दिला जातो. पाश्चिमात्य ज्याला तत्त्वज्ञान म्हणतात तसले हे तत्त्वज्ञान नव्हे. कारण पाश्चिमात्य तत्त्वज्ञानामध्ये फक्त बौद्धिक पातळीवर चर्चा होते; पण यापुढे ते शास्त्र जात नाही. या सर्व ठिकाणी या प्रयोगाला सर्व मुले चांगला प्रतिसाद देत आहेत. याकरता काही वेगळ्या पुस्तकांची योजना केली आहे. त्यामुळे मुलांना खूप फायदा झाला आहे व आम्ही असेच प्रगती करीत राहणार आहोत.

हे संपूर्ण वेदान्त शास्त्र मी आपल्याला एका तासात सांगू शकणार नाही. चार-पाच वर्षांपूर्वी मला एक ठिकाणी चहापानाला निमंत्रण आले होते. तेथे प्रोफेसर चार्लसशी माझा परिचय करून देण्यात आला. ते न्युक्लीयर शास्त्राचे फार मोठे अधिकारी आहेत. मला ते शास्त्र येत नसल्याने थोडं जाणून घेण्याची इच्छा होती. म्हणून मी त्यांना विचारले, 'न्युक्लीअर शास्त्र म्हणजे काय आहे ?' त्यांनी माझ्याकडे डोक्यापासून पायापर्यंत दोनदा पाहिले. आणि बाजूला वळून आपल्या उजव्या हाताला बसलेल्या माणसाशी बोलू लागले. एखादे

मांजर हळूच आंत शिरावे ना तसे त्यांनी माझ्याकडे पाहिले. माझी अशी उपेक्षा केल्याबद्दल मी त्यांना दोष देत नाही. कारण येवढं मोठं शास्त्र ते थोड्या वेळांत कसं काय समजावणार ? त्याप्रमाणे या युनोच्या सभेत जर एका तासात वेदांत सांगण्यास सांगितले तर ते अशक्य आहे. पण आताच्या काळात, या परिस्थितीत मानवजातीला वेदांत कसा उपयुक्त आहे, याची थोडी कल्पना देऊ शकतो.

सर्व जगच दुःखी व हलाखीत जगत आहे. आताचे लोक समजतात त्याप्रमाणे आणखी एक बायको व अधिक पैसा यांत आनंद व सुख नाही. आपली बायको सोडून गेली म्हणून दुसऱ्याच्या पत्नीवर डोळा ठेवायचा हल्लीच्या या मानसिकतेत काय अर्थ आहे ? आणि कशाकरता ? तर आपल्या सुखाकरता ? समजा नवीन पत्नी आली, तरी पहिला आठवडा ठीक असतो. पुन्हा येरे माझ्या मागल्या. लगेच दुसऱ्या आठवड्यात वाटतं की 'मी चूक केली, आता ही ही बायको मला बदलली पाहिजे.' मग तिसरी, माझी चौथी व तिचा पाचवा नवरा ! याला काही अर्थच नाही. कारण ते शाश्वत सुख नाही. म्हणून असल्या या मनाच्या घाणेरड्या अवस्थेतून आता जागं व्हायचं आहे. आपल्या मनबुद्धीचा विकास करून प्राणीवेच्या एका उच्च अवस्थेत जायचे आहे. त्याकरता भौतिक आनंदाचे क्षुद्र मोह सोडायचे आहेत व जीवनाच्या एका अधिक श्रेष्ठ उद्देशानुरूप जगायला सुरुवात केली पाहिजे. कोणत्याही उच्च ध्येयाकरता जीवन व्यतीत करण्यात माणसाला अधिक समाधान व आनंद मिळतो हे अनुभवायचं आहे.

मी आपला आभारी आहे.

॥ तद् सद् ब्रह्मार्पणमस्तु ॥

रूपांतर – शालिनी मराठे, मुंबई.
मो. : ९८६९६४३५६२



# आत्मबोध : एक चिंतन

प्रा. डॉ. अजित कुलकर्णी

*बी.ए. (तत्त्वज्ञान) एम.ए. (तत्त्वज्ञान, समाजशास्त्र) पीएच.डी. श्रीमत् भगवत गीता एक जीवन प्रणाली. रजिस्ट्रार बी.एम.सी.सी. कॉलेज. पुस्तके, लेखमाला प्रसिद्ध. गेली ३० वर्षे प्रवचन, कीर्तन, व्याख्यान - श्रीज्ञानेश्वरी, भागवत, दासबोध, रामकृष्ण, विवेकानंद इत्यादी. शंकराचार्यांकडून गौरव पुरस्कार, पुणे महानगरपालिका आदर्श शिक्षक व गौरव पदक. धर्मभूषण पदवी - श्रीमत् शंकराचार्य (पुरी) १९९६.*

स्वामी चिन्मयानंदांचे सर्व साहित्य हे इंग्रजी भाषेतून असताना चिन्मय मिशनच्या चिन्मय प्रकाशन, मराठी विभागाने ते साहित्य मराठी भाषेत, मराठी साधक-उपासकांना उपलब्ध करून दिलं आहे, ही एक समाधान - आनंदाची गोष्ट आहे.

आपल्या पूर्वसुरींप्रमाणे, स्वामी चिन्मयानंद, हे एक ऋषीतुल्य व्यक्तिमत्त्व! समर्थ रामदासांच्या शब्दात म्हणावयाचे झालं तर स्वामी म्हणजे कोण ? तर

*धर्मसंस्थापनाचे नर । ते ईश्वराचे अवतार ॥*

असे हे ईश्वरी अवतार होते.

तसेच, समर्थ म्हणतात,

*जे वस्तु परम दुल्लभ । जयेचा अलभ्य लाभ ।*
*तेचि होय सुल्लभ । संतसंगे करूनी ॥ १.३.२॥ दा.बो.*
*वस्तु प्रगटचि असे । पाहता कोणासीच न दिसे ।*
*नाना साधनी सायासे । न पडे ठाईं ॥ १.५.३॥ दा.बो.*

परमात्म व आत्मवस्तू अतिशय दुर्लभ असून ती प्राप्त होणे हाच खरा लाभ आहे. ती दुर्लभ वस्तू संत संगतीने सुलभ रीतीने लाभते. वास्तविक, आत्मवस्तू अगदी उघड आहे, पण देहबुद्धीने ती पाहू लागलं की कोणास ही दिसत नाही. ती प्राप्त व्हावी म्हणून नाना प्रकारच्या साधनाचे कष्ट केले तरी ती अनुभवाला येत नाही.

तसे आत्म स्वरूपाचे ज्ञान अत्यंत गुप्त असते. ते संत महात्म्ये यांच्या सान्निध्यातच प्राप्त होवू शकते, हा एक अनुभव आहे.

स्वामी चिन्मयानंदांनी आद्य शंकराचार्यांच्या 'आत्मबोध' या प्रकरण ग्रंथावर जे भाष्य केलं आहे. त्यांचे हे चिंतन उपासकांना आत्मज्ञान, आत्मबोध करून देण्यास समर्थ आहे. महात्म्यांच्या स्वानुभवात हे व्यक्त होत असल्याने याला विशेष महत्त्व असते. त्याचा वेध आपण या लेखातून घेणार आहोत.

## सध्याची सामाजिक स्थिती

सध्या मनुष्याचे जीवन अत्यंत गतिमान झालं आहे. २१ व्या शतकातील २०२० सालचे महासत्तेचे भविष्य आपण पाहात आहोत. हे सारं ठीक आहे. भौतिक यश तसेच सुखाच्या उपलब्धी यांनी मानवी जीवन एका उच्च शिखरावर जात आहे. तथापि, या 'महासत्ता' व गतिमान जीवनात मनुष्याला जीवन व जीवनाचा अर्थ समजून घेण्याचे विषयी तसेच, मानसिक वा अंतरंग विकास यासाठी काही मार्गदर्शन घेणे अत्यंत आवश्यक आहे. यासाठी मात्र कोणी बोलत नाही. वास्तविक, समाजातील सर्व स्तरावरील भ्रष्टाचार, हिंसाचार, बालहत्या इ. गोष्टी पाहिल्या तर आमचा हा विकास अगदी 'अधरी' गतिला नेत नाही ना ? ही विचारवंतांसमोरील समस्या आहे.

तेव्हा या पार्श्वभूमीवर शंकराचार्य, स्वामी चिन्मयानंद व इतर सर्व संतांचे मौलिक विचारधन हे मनुष्याला निश्चितच सद्गुण संपन्न, नीतीसंपन्न करण्यास उपयुक्त ठरत असते. तेव्हा या गतिमान स्थितीत अंतरंग सुधारण्यात निश्चितच मदत होते. तसेच, अध्यात्मिक आनंदासाठीही या आत्मबोधाची उपयुक्तता मोलाची आहे.

वेदान्त हे जीवनाचे शास्त्र आहे. ते जीवन जगण्याची कला स्पष्ट करते. जीवनाचे अंतिम ध्येय सांगत आहे. त्यामुळे या विचारांच्या सूत्रांनी हे जाणून घेणे यातच जीवनाची कृतार्थता आहे.

## स्वामी चिन्मयानंदांची भूमिका

या भौतिक विश्वात मनुष्य जगताना मानसिक संभ्रम दूर व्हावा व शारीरिक शक्तीचा पूर्ण आनंद मिळावा म्हणून प्राचीन ग्रंथातील दिव्यज्ञान त्यांनी प्रकट केले आहे. यातून अभ्यासकांचा, साधकांचा उत्साह वाढावा, त्यातून आनंद प्राप्त करून घ्यावा. जीवन संपन्नतेला मदत करू शकते. ज्ञानाचे दोन प्रकार आहेत. एक म्हणजे शास्त्रीय सिद्धान्त आणि पद्धती याचे विवरण ज्यात असते, ते 'शास्त्र ग्रंथ' होत आणि या शास्त्र ग्रंथातून वापरलेल्या संज्ञा आणि परिभाषा ह्यांचे स्पष्टीकरण ज्यात असते त्याला 'प्रकरण ग्रंथ' म्हणतात. हे प्रकरण ग्रंथ शास्त्राचे अधिक स्पष्टीकरण करीत असतात. त्यामुळे 'आत्मबोध' हे 'प्रकरण ग्रंथ' असून वेदान्त विषय यातून समजून दिला आहे. यात आत्मज्ञान बोध प्राप्तीचा मार्ग विदित केला आहे.

## आत्मबोध या ग्रंथाविषयी

शंकराचार्यांच्या 'आत्मबोध' या प्रकरण ग्रंथात एकूण ६८ श्लोक / मंत्र आहेत. या आत्मबोधाविषयी शंकराचार्यांची भूमिका अशी की, साधक/उपासकांचा काही अभ्यास झाला असून त्यांची आत्मतत्त्व बोध प्राप्त करून घेण्याची तयारी झाली आहे. त्यांच्यासाठी हा विचार या ग्रंथात मांडत असत. वास्तविक, सर्वांनी एक दृष्टिकोन घेण्यास हरकत नाही की, हे प्रकरण वाचून मोक्षाची इच्छा ज्यांच्या अंत:करणात होईल, त्याने त्याचे अवश्य चिंतन-मनन करावे आणि जे मुमुक्षू आहेत, त्यांना मोक्षप्राप्ती मार्ग मिळून आत्मज्ञान होईल.

या आधारावर स्वामी चिन्मयानंदांनी टीका लिहिली आहे, असे दिसते.

आद्य शंकराचार्य म्हणतात, 'जे तपाचरणाने शुद्ध झाले आहेत, जे अंत:करणामध्ये शांत व स्वस्थ आहेत, जे आसक्तीपासून मुक्त आहेत आणि जे मोक्षाची इच्छा करीत आहे. त्यांच्याकरिता या आत्मबोधाची रचना करीत आहे.'

## आत्मबोधासाठी गुणविशेषांची आवश्यकता

आत्मबोध प्राप्तीस सर्वजण पात्र आहेत. त्यामध्ये गुणांचा अंगिकार हा

मार्गक्रमणास उपयुक्त ठरतो. यासाठी हे गुणविशेष आंतरिक समायोजन आहे. ते गुणविशेष म्हणजे,

(१) सत् आणि असत् याचा विवेक होणे.

(२) असत् बाबत विरक्ती निर्माण होणे.

(३) शम, दम, इ. षड्संपत्तीचा अंगिकार करणे.

(४) आत्मस्वरूपाच्या ज्ञानाची तीव्र तळमळ वाटणे. (मुमुक्षुत्व वा पुनर्शोधाची इच्छा)

या जगात वावरताना सर्व संबंधाचे ठिकाणी आत्म संयमाने जगण्याचा प्रयत्न करणे, तसेच उच्च हेतुसाठी जे समर्पण केलें जाते, त्याला 'तप' असे म्हणतात. तीर्थयात्रा, जप, ध्यान ही सर्व तपसाधना आहे. याने मनुष्याच्या पापांचा क्षय होतो.

पाप म्हणजे स्वत: एक कृती नाही तर चुकीच्या कृतीचा परिणाम असून, त्यातून निर्माण होणारी प्रवृत्ती (वासना) आहे.

तपाने पापाचरण क्षीण होते व मानसिक शांती मिळते आणि आत्मबोधास उपासक सक्षम होतो. यासाठी तपाचरण व आत्मसंयमनाची साधना करणे आवश्यक आहे.

कर्माचरण, दानधर्म, तपाचरण, मन:संयमन, ग्रंथांचे अध्यायन, या गोष्टीत अध्यात्मिक प्रगतीच्या सहाय्यभूत घटक आहे. हे मनुष्याला मोक्षापर्यंत नेतात पण मोक्षासाठी ज्ञानाची आवश्यकता आहे. त्यामुळे कर्म अज्ञानाचा नाश करीत नसून, ज्ञानच अज्ञानाचा नाश करीत असते. हे ज्ञान, हे आत्मतत्त्व आंतरिक उपकरणे (अतिइंद्रियांनी) जाणता येते. थोडक्यात, ज्ञानदेवांच्या शब्दात हे ज्ञान स्वसंवेद्य आत्मस्वरूप असते. (श्लोक : १)

## जीवनात साध्ये कोणती व साधना कशी करावी याचे मार्गदर्शन

आत्मतत्त्व नित्य, सर्वव्यापी, परिपूर्ण, सत् चितरूप आहे. हे आत्मज्ञान प्राप्त करून घ्यावे, म्हणजेच स्वस्वरूपाचे ज्ञान होणे हेच जीवनाचे साध्य असावे. यासाठी पुनर्शोध वृत्ती (मुमुक्षुत्व) असावी.

यासाठी साधन म्हणजे, **सतत अभ्यास असावा**. अज्ञानामुळे हे आत्मस्वरूप मर्यादित वाटत असते. यासाठी ज्ञानरूपी प्रकाशाची गरज आहे. स्वामी चिन्मयानंद - मनाबद्दल म्हणतात, 'मन म्हणजे दुसरे काही नसून एक विचार प्रवाह आहे.' तेव्हा ध्यानावस्थेने मन शांत करावे आणि दिव्य अध्यात्मिक विचार म्हणजे ध्यानाची कला असते, ती जीवनात प्राप्त करून घ्यावी.

**ध्यानाचा अभ्यास करावा.** ध्यानाने मनाचे उदात्तीकरण होवून स्वत:चा भाव संपून जातो. यात होतं कसं तर, जोपर्यंत ब्रह्मभाव प्रकट होत नाही तोपर्यंत जग हे सत्यच वाटत असते. हे जग शारीरिक, मानसिक व बौद्धिक पातळीवर अनुभवता येते. परंतु मनाच्या संवेदना व भावना या जेव्हा शांत होतात, तेव्हाच ब्रह्मभावाचा अनुभव येतो.

हे जाणण्यासाठी दोन उदाहरणे आहेत. (एक) ती म्हणजे, ज्याप्रमाणे पाण्यावरील फेस व बुडबुडे याचे अधिष्ठान हे केवळ पाणी असते. तेव्हा परमश्रेष्ठ तत्त्व म्हणजे 'ब्रह्म' यावर या विश्वाचा डोलारा आहे. त्याला जाणावयाचे आहे. (दुसरे) सुवर्णाचे दागिने केले तरी, दागिन्यातील सुवर्णत्वाचा गुण हा असतोच, तसेच हे ब्रह्म सर्वव्यापी असून हे आत्मतत्त्वानीही तेच असते.

हे केवळ सततच्या अभ्यासाने जाणता येते. यासाठी स्वामी चिन्मयानंद म्हणतात, ज्ञानग्रहणाची आंतरीक उपकरणी ही शुद्ध करण्यासाठी दिव्य कर्मे उपयुक्त पडतात. (श्लोक : २ ते १०)

## आत्मतत्त्व सर्वव्यापी असूनही जाणवत का नाही

हे आत्मतत्त्व सर्वव्यापी असूनही जाणवत नाही, कारण या विश्वातील उपाधीमुळे जाणवत नाही. उपाधींचा संबंध हा जात, वर्ण, आश्रम इ. शी असल्यामुळे हे आत्मतत्त्व जाणवत नाही. पाण्याला रंग वा चव नसते पण त्यात रंग मिसळल्याने त्याचा रंग व चवही बदलते. यासाठी स्वामीजींनी एक उदाहरण दिलं की, वीज शक्ती एकच असते. तिच्यावर पंखे, दिवे (प्रकाश), यंत्र चालतात. तसे मनुष्याच्या वासनाप्रकारानुसार यात भेद दिसू लागतो.

यानंतर पंचमहाभूतांची निर्मिती व देहनिर्मिती सांगितली असून या देहाच्या, स्थूल, सूक्ष्म, कारण व महाकारण देहाच्या स्थिती विदीत केल्या आहेत. पंचमहाभूते यांच्या प्रक्रियेतून, तसेच प्रत्येक जीवाच्या कर्म व पूर्वकर्मानुसार हे आत्मतत्त्व अनुभवास येवू शकते. यातून उपाधी निर्माण होतात. अशा प्रकारे पंचकरण हा विषय सांगून यातून मानवी स्थूल देह व निर्मिती व मृत्यूनंतर त्याचे विघटन हे होत असते, हे सांगितले आहे.

सूक्ष्म देह हा पंचप्राण, मन, बुद्धी, पंचज्ञानेंद्रिये, पंचकर्मेंद्रिये, त्याच्या तन्मात्रा यापासून निर्माण होवून येथे जीव सुख-दु:खाचे अनुभव घेत असतो.

कारण देह हा अनादि व अनिर्वचनीय अशा अविद्येचा आहे. या तिन्ही अवस्थेपेक्षा भिन्न अशी आत्मस्थिती आहे. याला अविद्या असे म्हणतात. कारण येथे शाश्वत ज्ञान झाले पाहिजे असे असताना येथे ज्ञानावर आवरण व विक्षेप (भ्रम) निर्माण होतो. म्हणून याला अविद्या म्हणतात.

हे आत्मतत्त्व स्फटिकासारखे असते. याला पाच कोश आहेत. अन्नमय (स्थूल देह) कोश, प्राणमय कोश (वायुकोश), मनोमय कोश (मन), विज्ञानमय कोश (बौद्धिक), आनंदमय कोश (शुद्ध आत्मतत्त्व) हे प्रत्येक कोश निर्मळ असून, मनुष्याच्या वृत्ती, वासनाप्रमाणे हे कोश रंग घेतात व उपाधी बनतात. त्यामुळे आत्मतत्त्व हे दूषित असते. हे आत्मतत्त्व या सर्वांचे गुणधर्म स्वत:वर ओढवून घेतात.

हे जाणण्यासाठी शंकराचार्य उदाहरण देतात. तांदुळाला, तूस, कोंडा असतो. यात तांदूळ वेगळा असतो, तसे या आत्मतत्त्वाभोवती देहावस्था व पंचकोश असतात. तेव्हा मनुष्याने विवेकानी आत्मविश्लेषण व तर्कसंगत विचार करून आत्मतत्त्व जाणून घ्यावे, हे शंकराचार्य सांगतात.

आत्मतत्त्व सर्वच वस्तूत प्रकाशित होत नाही, परंतु ते केवळ अंत:करण वा बुद्धीत प्रकाशित होत असते. तेव्हा शरीर व इंद्रिय, मन व बुद्धी मिळून जशी प्रकृती बनते, तसे त्याच्याहून निराळा असणारा व कार्याचा साक्षी असणारा आत्मा हा तटस्थ (राजाप्रमाणे) असतो. यासाठी **'साक्षीभावाने पाहण्याची सवय असावी'**. तेव्हा जीवनात चांगले-वाईट, योग्य-अयोग्य, सुख-दु:ख हे सर्व साक्षीभावाने पाहणे, हे महत्त्वाचे आहे.

ज्याप्रमाणे आकाशात ढग हलू लागतात तसे चंद्रच धावल्याप्रमाणे दिसतो, तसे इंद्रियाकडून कर्मे घडताना आत्मतत्त्व स्थिर असून ते क्रियाशील बनते. यासाठी स्वामींनी सुंदर उदाहरण दिलं आहे - आगगाडीचे इंजिन ज्याप्रमाणे सर्व डबे ओढत असते, पण डब्यातील प्रवाशांना त्याबद्दल लोभ नसतो, तसे आत्मतत्त्व हे शरीर, मनबुद्धीला व्यक्त करते तेव्हा आत्मतत्त्व हे कर्म करीत असल्याचे दिसते. परंतु प्रत्यक्ष आत्मतत्त्व हे कोणत्याही प्रक्रियेत सहभागी होत नाही. असे हे आत्मतत्त्व अलिप्त असून, मनुष्याच्या इच्छा, वासनादि कर्मांनी झाकोळले जाते.

तसेच ज्याप्रमाणे सूर्यप्रकाशावर सर्व जगताचा व्यवहार सुरू होतो तसे आत्मचैतन्य व जीवनशक्तीवर शरीर, इंद्रिय, मन व बुद्धी आपापल्या क्रिया करीत राहतात. पण अज्ञानी व अविवेकी आरोप मात्र आत्मवस्तुवर करतात.

तसेच मनुष्य कर्तृत्व, भोक्तृत्व आणि इतर मर्यादा या सर्व मनाच्या अवस्था असतात. भावना कृती ही आत्मतत्त्वाला काही नसते. तरीदेखील ते स्वीकारते व आत्मतत्त्वात विक्षेप निर्माण करते.

मनुष्याची इच्छा, आसक्ती, सुख-दुःख इ. असतात तसे मन, बुद्धी कार्य करीत असतात. गाढ निद्रेत मनाचे अस्तित्व संपून जाते तेव्हा या गोष्टी जाणवत नाहीत. येथे सर्व खेळ मनाचे असतात. आत्म्याचे नाहीत.

ज्याप्रमाणे सूर्याचा स्वभाव हा प्रकाश देण्याचा, पाण्याचा थंडपणा, अग्नीचा उष्णता, हा स्वभाव असतो, त्याप्रमाणे आत्म्याचा सत्, चित्, अनंत, नित्य, निर्मळ असा स्वभाव असतो. यातच आत्मतत्त्वाचा सत् चित् भाग आणि बुद्धीतील विचार लहरी या गोष्टी अविवेकाने एकमेकांत मिसळल्यामुळे 'मी जाणतो', 'मी कर्ता' ही कल्पना उदयाला येते. आत्म्यालाही हा भ्रम वाटू लागतो. स्वामीजी म्हणतात, मानवी बुद्धीला स्वतःहून भावना, विचार, इच्छा वा अपेक्षा हे काही नसते. कारण ती जड, वा अचेतन अशा प्रकृतीतून बनलेली आहे. विद्युत् प्रवाहाशी संलग्न झाल्याशिवाय दिवा स्वतःहून प्रकाश देत नाही. तसे येथे घडते.

जेव्हा अहंकेंद्रित व्यक्तीला मी जीव नाही हा अनुभव येतो, मी आत्मरूप आहे असा अनुभव येतो, तेव्हा व्यक्ती निर्भय होते. आत्मतत्त्व मन व ज्ञानेंद्रिये प्रकाशित करीत असते. या गोष्टी स्वयंप्रकाशी नाहीत. तशा या गोष्टी अचेतनच आहेत. ज्याप्रमाणे प्रकाश पाहण्यासाठी, दुसऱ्या प्रकाशाची गरज नसते, तसे आत्मा हा ज्ञानस्वरूप असल्याने, त्याला जाणण्यासाठी दुसऱ्या ज्ञानाची आवश्यकता नसते.

यासाठी वेदमहावाक्यांच्या, श्रुतिवचनावरून उपाधीचा निरास करून जीवात्मा व परमात्मा यांचे ऐक्य अनुभवावे, हा विचार शंकराचार्य सांगत आहेत. (मंत्र - ११ ते ३०)

## श्रुतिवचनानुसार आत्मबोध करून घ्यावे

शरीर, मन व बुद्धी हे उपाधीमुळे मर्यादित झाले आहे. तसेच वासना, इच्छा, आकांक्षानी बद्ध झालेले आहे. विषय वस्तूंच्या आकर्षणाने अनेक दुःखे व निराशा वाट्याला आल्या. तथापि, जीवात्मा हा परमात्मा आहे. तो निरूपाधिक, अमर्याद, अविकारी, सत्, चित्, आनंद सारतत्त्वातच आहे. जेव्हा हा आत्मा या मर्यादित, बंधनात राहतो तेव्हा मात्र पूर्णानंदस्वरूप अमर्याद ब्रह्म होत नाही. परंतु जेव्हा तो या उपाधीच्या आवरणापासून अलग होतो तेव्हा दिव्य सत्यतत्त्वाचा अनुभव घेऊ शकतो.

हे ज्ञान मनुष्याने केवळ विवेकानी जाणून घ्यावे आणि सर्वाहून संपूर्णपणे, नित्य मी भिन्न असून मीच शुद्ध ब्रह्म आहे. हे विवेकाने जाणावयाचे की, विषय ग्रहणाच्या भावनाच्या वा आकलनाच्या कक्षेत येते, ते ग्रहण करणारे ज्ञानेंद्रिय असतात. भावना व्यक्त करणारे मन असते व आकलन करून देणारी शक्ती ही बुद्धीच्या ठिकाणी असते. या सर्वाहून शुद्ध आत्मतत्त्व वेगळे आहे. या विवेकाने शरीर, मन, बुद्धी शांत झालं पाहिजे.

त्याप्रमाणे मी देहाहून वेगळा आहे. मला, जन्म-मृत्यू, तारुण्य, वार्धक्य काही नाही. शब्द व रस इत्यादी विषयांशी माझा काही संबंध नाही. कारण मी ज्ञानेंद्रियरहीत आहे. हे ज्ञान स्थिर राहणे आवश्यक आहे. मी एकमेव परिपूर्ण आत्मतत्त्व असून ते नित्य व निर्मळ गुण व क्रियारहित आहे. हे निश्चित झालं पाहिजे.

तसं पाहता आकाशाप्रमाणे सर्व वस्तूंना तो अंतर्बाह्य व्यापून आहे. मी अविकारी व सर्व ठिकाणी सारखा असून सर्व काळी शुद्ध, अलिप्त व निष्कलंकीत व निश्चल असा आहे. मी केवळ नित्य शुद्ध व मुक्त, एकमेव अखंड व अद्वितीय आणि निर्विकारी ज्ञान अनंत अशा स्वरूपाचा आहे. याचा सतत अभ्यास हवा आहे. याचे चिंतन करून हा भाव सतत मनात ठेवणे याने याचा अनुभव येवू शकतो.

यासाठी सर्वप्रथम वेदोक्त महावाक्ये आहेत. त्याच्यावर श्रद्धा ठेवून अभ्यास करणे ही महावाक्ये अशी आहेत -

(१) तत्त्वमसि - तेच तू आहेस.
(२) अयमात्मा - आत्मा हेच ब्रह्म आहे.
(३) प्रज्ञानम् ब्रह्म - जाणीव हेच ब्रह्म आहे.
(४) अहं ब्रह्मासि - मी ब्रह्म आहे.

ही महावाक्ये जीवात्मा व परमात्मा या विषयी दर्शवीत असतात. या दोन्हीत सत्य तत्त्व एकमेव पूर्ण ब्रह्म आहे. स्वामींच्या मते ही वाक्ये समृद्ध अनुभवाकडे नेणारा दरवाजा आहे. यामुळे मनुष्य अध्यात्मिक अनुभवाच्या पवित्र क्षेत्रात पोहोचू शकतो. यासाठी श्रुतिमाता व महावाक्याच्या अभ्यासामुळे या दिव्यत्वाचा अनुभव घेता येतो. ज्ञानदेवांच्या शब्दात **'सर्वांघरी राम देहा देही एक । सूर्यप्रकाशक सहस्त्ररश्मी'** हा अनुभव येतो. दीर्घ अभ्यासाने अहंकेंद्रित विपरीत ज्ञान व कल्पना या नष्ट होतात. हे आत्मतत्त्व प्रकाश रूपाने जाणवू लागते. (मंत्र : ३० ते ३७)

## आत्मतत्त्व बोधासाठी साधन मार्ग

आत्मबोधाच्या प्राप्तीसाठी साधनमार्ग आचार्यांनी सांगितला आहे. तो म्हणजे, मनुष्याने एकान्तात बसून मन इच्छारहित करून, इंद्रिये ताब्यात ठेवून पूर्ण एकाग्रतेने आत्मतत्त्वाचे ध्यान करावे. यात मानसिक, बौद्धिक संवेदना दूर करून ज्ञानेंद्रिये ताब्यात ठेवून स्व-स्वरूप जाणून घ्यावे. हे ध्यानाच्या माध्यमातून जाणता येते. हे परम सत्यस्वरूप असून पवित्र विचारांनी निर्भय व्हावे. या आत्मपरिवर्तनास स्वामीजी 'भावना' म्हणतात.

यानंतर साधकांनी सर्व विषय वस्तूंचे जग हे आत्मतत्त्वात विलीन करावे. तसेच, आत्मतत्त्व कशानेही कलंकित झालेले नाही, याचा सतत विचार करावा. सततच्या अभ्यासाने आत्म्याभोवतीची आवरणे नष्ट होतात. जसे आकाशात ढग जमल्यावर सूर्यप्रकाश स्वच्छ पडत नाही तसे हे होते. त्यामुळे दृश्य जगाचे अनित्यत्व पटले की आत्मतत्त्वाचा अनुभव येतो.

एकदा हे परमतत्त्वाचे ज्ञान झाले की, नामरूपात्मक वस्तूशी असलेले तादात्म्य संपून जाते. आणि जीव चित् व आनंद स्वरूपात राहू लागतो. यासाठी ध्यानाचा अभ्यास दृढपणे व्हावा लागतो. शेवटी ज्ञाता, ज्ञेय व ज्ञान ही त्रिपुटी संपून जाते व सर्वत्र प्रकाशमान स्थिती अनुभवास येते. हे कसे तर सूर्याला पाहण्यासाठी दुसऱ्या विजेरी (बॅटरी)ची आवश्यकता नसते. तसे हे ज्ञान असते. महावाक्यांचा ज्ञानाग्नी प्रज्वलीत होतो आणि अशा ज्ञानाग्नीत सर्व अहंमन्यता नष्ट होते व आत्मज्योत प्रज्वलित राहते. आत्मतत्त्वाच्या दिव्य जाणीवेचा उदय होतो. (मंत्र : ३८ ते ४२)

## साधनाची अनुभूती कशी येते

आत्मस्वरूप नित्य असल्याने, अज्ञानाचा नाश झाल्यावर आत्मस्वरूपाचा

अनुभव येतो. अज्ञानामुळे ब्रह्मावर जीवात्म्याचा भास होतो. हा भास आत्मप्रकाशात नष्ट होतो. अहंकेंद्रित अस्तित्त्वाची (जीवभावाची) कल्पना नष्ट होते. त्यामुळे आत्मस्वरूप मी व माझे हे अज्ञान, ज्ञानाने नष्ट होते. अशा ज्ञानातून अनुभव विश्व निर्माण होते. तेव्हा साधक ज्ञानचक्षूंनी सर्व काही पाहू लागतो आणि सत्यतत्त्वाचा अनुभव घेतो. हे सत्याचे ज्ञान साधक चराचरात अनुभवू लागतो. तसेच सर्व प्रकारचे गुण,दोष टाकून आनंद स्वरूपात तो राहू लागतो. हे सर्व कसे घडते, तर अळीचे रूपांतर असे भ्रमर कीटकात होते, त्याप्रमाणे साधक ब्रह्मस्वरूप होतो. यामुळे सर्व मोह, राग, द्वेषरूपी राक्षस ठार होतात व शांत मनानी हा उपासक आत्मारामात रममाण होवू शकतो. ब्रह्मसुखाची आसक्ती संपून जाते. असा साधक आत्मानंदात रमून जातो व सर्वांना प्रकाशित करतो. अशा वेळी साधक सर्वत्र निःसंगपणे वायुप्रमाणे सर्वात राहून भ्रमण करीत राहतो.

अशा वेळी मननशील उपासक हा सर्वव्यापी विष्णुतत्त्वाशी एकरूप होतो. हा एकरूप कसा होतो, तर जे प्राप्त झाले असता दुसरे काही प्राप्त करावे असे शिल्लक राहत नाही. त्यामुळे त्याला जन्मही नसतो. सर्वत्र अनंत अद्वय ब्रह्माची जाणीव (ज्ञान) राहते. हीच आनंदाची स्वानुभूती असते. ज्याप्रमाणे लोणी हे दुधात व्यापून असते, त्याप्रमाणे ब्रह्म हे प्रत्येक वस्तूत व्यापून असते. हे जाणण्यासाठी साधना करावी. (मंत्र ४३ ते ५९)

## वेदान्त ज्ञानासाठी साधना

ब्रह्म हे जन्मरहित व अविकारी आहे. त्याला आकार, गुण, रंग, नाव काहीही नाही. ते स्वयंप्रकाशी आहे. संपूर्ण विश्वात ते व्यापून आहे. तथापि ब्रह्म हे विश्वाहून निराळे आहे. हे सत्यतत्त्वाचे ज्ञान अद्वितीय आहे. हे आत्मतत्त्व चैतन्य स्वरूप आहे.

हे स्वरूप जाणण्यासाठी श्रवण, मनन, निदिध्यासाच्या साधनांनी वैचारिक मंथन करून ब्रह्मरूपी नवनीताची गोडी चाखावी. हीच अनेकविधतेतील चैतन्याची अनुभूती आहे. यासाठी नामरूपात्मक जगतात मनुष्याने रमून जावू नये व ब्रह्मज्ञानास घट्ट पकडून ठेवावे. हे ज्ञान केवळ ज्ञानचक्षूंनीच पाहू शकतो. हे ज्ञानचक्षू म्हणजे मनुष्याची अंतर्ज्ञान शक्ती असते. यासाठी श्रवणादी साधनांनी ज्ञानरूपी अग्नी प्रज्वलीत होतो व मनुष्याच्या ठिकाणचे सर्व अशुद्ध दोष नष्ट होवून केवळ सुवर्ण राहते. त्याप्रमाणे ज्ञानाची साधना घडली पाहिजे.

वेदांत ज्ञान तीन पातळ्यांवर होते.

(एक) धर्मग्रंथ व सद्गुरू सांगतात, त्याचे श्रवण करावे.

(दोन) जे सत्य आहे ते तर्कसंगतीवर मनन करणे, ही मननाची क्रिया.

(तीन) जे ऐकले, ते मनन केले. त्याचे सखोल चिंतन करणे. या निदीध्यास साधनेनी अंतःकरणाची अशुद्धता दूर होते. या साधनेने हृदय आकाशात सर्व प्रकाशमान होते. याला काळ, दिशांचे बंधन नसते. हेच अमृतपद असते. (मंत्र ६० ते ६८)

## समारोप

अभ्यासाच्या दृष्टीने स्वामी चिन्मयानंदांचा मूळ 'आत्मबोध' या पुस्तकाची संहितावरून अधिक माहिती घ्यावी, अवलोकन करावे.

आत्मबोध वा आत्मज्ञान प्राप्त करून घ्यावे, हे प्रत्येक मनुष्याचे कर्तव्य आहे. साधक / उपासकांना हे ज्ञान प्राप्त करून घेताना, जे काही जाणवेल त्याचा एक वस्तुपाठ आद्य शंकराचार्यांनी मूळ संहितेत सांगितला आहे. तरी स्वामी चिन्मयानंदांनी त्यावर सखोल चिंतन व्यक्त केले आहे. संतांचा हाच कळवळा असतो. श्रवण, मनन, निदिध्यास या क्रमांनी मनुष्याने अभ्यास करावा व आत्मज्ञान प्राप्त करून घ्यावे आणि जीवन कृतार्थ करावे. हा उद्देश यामागे आहे.

असे हे स्वामी चिन्मयानंद प्रज्ञानंदी आत्मानुभूती, प्रतिभासंपन्न संत होते. यांची ग्रंथसंपदाही विपुल आहे. अशा या साधन विचारात मुमुक्षुत्वाची भूमिका, त्यासाठी तळमळ, जीव-जगत प्रक्रिया, आत्मतत्त्व जाणण्याची प्रक्रिया, साधनमार्गातील अडचणी व साधनेतून व्यक्त होणारी सिद्धावस्था या क्रमानी हा 'आत्मबोध' विकसीत झाला आहे.

**डॉ. अजित कुलकर्णी**
३४६, शनिवार पेठ, नवीन मराठी शाळेसमोर,
पुणे - ४११०३०.
फोन : २४४८७०३०

## महायोगी गुरूदेव

॥ श्री ॐ चिन्मय सद्गुरूवे नमः ॥
चिरंतन चिरकाल युगानयुगे
दरवळेल सुगंध सुवर्ण-स्मृतींचा विश्वामध्ये
कर्मयोगी ज्ञानयोगी भक्तीयोगी चैतन्य
ब्रह्मज्ञानी सर्वज्ञ तत्त्वज्ञ द्रष्टे गुरुदेव
शिस्तप्रिय राष्ट्राभिमानी हिंदुत्त्वनिष्ठ
रसिक विनोदप्रिय आंग्लभाषा पारंगत
वक्तृत्व निपुण संघटक कुशल अनुशासक
अवतरले भगवान भूवरी मानव कल्याणाप्रत
ध्येयपूर्ती हाच एक ध्यास होता खास
तमा नाही शरीर कितीही देवो त्रास
सन्यस्तवृत्ती अकर्तेपणा सहवास शब्दाहूनी बोलका
नव्हते प्रदर्शन बुद्धीचे होते ममत्व मातेचे
वेदान्त गीता ज्ञानयज्ञ आयोजन केले सर्वत्र
वेदान्त तसे सिद्धांत ते आचरणाचे शास्त्र
सोडा अहंकार घ्या शोध आत्म्याचा हा संदेश
यास्तव जीवन समर्पित स्थापीला सांदीपनी आश्रम
भक्त हो असु दे नित्य अनुसंधान माळ जपाची
नित्य शरणागती मानसपूजा गुरू पादुकांची
नमो नमः गुरू पादकांच्या स्वामी चिन्मयानंद महाराजा
द्या मज बुद्धी कार्यशक्ती प्रेरणा
उजळू दे ज्योत कार्याची ही संकल्पना
हाच प्रसाद हीच करीतो वंदना

**देशपांडे एस. डी.**
ए-१, पुष्पहास. सोसायटी,
सातारा रोड, पुणे ३७. फोन : २४२२८३३६

# न्दम् - प. पू. गुरुदेव या

प्रज्ञाशिष्या रामदासी

गुरुत्व ज्यांच्या नांवातच दडलेले आहे असे शंकराचार्य, त्यांच्या गुरूच्या प्रेरक हृदयातून स्फुरलेले हे काव्य ! 'भज गोविंदम्' अथवा चर्पटपंजिरी 'भज् गोविन्दम्'वर जीवनाची वास्तू मृत्यूच्या अग्निने प्रदीप्त होत असताना प्रपंचाच्या दुःखात निद्रामग्न असणाऱ्या प्रिय शिष्यांच्या कल्याणाकरिता आत्यंतिक उतावीळपणे (करुणेने) आणि बाह्यतः क्रोधयुक्त दिसणाऱ्या प्रेमाने त्यांच्यावर निर्दयपणे थोडेसे मधुर फटकारे मारणारे हे स्तोत्र होय.

'भज' म्हणजे प्रभूशी एकरूप होणे. हे खरे भजन, ही खरी सेवा होय, असे गुरूदेवांचे स्पष्ट म्हणणे आहे. तर 'गोविन्दम्'मध्ये वेदातील निर्गुण, निराकार ब्रह्म जे, तेच गोकुळातील कृष्णाचे सावळे रूप धारण करणारे विश्वंभर सगुण साकार रूप आहे, असे अनेक ग्रंथांच्या संदर्भाने सुस्पष्ट करतात.

मूढमते, मूढ म्हणून कृतक् कोपाने जीवाला सत्यतत्त्वाकडे अंतर्मुख होऊन वळविण्याचा आत्मीयतेने प्रयत्न करतात. लौकिक संपत्तीची आसक्ती, देहाची-कायिक सौंदर्याची ओढ वा आकर्षण, जीवनाची क्षणभंगुरता शंकराचार्य ज्या काव्यात्मकतेने असार आहेत असे सांगतात तेच बोल गुरूदेव सामान्य माणसाच्या भूमिकेत जाऊन पटवून देतात अन् तेही त्यांच्या मनी सखोल ठाशीव दडलेल्या अद्वैत वेदान्ताच्या भूमिकेस पक्के धरून. म्हणून बुद्ध-तत्त्वज्ञानाचे खंडन करीत, विवेकचूडामणी इत्यादी ग्रंथांच्या अवतरणांसह विवरण करीत राहतात.

'शून्याचा मोबदला शून्य' असे सरळ सरळ बुद्धांच्या शून्यवादाला तडाखा लगावीत, आत्मशुद्धीची कला म्हणजे परिपूर्ण साधण्याचे कौशल्य कसे साधावे हे पटवून देतात.

'देह' हे उपकरण साधन आहे याची सतत जाणीव राखण्याबद्दल गुरूदेव अत्यंत सजगतेचा Positive approach ने इशारा देतात व म्हणतात, 'यथार्थ ज्ञानाने देहात वास करणे हेच खरे निरोगी जीवन होय' असे देहाची निरर्थकता रुजवित रुजवित सहज खेळकरपणे गुरूदेव सांगून जातात.

मानवी जीवनात बाल-तारुण्य-वृद्धत्व असे टप्पे ओलांडत असता माणसाला त्या परब्रह्माशी संलग्न होण्यास एकही संधी सापडत नाही की फुरसतही मिळत नाही असे सखेदपणे नोंदवितात.

'हे बंधो ! किंवा हे वेड्या असे संबोधून त्या जीवाला परिवारादिंच्या आसक्तीपासून सोडविण्याचा प्रयत्न करतात अन् ९ व्या श्लोकात नेमका यावरचा रामबाण उपायही लगेच सांगतात. गीतेच्या अधःपतनाच्या सोपानाचा निर्देश करीत यामध्ये शंकराचार्यांनी उत्थानाची सोपान परंपरा कशी निर्देशित केली आहे ते सांगतात. तर कारण नाहीसे झाल्यावर कार्य रहात नाही हे पुढील श्लोकातून आणखी उघड करून सांगतात व क्रमाक्रमाने 'ब्रह्मपद त्वं प्रविश' हे मूळ सूत्र जीवावर बिंबवीत राहतात.

माणसाशी काळ खेळतो ते 'तमाशावत्' तो जीवन कसा भुलवीत राहतो व त्याचे फोलत्व उपनिषदांच्या आधारे सांगत शेवटी 'अरे ! शहाणा हो ! इच्छा-आकांक्षा सोड, सत्यतत्त्वाचा शोध घे, ते अनंततत्त्वच केवळ तुला समाधान देईल' असे अगदी सरळ सरळ सांगतात. जीवनाचा हा मूलमंत्र, हे सार बिंबविण्यासाठी इंद्रियनिग्रह, संतोष, स्वाध्याय, चिंतन वा विचार, ही साधने सांगत आंतरिक विकासाच्या टप्प्यावर हा 'सत्संग'च हितकारक कसा ठरतो ते फारच सुगमतेने समजावून देतात.

जटीलो मुण्डी... या श्लोकाच्या विवरणाद्वारे भोंदू साधूंचे चाळे कसे अनुभवास येतात ते सांगतात. अन् पुढे अंगं गलितं-मध्ये वृद्ध होत जगणाऱ्या तरुणाचे सुंदर चित्र सुस्पष्ट करून दाखवितात. तर त्यापुढे ढोंगी संन्यासी जीवनाचा हास्य विषय वा तिरस्कार सुस्पष्ट करतात.

तर कुरुते गंगासागरगमनं... द्वारा अज्ञानीपणाने धार्मिक व्रताचरण करणाऱ्यांवर ओरखडे काढीत, परिपूर्ण आत्मतत्त्वाला ओळखणे, हेच जागे होणे असे सांगून 'तत् त्वम् असि'च्या महावाक्याचा निर्देश सहजी करून जातात. त्यापुढे बाह्याकारी वैराग्य जोपर्यंत आहे तोवर जीवनाचा खरा आनंद मिळणे शक्य नाही हे सुंदर उदाहरणांनी गुरूदेव पटवून देतात.

ब्राह्मीस्थितीची गौरवगाथा गाणाऱ्या त्या पुढील श्लोकातून तर हिमालयातील आत्मानंदी रमलेल्या साधूंपासून राष्ट्राध्यक्ष, डॉक्टर व बाप यांची उदाहरणे देऊन ढोंगी, संन्याशी व आत्मानंदी रमणारा संन्यासी कसा आनंदी असतो हे दाखवून देतात.

त्यानंतरही आत्मविकासासाठी गीता-अध्ययन, गंगा म्हणजे वेदान्तार्गत अध्यात्मज्ञान-दीक्षा व मुरारी-उपासना हे आवश्यक कसे आहे याचेही सुंदर प्रतिपादन केले आहे. अन् या ओघात गंगेवर अंधश्रद्धेने निंदा करणाऱ्यांची चांगली खरडपट्टी काढतात.

जन्ममृत्यूच्या चक्राची गती थांबवण्यासाठी भगवंतास शरण जाणे, त्याची करुणा भागणे म्हणजेच अंतःकरणात पवित्र व दैवी वासना निर्माण करणे होय, असे सांगताना त्या मुरलीधराचे गीत, त्याचे नीलवर्णी तेजोवलयाचे दर्शन व त्याच्या हातीचा लोण्याचा प्रसाद कसा मिळवून त्याची अनुभूती घ्यावी हे सांगताना त्यात गुरूदेवांची आत्मप्रचितीच स्पष्टपणे दिसते.

त्यानंतर बालवत् सिद्ध वा साक्षात्कारी पुरुष कसा वागतो त्याचा उन्मत्तवत् संचार कसा चालतो हे फारच काव्यमयतेने गुरूदेव सांगतात.

२३ व्या श्लोक विवरणातून गुरूदेवांचा व्यासंग, पिंडात राहून त्यांचे विश्वात सर्वांशी 'प्रेमाने रमणे' जवळून पहावयास मिळते. ती अनुभूती सर्वांना मिळावी म्हणून अत्यंत प्रेमाने सांगतात की, 'अधीरपणे तुझे माझ्यावर रागावणे व्यर्थ आहे. तुला जर प्रशान्त साम्राज्यात-विष्णुपदात लवकरात लवकर प्रवेश हवा असेल तर कोणत्याही परिस्थितीत समचित्त रहा.' अशाच विश्वात्मक एकतेचा शोध घेण्याचा निष्ठावान साधकांना उपदेश करतात. कोणाशी

भांडण्याचा वा कोणाशी मैत्री करण्याचा प्रयत्न करू नको. कारण सच्चिदानन्दावस्था हा माणसाचा मूळ स्वभावधर्मच आहे. तेव्हा त्याद्वारेच तुझे जीवन व इतर सर्वत्र असणारे जीवन यातील एकतेचा (सर्वात्मकतेचा) साक्षात्कार होऊ दे.

हीच सर्वात्मकता अंगी बाणवण्याची त्रिसूत्री गीताध्ययन, धर्माचरण व सत्संग हे बिंबवित दानाचे महत्त्व आग्रहपूर्वक पटवून देतात.

साक्षात्कारी पुरुषालाही अध:पतनाची शेवटपर्यंत यथार्थ भीती दाखवीत, त्याचे पुनरुक्तीने कथन करीत आत्मदर्शनानंतरही नित्यपणे प्राणायाम, प्रत्याहार, जपादींचा अभ्यास अत्यंत सावध-सजग-दक्षतेने कसा करणे आवश्यक आहे याचे उपनिषदीय व्याख्यांसह सुंदर प्रतिपादन करतात.

गुरूचरणांबुज निर्भरा भक्तीच कशी आत्मदर्शन - आत्मज्ञान करवून देते ते रसाळपणे सांगून या 'चर्पट पंजरिका' या नावानेही ओळखल्या जाणाऱ्या या भक्तिगीताची समाप्ती करतात.

या स्तोत्रात शंकराचार्यांच्या ज्या ज्ञान-भक्ती-वैराग्याचे दर्शन घडते त्याचाच पुन: प्रत्ययानंद साक्षात् जसाच्या तसा श्रीगुरूदेवांच्या विवरणातूनही गोचर होतो. त्यामुळे गुरूदेव स्वामी चिन्मयानंद हा आद्य शंकराचार्यांचा कलियुगातील - अर्वाचिन युगातील अवतारच असावा असे वाटते. त्याशिवाय का त्यांचे तत्त्वज्ञान व कार्य आंतरराष्ट्रीय वा जागतिक कीर्तीचे झाले ?

श्री शिवार्पणमस्तु !

प्रज्ञाशिष्या रामदासी

# विकसनाची मार्गदर्शक

**डॉ. सौ. सुनीता तांबे**

*एम.ए.एम.फिल.पीएच.डी. श्रीएकनाथ महाराज पंचक एक विवेचक अभ्यास. २५-३० लेख व लघुकथा प्रकाशित. त्यातील काही कथा बक्षीस पात्र.*

## ।। आरंभिक ।।

इ. स. १९१६ ते १९९३ या काळात एका सच्छिल, धार्मिक, सुसंस्कृत, प्रतिष्ठित तसेच सधन कुटुंबात जन्मलेले, महात्मा गांधीजींच्या स्वातंत्र्य चळवळीत सहभागी होऊन खडतर तुरुंगवास भोगलेले आणि 'युगप्रणेते' म्हणून विश्व-विख्यात असलेल्या प. पू. स्वामी चिन्मयानंदजींची प्रवचने आजही जगभरच्या हजारो साधक-श्रोत्यांना मार्गदर्शन करीत आहेत. त्यासाठी त्यांनी काही पाठ्यपुस्तकांची निर्मितीही केलेली आहे. श्रीमद्‌भगवद्‌गीता आणि उपनिषदांच्या क्रमवार अभ्यास क्रमासाठी 'स्वविकसनातील मार्गदर्शिका' हे त्यातील दुसरे पुस्तक असून स्वामीजींनी मूळ इंग्रजीत लिहिलेल्या 'Manual of Self Unfoldment' या पुस्तकाचा हा मराठी अनुवाद आहे. यातून अभ्यासकांसाठी अध्यात्म शास्त्राची मूलगामी तत्त्वे, मानव, त्याच्या भोवतालची सजीव व निर्जीव सृष्टी आणि ईश्वर या तिन्हींच्या परस्परांशी असलेल्या संबंधाविषयीची प्रास्ताविक तरीही आवश्यक ती माहिती एकूण दहा प्रकरणांद्वारे करून देण्यात आलेली आहे. साहजिकच मानवी जीवनात ती तत्त्वे प्रत्यक्षात उतरवून त्याचा विकास घडविण्यास हे पुस्तक मदतरूप ठरत असल्याने त्यातीलच काही विचार येथे उद्‌धृत करण्यात आलेले आहेत.

## ।। वेदांतविषयक विचार ।।

'वेदांत म्हणजे जगण्याची कला ! तिचा पाठपुरावा कोठेही, कोणत्याही परिस्थितीत करता येण्यासारखा आहे', असे सांगून त्यासाठी साधकाने सूक्ष्म दृष्टीने आपल्या तत्त्वज्ञानाचा अभ्यास करण्याची सवय लावून घ्यायला हवी आणि त्यातील शास्त्रीय सिद्धान्त समजून घेण्याची अध्यात्मिक जिज्ञासाही कायम राखायला हवी, असे स्वामीजी सांगतात. 'आत्मतत्त्वाचा अभ्यास' म्हणजेच सत्तत्त्वाचे शास्त्र (ब्रह्मविद्या) अर्थात तोच वेदांताचा विषय व गाभाही आहे. मनुष्यप्राणी हा मूलतःच परिपूर्ण असल्याचे वेदांत प्रतिपादितो. त्याच्यातील अमर्याद सारतत्त्वाचा शोध, विकास व कौशल्यपूर्ण उपयोग करून घेण्याची क्षमता ही त्यांस जन्मजात लाभलेली अमोल देणगी असून या सुप्त शक्तीचा शोध घेऊन तिचे पोषण व विकास होईल असा जीवनक्रम आखणे हेच स्वामीजींच्या मते खरे शिस्तबद्ध व सार्थ जीवन ! या मार्गाने आपले व्यक्तिमत्त्व व चारित्र्य बदलण्याच्या प्रक्रियेतून यशप्राप्तीचा आनंद अनुभवून, त्याचबरोबर अंगभूत बुद्धिचातुर्याचा व्यवहारात प्रत्यक्ष उपयोग करून मनुष्य यशस्वी जीवनाचा शिल्पकारही ठरतो, अशी ग्वाही स्वामीजी देतात. स्वामीजींनी येथे बाह्य सृष्टीच्या संपर्कात असणाऱ्या मनुष्याच्या अंतरंगाचेही विश्लेषण केले. जीवनानुभव ज्या उपकरणांच्या साधनांद्वारे मानवास मिळतात ती उपकरणे सांगून, ती शुद्ध, स्वच्छ, सुसंवादी व सुनियंत्रित कशी ठेवावीत की, ज्यायोगे प्रत्येकास अधिकाधिक यश व सुख प्राप्त होईल याचा शोधही लावला आणि हे विश्लेषण म्हणजेच जगातील सर्व धर्मातील प्रमाणभूत ग्रंथातील मुख्य शिकवणूक असल्याचे ठामपणे सांगितले.

## ।। अनुभव ग्रहणाची तीन उपकरणे ।।

स्वामीजी सांगतात, 'मनुष्य प्राणी हा बुद्धिमान पशू असून अत्यंत उच्च दर्जाचा, विकास पावलेला व भावनाशीलही असल्याने, त्यांस मानसिक समाधानाची अत्यंत आवश्यकता असते. शरीर, मन व बुद्धी (श-म-धी)' ही त्याची अनुभवग्रहणाची तीन उपकरणे ! त्याचे संपूर्ण विश्व हे दृश्य विश्वाचे, भावना विश्वाचे व विचार विश्वाचे बनलेले असते. या सर्वांची बेरीज-वजाबाकी म्हणजे त्याच्या बाह्य जगाच्या अनुभवांचे समग्र क्षेत्र होय. त्याचे स्वतःचे जीवन अर्थपूर्ण जगण्यासाठीच त्याने आपल्या आंतरिक गाभ्याचे ज्ञान करून घेणे आवश्यक असल्याची ग्वाही ऋषी-मुनींनीही दिल्याचे स्वामीजी सांगतात. त्यांनी म्हटले आहे, मानवाच्या बाबतीत तर जसे मन तसे जग ! मन म्हणजेच विचार ! या दोघांचे अन्योन्य संबंध मात्र गुंतागुंतीचे पाणी व नदीसारखे ! नदी म्हणजे वाहते पाणी ! आपल्या आत जेव्हा विचार प्रवाह चालू असतो तेव्हा आपल्याला मनाच्या या शक्तिशाली उपकरणाचा प्रत्यय येतो. अर्थात विचार चांगले असतील तर मनही चांगले असते. या उलट विचार वाईट तर मनही वाईट असते. चांगल्या मनाकडेच सर्व जग आकर्षिले जात असल्याने दक्षतापूर्वक सत्कृत्ये करण्याचे प्रशिक्षण पद्धतशीरपणे देत राहून मनास शिस्त लावावयास हवी ! स्वामीजी निश्चयपूर्वक सांगतात, 'अध्यात्माच्या अभ्यासकाने स्वतःच्या अंतर्यामी पाहण्याची हातोटी प्राप्त करून घेणे अत्यंत आवश्यक आहे. जिज्ञासू साधकाने तर प्रथमतः आपले आंतील विश्व पहात त्याची ओळख करून घ्यावी आणि त्यानंतरच सृष्टीतील विषय वस्तूत कसे वागायला हवे ते शिकायला हवे. प्रत्येक दिवसाच्या शेवटी त्याने दिवसभराच्या घडामोडी, विचार, शब्द, कर्मे, विकार व भावना या सर्वांना डोळ्यांपुढे आणून आत्मपरीक्षण करण्याची सवय लावून घेणे अतिशय महत्त्वाचे आहे. सतत शोध घेत, निरास करीत, त्याचे जागी नविनाची स्थापना करीत जाणे हाच विकसित व सुखी होण्याचा राजमार्ग असल्याचे स्वामीजी सांगतात. सुरुवातीस प्रयत्नात कसूर झाले तरी, नियमितपणे दिवसभरातील एकूण व्यवहारातून स्वतःचा कमकुवतपणा, दोष, उणिवा, पशुवृत्ती आदींचा शोध घेण्याचा प्रयत्न करावयास सांगून त्याद्वारे लक्षात येईल की मानवी जीवन हे कुठल्याही अर्थाने दैवी जीवन नाही. तरीही निराश न होता, प्रयत्नांची पराकाष्ठा करीत गेल्यास स्वतःतील अवगुणांचा शोध लागेल आणि त्याचक्षणी त्याविरुद्ध सद्‌गुणांची पेरणी करीत राहिल्यास लक्षात येईल की स्वतःतील अपप्रवृत्ती नाहीशा होऊन सद्‌गुण वाढीस लागले आहेत.'

## ।। गीतेतील जीवन जगण्याची कला ।।

शरीर, मन व बुद्धी (श.म.धी.) माणसाच्या व्यक्तिमत्त्वाच्या या तीनही बाजू एकसमयावच्छेदाकरून जो कोणी आपल्या कार्यक्षेत्रास लावू शकतो तोच उत्साहाने आपले कार्य करीत असतो आणि स्वतःसही अधिकाधिक आनंदाची

प्राप्ती करून देत असतो. 'गीतेतील जीवन जगण्याची कला' म्हणजे या प्रमाणे काम करणे असते. व्यक्तीच्या शरीर-मन-बुद्धी या उपकरणाची अवस्था व गुणवत्ता यावर तिच्या जीवनातील यश व सुख अवलंबून असते. ही उपकरणे जात्याच जड व अचेतन असल्याने त्यांना स्वतःला स्वतंत्रपणे आपले अनुभव गोळा करण्याची प्रज्ञा नसते. परंतु जेव्हा ती व्यक्तिच्या अंतर्यामीच्या आत्मतत्त्वाशी संयोग पावतात तेव्हाच ती जीव चेतना प्रकट करतात. प्रत्येक प्राणीमात्रास प्रभावीत करणारे हे दिव्य तत्त्व म्हणजेच वेदांतानुसार 'आत्मा' वा 'आत्मतत्त्व' होय. जगातील विविध वस्तूमधून वाहणारे ते एकमेव तत्त्व सर्व वस्तुमात्रांना चैतन्य प्रदान करून आपापले अनुभव अनुभविण्यास समर्थ करते. ईश्वर, आकाशातील बाप, खुदा वा बुद्ध आदी सर्व त्या एकाच सर्व शक्तिमान घटकाचा, ईश्वरी आत्मतत्त्वाचा निर्देश करतात. (पृ. ८३) साधकातील मन-बुद्धी उपकरणांचे विक्षेप, त्यांचा अहंभाव आणि जे तत्त्वतः त्याचे मूळ स्वरूप आहे असे मन म्हणजेच अनंत जाणीव तत्त्व यांच्यामध्ये अभेद्य असा विचारांचा अडथळा निर्माण करतात. सर्व प्रकारच्या अध्यात्मिक साधना म्हणजे विचारांचे हे विक्षेप जितके कमी करता येतील तितके कमी करण्याचे प्रशिक्षण होय. वेदांताने यावरील साधा पण परिणामकारक उपायही सांगून ठेवला आहे आणि तो म्हणजे दैनंदिन अभ्यास ! स्वस्थ-शांत व्हा ! दररोज केवळ दहा मिनिटे तरी केवळ शरीरानेच नव्हे तर मन व बुद्धीनेही पूर्णपणे शिथील राहण्याचा प्रयत्न करा.

### ।। साधनामार्गावरील वाटचाल ।।

स्वामीजींनी म्हटले आहे, 'साधनेचा मार्ग सुबुद्ध तसेच सर्वसाधारणांस सुलभतेने आचरणात आणता यायला हवा. त्याचप्रमाणे तो त्वरित फलप्रद व आवाक्यातील असायला हवा. साधना काही एका निष्ठेने तसेच विशिष्ट प्रमाणात वीरतापूर्ण प्रयत्नांनी सुरू ठेवायला हवी. ज्यायोगे ती परिणामस्वरूप फलप्रद असेल. उपनिषदकारांनी आपण सत्य स्वरूपाच्या मार्गावर सुस्थापित होण्यासाठी आपल्याला साहाय्यभूत होईल असा आकर्षक व प्रियदर्शी मार्ग शोधून काढला आहे आणि तो म्हणजे पूर्णांशाने आंत गढून जाण्याच्या भावनेतून केलेला, विद्वानांच्या विवेकी प्रवचनांच्या वारंवार श्रवणाने, अधिकृत महात्म्यांच्या थोड्याफार प्रत्यक्ष संपर्काची जोड असलेला असा उपनिषदांचा अभ्यास ! स्वामीजींच्या दृष्टीने प्रारंभी हा अभ्यास फार फार उपयुक्त होतो.

### ।। साधना मार्गातील महत्त्वाची साधना 'ध्यान' व 'जप' ।।

स्वामीजींच्या दृष्टीने 'ध्यान' व 'जप' ही अशी पद्धती आहे की, ज्यायोगे साधक स्वतःस सूक्ष्म शरीरात अधिकाधिक सुस्थित करून घेतो आणि त्या काळापुरता आपला देह व त्याचा परिसर यांचे पूर्ण विस्मरण साध्य करतो. ध्यानप्रक्रियेने मन स्तब्ध केले जाते तसेच अहंकार नष्ट केला जाऊन बुद्धीचे उन्नयन केले जाते. 'सुप्रभाती ध्यानाची सवय कराल तर आधुनिक समाजातही तुम्हाला नियमितपणा राखता येईल', असे आश्वासन स्वामीजी देतात. ध्यान कसे करावे ? त्यासाठीची वेळ, आसन, बैठक, विचार मर्दन, मुखाने ॐकाराचा जप, मनातल्या मनात जप, मनाची विचारहीन अवस्था इत्यादी सर्व क्रियांचे दिग्दर्शन स्वामीजींनी केलेले असून नियमितपणा व आत्मीयता राखीत, निराशा दूर सारीत ध्यानधारणा करण्यास-जाणीव तत्त्वाच्या ज्योतरहित प्रकाशाची (निर्वाणाची) प्रचिती येईपर्यंत साधना चालू ठेवण्यास त्यांनी सांगितले आहे.

जपमाळेच्या साहाय्याने वा माळेशिवाय एखादा मंत्र पुनः पुन्हा उच्चारणे आणि तसे करीत असता त्या गूढ शब्दांचा दैवी अर्थ व अध्यात्मिक सूचितार्थ यावर मन केंद्रित करणे यास 'जप' म्हणतात. जपसाधनेने विचार (चित्त) शांत व दक्ष होतात आणि मन उत्स्फूर्त ध्यानावस्थेत अधिकाधिक अंतर्भूत होते. नाम व जप यांच्या घनिष्ठ संबंधात 'जप' पद्धतीचे मूलभूत तत्त्व अंतर्भूत असल्याचे तसेच अध्यात्मिक प्रगतीसाठी 'जप' ही अतिशय प्रभावी मानसिक शिस्त असल्याचे स्वामीजींनी सांगितले आहे. गीतेत योगेश्वर श्रीकृष्णांनीही 'योगामध्ये मी जपयोग आहे' असे सांगून ठेवल्याचा दाखलाही स्वामीजी देतात. जपसाधनाही कुठे ? केव्हा ? कशी करावयाची ? त्यासाठीचे आसन कसे हवे ? जपकर्त्याची त्यासाठीही शारीरिक स्थितीही कशी असायला हवी ? १०८ मण्यांची जपमाळ हातात कशा रीतीने धरावी ? जपकर्त्यासमोरील मूर्ती वा तसबिरीकडे कशा रीतीने लक्ष द्यायला हवे, पहायला हवे. अंतर्यामी व सभोवार तिच्या उपस्थितीची भावना कशी असायला हवी आणि शेवटी स्वतः निवडलेल्या मंत्राचा सावकाश - संथपणे, स्थिरपणे शक्य होईल तितक्या प्रेमभावनेने काही वेळ पुनरूच्चार करून, स्वतःतील भक्तिभावनेस आवाहन कसे करावे इत्यादी सर्व क्रिया स्वामीजींनी समजावून दिलेल्या आहेत. प्रतिदिन वीस माळा जपण्यास सांगून जप सकाळी एकदा व सायंकाळी एकदा करण्यास सांगितले आहे.

सर्व विशिष्ट पात्रता अंगी असलेल्या अधिकारी अभ्यासकाने हे जग कोठून आले व कोठे जाईल या प्रश्नापासून आपल्या अन्वेषणास प्रारंभ करून त्याचे ज्ञान संपादावे. त्यानंतर आपला देह व ज्ञानेंद्रिये यांच्याविषयी शोध घेत जायला हवे. हळूहळू साधक बाह्य जगापासून आपल्या आतील केन्द्राशी जाऊन पोहोचतो. आपल्याला बाह्य जगाची कल्पना आपल्याच ज्ञानेंद्रियांद्वारे मिळते. मात्र ज्ञानेन्द्रिये मनाखेरीज काम करू शकत नाहीत. गाढ झोपेत मन नसते म्हणून ज्ञानेंद्रियेही नसतात तेव्हा अन्वेषक बाह्य जगापासून शोध घेत आपल्यातील सूक्ष्म चैतन्य तत्त्वापर्यंत अंतर्यामी अगदी खोल असलेल्या केंद्राप्रत जाऊन पोहोचतो.

बाहेरच्या प्रत्येक स्थूल आवरणास वेदांताच्या भाषेत 'कोश' म्हणतात. अन्नमय कोश, प्राणमय कोश, मनोमय कोश व विज्ञानमय कोश आणि आनंदमय कोश अशा पाच कोशांविषयक माहितीही स्वामीजी समजावून देतात. या 'पंचकोशात्मक रचनेचा गाभा' 'आत्मा' असून तो सर्वापेक्षा अत्यंत स्थूल आहे. तो वरील पाचही प्राकृतिक आवरणांहून भिन्न व निराळा आहे. सर्वांहून सूक्ष्मतर असलेला 'आत्मा' हा इतर पाचही कोशांचा निमंत्रक व पुष्टिदाता असल्याचे स्वामीजी सांगतात. अन्नमय व प्राणमय कोश या दोन्हींना मिळून स्थूल शरीर म्हणतात. मनोमय कोश व विज्ञानमय कोश मिळून सूक्ष्म शरीर बनते. आनंदमय कोशास कारण शरीर म्हणतात म्हणून स्थूल-सूक्ष्म व कारण या शरीरांनी घेरले गेलेले जाणीव तत्त्व वा चैतन्यतत्त्व म्हणजेच मनुष्य ! असे ते सांगतात.

स्वामीजींच्या दृष्टीने धर्म हा अप्रबुद्ध लोकांकरिता नाही. अध्यात्मिक, मानसिक व शारीरिक अशा सर्व दृष्टींनी सुदृढ, समचित्त व स्थिरबुद्धी असलेल्या लोकांसाठी तो आहे. ब्रह्मविद्येच्या अभ्यासकासही जर वेदांताच्या दालनात प्रवेश करावयाचा असेल, तर काही प्राथमिक पात्रता त्याच्या अंगी असायला हव्यात. त्यात विवेक, वैराग्य, षट् संपत्ती आणि मुमुक्षुत्व इत्यादींविषयी स्वामीजींनी सविस्तरपणे सांगितले आहे. त्याचप्रमाणे स्वतःच्या उत्क्रांतीसाठी प्रत्येकाने तीन टप्प्यांच्या अनुशासनातून जाण्यास ते सांगतात. स्वतःची कशीही स्थिती वा दशा असली तरी त्यातून गतिमानता निर्माण करणे, संपादित गतिमानता संग्रहीत करणे आणि ती आपल्या ध्येयपूर्तीस्तव कार्यवाहीत आणणे. गतिमानता हा चैतन्याचा आविष्कार - इतिहासाची प्रेरक शक्ती ! प्रत्येकात व्यक्त व आविष्कारित होणारे ते सत्-चित्-आनंद स्वरूप असल्याचे सांगून आपल्यात असणाऱ्या या जीवन तत्त्वामुळेच आपण जिवंत व दक्ष राहू शकतो असे स्वामीजी सांगतात.

**डॉ. सौ. सुनीता तांबे**
२, आसावरी, औंध गाव रोड, औंध, पुणे ७.

# 'चिन्मय भक्तिसूत्रे'

पू. ब्रह्मचारीजी प्रयागजी चैतन्य

बी.कॉम. सांगली चिन्मय मिशन, प्रमुख आचार्य.

'I Love you - Letters to Children' हे पुस्तक सेंट्रल चिन्मय मिशन ट्रस्टतर्फे प्रसिद्ध झालेले असून यांत प. पू. गुरूदेव स्वामी चिन्मयानंदांनी ८ मे १९६८ ते २० ऑक्टो. १९६८ या काळात चिन्मय बालविहारच्या मुलांना उद्देशून लिहिलेली एकूण बारा पत्रे प्रकाशित करण्यात आली आहे. श्री गुरूदेवांची मुलांविषयीची कळकळ त्यातील शब्दाशब्दांतून व्यक्त झाली आहे. शिवाय 'आधी केले आणि मग सांगितले' अशी परिस्थिती असल्याने त्यांच्या शब्दांचा विलक्षण प्रभाव पडतो. शिवाय सर्व पत्रे एक 'प्रेम' या विषयाला वाहिलेली असली तरी प्रत्येकांतून निरनिराळ्या पैलूंवर प्रकाश टाकण्यात आला आहे. त्यामुळे त्या विषयाचा सर्वांगीण अभ्यास होऊन ती आबालवृद्धांना उपयुक्त झाली आहेत. सामान्य प्रेमापासून उच्च प्रतीच्या भक्तिप्रेमापर्यंत वाटचाल कशी करावी याचे मार्गदर्शन यातून होत असल्याने त्यांना 'भक्ती सूत्रे' म्हटले तरी अयोग्य ठरणार नाही. येथे थोडक्यात आढावा घेण्याचा प्रयत्न केला आहे.

१) कुणीही महान होतो तो ईश्वरी कृपेनेच होतो.

२) गुरूकृपा आणि गंगामातेची कृपा यामुळे जीवनाला प्रेरणा मिळाली आहे. गंगा माता सतत वहात राहून सेवाभाव आणि सतत कार्यरत राहण्याची शिकवण देते.

३) नित्यनियमित प्रार्थना आणि शुद्ध प्रेमळ, निर्मळ अंत:करण असेल तर भगवान् कृपा करतात आणि माणूस हवे ते मिळवू शकतो.

४) अंत:करणात भक्ती हवी. हातापायांनी सेवा केली पाहिजे. त्यासाठी घाम गाळला पाहिजे. कठोर परिश्रम पाहिजेत आणि बुद्धी उत्तम विचार करणारी हवी.

**५) प्रेम हा हिंदुत्वाचा पाया आहे. खरे प्रेम कसे करावे हे जो जाणतो तो महान् हिंदु होय.**

**६) भगवान म्हणजे मूर्तिमंत प्रेमच !** आपल्याला प्रेम म्हणजे काय, ते सर्वांवर कसे करावे हे कळले तर ती खरी परमेश्वराची सेवा ठरेल. त्याहून श्रेष्ठ पूजा दुसरी नाही.

७) सामान्यपणे प्रेम म्हणजे काय, हे कळते पण खऱ्या प्रेमासंबंधी आपण लज्जास्पद रीतीने अज्ञानी असतो.

८) माणसाच्या अस्तित्वासाठी आणि त्याच्या सर्व समस्या दूर होण्यासाठी प्रेम हाच उपाय आहे. तेच सर्व प्रश्नांचे उत्तर आहे.

९) प्रत्येकाची दुसऱ्यांनी आपल्यावर प्रेम करावे ही अपेक्षा असते पण आपण दुसऱ्यांवर प्रेम केले पाहिजे हे सर्वांच्या लक्षात येत नाही.

१०) दुसऱ्याकडून प्रेमाची अपेक्षा करून ते मिळाले नाही की माणूस निराश होतो, दु:खी होतो आणि एखादे वेळी मोडून पडतो.

११) थोर माणसांनाच प्रेम कसे करावे हे कळते. लोकांवर प्रेम केले तर तेही आपल्यावर प्रेम करतात हा जगाचा नियम आहे. 'प्रेम द्यावे, प्रेम घ्यावे.'

१२) दुसऱ्यावर प्रेम करणे ही कला आहे. इतर कलांप्रमाणे तिचा सिद्धांत आणि प्रात्यक्षिक दोन्हींचा अभ्यास करायला हवा.

१३) कुणावर प्रेम करावे यापेक्षा प्रेम कसे करावे हे महत्त्वाचे आहे. मानवी मनात ही शक्ती आहे. ती जोपासली पाहिजे.

१४) आपण प्रेम करतो पण आपले प्रेम व्यापारी असते. आपण वस्तू आणि व्यक्ती यांच्याकडून त्या बदल्यात सुखाची अपेक्षा करतो.

१५) उन्मादक प्रेम आणि उदात्त प्रेमाची वृद्धी यात महदंतर असते. उन्मादक प्रेम प्रथम थरारून सोडते. प्रथम भेदाच्या भिंती कोसळून पडतात पण विजेप्रमाणे क्षणभर चमकून ते नाहीसे होते आणि भिंती परत उभ्या राहतात. प्रेमी आणि प्रेमास्पद दोघेही दु:खी होतात.

१६) सर्व जगात बुद्धिमान् माणसांना प्रेमाची भूक असते. यात वय, जात, पंथ लिंग इत्यादी अपवाद नाहीत. जनावरेही प्रेमाची भुकेली असतात. म्हणून प्रत्येक माणूस प्रेमाचा शोध घेत असतो. कधी कधी तो त्यासाठी वाईट उपायही योजतो. पण अशाने प्रेम मिळत नाही.

१७) सर्वांना प्रेम हवे असते पण ते मिळत नाही. ही वैश्विक समस्या आहे. म्हणून प्रेमाचे स्वरूप, स्वभाव, कार्य याविषयी ज्ञान प्राप्त केले पाहिजे.

१८) प्रेम देण्याची ज्वलंत इच्छा हवी त्यासाठी कुठल्याही त्याग करण्याची तयारी हवी. खरे तर तो त्याग, त्याग नसतोच.

१९) सर्व प्राण्यांना उपजत स्वामीत्व आणि कळपाबद्दल आत्मियता असतेच. माणसालाही प्रेम असते. असे अंध आकर्षण कुटुंब, जात, देश, गट वगैरे संबंधी माणसात दिसून येते.

२०) बुद्धिमुळे माणसात स्वत:विषयी, भोवतालच्या परिस्थितीविषयी अधिक सावधानता दिसून येते. त्याला स्वत:च्या अपूर्णत्वाची जाणीव असते. तो भूतकाळ स्मरतो, वर्तमानांनी उत्तेजित असतो आणि भविष्याची थोडीफार चिंता करतो. स्वत:चा विरह होणार आहे हे तो जाणतो. त्यामुळे सर्वांमध्ये असूनही तो एकाकी असतो. द्वैतामुळे त्याला दुसऱ्यांपासून भय वाटते. त्यामुळे तो स्वार्थी, संशयी आणि क्वचित गुन्हेगारही बनतो.

२१) सर्व समस्यांवर प्रेम हे एकच उत्तर आहे.

२२) एकाकीपणापासून लज्जा, अपराधी भावना उत्पन्न होतात. एकाकीपणाची समस्या वैश्विक आहे. खरे प्रेम असेल तेथे असे होत नाही.

२३) गर्भात आणि अगदी लहानपणी आईचा आधार वाटतो. थोडा मोठा झाला की माणूस इतर आधार शोधू लागतो. वडील,मित्र, नातेवाईक, शिक्षक, शेजारी इत्यादी. एकाकीपणापासून पळवाट म्हणून आपण सणवार, वाढदिवस, उत्सव, खेळ, स्पर्धा वगैरे उपाय शोधतो. पण त्यामुळे तात्पुरते समाधान मिळते पण मूळ समस्या कायमच असते.

२४) प्रेम दोन प्रकारचे असते. जे उच्च, श्रेष्ठ प्रतीचे असते त्याला आपण भक्ती म्हणू. दुसरे निकृष्ट प्रतीचे त्याला स्नेह म्हणू. या दोन्हींमध्ये प्रेमाची भावना सारखीच असते.

२५) प्रेमास्पद श्रेष्ठ असेल तर ती भक्ती ठरेल. उदा. आईवडील, शिक्षक, देश, ज्ञान इत्यादी प्रेमास्पद सर्वसाधारण असेल तर स्नेह म्हणतो. उदा. मित्र, भावंडे, प्राणी, फुले, खेळणी इ.

२६) स्नेह उभयपक्षी फायद्यासाठी केला जातो. यात सहजीवन असते. उदा. आई आणि मूल. यांतही दोन प्रकार असतात. प्रेमी प्रेमास्पदावर अथवा प्रेमास्पद प्रेमीवर अवलंबून असतो. कुणी तरी एक हुकुमशहा बनतो आणि दुसरा त्याचा दास. लहान मूल आईचे संरक्षण स्वीकारते. मोठे झाल्यावरही आपण इतरांचे संरक्षण स्वेच्छेने स्वीकारतो. हे संरक्षण नसेल तर एकाकीपणा वाटतो. स्वतंत्र राहावयाचे भय वाटते.

२७) अशी व्यक्ती स्वत:भोवती माझे घर, माझे कुटुंब, माझे मित्र, माझे नातेवाईक, माझ्या वस्तू, माझ्या आवडीनिवडी असे करून तुरूंगच उभा करते. अशा व्यक्ती कधी स्वतंत्र होतच नाहीत. त्या व्यक्ती लोकांच्या जीवनावर जळवा होतात. आयुष्यभर इतरांच्या जीवनावर मानसिक बांडगुळे ठरतात.

२८) पुढे ईश्वरावर किंवा गुरूवर अवलंबून असतात. स्वतंत्र निर्णय घेऊच शकत नाहीत. **हे स्नेहाचेच विदारक प्रदर्शन आहे. यात शांत प्रेमभक्तीचा प्रकाश नाही**. रामानुजांच्या तत्त्वज्ञानात एकच दिलासा आहे की ईश्वराला अंशी आणि स्वत:ला त्याचा अंश समजतात. पण ही भावना बाळगणेसुद्धा स्नेहच आहे.

२९) स्वतंत्र व्यक्तिमत्त्व होणे हा दुसरा जन्म आहे. भगवंताच्या खऱ्या साधकाला द्विज म्हणतात. जे स्नेहातून भक्तीकडे वळतात तेच खरे आणि योग्य साधक होत.

३०) स्नेहातही दोन प्रकार आहेत. Active आणि Passive एखादा प्रेमास्पद प्रेमी व्यक्तीचा गुलाम बनतो आणि शेवटी आपल्या मनाप्रमाणे त्या व्यक्तीस वागण्यास भाग पाडतो.

३१) आधुनिक मानसशास्त्रात अशा पंगु (परतंत्र) व्यक्तीच्या मनाचे वर्गीकरण Masochism असे केले आहे, तर दुसऱ्या प्रकारच्या हुकूमशाही मनांचे वर्गीकरण Sadism असे केले आहे. हुकूमशाही गाजविणारा कुटुंब प्रमुख, असह्य वडील, खाष्ट आई अगर भाऊ वगैरे याचीच उदाहरणे आहेत. प्रत्येकात या दोन्ही प्रवृत्ती असतातच पण एक अधिक शक्तिशाली असते एवढेच.

३२) प्रेम ज्यावेळी उच्च व्यक्तिमत्त्वासाठी असते तेव्हा ते जास्त कार्यप्रवण करते, आदर्श असते त्यावेळी मानसिक विकास होतो. दृष्टिकोन विशाल आणि गंभीर होऊन कर्तृत्व कित्येक पटीने वाढते. हे प्रेम जेव्हा ईश्वराकडे, सर्वांमध्ये असलेल्या दैवी अंशाकडे वळते तेव्हा त्याला भक्ती म्हणतात.

३३) सर्व संत अशा प्रेमाची प्रशंसा करतात. यात भक्त परमेश्वरावर प्रेम करतो आणि कुठल्याही मोबदल्याची अपेक्षा करीत नाही. खरे प्रेम असेल तर ते समर्पण भावनेत असते. आणि त्यातच आनंद देते. भक्ताचा कंठ सद्‌गदित होतो, प्रेमाने हृदय भरून येते. डोळ्यांतून अश्रु वाहू लागतात, भक्त प्रेमाने नाचू लागतो. त्याला सर्व जग म्हणजे आपल्या परमेश्वराचेच रूप भासते. प्रत्येक गोष्ट दैवी, त्याच्या सखोल प्रेमाचा आणि आदराचा विषय बनते. प्रेमी नेहमी कार्यरत असतो. त्याचे प्रेम विलक्षण शक्तिशाली असते. ते हृदयांतून उत्स्फूर्तपणे बाहेर वाहू लागते आणि एकत्वाचा विलक्षण आनंद देऊन जाते. त्या शक्तिशाली आणि म्हणूनच आक्रमक प्रेमात प्रेमी प्रेमास्पदाला भारून टाकतो आणि तरी त्याचे स्वतंत्र व्यक्तिमत्त्व अबाधित राहते.

३४) हिंदुत्वास धरून प्रेम क्रियाशील असते. तेथे क्रियाशील म्हणजे सावध आणि आक्रमक असते म्हणजे नित्य देण्याची ओढ असते. घेण्याची अपेक्षा जवळ जवळ नसतेच.

३५) लोक द्यावयाचे म्हटले की घाबरतात पण आपल्या संस्कृतीत त्यागाला फार महत्त्व आहे. त्याग म्हणजे विषयासक्ती आणि कर्मफळाच्या आशेचा त्याग असे भगवान् गीतेत सांगतात.

३६) प्रेम जेव्हा पूर्ण आणि खरे असते तेव्हा ते बिनशर्त आणि आनंदयुक्त असते. ते स्वत:च परिपूर्ण असते, हेच त्याचे पारितोषिक असते. ज्याची आंतरिक दृष्ट्या वाढ झालेली असते, अध्यात्मिक उन्नती झालेली असते त्यांनाच असे वाटते आणि 'प्रेम देणे' सर्वांवर प्रेम करण्यातील मर्दुमकी त्यांनाच कळते. सर्व काही भगवान् नारायणरूपच आहे मग आपण जगास प्रेमाशिवाय काय देऊ शकतो ?

३७) सूर्य, पृथ्वी, निसर्ग, नद्या, जनावरे, सर्व वैश्विक सूर प्रेमाने देण्याचा आहे. प्रेमाची मागणी कुणीही करीत नाही. ती करणे हा मनाचा कमकुवतपणा आहे. शुद्ध गुलामगिरी आहे. **माणसाचा हक्क आहे की प्रेम करावे. आपल्याला हे सामर्थ्य मिळालेले आहे. हेच जीवनाचे सौंदर्य आहे**. या गुणाची जोपासना केली पाहिजे.

३८) व्यापारी प्रेम करू नका. ही चूक करू नका असे श्रीगुरूदेव मुलांना बजावतात. स्वत:शी म्हणा की, 'मी प्रेमाचा भिकारी नाही. मी दाता आहे. मी प्रेम वाटण्यासाठी आलो आहे. सर्व जगाला मी माझ्या अनिवार प्रेमाच्या पुरात बुडवून टाकीन.'

३९) सेवा हे प्रेमाचे प्रकटीकरण आहे. म्हणून सर्वांची सेवा करा. वनस्पती, प्राणी, माणसे सर्वांची ! कारण सर्व भगवान जगदीश्वर स्वत:च आहे. हे भगवान आपली प्रत्येकाची सेवा करतात. आपण भगवंतांसारखेच होऊ या.

४०) प्रेम मिळाले तर भगवंताचे हास्य समजून स्वीकारा. 'पण प्रेम मिळो न मिळो पण सर्वांवर तुझ्या मुलांवर प्रेम करणे हीच तुझ्या पूज्य चरणांची माझी पूजा आहे', असे भगवंतास म्हणावे आणि हाच दृष्टिकोन बाळगावा.

४१) 'प्रेम देणे' हे बुद्धिमान लोकांना त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे सर्व श्रेष्ठ आणि उदात्त प्रकटीकरण वाटते. तो त्यांच्या उत्साहाचा प्रमुख स्त्रोत आणि अस्तित्वाचे प्रमुख चिन्ह असते.

४२) 'प्रेम देणे' म्हणजे त्याचा विस्तार करणे. प्रेम देण्यामुळे प्रेमी आणि प्रेमास्पद अशी दोन प्रसाराची केंद्रे निर्माण होतात. प्रेम देणे म्हणजे स्वत:चा अंश देणे. ही क्रिया अगदी सहज व्हावयास हवी. कुठल्याही अपेक्षेने हे देणे डागाळता उपयोगी नाही. हातचे न राखता प्रेम दिले पाहिजे. अशा औदार्ययुक्त प्रेमाने इतरांशी संबंध सुधारतात.

४३) प्रेम हे प्रभावी शस्त्र आहे. प्रामाणिक शुद्ध प्रेम पारितोषिक दिल्याखेरीज राहात नाही. प्रेमात चार मूलभूत घटक हवेत. कुठलेही प्रेम टिकाऊ आणि विधायक होण्यास यांची आवश्यकता आहे. १. प्रेमास्पदाविषयी खरी प्रामाणिक चिंता २. जबाबदारीची सखोल जाणीव ३. अत्यंत प्रेमादराची भावना, ४. आणि प्रेमास्पदासंबंधीचे संपूर्ण ज्ञान. हे चारी घटक हवेत तरच प्रेम परिपूर्ण, फलद्रूप आणि प्रामाणिक ठरते.

४४) ज्यांच्याशी आतापर्यंत प्रेमाने वागला नसाल त्यांच्याशी प्रेमाने वागण्याचा निश्चय करून त्या व्यक्तीला तशी जाणीव द्यावी. यामुळे अनिर्वचनीय

आनंद आणि अभिमान याचा आपल्याला अनुभव येईल. त्या व्यक्तिलाही आनंद होऊन वागण्यात बदल होईल. हातचे राखून प्रेम करू नये. पूर्णपणे भरपूर देवासारखे द्या. प्रतिसाद मिळाला नाही तरी फसवले गेलो हे मानून निराश होऊ नये.

४५) प्रेमास्पदाच्या सुखाची प्रामाणिक इच्छा हवी. फुलांवर प्रेम असेल तर पाणी घातले जाईलच; तर ते प्रेम खरे म्हणता येईल. प्रेमास्पदाच्या सुरक्षिततेची हिताची कळकळ आणि त्यासाठी वाटेल तो त्याग करण्याची तयारी हवी. खरा देशभक्त देशासाठी वाटेल ते कष्ट सोसतो. खरे प्रेम असेल तेथे थकवा येतच नाही. प्रेम आणि कार्य ही हातात हात घालून जातात. खरे प्रेम असते तेथे काम करण्याने आनंद मिळतो.

४६) प्रेमाचा उच्चार जिव्हेने करण्याची आवश्यकता नाही. आपल्या कृतीने ते दाखविले पाहिजे. ते अधिक उदात्त, दैवी, शक्तिशाली आणि स्वाभाविक असते. हातापायांनी सेवा करावी. आपल्या हृदयातील प्रेमाने वातावरण भारून टाकावे. म्हणजे भोवताली जणू जादूचे वातावरण निर्माण होऊन वाईट व्यक्तीलाही प्रतिसाद द्यावासा वाटेल.

४७) प्रेमास्पदाबद्दल गाढ आदर हवा. जेव्हा आपण प्रामाणिकपणे प्रेम करतो तेव्हा प्रेमीच्या मनात प्रेमास्पदाच्या अनुच्चारित गरजा आणि भावना जाणण्याचे सामर्थ्य येते. हे खरे जबाबदारीचे लक्षण आहे. आपण प्रेमात जसे तज्ज्ञ होऊ आणि प्रेमाची व्याप्ती जशी वाढेल तसे आपण अधिकाधिक संवेदनक्षम बनतो. मातेला दूर अंतरावरूनही बालकाच्या गरजांची जाणीव होते. यालाच 'टेलिपथी' म्हणतात. हे सामर्थ्य खऱ्या प्रेमामुळे प्राप्त होते. ते खऱ्या प्रेमाचे खात्रीचे चिन्ह आहे. ज्यावेळी असे घडू लागते त्यावेळी असे घडल्यावर प्रत्येक प्रसंगी प्रेमी आणि प्रेमास्पद दोघांच्या हृदयात आनंदाचा जणू स्फोटच होत असतो.

४८) कुठल्याही क्षेत्रांतील व्यक्ती थोर ठरतात; लोकप्रिय होतात त्यास त्यांच्या ठिकाणी जे सुप्त परचित विज्ञान आणि योग्य वेळी लोकांच्या उपयोगी पडण्याची वृत्ती तसेच त्यांचे जे इतरांवर अथवा स्वत:च्या कामावर उपजत प्रेम असते तेच असते.

४९) श्रीगुरूदेव मुलामुलींना सांगतात की, तुम्ही सर्वांनीही भारताचे महान स्त्रिया, पुरुष आदि बनून कदाचित पूर्वी कधीही प्राप्त झाली नसेल अशी महान थोरवी आपले राष्ट्र आणि आपली संस्कृती यांना प्राप्त करून द्यावयाची आहे. म्हणून ज्या प्रेमाने सभोवतालच्या लोकांना जिंकणे अथवा त्यांच्यात चांगला बदल घडवून आणणे शक्य असते त्या प्रेमाची ही सुप्त शक्ती जोपासली पाहिजे.

५०) प्रेमास्पद व्यक्तिबद्दल नितांत गाढ प्रेमादर असल्याशिवाय खरे प्रेम होऊ शकत नाही. प्रत्येक माणसाच्या व्यक्तिमत्त्वाला एक प्रकारची खोली असते. जगात बहुतेक वेळा आपण एकमेकांस भेटतो तेव्हा वरवरचे भेटतो. त्यामुळे समोरील व्यक्तीची प्रतिक्रिया ही वरवरची असते. आपण स्वत:च्या अंतरंगात प्रवेश करून जर लोकांना भेटलो तर इतरांच्याही अंतरंगात प्रवेश करू शकू. आपल्या हृदयांतील भावनाद्वारेच आपण लोकांच्या हृदयास स्पर्श करू शकू. आपल्या विचारांच्या द्वारे त्यांच्या विचारांना प्रेरणा देऊ शकतो. म्हणून दुसऱ्यांच्या अंतरंगात प्रवेश करण्यासाठी आपण अगदी मनापासून प्रेमगीत आळविण्यास शिकले पाहिजे.

५१) आपण एखाद्या व्यक्तीबद्दल आदर बाळगतो पण प्रेम असेलच असे नाही किंवा एखाद्याबद्दल प्रेम असेल पण आदर असेलच असे नाही. ज्यावेळी आपल्या मनातील प्रेमाची भावना आणि बुद्धीमधील आदर एकाचवेळी एकत्रित होतात तेव्हा त्यांच्या मिश्रणाने जी भावना उत्पन्न होते तिला 'प्रेमादर' म्हणता येईल. ही भावना आपल्या मन आणि बुद्धीच्या सहचर्याने उत्पन्न होऊ शकते. **जेव्हा जीवनाबद्दल आणि सर्व प्राण्यांबद्दल अत्यंत गाढ प्रेमादर आपल्या मनात असतो तेव्हाच आपल्या मनातील इतरांबद्दलचे प्रेम क्रियाशील बनते.** प्रेम असेल आणि आदर नसेल तर त्या व्यक्तीला अपमानाची बोच सलत राहते.

५२) आदर शब्द ऐकून भयाची वा दूरत्वाची भावना उत्पन्न होणे चुकीचे आहे. एखाद्या व्यक्तीचा आदर करणे म्हणजे व्यक्ती जशी आहे तसे त्या व्यक्तीस जाणणे. आदर दर्शविणे म्हणजे त्या व्यक्तीची उन्नती साधण्यास त्या व्यक्तीस बोलते करण्यास उत्तेजन देणे, साह्य करणे. पालकांनी, शिक्षकांनीही मुलामुलींचा, विद्यार्थ्यांचा आदर केला पाहिजे. मात्र खरा प्रेमी तटस्थपणे प्रेमास्पदाकडे पाहतो, त्याच्या व्यक्तिमत्त्वात ढवळाढवळ करीत नाही. कुठलीही कुरकुर न करता प्रेमास्पदास स्वत:चा विकास करण्यास, परिपूर्ण होण्यास सहाय्य करतो. शुद्ध प्रेमी व्यक्तीच्या सान्निध्यात इतरांच्या व्यक्तिमत्त्वाचा विकास होतो. प्रेमास्पदाबद्दल असा सखोल प्रेमादर असल्याशिवाय प्रेमी व्यक्तीच्या हृदयांतून खऱ्या प्रेमाचा प्रवाह वाहू लागत नाही.

५३) आपल्याला दुसऱ्यांचे सहाय्य, प्रोत्साहन प्रेम हवे असते. पण दुसऱ्याला प्रेम देण्यासाठी आपण स्वतंत्र असावे लागते आणि लोकांच्या अडीअडचणीच्या वेळी आधारस्तंभाप्रमाणे आधार देण्याची क्षमता आपल्याजवळ असावी लागते. ज्या व्यक्तीच्या स्वत:च्या अस्तित्त्वासाठी कुबड्यांची गरज नसते. तीच व्यक्ती लोकांना प्रेम देण्याचे सामर्थ्य बाळगून असते. इतर सर्व प्रेमाचे याचक असतात. असे सामर्थ्य आणि जीवनाबद्दल आणि प्राणीमात्रांबद्दल प्रेमादर असणारी व्यक्तीच लोकांना खरे प्रेम देऊ शकते, त्यांच्यात सुधारणा घडवू शकते.

५४) खरे प्रेम करण्यासाठी १) आत्मसंयमन, २) अत्यंत एकाग्रता आणि ३) संपूर्ण समर्पण या तिन्हीची अत्यंत आवश्यकता आहे. यातील कुठलेही एक नसेल तर शुद्ध प्रेम करता येणार नाही.

५५) प्रेम ही भावना स्वाभाविक आहे. ज्यापासून आनंद मिळतो त्यावर सहज प्रेम बसते. अगदी प्रथम माणूस निसर्गावर प्रेम करू लागला. त्यातून निसर्गपूजा रूढ झाली. नंतर तो दगड, धातू यांच्या अधिक संपर्कात आल्यावर मूर्ती पूजा करू लागला. प्रेमाच्या बाबतीत मातेचे प्रेम-नाते दैवी समजले जाते. ती तिची मुले म्हणून त्यांच्यावर प्रेम करते. दुसरे काही कारण नसते. नित्य प्रेम करते आपण कसेही वागलो तरी नुसत्या 'आई, आई' हाका मारल्या की ती सर्व विसरते आणि आपल्याला कुशीत घेते. म्हणून प्रथम परमेश्वरासंबंधी आईची भावना करण्यात आली. नंतर पित्याची भूमिका त्याचेकडे देण्यात आली. कडक पण प्रेमळ पिता-ऐकले नाही तर शिक्षा करतो; आज्ञा पाळल्या, उद्योग केला, नम्रता बाळगली, निर्मिती केली तर यश देतो. श्रीगुरूदेव म्हणतात, सध्या सर्व धर्म या भूमिकेवर आहेत. पण तरी आईची भावना जगातून जाणार नाही. आईच्या वात्सल्याची भूक माणसाला सदैव असते. आईकडून वडिलांकडे वळणारे धर्म-माणसाच्या व्यक्तिमत्त्वाच्या विकासाबरोबर ईश्वराविषयी कल्पना बदलतात. सर्व शक्तिमान ईश्वर, हुकूमशहा, क्रूरपणे शिक्षा करणारा, संपूर्ण शरणागतीची अपेक्षा करणारा, त्याचे कायदे बिनतक्रार पाळण्याची अपेक्षा करणारा येथपासून सर्व दया, सर्व प्रेम आणि न्याय देणारा ईश्वर येथपर्यंत विविध कल्पना आढळतात.

५६) बालकांतून माणूस युवावस्थेत प्रवेश करतो, जबाबदार व्यक्ती होतो तेव्हा बापाच्या वागण्यातील कार्यकारण परंपरा तो जाणतो. मग अधिक निकटता

येते. श्री नारायणाशी असलेले नाते तो जाणतो - एकच अनंततत्त्व सर्वात असलेला आत्मा ही केवळ कवि कल्पना नाही. विशिष्ट काळी, विशिष्ट समाजाची मनोवृत्ती यावर हे निरनिराळे संबंध अवलंबून असतात. उदाहरणार्थ मध्वाचार्य द्वैताचे प्रतिपादन करतात. भक्त आणि भगवान् भिन्न आहेत, असे प्रतिपादितात. तर रामानुजाचार्य दुसऱ्या काळात मनुष्य सर्वस्वी भिन्न नाही. ईश्वराशी अंश, अंशी संबंध आहे; भगवान् अंशी, जीव अंश आहे असे विशिष्टाद्वैत प्रतिपादितात. आदि शंकराचार्य भक्त भगवान् एकच आहेत असे अद्वैत तत्त्वज्ञान मांडतात. तिन्ही आचार्यांत मतभेद नाहीत. मूल पाहिल्याने वडिलांना थोडे घाबरते, धाक वाटतो. मोठे झाले की त्याला कळते की त्यांची मुले म्हणून आपल्यालाही घरात काही अधिकार आहे. पूर्ण वाढ झाली की मग त्याला कळते की वडील आणि मुले यात भेद नाही. याप्रमाणे प्रेमाचा परिणाम म्हणून परमात्म्याची ओळख पटते आणि यातच प्रेमाची पूर्तता होते.

५७) स्नेह आणि भक्ती यातील फरक जेव्हा आपण शोध घेतो, जाणून घेतो, अनुभवतो तेव्हा परमेश्वराशी असलेले ऐक्य आपणास कळते. तीच भक्ती होय. objective love - सकाम प्रेम नेहमी दुःखद ठरते. आपल्या इच्छा पूर्ण व्हाव्या, आपला फायदा व्हावा म्हणून जे प्रेम केले जाते ते आसक्तीरूप असते.

५८) प्रेमाचे बीजगणित -- प्रेम + इच्छा = आसक्ती (काम)

शुद्ध प्रेम (भक्ती) = आसक्ती - काम (राग)

म्हणून भगवान श्रीकृष्ण म्हणतात की, राग विवर्जित काम मी आहे. इच्छेने प्रेरित प्रेम ऑक्टोपस सारखे असते. ते प्रेमास्पदाचे शोषण करते. आसक्तीने त्याचा नाश करते. प्रेमास्पदाच्या मनात तिरस्कार उत्पन्न करते व प्रेमी स्वतःही अस्वस्थ होतो. त्याला समाधान कधी मिळत नाही आणि आसक्तीमुळे तो एकात अनेकतत्त्वाचा शोध घेत असतो.

५९) खऱ्या प्रेमात इच्छा नसते. मागणी नसते. ग्राम्य अपेक्षा नसते. ते शुद्ध प्रेम असते. यातच त्याची पूर्णता असते. **माणसाला हा अधिकार आहे. देणगी आहे. फक्त माणूसच हे करू शकतो.** अशा व्यापक प्रेमाला देवर्षि नारद अनुराग म्हणतात. यात अनेकातील एकत्वाचा शोध घेतला जातो. हे क्वचित एखाद्यातच आढळते.

६०) प्रेमाचे प्रकटन करण्याची प्रत्येकाची विशिष्ट तऱ्हा असते. ती मानसिक भूमिकेवरच अवलंबून असते. या विविध भूमिकेवरून भक्तीचे विविध प्रकार गणले जातात. हे भाव वात्सल्य, दास्य, वगैरे यांत गुप्त प्रेम किंवा प्रिया-प्रेयसी-माधुर्य भावही येतो. हे सर्व भाव उत्तेजन देण्यायोग्य आहेत. एकदा बांध फुटला की आपले आपल्यालाच आश्चर्य वाटते की, इतक्या जणांवर आपण कसे प्रेम करू शकतो !

६१) आत्मविकासाच्या या महान योजनेमुळे आपल्याला आपल्या खऱ्या स्वरूपाची ओळख पटते व इतरांशी असलेले एकत्त्व कळते. या स्वरूपाला मर्यादा नाही. कोणतीही शक्ती हे रोखू शकत नाही. आपल्या इच्छा-आसक्ती याच अडथळा करतात म्हणून आपले स्वतःचे हृदय सर्वांवर प्रेम करण्यास सक्षम होण्यासाठी आपले अंतःकरण प्रथम शुद्ध केले पाहिजे.

६२) नारायणाची भक्ती हाही अंतरातील प्रेम वाढविण्याचा उपाय आहे. त्यांच्या यशाचे श्रवण करणे, गुणांचे गान करणे, त्यांच्या प्रेमास प्रतिसाद देणे आणि आपल्या अंतर्यामी वास करणाऱ्या नारायणाचे ध्यान करणे ह्या मार्गांनी आपल्या भगवंतावरील प्रेमाची वृद्धी होते. **भगवान् कुठे दूर स्वर्गात वगैरे नाहीत तर ते येथे सर्वत्र विद्यमान आहेत. सुवर्णाचे दागिने म्हणजे सुवर्णच असते. तसे हे विश्व परमेश्वरापासून प्रकट होते. म्हणून सर्व विश्वाला तोच व्यापून आहे. हे आपण प्रामाणिक आणि सर्व प्राण्यांच्या क्रियाशील प्रेमाद्वारे जाणून त्यांची सेवा करणे हीच सर्वश्रेष्ठ पूजा आहे, सर्वोत्तम प्रार्थना आहे.**

६३) मात्र या वरून चुकीची कल्पना कुणी करून घेऊ नये असे श्रीगुरूदेव बजावतात. हे जग म्हणजे ईश्वर नव्हे. जगात परमेश्वर आहे. प्रेमाच्या द्वारे, समर्पण वृत्तीने त्याचा शोध घ्यावा, प्रार्थनेने त्यास जागृत करावे आणि एकाग्रतेने ध्यानात त्याला भेटावे, त्याच्याशी एकरूप व्हावे.

६४) कुणीही एक व्यक्ती म्हणजे ईश्वर नाही पण सर्व त्याचीच अभिव्यक्ती आहे.

अ) आईचा केस म्हणजे आई नव्हे पण तो तिच्याच विस्तार असतो.

ब) आपला पाय म्हणजे आपण नव्हे पण पायात आपण असतो.

क) दूध म्हणजे लोणी नव्हे पण दुधात लोणी असते. दही दूध घुसळून लोणी काढावे लागते.

तसे एरवी आपल्याशी लपंडाव खेळणाऱ्या परमेश्वराला प्रेमाने प्राप्त करून घ्यावे. आपल्या चांगुलपणाने, आनंदी वृत्तीने आणि सर्वांवरील प्रेमाने त्याला पकडावे. रोजच्या दैनंदिन जीवनात सर्वत्र त्यालाच पहाण्याचा प्रयत्न करणे हा रोमांचकारी खेळ आहे. न संपणारा आनंद आणि जीवनाच्या अंतापर्यंत चालणारी करमणूक आहे. या खेळात मिळणारा थरारक अनुभव हेच त्याचे पारितोषिक होय. जय, पराजयाचे फारसे महत्त्व नाही. जो आयुष्यात सर्वांवर प्रेम कसे करावे हे जाणतो त्याचे आयुष्य म्हणजेच एक चित्तथरारक खेळ असतो.

६५) **आपण किती प्रेम देऊ शकतो हाच आपल्या आयुष्याचा मानदंड असतो.** आपल्या मनांतील भेदभावच प्रेम नाहीसे करून आपल्याला भिकारी बनवितात. वस्तू आणि व्यक्तीच्या मोहात पडून आपण पंगु अथवा हुकूमशहा बनतो, दुःखी होतो. अशी व्यक्ती महान बनू शकत नाही. श्रीगुरूदेव मुलांना सांगतात की, तुम्ही तरी असे प्रेमाचे भिकारी बनू नका. कारण तुम्हाला उत्तम शिक्षण देण्यात येत आहे.

६६) संपूर्ण त्यागाची तयारी असल्याशिवाय या प्रेममार्गावर वाटचाल करण्याचा प्रयत्न करू नये. खरे तर प्रेम देण्यासाठी सर्वस्वाचा प्रसंगी आपल्या जीवनाचाही त्याग करण्याची आपली तयारी पाहिजे. बुद्ध, ख्रिस्त वगैरे अनेकांनी हे दाखवून दिले आहे. प्रेमासाठी सर्वस्वाचा त्याग करण्याचा दृढ निश्चय आपल्या ठिकाणी जगात परिवर्तन घडवून आणण्याचा पराक्रम, जीवदान देण्याचे ध्येय, सर्व मोहांवर मात करण्याचे सामर्थ्य आणि सर्व आसक्तींवर विजय मिळवून सर्व जगास प्रेमाने आलिंगण्याचे सामर्थ्य देतो.

अपयश आले तरी हरकत नाही. आपण अपूर्ण आहोत आणि पूर्णता प्राप्त करण्यासाठी जास्तीत जास्त प्रयत्नशील असावे. चुकांपासून धडा घेऊ. ज्या दिवशी आपण इतरांकडून प्रेम घेण्याऐवजी सर्वांना प्रेम देण्याचा निश्चय करू, तेव्हा पासून आपण स्वतःच्या संपूर्ण भविष्याचे पुनर्लेखन करू शकू.

६७) आतापर्यंत तुम्ही कुणाला दुखवले असेल, फसवले असेल तर त्यांची क्षमा मागा. शब्दाने नव्हे तर आपल्या आनंदी, निर्लज्ज, शुद्ध उदात्त प्रेमाच्या उत्कृष्ट आचरणानी त्याची भरपाई करा. मूल जसे मातेला कधी मारते पण ते विसरून परत जाऊन तिला मिठी मारते. तसे तुम्ही जीवनात लहान मुलासारखे व्हा. अपराध केला असेल तर योजनाबद्ध प्रयत्न करून प्रेमाची वृष्टी करा. कुणाचीही कसलीही सेवा करण्याची संधी सोडू नये. नारायण कुठल्या रूपात, कुठल्याही वेळी, कुठल्याही प्रसंगी आपल्याकडे येऊ शकतात. जितके होईल तितके कुणाच्याही आयुष्याचा नाश करू नका. सर्वांच्या जीवनाचा आदर करा.

**पण जे मनुष्याचा घात करतात त्यांची गय करू नका.** रोगाचे जंतु, वनस्पतीवरील कीड, धान्याचा नाश करणारे कीटक यांचा नाश अपरिहार्य आहे. अप्रामाणिक, चारित्र्यहीन व्यक्तीमुळे जीवनास हानी पोहोचत असेल तर लोकांची सेवा, रक्षण करण्यासाठी अशांना यथोचित दंड देणे आवश्यक आहे.

६८) सर्व प्राणीमात्रांचे बुद्धिमान आणि शक्तिशाली सेवक बनण्याचा प्रयत्न करावा. ज्यावेळी कसे वागावे हे कळत नसेल तेव्हा राम, कृष्ण, विवेकानंद आदि याप्रसंगी कसे वागले असते असा विचार करून न कचरता योग्य कर्तव्ये व उदात्त कर्मे आचरावी.

६९) स्वत:शी आपल्या अंतर्मनाशी प्रामाणिक रहावे. जगाने निंदा केली तरी पर्वा करू नये. लोक निंदा करणारच. आपण प्रामाणिकपणे, चांगुलपणाने मनापासून सेवा करीत राहावे. आपल्या स्वच्छ, शीतल आणि उत्स्फूर्त प्रेमाच्या पुरात सर्व काही बुडवून टाकावे.

**७०) असा प्रेमी ज्याच्याजवळ देण्यासाठी भरपूर प्रेम असते आणि मानसिक स्वतंत्रताही असते तोच खरा हिंदू होय. तोच खरा संत होय आणि तोच खरा मानव होय.** अशा मानवांचा समूहच जगाला विनाशापासून वाचवून योग्य राज्यमार्गाकडे वळवून शाश्वत शांती आणि अर्थपूर्ण विकासाकडे वळवू शकेल.

७१) हे ध्येय साधण्यासाठी धर्म आणि श्रद्धा यांच्यायोगे वर्तमानकालीन जगातील जीवनाचा आदर करण्यास शिकले पाहिजे. सर्व प्रसंगी, सर्व ठिकाणी लोकांच्या जीवनात सहभागी होण्याचा प्रयत्न केला पाहिजे. त्यांच्या सुखाने सुखी होऊन, दु:खांत प्रामाणिकपणे सहानुभूती दाखवली पाहिजे. सर्व तऱ्हेने लोकांना मदत करावी. बाकी काही करणे शक्य नसेल तर आपल्या प्रेमळ, उत्साहवर्धक, अंत:करणपूर्वक उच्चारलेल्या गोड शब्दांनी दु:खितांचे सांत्वन करावे.

७२) जगात वंचक लोक अनेक असतात. पण कृपा करून त्यांना दोष देऊ नये. ते आधीच त्यांच्या स्वत:च्या कुरूप आणि विकृतीत मनाची आणि अगतिक दुर्दैवाची शिकार बनलेले असतात. त्यांच्यासाठी सहिष्णुता दाखवावी. त्यांना मदत करण्याचा प्रयत्न करावा. चूक दाखवून आपल्या पायांवर भक्कम उभे राहण्यास शिकवावे. **जीवनात कधीही एखाद्या अगतिक प्रेक्षकासारखे अलिप्तपणे उभे राहू नये.** चिन्मय बालविहारच्या बालकांनीतरी आपल्या प्रिय गोप बालकाने सेवेची संधी आपल्याला दिली आहे, असे समजून सेवा करावी.

७३) त्या यशोदेच्या सुंदर बालकावर किती संकटे आली होती, त्याने हसत मुखाने कशाचीही भीती न बाळगता, कुणाचाही तिरस्कार न करता त्यांचा सामना केला आणि सर्वांना आनंदीत केले. त्याचे उपासकांनी तरी अनुकरण केले पाहिजे. **आपल्या भोवतालच्या जगात अखंड उत्साहाने, सर्वांची सेवा करीत त्यांच्या सुखदु:खात सहभागी होऊन जगणे ही श्रीकृष्णाची जीवनप्रणाली आहे.** प्रेम देणारांचे जीवन असे असते.

**ईश्वराप्रमाणे प्रेमाचे दानी व्हा; कुत्र्याप्रमाणे प्रेमासाठी कधी लाचार बनू नका.**

हरि ॐ तत् सत्

**पू. ब्रह्मचारीजी प्रयागजी चैतन्य**
चिन्मय मिशन, सांगली शाखा
प्रमुख आचार्य

# भक्तीसूत्रावरील गुरूदेवांचे

**सौ. रेखा पटवर्धन**

*एम.ए. संस्कृत. प. पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती यांजकडून अनुग्रहित आईवडील - त्यामुळे सुसंस्कार वेपगीतून अध्यात्म व विशेष करून श्रीराम चरित मानसाबद्दल विशेष ओढ. १९९४ गुरुपौर्णिमेला पू. डॉ. कमलताई वैद्यतर्फे प. पू. स्वामींचा अनुग्रह लाभला. प. पू. स्वामी लिखित 'मानसगूढार्थ चंद्रिका' मानस टीकेचा सखोल अभ्यास. २००६ मध्ये कैलास मानसची यात्रा. १९९८ मानस प्रचारासाठी लेखन व प्रवचन कार्य सुरू. या निमित्ताने जवळ जवळ भारतभर प्रवास.*

## प्रस्तावना

नारम् ददाति इति नारद: ह शब्दकल्पद्रुम (अर्थ - परब्रह्माचे जे ज्ञान देतात ते नारद.)

सूत्र : दोरा, ही नारद भक्ती सूत्रे म्हणजे नारदांनी या सूत्रामध्ये ओवलेला (भगवंतासाठी खास) भक्तीचा सुंदर हार ! अशी प्राथमिक ना.भ.सू.ची सुरेख फोड करून गुरूदेव नारदांच्या दासीपुत्राच्याही पूर्वजन्मीचा नारदांचा जन्मेतिहास सांगतात. रंभा-नृत्य पाहताना कामवासनेने घायाळ झाल्याने ब्रह्मदेवांनीच 'जगात क्षुद्र म्हणून जन्मास येशील' अशा दिलेल्या शापाची कथा सांगतात. तत्पूर्वी गुरूदेव नारदांचा अत्युत्तम गुण विशेष सांगून या भगवत् पार्षदाचा अन् वाचकांचा जणू सूरच जुळवून देतात ह 'भक्तांचे जे दोष असतात त्याचा ते (नारद) फायदा घेतात आणि त्याकरता त्यांना दु:खे भोगावयास लावतात. परिणामत: वासनांचा निचरा झाल्यावर ते भक्त सर्व वासनादोषांपासून मुक्त होऊन आपल्या अध्यात्मिक ध्येय-साध्याकडे अधिक निश्चयाने वळतात.'

अशा प्रकारे प्रस्तावनेपासून वाचक या ग्रंथाच्या प्रेमात पडत जातो.

गुरूदेवांची भाष्य करण्याची पद्धती ह प्रथम ना. भ. सूत्र, त्याचा अन्वयार्थ, सरलार्थ सांगून ते गूढार्थाचे विवेचन करतात.

१) अथातो भक्तिं व्याख्यास्याम: ।

'अथ' - मध्ये साधक, भक्त वा शिष्याचा अधिकार सांगून अत: मध्ये ती पात्रता दक्षतेने दृढ करण्याचा इशारा देतात. अन् त्याचे विवेचन रामानुजाचार्य व भ.गीता यांचा अभिप्राय नोंदवून स्वत:च्या सोप्या भाषेत व्यक्त कसा असावा ते समजावून देतात. इथे साधकाने सदाचारी जीवन व्यतीत करावे म्हणजे तो शांतचित्त होऊन सत्यतत्त्वाची प्राप्ती करून घेण्यास खऱ्या अर्थाने सिद्ध होईल. असे सांगून 'भक्ती' म्हणजे स्वत: अनुभवलेले ईश्वर-प्रेम होय असा सुंदर नवीन अर्थ सांगतात.

॥२॥ सा त्वस्मिन् परम प्रेमरूपा ॥ - ती भक्ती खचितच म्हणजे नेमके त्या परमात्म दिव्य स्वरूपाचे ठिकाणी परम = अत्यंत उच्च व उत्तमोत्तम प्रेमरूपच असते असे सांगून भक्तीचा पाश भक्त भगवंताशी सदैव मोहित करून आकर्षित करून आ-बद्ध ठेवतो असे सांगतात.

॥३॥ अमृत स्वरूपाच ॥ मानवाच्या निरंतर सुख-शांतीचा मूलस्त्रोत या अमृतत्वात म्हणजे परमात्म्याच्या दिव्य 'नित्य' प्रेमात आहे हे सांगून ब्रह्मविद् ब्रह्मैव भवति - उपनिषद सिद्धान्ताची या सूत्रास सुरेख जोड देतात.

तर पुढील सूत्रात भक्ताची अवस्था वर्णन करताना भक्ताची सिद्धता अमृतत्वात नित्य तृप्तीत विलीन कशी होते व ती जगातल्या सवंग सिद्धीला भुलणाऱ्या तथाकथित साधूंपेक्षा कशी वेगळी उत्तम उच्चतम आहे ते शेवटी कृष्णभक्त सुदाम्याच्या उदाहरणाने पटवून देतात.

५) द्वेष, असूया इ. विकारांना पार करून हा सिद्ध-तृप्त भक्त सततच्या उत्साह आनंदाला वरतो ते सांगतात. पण हा आनंद व उत्साह सामान्य लौकिक नसून आंतरिक दिव्य कसा असतो ते गोपींच्या उदाहरणाने स्पष्ट करतात.

६) हा भक्त 'मत्त' म्हणजे भक्तीने कसा माजतो, भक्तीला येतो ते सांगून तो शेवटी 'शांतचित्त' ही कसा बनतो ते सांगून तो ध्यानात आता खऱ्या अर्थाने कसा रमतो ते जणू गुरूदेव इथे गुरू-शास्त्र व आत्मप्रचितीने सांगतात.

पुढील ८ सूत्रात (७ ते १४) मध्ये या ही पुढची भक्ती-प्रेमाची उच्च पातळी दिव्य भक्ती प्रेमाचे स्वरूप असे सांगून स्पष्ट करतात.

७) भक्त आता त्यागरूप बनल्याने त्याच्या अंत:करणातील कामनांचा समूळ नाश होतो. त्याचे अधिक स्पष्टीकरण म्हणजे लौकिक व वैदिक व्यापार यांचाही त्याग आता भक्त करू लागतो म्हणजे तो ना व्यवहारिक संसारिक विषयात असतो ना तो कर्मकांडात (वैदिक वा पौराणिक कोणत्याही) रस घेत नाही कारण भगवंत, परमात्मा व त्याची प्राप्ती करण्यासाठी केवळ त्याचेवर प्रेम करण्यातच तो फक्त रमतो अन्यत्र कोठेही नाही. म्हणून जगात असून राहून जगूनही तो सर्व बाह्य गोष्टींबाबत उदासीन, तटस्थ असतो कारण भगवत् स्वरूप वा प्रेम याशिवाय आता त्याला कोणताच आश्रय नसतो. त्यामुळे जगतात सर्वत्र त्याला त्याचा परमेश्वरच दिसतो. अगदी प्रभातीच्या चिमण्यांच्या चिवचिवाटापासून ते रात्रीच्या रातकिड्यांच्या आवाजातून त्याला भगवंताच्या गुण-लीला-स्तुतींचेच सुस्वर ऐकू येऊ लागतात. भगवंत भक्ती प्रेम प्राप्तीसाठी त्याने वेदोक्त वा पुराणोक्त कर्मे नाकारली तरी त्याचेकडून आता 'अधर्म' घडत नाही. कारण त्याचे मन-बुद्धी सदैव सतत भगवंत अनुसंधानातच रममाण झालेले असते. 'भक्तीच्या नावाखाली श्रुतीग्रंथांची अवज्ञा आणि शास्त्रज्ञांचे उल्लंघन केलेले चालेल काय ?' असा स्वत:च प्रश्न तयार करून पुढील सूत्रात त्याचे उत्तर देतात. अलौकिक अशा भगवत् प्रेमाचा एकदा का मनात दृढ निश्चय झाला की मग तो भक्त वेद-शास्त्रानुसार वागतोच. कारण तसे वागले नाहीतर भक्ताचे पतन होण्याची शक्यता असते. त्यामुळे परमात्म्याशी एकरूप झालेला भक्त शास्त्राने वर्ज्य केलेल्या मार्गाने जाणार नाहीच. परंतु ज्या शरीर व इंद्रियांच्या सहाय्याने परमात्म्याचे ध्यानादी करतो त्या शरीर रक्षण पोषणादींसाठी आवश्यक तेवढे (मित) आहार, निद्रादी घेतो. खरा भक्त वा साधक अंतरी त्या परमात्म्याशी जुळलेलाच असतो पण बाह्यत: सामान्य माणसाप्रमाणे बोलतो-वागतो खातो पितो इ. असा आत्मरंगी रंगलेला कसा वागतो ते पुढे सांगतात.

वेदव्यासांच्या मते पूजा इ. उपचार करण्याबद्दलची साधक-भक्ताची आसक्ती-ओढ वाढतच जाते. तर गर्गाचार्यांचे मते अशा भक्ताला भगवत्-कथेविषयीचे आकर्षण इतके वाढत जाते की त्याला 'कथानुराग', 'कथारति'

शिवाय चैनच पडत नाही. तर शांडिल ऋषी म्हणतात - मूर्तीपूजा, जप, पारायण, स्तोत्रपठणादी करून ज्या योगे भगवंताचे अनुसंधान जराही विलग होऊ नये किंबहुना ही 'आत्मरति' वाढतच राहील असे आता भक्त वागू लागतो. तर या बाबतीत नारद महर्षी म्हणतात की, असा भक्त आता आपल्या प्रत्येक श्वासागणिक प्रत्येक कर्म ईश्वरार्पण बुद्धीने करू लागतो. क्षणभराचे भगवंताचे विस्मरणही त्याला मरणप्राय यातना देते. इतकी व्याकुळता त्याचे ठायी प्रगटते.

अस्ति एवम् एवम् = हे (भक्तीलक्षण) असेच आहे. गुरूदेव शेवटी म्हणतात ह 'गीता आणि उपनिषदे हे ग्रंथ श्रद्धामय प्रेमस्वरूपा भक्तीच्या श्रेष्ठ गुणांचे उत्कट निष्ठेने मधूर झालेल्या प्रेमाचे समर्थन करतात.' अगदी व्रजनिवासी गोपिकांप्रमाणेच ! त्या भावविभोर अवस्थेतही गोपींना भगवंताच्या वैभवाचे (त्याच्या परब्रह्मत्वाचे) यत्किंचितही विस्मरण झाले नाही. कारण त्या कन्हैया कृष्णाशी ज्या बालभावाने - सुंदर बालकाच्या रूपात सगुण साकार ईश्वर आहे हे जाणून जेव्हा त्या प्रेम करतात त्याच वेळी तेच निर्गुण निराकार परब्रह्म तत्त्व आहे हे त्या जाणतात, असे म्हणून गुरूदेव भागवतातील श्लोकही उद्धृत करतात. (तळटीपेत)

*'न खलु गोपिकानन्दनो भवान् अखिल देहिनामन्तरात्मदृक् ।'*
*विखनसार्थितो विश्वगुप्तये सख उदेयिवान् सात्वतां कुले ॥'*
*(भा. १०.३१.४)*

अन् याच्याच आधारे पुढील सूत्रात अधिक स्पष्ट करतात की, ही त्यांची ज्ञानोत्तर दृढ भक्ती होती म्हणूनच त्यांना महारासलीलेचा अधिकार मिळाला तो केवळ त्यांच्या अव्यभिचारिणी भक्तीमुळे ! या सूत्राचे निमित्ताने(so called तथाकथित) कामुक प्रेम व गोपींचे दिव्य प्रेम यावर गुरूदेव भरभरून बोलतात.

म्हणून त्या दिव्य प्रेमाच्या आधारे कृष्ण-विरहातही गोपी त्याच्या त्या प्रेमभक्तीत भावविभोर होऊन 'अधिक प्रेमभाव' अनुभवित राहिला अन् त्यांचा तो प्रेमभाव, तो स्नेह परमात्म्यालाही द्रवित करून त्याचेही डोळे पाणावित राहिला ह म्हणून धन्य त्या गोपी व धन्य त्यांचा 'प्रेमभाव', 'प्रेमभक्ती'.

म्हणून असा हा प्रेमभाव ही प्रेमाभक्ती कर्म-ज्ञान व योग या तिन्ही मार्गाहून श्रेष्ठ आहे - इथे भक्तीचे श्रेष्ठत्व वेदांपेक्षाही कसे आहे ते गुरूदेव समजावून देतात.

भक्ती ही साधन आहे तेच पुढे साध्य 'फल' बनते. नव्हे नव्हे 'रसो वै सः ।' ची दिव्यानुभूती भक्ताला प्राप्त होते. असे जे आत्म-ब्रह्म-तत्त्व = तीच ही प्रेमभक्ती ! असे विवरण करताना शेवटी म्हणतात - 'भक्तीमार्ग हा इतर सर्व आत्मविकसनाच्या अध्यात्म मार्गापेक्षा श्रेष्ठतर (उदात्त तर) आहे हे जे दृढ कथन आधीच्या सूत्रात केले आहे', त्याचे समर्थन या सूत्रात सापडते. (सू. २६ फलरूपत्वात् मध्ये) भक्तीमार्गाच्या श्रेष्ठतरतेस पुष्टी देणारे हे २७ वे सूत्र होय. कर्म-ज्ञान-योग मार्गातील प्रगतीनंतर येणारी अहंकाराची भीती येथे नाही कारण दैन्यप्रियतेमुळे भगवंतच भक्ताचा हा अहंभाव समूळ निपटून काढतो.

भक्ताच्या हृदयात 'भक्ती स्थिरावते - रमते' ते ज्ञानरूपी साधनेच्या द्वारेच. हे गुरूदेव भ. गीता, ध्रुव, शबरी इ. भक्तांच्या उदाहरणांनी सिद्ध करून दाखवतात.

॥अन्योन्याश्रयत्वमित्यन्ये ॥ या सूत्रावरील भाष्य हे फारच व्यासंगी, रसाळ, सुंदर असे गुरूदेवांच्या शैलीने रंगले आहे ते सर्व समूळच वाचावे. अनेक आचार्यांची मते स्पष्ट करून सनत् कुमारांचे मत पुढील सूत्रात उद्धृत करून स्पष्ट करतात. तर ३१ वे सूत्र हे खास उदाहरणादाखल देऊन सिद्धांतास सुरेख पुष्टी देतात. तसेच पुढील सूत्रही असेच सोदाहरण स्पष्टीकरण आहे - पण फारच रसज्ञतेने गुंफलेले आहे.

मुमुक्षूंनी केवळ रुक्ष ज्ञानी न होता भक्ती संपृक्त व्हावे यासाठी भगवंताचे लडिवाळ अंतरंग पार्षद नारद कसे तळमळीने सांगत आहेत ते जणू गुरूदेव 'प्रत्यक्ष नारद' बनूनच आता या विषयात खोल खोल अवगाहन करीत चालल्याचे जाणवते. 'गायन्ति आचार्यः' या पदातून भक्तीची अविरत ओढ स्पष्ट होते. तर स्थितप्रज्ञ-लक्षणे सांगताना भगवान स्वतः 'संगात् संजायते कामः'... अशी जशी पथ्ये वा वर्जन स्थळे सांगतात तसे इथे मधूनच विषय त्याग व संगत्यागाचे पथ्य गुरूदेव स्पष्ट करतात. अन् त्या पथ्यानंतर लगेच अनुपान म्हणून 'अखंड भजना'चा उल्लेख आवर्जून करतात. 'वाक्, काया आणि मन यांचे द्वारा अशा तऱ्हेने केलेली परमेश्वराची 'स्नेहपूर्वक भगवत् सेवा' म्हणजे भजन अशी व्याख्या करून ही अखंड, स्थिर आणि अत्यंत नियमित झाली पाहिजे असे गुरूदेव कळकळीने व आग्रहपूर्वक सांगतात.

तर पुढील सूत्रातून श्रवण-कीर्तन व संकीर्तन हे सुस्पष्ट करून दाखवितात.

या ना.भ.सू. चा गाभा म्हणजे हे ३८ वे सूत्र होय. ही प्रेमभक्ती महात्म्यांच्या (सद्गुरू) कृपेने व भगवंताच्याच अंशमात्र कृपेने प्राप्त होते असे सांगताना सद्गुरू व ईश्वरैक्य सहजी सिद्ध करून देतात.

महत् संगस्तु दुर्लभोऽगम्योऽमोघश्च । मधील प्रत्येक पदाची फोड करून गुरूदेवांच्या सहज हसत खेळत समजावण्याच्या शैलीत फारच सुंदर रीतीने उलगडून दाखविले आहे.

अन् ४० व्या सूत्रात मागील दोन-तीन सूत्रांची सिद्धता अगदी शिक्कामोर्तब करून टाकतात.

तर ४१व्या सूत्रात महात्म्यांच्या दुर्लभ सत्संगाची मेख 'वेदान्त' च्या शैलीने 'लोकवत्तुलीलाकैवल्यम्' अशा शंकराचार्यांच्या सुगम शैलीत समजावून देतात.

पुन्हा ४२ व्या सूत्रात सत्संग साधावा असे पुनरूच्चारपूर्वक स्वामीजी हे साधनेचे अनुपान वाचकांवर बिंबवत आहेत.

या अध्यात्म-मार्गावरील Danger zone दाखवून साधकांना गुरूदेव चांगल्या प्रकारे सजग करीत आहेत. क्रमशः दुःसंग, काम-क्रोधादी विकार, कसे टाळावेत ते नेहमीच्या खेळकर शैलीत सांगत आहेत अन् दुःसंग प्रारंभी न कळण्याइतका सूक्ष्म रूपाने एकदा तन-मनात घुसला की, त्याचे विराट रूप कसे सतावते व त्यावरचा रामबाण उपाय 'सत्संग केवळ सत्संग' हेही छान सांगतात.

भक्तीच्या प्रदेशात एकेक सोपान चढण्याचा क्रम सांगताना महानुभाव सेवा व निर्ममत्वाचे महत्त्व फारच सुंदर तऱ्हेने विशद करून दाखवले आहे. त्यानंतर ऐकान्तिक साधना व त्याने येणारी निस्त्रैगुण्यता कशी साध्याप्रत पोचवते ते शिक्षकी ढंगाने गुरूदेव छान समजावून देतात. त्यानंतर कर्मफलाचा त्याग आणि निर्द्वंद्व होण्याची पातळी कशी गाठावी ते सांगतात. इतकेच नव्हे तर शेवटी शेवटी वेदांचाही त्याग करून जो अखंड भगवत्-प्रेमात सतत डुंबत, रमत राहतो तो अंतिम पातळी हा भक्त गाठतो. तो स्वतःही तरतो इतकेच नव्हे तर त्याहीपुढे जाऊन इतरांनाही तारण्याची त्याची तयारी होते.

ही भक्ताची पातळी केवळ अनुभाव्य-अनुभवण्याचीच केवळ वस्तू होऊन राहते. त्यामुळे त्याचे वर्णन कसे करणार ? ते शक्यच नाही. कारण तेथे वाणी-शब्द-भाषादी पांगुळतातच. 'वासुदेवः सर्वं इति' अशी त्याच्या मनाची व्याप्ती वाढत वाढतच राहते. अशा अनुभवात रमायला लागलेला भक्त मग आपसुकच त्रिगुण, कामनादिरहित होत जातो. आता ह्या भक्ताला केवळ तोच ध्यास सतत लागतो. अगदी त्या आत्मरूपात तो इतका रमतो, इतका रमतो की तो

आता साधक भक्त न राहता आत्मक्रीड, आत्मतृप्त, आत्मकाम - या पायरीवर येऊन ठेपतो.

यानंतर ब्रह्मर्षी नारद भक्तीचे प्रकार सांगत आहेत. भक्ताच्या प्रकारांनुसार नारदांचे मते भक्तीचेही प्रकार बदलत राहतात. परंतु भक्तीचा स्थायी भाव मात्र बदलत नाही. शांती व परमानंदरूप असाच राहतो.

भक्ताने आजीवन नित्य नेमाने व प्रेमाने आपली साधना चालूच ठेवावी. देह पडेपर्यंत यात खंड पडू देऊ नये म्हणजे मग भक्तिमार्गात येणारे सर्व अडथळे तो परमेश्वर आपण होऊन दूर करतो. अन्यथा साधना शिथिलतेमुळे भक्त ही या मार्गावरून पतित होऊ शकतो -- जर तो षड्विकारांच्या पाशात अडकला तर !

म्हणून ऐकान्तिक प्रेमभावात रंगलेले भक्त सर्वश्रेष्ठ होत. कारण प्रेमभावात 'कंठी प्रेम दाटे, नयनीं नीर लोटे, हृदयीं प्रगटे राम-रूप' अशीच जणू त्यांची नित्यावस्था बनलेली असते. असे अष्ट सात्त्विक भावयुक्त भक्तच तीर्थांना आपल्या या पवित्रमय कर्मांनी 'तीर्थत्व' प्रदान करतात. इथे भारतातील अनेक संत महात्म्यांची यादी गुरूदेव देतात. हे सिद्ध-महात्मे यांच्या भक्तिभावाच्या तन्मयतेने असे काही रंगून जातात की, ते अगदी 'देव' कोटीतले बनून जातात. त्यांच्यामुळे ही पृथ्वी जणू खऱ्या अर्थाने 'सनाथ' बनते. ते कोणत्याही जाति-धर्मातील असोत ते आपल्या कुल-पितरांसह अखिल विश्वाचे तारक बनतात. कारण ते सर्व सीमा पार करून त्या असीम परमात्म्याच्या प्रांतात प्रवेशलेले त्याचेच बनलेले 'ईश्वराचे लडिवाळ' बनलेले असतात. असा भक्त म्हणजे सर्व सद्गुणांचे आगर बनलेला असा असल्याने त्याच्या बाह्य रूपादीवर टीका न करता त्याचे 'सुंदर अंतरंग' अनुसरावे असा गुरूदेव सुरेख उपदेश करतात.

अन् या भक्तीचे महात्म्य वा फल सांगताना गुरूदेव म्हणतात -- या दिव्य भक्तांच्या नित्य सत्संगात राहिल्याने त्यांच्यासाठी प्रगट झालेले ते भगवंताचे दिव्य रूप - दर्शन अगदी जवळून घडण्याची सुवर्ण संधी मिळते. नवविधाच नव्हे अकरा प्रकारच्या भक्ती साधनेत हा भक्त आदलून-बदलून सदैव रममाण होत असतो. त्याची ८२ व्या सूत्रात भली मोठी यादीही नारदजी देतात. अन् हे सारे 'भक्तीचे प्रमुख आचार्य' कसे आहेत ते गुरूदेव स्पष्ट करून सांगतात.

अशा प्रकारे या ना. भ. सू. ची फलप्राप्ती सांगताना शेवटच्या सूत्रात म्हणतात - जो या नारदांनी सांगितलेल्या, शिवाने उपदेशिलेल्या मंगलमय उपदेशावर विश्वास ठेवतो व श्रद्धा बाळगतो तो आपल्या प्रियतमाची (परमात्म्याची) प्राप्ती करूनच घेतो. जो शुद्ध-विशुद्ध भक्तीवर विजय मिळवितो तो सर्वांना म्हणजे जणू तिन्ही लोकांना जिंकतो.

अशी ही भगवत् पार्षद नारदांची भक्तीची सांगितलेली महती गुरूदेव आपल्या वाणीने त्या सूत्राची सुंदर फोड करून देतात. तो हा भक्तीचा भाव-मधुर सुगंधी मोहक हार आपण आपल्या प्रत्यक्ष आचरणाने भगवंताला अर्पून तो परमात्मा ते परम ध्येय प्राप्त करून घेऊ या ! त्यासाठी नारदांपासून गुरूदेवांपर्यंत सर्व संत-सिद्ध-महात्मे महापुरुष वा महानुभाव यांची कृपा प्रार्थू या. म्हणजे त्या भक्तवत्सल परमात्म्याला आपणावर कृपा करणेच भाग पडेल कारण तो त्यांच्या 'आपल्या भक्तांच्याच' ताब्यात आहे ना ?

रामदास रामाहून मोठे -- हीच भक्तीची श्रेष्ठता होय !

जय सियाराम ।

श्री सीता रामचंद्रार्पणमस्तु ।

**सौ. रेखा पटवर्धन**
वृंदावन हॉटेल मागे, अक्षय रेस्टॉरंट समोर स्टेशन रोड,
मिरज ४१६४१०

# [illegible] निर्मितीचं वेदांतिक स्प[illegible]

**किशोर पुंडलीक चौधरी**

*मेकॅनिकल इंजिनिअर, नोकरी - शापूर्जी पालनजीमध्ये, चिन्मय मिशनचे काम करतात.*

कुणीही नवीन असं काहीही निर्माण करत नाही. आकार, नांव, मूळ स्वभाव आणि स्थिती बदलणे यालाच निर्मिती म्हणतात. निर्मिती म्हणजे केवळ पुन: रूपान्तर / पुन:धर्मान्तर (इथे धर्म म्हणजे त्या वस्तूचा स्वभाव, गुण इ.) अशा रीतीने एखादी वस्तू निर्माण करायची झाल्यास तीन घटक आवश्यक असतात आणि एकंदरीत त्यांना कारण असं म्हणतात.

कुठल्याही निर्मितीत तीन मूलभूत कारणं असतात ती अशी (अ) उपादान कारण किंवा कच्चा माल (ब) कारणीभूत ठरणारं कारण (निमित्त कारण) किंवा असं यंत्र / हत्यार की ज्यामुळे त्या वस्तूची निर्मिती होते. (क) कार्यक्षम कारण त्या यंत्र / हत्यारामार्फत त्या कच्च्या मालावर प्रक्रिया करण्यासाठी लागणारी बुद्धिमत्ता / ते यंत्र तयार करण्यामागची बुद्धिमत्ता.

साधारणत: या तिन्ही विषयांचं / कारणांचं अस्तित्व वेगवेगळं आहे. परंतु जगाच्या निर्मितीच्या बाबतीत निर्माण झालेली वस्तू / हे जग त्या निर्मात्यापेक्षा वेगळं नाही. यातील उपादान कारण एक परमोच्च तत्त्व, परमात्मा वेगवेगळ्या स्वरूपात प्रकट होतो. त्याच्या अनंतत्वाच्या अस्तित्वाबद्दल म्हणायचं झाल्यास त्याखेरीज दुसरं काही अनंत असूच शकत नाही.

समुद्रातील लाटा काही त्याचं अस्तित्व हे समुद्रातल्या पाण्याशिवाय दुसरं काही आहे असा दावा नक्कीच करू शकत नाही. तसंच हे बाहेरचं जग आणि आपलं स्वत:चं शारीरिक, मानसिक आणि बौद्धिक अनुभवांच्या जगाचे खंड / प्रांत प्रत्येकात असणाऱ्या एका उच्चतम सावधानतेतूनच निर्माण होतात / उदयाला येतात. अस्तित्वात राहतात आणि त्यातच विरून जातात आणि जसे पाण्यातून अनेक बुडबुडे निर्माण होऊन वरच्या स्तरावर येऊन फुटून जातात तसेच वेगवेगळ्या मनांमध्ये निर्माण होणारे वेगवेगळे अनुभव जाणीवांद्वारा वर येऊन त्या जगातच व्यक्त होतात.

तसंच या आपल्याला दिसणाऱ्या / भासणाऱ्या अस्तित्वाच्या अनेक रूपांमध्ये आणि आपल्याला येणाऱ्या विविध पैलूंच्या अनुभवांमध्ये त्यामागील आधार त्याच्या तेजासहीत आपल्याला जाणवत असतो. [illegible] आपल्या वेगळ्या पद्धतीने ब्रह्म, परमात्मा किंवा सत् चित् आनंद म्हणतो. हे परमोच्च तत्त्व एक महान शक्तीवान सत्य आहे. आणि त्या सर्वांच्या पूर्णत्वात विविधता / भेद असणं शक्यच नाही.

मग आपल्याला बाहेरच्या जगतातील अनेकविध वस्तूंमध्ये विविधता का जाणवते ? आणि त्यांचा अनुभव इतक्या खरेपणाने करता येतो ? जर या सगळ्या वस्तूंमध्ये आणि आपल्या भोवताली असणारं त्यात स्पंदित होणारं तत्त्व हे एकच आहे / अद्वितीय आहे. तर मग आम्हाला त्यांचा अनुभव ग्रहण करताना ते विविध आहेत, असा दुजाभाव आमच्या मनात का निर्माण होतो ?

## निर्मितीचे सिद्धांत

न्यायवैशेषिक प्रशालेने एक सिद्धांत मांडला आहे की, परमाणू हे कारण आहेत की ज्यापासून या जगाची निर्मिती झाली आहे. ते मान्य करतात की परमाणू निश्चल आहेत / सुस्त आहेत. कितीही झालं तरी अशा सुस्त कारणापासून ज्ञानग्रहण क्षमता असलेले जीव निर्माण होण्याची अपेक्षा केली जाऊ शकत नाही. पुढील निरीक्षणांवरून हे देखील लक्षात येतं की, कारणांमध्ये नसलेले गुण जगात घडणाऱ्या घटनांमध्ये दिसतात / त्या परिणामांमध्ये दिसतात म्हणून तत्त्वशास्त्राचा प्रामाणिक अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांना हा सिद्धांत अमान्य करावा लागतो, नाकारावा लागतो.

दुसरा सिद्धांत असा आहे की, जग हे 'प्रधानातून' निर्माण झालेले आहे. (प्रधान म्हणजे) अव्यक्त. ज्याचा उल्लेख वेदांतात मूळ प्रकृती म्हणून केलेला आहे, यात वादच नाही की, व्यक्त झालेले जग हे अव्यक्तातूनच पुढे आलेले आहे. परंतु हे जाहीर करणे की, अव्यक्त हेच केवळ या व्यक्त झालेल्या गतीमान / शक्तीमान जगामागील कारण आहे. हा केवळ चुकीचा युक्तिवाद आहे. त्या अव्यक्तामागे काहीतरी महत्त्वाचा मूलभूत आधार असायलाच हवा. तेव्हाच हे कार्य होऊ शकेल. म्हणून हा सिद्धांत सुद्धा एका व्यासंगी अभ्यासकासाठी समाधानकारक ठरू शकत नाही.

तसंच जे असत्वादी असतात, बौद्धवाद्यांची एक मोठी शाळा; ते जाहीर करतात की, हे अस्तित्वात असलेलं जग जे कधी अस्तित्वात नव्हतच अशाच कशातून तरी निर्माण झालं आहे. हे देखील नाकारावच लागतं. मला जर एखाद्या वांझ बाईच्या मुलाच्या मोठ्या भावाच्या लग्नाला बोलवलं असेल तर साहजिकच त्या लग्नाला मी कधीच जाऊ शकणार नाही. तत्त्वशास्त्राचा कुठलाही विद्यार्थी हे स्वीकारू शकणार नाही की, अस्तित्वात असलेलं जग हे अस्तित्वातच नसलेल्या कारणापासून तयार झालं आहे.

अशा रीतीने विचारांच्या वेगवेगळ्या प्रशालांनी मांडलेल्या निरनिराळ्या सिद्धांतांना नाकारून वेदांतिक ऋषी / गुरू इथे सरळ सरळ एका निश्चित देवी आधाराचे निर्देशन करीत आहेत. ज्यावर हे आश्चर्यकारक, भ्रामक जगत अध्यारोपित केले जावू शकते - वस्तू व व्यक्तींचे / जीवांचे हेतू पुरस्सरपणे सतत स्थित्यंतर होत राहण्याचा [illegible] चालत राहतो असे हे जगत. अद्वैत तत्त्वज्ञानाप्रमाणे हा आधार (सत्) अस्तित्वात आहे. (अखंड) अमर्यादित. मग आता जग निर्माण कसं झालं ? त्याची नक्की प्रक्रिया काय ? बऱ्याचशा विचारवंतांनी निष्कर्ष काढला आहे की, हे बहुतेक अनंत सत्याच्या नूतनीकरणाच्या प्रक्रियेमुळे घडलेले असावे. (परिणामवाद) जर जग ईश्वराने स्वत: जग होऊन निर्माण केलं असेल, जसं की दूध त्याचं नूतनीकरण दह्याच्या स्वरूपात करतं तर त्यातून एक मोठी शोकांतिका सुचवली जाईल. कारण दही होण्यात दूध त्याचे गुण कायमचे गमावून बसलं आहे. तसंच देवाने जर जगाच्या निर्मितीसाठी स्वत:च नूतनीकरण केलं असतं तर ईश्वर तत्त्वच समाप्त झालं असतं.

आता आपण एकंदर कोंडित सापडण्याच्या परिस्थितीला पोहोचलो आहोत. जगाच्या मागचं कारण हे अनंत जाणीव तत्त्व असावं. परंतु ते अनंत

जाणीव तत्त्व स्वत: किंवा त्या अनंत जाणीव तत्त्वात तर जग झालेलं नाहीये आणि त्याचवेळी बहुत्वाचं जग आपल्या अनुभवासाठी समोर तयार आहे. मग या नाशवंत आणि अविनाशी अनंतात नक्की नातं काय ?

आचार्य शंकराचार्य आणि अद्वैत प्रशालेच्या विचारांच्या इतरांच्या अनुसार तो केवळ एक भ्रामक आभास आहे. (आभासवाद) आणि त्याला कारण अविद्या. सत्याची निश्चित उकल न होणे. श्री स्वामी तपोवन महाराज यांनी केलेल्या बद्रीनाथ स्तुतीत म्हणतात,

''जर हे जग सच्चिदानंद जाणीव स्वरूपाचं नूतनीकरण असेल तर विरजण लावलेल्या दुधाप्रमाणे परमोच्च तत्त्वाचे मूळ गुणधर्म संपतील. त्याचं दुसरं काही होण्यासाठी म्हणून भ्रम जो झालाय तो म्हणजे न समजणाऱ्या जग मृगजळासारखं त्या भगवान बद्रींना माझा नमस्कार.'' (भाग १:२५)

हे भ्रामक चित्र प्राचीन वेदांमध्ये याची तुलना मृगजळाशी केली जाते जे की कोणाचीही तहान भागवू शकत नाही. वाळवंट हेच केवळ सत्य पण तहानेमुळे मार्गक्रमण करणारे त्यांच्या वासनांना पाण्याच्या स्वरूपातील चित्रात बदलतात आणि त्यांना खळखळून वाहणारं पाणी असलेला तलाव दिसायला लागतो. एका विशिष्ट अंतरावर एकदा का मनाने ठरवलं की, समोर पाणी आहे असं समजायचं की, बऱ्याचशा वाळवंटात प्रवास करणाऱ्यांचा अनुभव आहे की, त्यांना त्या कल्पनेच्या तलावात लाटा आणि खळखळाट दिसायला लागतो. अगदी त्यावर चालणारी जहाजेसुद्धा ! आणि सूर्यकिरणं त्यात खळखळणाऱ्या लाटांवरून चमकणारी, अगदी तसंच; जेव्हा शुद्ध चैतन्यतत्त्व समजलं जात नाही तेव्हा मन त्याच्या जागेत एक जग निर्माण करतं आणि मग त्या जगाशी तादात्म्य पावतो त्यातला अहंकार, दुःख आणि वेदनांचं जीवन जगायला लागतो.

वेदांत जगाला असत्य मानतो कारण त्याची स्थिती सतत बदलत असते. जे सगळ्या कालखंडामध्ये भूत, वर्तमान आणि भविष्यातही ज्यात कुठलाही बदल होत नाही. त्यालाच सत्य म्हणतात. (सत्) आणि जे कधीही आहे तसे राहत नाही परंतु आपल्या अनुभवासाठी सतत डोळ्यांसमोर असतं त्याला म्हणतात असत्.

ज्यात कुठलाही बदल होत नाही तेच केवळ शाश्वत असू शकतं. सत्य, वेदांत आपल्याला समजावतो की, अनेकत्वाचं जग, खरं पाहता जे सत्य नाहीये ते सत्यावर अध्यारोपित आहे. असं भ्रामक अध्यारोपण तेव्हाच होतं की, जेव्हा यामागे असलेल्या 'सत्य' आधाराची समज पटलेली नसते. उदा. एका हाराविषयी गैरसमज होऊन आपण त्याला साप समजतो. सत्याची समज नसणं कितीतरी चुकीच्या समजुतींना निर्माण करते. सत्याची समजूत पटल्यावर सगळ्या गैरसमजुती नाहीशा होतात.

ही तर अनुभवातली वस्तुस्थिती आहे की, ज्याला कुठलीही जागा, काळ, वस्तू अशी प्राथमिक वैज्ञानिक घटकांची मर्यादा नाही, असं अनुभवाचं जगत आपल्या स्वप्नात आपण निर्माण करतो. हे तर आपल्याला अगदी पुराव्यानिशी माहीत आहे की, आपण आपल्या कल्पनांनी एक अनेकत्वाच्या जगताचं चित्र आपल्यासमोर उभं करू शकतो आणि त्यात आपल्याला हव्या त्या स्थिती / वातावरण निर्माण करून आपण सुखदुःखाचं जीवन जगू शकतो.

काळाचा अनुभव हा सापेक्ष आणि आत्मनिष्ठ असतो. स्वप्न बघणारा जगात १० व्या वर्षीच जीवनसुद्धा अगदी स्पष्टपणे जगून घेतो आणि तरीही जेव्हा तो जागा होतो तेव्हा त्याला कळते की, तो जगतोय त्या जगातील काळमापक यंत्राप्रमाणे केवळ काही मिनिटंच गेलेली आहेत. मोठाली मिनिटं गेली आहेत. ते स्वप्न अशा मनामध्ये चित्रित झालं होतं की, जिथे नक्कीच तितकी गांव तितकी क्षेत्र, तितकी घरं आणि पहाड सूर्य, चंद्र आणि तारे हे मावायला जागा नव्हती तरीही स्वप्न बघणाऱ्याने स्वप्नात ते सगळं बघितले आणि यात शंकाच नाही की, स्वप्न पाहण्यासाठी स्वप्न बघताना ते सगळं खरं होतं. स्वप्न जगतात स्वप्नकाळ आणि स्वप्न वस्तू निर्माण होतात. परंतु जागे झालेल्याला मात्र तो सगळा केवळ रिकाम टेकडा भ्रम असतो. आजचं आपलं वर्तमानातील काळ, देश आणि वस्तू यात गुंफलेल्या जागृत जगतसुद्धा उच्च स्तरावरील जाणीवेच्या पातळीवरून बघितल्यास / त्या भूमिकेतून बघितल्यास एक काल्पनिक चित्र म्हणूनच त्याचा साक्षात्कार होऊ शकतो. हा साक्षात्कार तेव्हाच होवू शकतो जेव्हा आपण आपल्यातील जाणिवेच्या त्या स्तराला पोहोचू आणि अनुभवाची ती स्थिती हाच केवळ सत्याचा साक्षात्कार आहे, आत्मतत्त्वाचा.

त्याच्या समोर स्वप्न जगताचं चित्र उभं केल्याने तर स्वत:च्या जागृतावस्थेला पूर्णपणे विसरून जागा माणूस स्वप्न पाहणारा बनतो. स्वप्न पाहणारा स्वप्न आणि स्वप्न पाहणं आणि त्यानंतर ह्या बदलामुळे उद्भवलेले आनंद आणि सुख याचा अनुभव घेणं हे चालू राहातं. परत जागा झाल्यानंतर त्याला कळतं की, स्वप्न पाहणारा स्वप्न आणि स्वप्न सृष्टी हे तिनही घटक / ही त्रिपुटी हे तीन नसून एक दुसऱ्यात मिसळलेलं एक संपूर्ण / एकच आहे. जागृत मन जागी असलेल्या माणसाचं मनच स्वप्नातल्या वस्तू बनतं. त्या मनाचाच एक दुसरा भाग स्वप्न पाहणारा होतो आणि स्वप्न पाहणारा जागृत मनातून किंवा त्या मनातून सहनशक्ती आणि गतीशिलता ओढून घेवून तो स्वप्नातील अनंत वस्तूंशी त्यांच्या रचनेशी आणि वस्तुस्थितींशी नातं जोडून घेतो आणि तशा कृतीही करतो. ही प्रक्रिया म्हणजे स्वप्न होय.

अशाच एका पद्धतीने आपलं स्वत:चं शाश्वत, दैवी स्वरूप विसरून आणि हे विसरून की आपण म्हणजेच एक अद्वैत जाणीव तत्त्व आहोत. आपण अनेकतेच्या वस्तू जगताच्या चुकीच्या कल्पनांचं चित्र आपल्या समोर उभं करतो आणि अनुभवांचे खेळ खेळतो आणि त्यासाठी वापरतो त्रिपुटीचे तीन घटक. ज्ञाता, ज्ञान आणि जाणणारा.

आतापर्यंत आपण जी चर्चा केली त्यावरून आपण म्हणू शकतो की, हे अनेकत्वाचं जग सत्यातूनच उदयाला आलेलं आहे - हे जर असत्य आहे तर ? पण जरी ते असत्य असलं तरी त्यामध्ये सत्यपणाची अशी काही झाक आहे की ते त्याच्या बंधनांनी आपल्याला झाकून टाकत आपले सर्व मार्ग बंद करून टाकतं आणि आपल्यापुढे असा काही आभास निर्माण करत दुःखाचा आणि आनंदाचा हे कसं काय ? प्रत्येक तत्त्वशास्त्राच्या अभ्यासकांना हे कठीणच वाटतं / हे समजावणं कठीणच वाटतं की, हे सत्य नसणारं सत्यामधून आलं कसं काय ? म्हणून महान आचार्य गौडपाद मांडूक्य कारीकेमध्ये हे मान्य करतात की - जाणीव तत्त्व जेव्हा कृतीच्या संकल्पनेशी जोडले जाते तेव्हा त्याच्यात निर्माण होणारे आभास कुठून बाहेरून येत नाहीत. तसंच जेव्हा जाणीवतत्त्व कार्याशी संलग्न नसतं / अचल असतं, तेव्हा त्यातील ते आभास त्या निष्क्रिय जाणीवतत्त्वातून कुठेही निघून जात नाहीत. आभास हे जाणीवतत्त्वातून निर्माणही होत नाहीत किंवा ते कुठे दुसरीकडे निघूनही जात नाहीत कारण ते आभास म्हणजे अस्तित्वात असलेल्या सत् व्यक्तिभाव नव्हेत. हे सगळं काही आपल्याला समजण्याच्या पलीकडचं आहे. कारण ते कार्यकारण भावाच्याही अतीत आहे. (अलथा शांती ५१-५२).

हे श्लोक सरळ सरळ जाहीर करतात की, अनंतातून हे मर्यादित (नाशवंत) कसं बाहेर येतं ? हे समजणं शक्यच नाही. महान विचारवंत गौड पादाचार्य स्वत: मान्य करतात की, 'हा काही बुद्धीचा आळस नव्हे की, जसं काही तत्त्वशास्त्राच्या अभ्यासकांनी बुद्धी वापरली नाही असं याचं कारण नव्हे. तर त्याला कारण आहे तर्काच्या शास्त्राची दुर्बलता.' ते म्हणतात की, कारण भाव

हा केवळ एक कल्पित असा प्रकार असल्यामुळे, कारण भावाचा नियम हा या विशिष्ट गोष्टीमध्ये कार्य करू शकत नाही आणि पुराव्याच्या दृष्टीने कुठलेही वैज्ञानिक स्पष्टीकरण. अनंत तत्त्वाच्या दिसणाऱ्या या नाशवंत आभासामागे असलेले कारण वैज्ञानिक दृष्ट्या शोधून काढल्याशिवाय आणि त्याचा वैज्ञानिक शोध लावल्याशिवाय वैज्ञानिक पुरावा म्हणून सादर करता येणार नाही.

विज्ञान केवळ कार्य आणि परिणामांच्या क्षेत्रातच कार्य करू शकते. परंतु केवळ बुद्धी आणि मन हे कारणभावाच्या निम्नस्तरीय विषयांच्या पलीकडे जाते आणि भ्रामक दुनियेच्या अवस्थेतून मुक्त होऊन त्यापासून दूर जाते तेव्हा [illegible] सत्याच्या प्रांतात प्रवेश करतात. तिथे विषय हे पडायलाही मिळत नाही. कारण [illegible] जाणीव तत्त्वात कोणांचंही कारण नसतं. शिवं कशाची उत्पत्तीही होऊ शकत नाही. तिथे सत्य हे अद्वैत आहे.

आपण हे लक्षात ठेऊन नमूद करायला हवं की, या दोन श्लोकांमध्ये आचार्य गौडपाद आपल्याला सूचित करत आहेत की, कृतीच्या संकल्पनेशी जोडलं गेलेलं जाणीवतत्त्व म्हणजे आपल्यासाठी जागृत व स्वप्नावस्थेत उपलब्ध असलेली जाणीव (आभासाच्या स्वरूपातलं) तत्त्व जेव्हा ते म्हणतात की, जाणीव तत्त्व अचल / निष्क्रिय असतं तेव्हा त्यांचा अर्थ गाढ निद्रेच्या अवस्थेतच निर्देशन करण्याकडे आहे की जिथे जागृत आणि स्वप्न या आपल्या दोन्ही अवस्थांमध्ये आपल्याभोवती उपलब्ध असलेलं अनेकत्त्वाचं जग आपल्याजवळ नसतं. याचा अर्थ असाही नाही की ते जागृत अवस्थेतलं आणि स्वप्नांच्या विश्वातलं जग दुसरीकडे कुठे गेलंय आणि आपण असंही म्हणू शकत नाही की, त्यांनी गाढ निद्रा घेणाऱ्यात प्रवेश केला आहे. आपली खरी अडचण ही या गोष्टीचं खरं स्पष्टीकरण देण्याबाबतची आपली दुर्बलता हीच आहे. हे आभास का आणि कसे उद्भवतात / हे जाणीव तत्त्वातून कसे उद्भवले आणि आपल्याकडे ते कसे येतात हे सगळं सांगणं आपल्याला शक्यच नाही. याबाबतच्या अडचणींमुळे आपल्या तत्त्वशास्त्राच्या साहित्यात, निर्मितीबद्दलचे बरेचसे सिद्धान्त सांगितले गेले आहेत.

निर्मितीविषयी बोलणाऱ्या काहींचा विश्वास आहे की, हे ईश्वराच्या स्वतःच्या अति मानवी शक्तीचे पुढे उभे केलेले भव्यदिव्य चित्र आहे. तर इतर काही मानतात की, जग हे स्वप्न किंवा माया असाच प्रकार आहे. काहीजण मानतात की, हे व्यक्त झालेले जग केवळ ईश्वराच्या इच्छेमुळे व्यक्त झाले आहे. तर काही जणांना वाटतं की, काळ हे जणू सत्यच आहे. आणि म्हणून ते काळाला वस्तू जगत व्यक्त होण्यामागचं कारण जाहीर करतात.

इतर काहीजण विचार करतात की, जगाची निर्मिती ही ईश्वराच्या आनंदासाठी होते तर काहीजण अजूनही तो ईश्वराचा एक नुसता खेळ आहे असे ठामपणे म्हणतात. परंतु तो त्या चकाकणाऱ्या तत्त्वाचा केवळ स्वभाव आहे, आत्मतत्त्व. कारण त्याला कुठल्याही इच्छा अशक्य नाहीत. ज्याच्या इच्छा नेहमीच परिपूर्णतेच्या स्थितीतल्याच असतात.' (मांडूक्य उपनिषद आगम प्रकरण ७-९)

सृष्टी उत्पत्तीबद्दल विचार करणारे आणखी दुसरे जग हे परमेश्वराच्या अती मानव शक्तीच्या वैभवाचे प्रलंबन समजतात, तर आणखीन दुसरे सृष्टी स्वप्न किंवा माया यांच्यात स्वरूपाची असल्याची कल्पना करतात. निर्मितीवादी हे व्यक्त सृष्टी ही केवळ परमेश्वराच्या इच्छेने निर्माण झाल्याचे मानतात, तर कालाला सत्य मानणारे दुसरे भूतमात्रेच्या व्यक्तित्त्वाचे कारण काळच असल्याचे मानतात. दुसरे काही विचारवंत सृष्टी ही परमेश्वराच्या उपभोगासाठी आहे असे मानतात. तर इतर काही ती ईश्वराची लीला असे मानतात. तथापि तो त्याच्या दैदिप्यमान अशा परमेश्वराच्या - आत्म्याचा स्वभाव धर्मच आहे. कारण ज्याच्या कामना सदा पूर्ण परिपूर्ण अवस्थेत आहेत त्याला कसली इच्छा असणे कसे शक्य आहे ?

आपली कल्पावशा सिद्धांताची गणना झाल्यावर आता, विश्वनिर्मितीच्या बाबतीतलं बघू या. गुरू म्हणतात की, जगाची निर्मिती ही [illegible] इच्छेप्रमाणे झाली आहे, तर इतर काहींचा विश्वास आहे की, त्यामागे त्याचा विशिष्ट हेतू होता. तो हेतू म्हणजे एकतर जगताच्या उपभोगाचा होता किंवा तो त्याने यामकुशीच्या झोपेत कुशी बदलण्यासारखं होतं किंवा तो त्याचा [illegible] विचार होता. काल हा घटक सत्य आहे असा विश्वास [illegible] आहेत आणि त्यांचा विश्वास आहे की, [illegible] ही काळाप्रमाणे अवलंबून असते.

[illegible], मायेच विश्वास न ठेवणारे काहीजण, 'जग' हे केवळ लांबलचक स्वप्न आहे असं सांगतात. विचारवंतांच्या या प्रशालेप्रमाणे हे स्वप्न पाहणारा जेव्हा बघत असतो तेव्हा पूर्ण सत्य असतं आणि ही जादुई माया किंवा अशी माया जसं की दोरीवरचा साप किंवा सगळंच सत्य, जोपर्यंत मायेचा खेळ चालू आहे. ते वाद घालतात की, एखादी वस्तू जर असत्य आहे, तर तिच्याशी आपला संबंध येऊन तिचं आपल्याला ज्ञान होणंच शक्य नाही. त्यांच्या मताप्रमाणे जेव्हाही एखाद्या वस्तूचं ज्ञान होतं व त्यामुळे त्या वस्तूविषयी एखादी भावना उत्पन्न होते तेव्हा ती सत्य असते. मग तिचं आयुष्य किती का कमी असेना.


किशोर पुंडलीक चौधरी

१२/२, एल.आय.सी. कॉलनी, सेक्टर २५, प्राधिकरण निगडी,

सिंधुनगर, पुणे ४११०४५.

# किमान हे करायलाच हवे !

**प्रा. डॉ. अशोक कामत**

*एम.ए.पीएच.डी (मराठी) पीएच.डी. (हिंदी). १९९८ पासून प्रमुख नामदेव अध्यासन, संत अध्ययन संशोधन केंद्र पुणे विद्यापीठ - निवृत्त मार्च २००७. मराठी संत साहित्याचे अध्ययन, अध्यापन, अनुबंध, लेखन, संशोधन व शोधकार्यासाठी मार्गदर्शन. सामाजिक प्रबोधन व व्याख्याने. एम.फिल., पीएच.डी. पदवीसाठी मार्गदर्शन, ३० प्रबंध पूर्ण. ७५ संशोधन प्रकल्प अभ्यासकांकडून करवून घेतले. अगणित पुरस्कार प्राप्त. प्रतिष्ठेचा वर्ध्याचा महात्मा गांधी पुरस्कार प्राप्त.*

'वुई मस्ट' अर्थात् 'आपण हे करायलाच हवे' अशा शीर्षकाने स्वामी चिन्मयानंद यांनी 'तपोवन प्रसाद' मधून इंग्रजी भाषेतून काही लेख क्रमशः लिहिले होते. त्यातून त्यांचे हे पुस्तक आकाराला आले आहे. यात बहुत करून अध्यात्मिक विकासाकरिता, साधनेसाठी व्यावहारिक सूचना पाहायला मिळतील.

स्वामीजींनी हे लेखन करताना प्रामुख्याने चिन्मय मिशनसाठी कार्य करणारे स्वामी, ब्रह्मचारी आणि इतर क्रियाशूर कार्यकर्ते आपल्या दृष्टिपुढे ठेवलेले दिसतात. मिशनच्या प्रतिज्ञेचा त्यात जागोजागी उल्लेखही मिळतो. पण हे पुस्तक सर्वसामान्य कुटुंबप्रिय साधकांनाही उपयोगी ठरू शकेल असे आहे.

संपादकांनी प्रस्तावनेत यथार्थपणे म्हटले आहे, 'धर्मप्रसारकांसाठी त्यांचे चारित्र्य, विशुद्ध आचार हेच खरे धन असते. तेच त्यांचे बळ ठरते. तीच त्यांची खरी शक्ती असते. जगात प्रमाद करणारे, उपभोगात रमलेले कित्येक लोक असतात. पण त्याचबरोबर निरपेक्ष वृत्ती ठेवून सद्वर्तन करणारे, समाजाची सेवा करीत राहणारेही पुष्कळ लोक असतात. पूजा त्यांची केली जाते. आदरसत्कार त्यांचाच होत असतो.'

प्रस्तुत ग्रंथातून मुख्यत्वेकरून या गोष्टी करण्याचा स्वामीजींनी आग्रह धरला आहे...

**१. विचार परिवर्तन :** प्रत्येकाचे मन विविध भावभावना आणि विचारांनी समर्थ, समृद्ध बनलेले असते. जितके विशुद्ध विचार मनात जोपासावेत तितका व्यक्तित्वविकास साध्य होतो आणि मनावरही त्यायोगे नियंत्रण करणे शक्य होते.

महामानवांची जीवनचरित्रे, त्यांचे कार्य, त्यांची शिकवण आपल्या आंतरिक जीवनाला प्रेरक ठरत असते. आपली दृष्टी उदार आणि व्यापक व्हायला मदत होते. यासाठी अशी सामग्री सादर करणारे ग्रंथ वाचावेत.

**२. नियमित ध्यान आणि प्रार्थना :** आपल्या नित्याच्या दैनंदिन व्यवहारात शुद्धता, पावित्र्य, प्रेम, दया, क्षमा, औदार्य असावे. परोपकारी वृत्ती हवी. यासाठी नियमित ध्यान आणि प्रार्थना उपयोगी ठरते. स्वावलंबन, स्वाध्याय यामुळे खरी आत्मसुधारणा होते. ध्यानाने आंतरिक शक्ती जागृत होतात.

**३. कर्मपरायणता :** मानवी देहाने नाना प्रकारची कार्ये करता येतात. आपण साहस आणि निर्धारपूर्वक कार्ये अथवा कर्मसाधना करायला हवी.

आपले काम कुणाच्या निंदा अथवा स्तुतीमुळे थांबू नये किंवा होऊ नये. आपणच आपले काम निवडावे. मनापासून करीत जावे. त्यात सातत्य ठेवावे. जितके आपण उत्तम काम करू तितके त्याचे उत्तम परिणाम आपल्याला पाहता येतात. अनुभवता येतात.

**४. स्वास्थ्य, शांतता आणि सुख :** शारीरिक स्वास्थ्य, मानसिक शांती आणि सुखसंतोष सर्वांनाच हवा असतो. यात काही चूकही नाही. पण आपण मिथ्या धारणा - कल्पनांच्या आहारी जाऊन अनुचित काम करतो. त्यालाच पाप म्हटले जाते. पापामुळे रोग होतात. जर आपण मनावर ताबा ठेवून, श्रद्धाभक्तिपूर्वक विशुद्ध आचार-विचार केला तर सारे काही मिळून जाते.

**५. आशा, उल्हास, उत्साहमय जीवन :** सारे महापुरुष स्वेच्छेने महान कार्य स्वीकारतात. ते धैर्य नि उत्साहपूर्व प्रसन्नतेने करीत राहतात. त्यांना निराशा शिवत नाही. त्यांचा आशावाद कधी क्षीण होत नाही. अखेरच्या क्षणापर्यंत ते अनुशासनपूर्वक जगतात.

आपण प्रशंसा-पुरस्कारासाठी कार्य करू नये. आनंद समाधानाकरिता करावे.

**६. आंतरिक शक्तिजागरण :** खरा धर्मशील माणूस आपल्या अंतरंगात सुख, समाधान, सज्जनत्व, साधुत्व, विनम्रता, सरलता, तितिक्षा अशी गुणसमृद्धी अनुभवतो. त्यातून ईश्वरी भाव कार्यरत होतो. विपरीत परिस्थितीवर विजय संपादन करता येतो.

आपल्या अवतीभवती काही लोक मजेत जगताना आढळतात. त्यांची संख्या कमी पण अपयशी अप्रसन्न, दुःखीकष्टी लोकांची संख्या बरीच मोठी दिसते. समाजात बराच मोठा युवावर्ग अनैतिक, अपराधी, व्यसनी आचरण करतो आहे. माणसामाणसातील सांस्कृतिक संबंधच नष्ट होत चाललेत.

वाहतुकीची साधनं पुष्कळ. जग जवळ आलं आहे. पण... माणसं एकमेकांजवळ येत नाहीत. यासाठी आपण काही तत्परतेने करायला हवं.

मिळालेला काळ नि वेळ सार्थकी लावला पाहिजे. विचार उद्याच्या, पुढचा करण्याआधी आजचा करावा. चांगल्या कार्यकर्तव्यात कसूर करू नये.

आपल्या प्रत्येक कार्यामागे काही सुनिश्चित विचारधारा हवी. जर विचार स्फूर्तिप्रद आणि सृजनात्मक असले तर उत्तम. प्रत्येक शिक्षित, विचारी व्यक्तीपाशी काही ना काही कौशल्याने करण्याची शक्ती असतेच असते.

बौद्धिक ज्ञानाने आपली योग्यता खचितच वाढते. सत्यनिष्ठ आणि निष्ठासंपन्न व्यक्तीच शांत चित्ताने आणि प्रभावी रीतीने कार्य करीत असतात.

जसे आपले मन आपल्या कार्यातून प्रकट होते तसेच आपली शारीरिक स्थिती आणि शरीराद्वारे केलेल्या कामांचा परिणाम मनावर होत असतो. म्हणून शारीरिक सवयींना अधिक योग्य वळण देत राहिले पाहिजे. शुचिर्भूत होऊन केलेल्या नियमित ध्यानधारणेचा खचितच खूप उपयोग होत असतो.

जीवन हरिभक्तिमय असावे. ईश्वराच्या निकट जात राहणे हीच भक्ती. त्यासाठी नित्य नम्रभावाने प्रार्थना करायला हवी.

चांगले विचार निरंतर आणि काळजीपूर्वक श्रवण करावेत. मन नित्य प्रसन्न आणि समाधानी ठेवून अध्यात्मिक विचारसरणीत एक प्रकारची निश्चयात्मकता यावी. दोलायमान, चंचल स्थिती नसावी.

अशा बाबी स्वामीजींनी पुनःपुन्हा सांगितल्या आहेत.

**प्रा. डॉ. अशोक कामत**

शिवश्री, सहकारनगर नं. २, पुणे ४११००९.

# स्वामी चिन्मयानंद यांचे चिन्मय मिशन

**श्री. भगवान कृष्णाजी वाडीकर**

*निवृत्त ग्रंथपाल - पुणे विद्यापीठ. लेखन, वाचन आवड. गीतेचा सखोल अभ्यास.*

गुरूदेव स्वामी चिन्मयानंद यांचे चिन्मय मिशन एक दिव्यदृष्टी. डिव्हाईन लाईफ सोसायटीचे संस्थापक, महान विभूती - शिवानंद यांनी एका तरुण व्यक्तीस संन्यास दीक्षा देऊन त्यास 'चिन्मयानंद' हे नाव दिले व सद्‌गुरू स्वामी तपोवन महाराज उत्तर काशी यांचेकडे विद्या संपादनासाठी पाठविले. सद्‌गुरू तपोवन महाराज यांच्याकडे वेद-उपनिषदे गीता यांसारख्या श्रुती-स्मृती इत्यादी धर्मग्रंथांच्या अध्ययनातून प्रेरणा घेऊन गुरूदेव स्वामी चिन्मयानंदांनी पहिला गीता ज्ञानयज्ञ ३१-१२-१९५१ रोजी पुणे येथील रास्ता पेठेतील हरिहर मंदिरात घेतला तो शंभर दिवस चालला व पुढे आपले ज्ञानयज्ञव्रत स्वीकारले. त्यांच्या या उपक्रमाने ठिकठिकाणचे शेकडो-हजारो सुशिक्षित प्रभावती झाले. त्यातूनच पुढे मद्रास येथे अनेक सुशिक्षित व्यक्तींनी एकत्रित येऊन एक संघटना उभारली व त्यास 'चिन्मय मिशन' हे नाव दिले. १९५१ साली चालू झालेल्या या छोट्याशा बीजाचे पुढे देशभरात मोठ्या वटवृक्षात रूपांतर झाले. आजच्या घटकेला भारतात चिन्मय मिशनच्या २०० पेक्षा जास्ती शाखा आहेत व परदेशात ५० पेक्षा जास्ती शाखा आहेत. चिन्मय म्हणजे शुद्ध जाणीव ज्ञान. हा काही व्यक्तिगत सांप्रदाय नाही. माणसामधील अज्ञान नाहीसे करून त्यांच्या मनातील विवेकबुद्धी जागृत करून त्याला प्रथम स्वत:मधील व नंतर सर्वत्र असलेल्या शुद्ध चैतन्याचा शोध घेण्यास प्रवृत्त करून समाजाची सर्वतोपरी सेवा करण्यास उद्युक्त करणारी एक अत्यंत प्रभावी संघटना केवळ गुरूदेव चिन्मयानंदांसारख्या दिव्य विभूतीच निर्माण करू शकतात. सन १९५१ साली सुरू केलेले ज्ञानयज्ञ त्यांनी अगदी अखेरपर्यंत चालू ठेवले. जीवनभरात त्यांनी भारतात ५१० ज्ञानयज्ञ घेतले व भारतातील त्यांचा शेवटचा ज्ञानयज्ञ २६ मार्च १९९३ ते १ एप्रिल १९९३ या कालावधीत इंदूर येथे गीता १५ व्या अध्यायावर झाला. परदेशातही विविध देशात त्यांनी ज्ञानयज्ञ घेतलेले असून शेवटचा ज्ञानयज्ञ त्यांनी वॉशिंग्टन येथे १९ जुलै १९९३ ते २५ जुलै १९९३ या कालावधीत गीता अध्याय ३ वर घेतला.

गीता-उपनिषदे व अनेक धर्मग्रंथ यावर गुरूदेव स्वामी चिन्मयानंदांनी इंग्रजी भाषेत जवळपास २८० पुस्तके लिहिली व या पुस्तकांच्या जगभरच्या प्रसाराने हिंदू धर्माची पताका सर्व जगात आजही फडकत आहे. स्वामी विवेकानंदांच्या नंतर जगभर हिंदू धर्म प्रचार व प्रसार करणारे सर्वात मोठे व महान फक्त गुरुदेव चिन्मयानंदच आहेत. त्यांच्या अनेक पुस्तकांचे जगातील सर्वच भाषेत प्रकाशन झालेले आहे.

एकाच आम्ही कुटुंबातले - प्रेमादराने दृढ बांधलेले हे ब्रीद वाक्य त्यांनी प्रत्येकांच्या मनावर ठसविले. जास्तीत जास्त काळ जास्तीत जास्त लोकांना जास्तीत जास्त आनंद देणे या एकमेव ध्येयवादाने गुरूदेव स्वामी चिन्मयानंदांनी लक्षावधी व्यक्तींच्या जीवनात नवचैतन्याची प्रेरणा दिली.

गुरूदेव स्वामी चिन्मयानंदांनी भारतातील व भारताबाहेरील जगातील सर्वच क्षेत्रातील सर्व वयोगटाच्या स्त्री-पुरुषांना-बाल-बालिकांना खऱ्या अर्थाने 'जगावे कसे' याचे शिक्षण देण्यासाठी अनेक उपक्रम सुरू केले. त्याचा नुसता आढावा घेतला तरी आपल्याला एक नवीन प्रेरणा मिळेल.

**१) बालविहार** - वय वर्षे ६ ते १६ वयोगटातील मुलामुलींसाठी त्यांच्यामधील विविध गुणांना वाव देऊन पुढे आणणारा एक मुलासाठी अभ्यासवर्ग सुरू केला. आठवड्यातून एकदा ९० मिनिटांचा अभ्यासवर्ग कशा प्रकारे चालला पाहिजे याचे शास्त्रशुद्ध ज्ञान त्यांनी अभ्यास वर्गाच्या सेवक-सेविकांना दिले. मुलांसाठी अनेक पुस्तके लिहिली. अनेक भजने - स्तोत्रे लिहिली. रामायण, महाभारत, पुराणे यामधील आजही उद्‌बोधक, अशा गोष्टी त्यांनी लिहिला.

**२) युवा केंद्र** - वयोगट १४ ते २४ वयोगटातील युवक-युवतींसाठी गुरूदेवांनी केलेले कार्य तर अद्‌भुतच आहे. त्यांच्यातील कलागुणांना वाव देऊन त्यांना सर्वच क्षेत्रात पुढे येईल असा साप्ताहिक ९० मिनिटांचा उपक्रम आजही युवकांना आकाशात भरारी घेण्यास व झुंज घेऊन यशश्री मिळविण्यास उपयुक्त ठरत आहे.

**३) अभ्यास वर्ग** - वेदांचा व उपनिषदांचा, गीतेचा धर्मग्रंथाचा अभ्यास करून आपल्या जीवनाचे कल्याण साधू इच्छिणाऱ्या सर्वच स्त्रीपुरुष व्यक्तींना त्यांच्या सोयीनुसार ठराविक ठिकाणी, ठराविक वेळी नियमित एकत्रित आणून कोणता अभ्यास कसा करावयाचा याचे शास्त्रशुद्ध मार्गदर्शन गुरुदेवांनी दिले. आठवड्यातून एकदा ९० मिनिटांच्या या उपक्रमांतून एकाच शहरात अनेक अभ्यासक्रम सुरू होऊन हजारो व्यक्तींना अभ्यासाची गोडी लागली व त्यांचे जीवन सुधारले. आज मुंबईत सुमारे २०० तर भारतात जवळपास २५० शहरांत हजारभर तरी अभ्यासवर्ग आहेत. परदेशातही शेकडो अभ्यासवर्ग आहेत.

**४) सांदीपनी साधनालय** - गुरूदेव चिन्मयानंदांनी उत्तर काशी येथे दीर्घ काळ राहून स्वामी तपोवन महाराज यांचेकडे कठोर तपश्चर्या केली. सध्याच्या काळात प्राचीन काळाप्रमाणे जंगलात, अरण्यात राहून ऋषीमुनींच्याकडे राहून तपश्चर्या करणारे विद्यार्थी मिळविणे अवघड म्हणून त्यांनी मुंबईत पवई येथे सांदीपनी साधनालय ह्याची स्थापना केली. कोणत्याही भागातील कोणत्याही अविवाहित सुशिक्षित पदवीधराला येथे २॥ वर्षे पूर्ण वेळ अध्यापनासाठी प्रवेश मिळतो. भगवत गीता - उपनिषदे - ब्रह्मसूत्रे व इतर धर्मग्रंथ त्यांना सखोल अभ्यास करता येतात. साधारण ५० स्त्री-पुरुषांना येथे निवास-भोजनाची सुसज्ज व्यवस्था आहे. अभ्यासक्रमाच्या काळात - प्राचीन आश्रमाप्रमाणे कठोर शिस्त पाळावी लागते. अध्यापन पूर्ण झाल्यावर ब्रह्मचारी व ब्रह्मचारिणी यांना केंद्रावर पाठवून मानवनिर्मितीतून राष्ट्रनिर्मितीचे कार्य होते. पुढे परदेशातही १९७९ मध्ये उत्तर अमेरिकेत सांदीपनी पश्चिम हे दुसरे गुरूकुल स्थापन झाले. हिमाचल प्रदेशात सिद्ध बारी येथे तिसरे गुरूकुल एप्रिल १९८१ पासून सुरू

होऊन तेथे हिन्दी माध्यमातून शिकविण्याची सोय झाली आहे. त्याचप्रमाणे अनेक राज्यात अशी गुरूकुले साकारली आहेत व नुकतेच कोल्हापूर येथे 'चिन्मय सांदीपनी' हे गुरूकुल तयार असून तेथे मराठी माध्यमातून शिकविण्याची सोय होणार आहे.

५) **सत्संग व भजन मंडळ** – समाजातील सर्वसामान्य भाविक जनांसाठी भजन-नामसंकीर्तन गीतापठण, स्तोत्रपठण त्यांचे स्पष्टीकरण इत्यादी कार्यक्रमाचा यात समावेश असून अशा कार्यक्रमास त्या त्या शहरातील चिन्मय मिशनचे आचार्य - ब्रह्मचारी, ब्रह्मचारिणी यांचे मार्गदर्शन होते. गृहस्थाश्रमी साधकही 'धर्मसेवक' शिक्षणक्रम पूर्ण करून यात सहभागी होतात.

६) **देवी ग्रुप** - फक्त स्त्रियांसाठी अभ्यासवर्गाप्रमाणेच चालणारा हा आणखी एक उपक्रम. आठवड्यातून एकदा काही महिला एकत्रित येऊन सोईच्या ठिकाणी नियमित चर्चात्मक पद्धतीने अभ्यास करतात. भजने-स्तोत्रे शिकतात.

७) वेदान्ताचा खरा अर्थ जास्तीत जास्त लोकांपर्यंत पोचावा या दृष्टीने चिन्मय मिशनचे ब्रह्मचारी-ब्रह्मचारिणी-स्वामीजी-स्वामिनी हे अखंड भारतभर व परदेशातही ४ ते ७ दिवस ज्ञानयज्ञाचे सत्र चालूच ठेवतात व गुरूदेव स्वामी चिन्मयानंद यांचे ३.८.१९९३ रोजी झालेल्या निर्वाणानंतर त्यांच्या शिष्यांनी भारतात व परदेशात अनेक भव्य व दिव्य प्रकल्पाची निर्मिती करून गुरूदेवांचे कार्य अखंड चालू ठेवले आहे.

भगवान कृष्णाजी वाडीकर
डी-३५, चिंतामणी नगर भाग १, रेणूका सोसायटी,
बिबवेवाडी, पुणे ३७.
फोन : २४२१८६३३

# चिन्मय मिशन माहिती

गुरूदेव स्वामी चिन्मयानंद यांच्या शिष्यांनी १९५३ साली चिन्मय मिशनची स्थापना केली.

**उद्दिष्ट :** वेदान्ताचे प्रशिक्षण, प्रसार व प्रचार. सांस्कृतिक वारसा जपण्याचे प्रयत्न. गुरूकुल पद्धतीने २/२॥ वर्षांत वेदान्त प्रशिक्षण ब्रह्मचारी तरुण-तरुणी-विद्यार्थी-नि:शुल्क व्यवस्था.

**सामाजिक बांधिलकी** - शाळा, कॉलेज, दवाखाना, हॉस्पिटल, वृद्धाश्रम वगैरे. भारत व भारताबाहेर मिळून एकूण २५० सेंटर्स आहेत.

**चिन्मय विभूति प्रकल्प :** दिव्यदृष्टी केंद्र हे साधकांना त्यांची दृष्टी सतत तेजोमय, आनंददायक ठेवण्यासाठी जे ज्ञान हवे ते देणारी पवित्र वास्तु. जीवनाचा परिपूर्ण अर्थ जाणून घेण्याचे व पूज्य गुरूदेवांच्या कार्याचा परिचय करणारे पवित्र स्थान.

पुणे जिल्ह्यात कोळवण गावी मुंबईपासून २॥ तास व पुण्याहून ४५ मिनिटांच्या अंतरावर ७० एकर जागा. सह्याद्री डोंगरांनी वेढलेले निसर्गरम्य ठिकाण.

**उद्दिष्ट :** १) परमपूज्य गुरूदेवांच्या ग्रंथांतून, कार्यातून, आधुनिक विज्ञानयुक्त माध्यमातून मार्गदर्शक शिक्षण देणारे केंद्र.

२) आदि शंकराचार्य गुरूंसारख्या वेदान्त प्रणित शास्त्र ग्रंथांतून व आधुनिक वैज्ञानिक तंत्रातून शिकवण देऊन साधकाला व्यक्तिमत्त्व विकास साधता येईल.

३) चिन्मय मिशन कार्यकर्त्यांसाठी विशिष्ट पद्धतीचे शिक्षण देणारे ठिकाण - बाल विहार, युवा केंद्र, अभ्यास वर्ग, ज्येष्ठ नागरीक संस्था व ग्रामीण भागात कार्य.

४) बाल, तरुण व शैक्षणिक / सांस्कृतिक शिबिरे भरविण्याचे स्थान.

५) आंतरराष्ट्रीय परिषद केंद्र.

६) रहाण्याची सोय.

७) श्री गणेश व श्री हनुमान मंदिर.

**२) चिन्मय सांदिपनी महाराष्ट्र :** वेदान्ताचे प्रशिक्षण, प्रसार व प्रचार मराठी माध्यमातून. ब्रह्मचारी, सांसारिक जबाबदारीतून मुक्त व ज्ञानार्जन करून धर्मसेवा करण्याची इच्छा असणारांसाठी - भगवद् गीता, उपनिषद, संत ज्ञानेश्वर, समर्थ रामदास, एकनाथ महाराज, तुकाराम महाराज व राष्ट्रसंत तुकडोजी महाराज यांच्या साहित्याचा अभ्यासक्रम शिकवला जाईल. (गुरूपौर्णिमा २००८ पासून)

पत्ता : चिन्मय आश्रम, टोप - संभापूर, कोल्हापूर ४१६१२२

३) चिन्मय मिशन पुणे - चिन्मय माऊली - वेदान्ताचे प्रशिक्षण, प्रसार व प्रचार, भारतीय सांस्कृतिक मूल्यांचे जतन.

पुण्यापासून ४ कि.मी. अंतरावर लोहगांव या ठिकाणी २ एकर जमिनीवर चिन्मय माऊली प्रकल्प साकारणार आहे. त्या ठिकाणी श्री विठ्ठल रुक्मिणी देऊळ, हॉल व रहाण्याची व्यवस्था.

पत्ता : ब्रह्मचारी - श्री. शैलेशजी चैतन्य
ए/२ ईश्वर चरण, ३३७, नॉर्थ मेन रोड, कोरेगांव पार्क, पुणे ४११००१.
फोन : ०२०-२६१३२१७२

पत्ता : सेन्ट्रल चिन्मय मिशन ट्रस्ट
साकी विहार रोड, पवई, मुंबई ४०००७२.
फोन : ०२२-२८५७२३६७, २८५७५८०६, २८२७२८२८

नरस्याभरणं रूपं रूपस्याभरणं गुण: ।
गुणस्याभरणं ज्ञानं ज्ञानस्याभरणं क्षमा ॥

# आठवणी

## डॉ. सौ. विजया भोळे

१. वैद्यकीय अध्यास पूर्ण केल्यानंतर १९६४ साली मी प्रथम पूज्य गुरूदेव स्वामी चिन्मयानंदांची व्याख्याने नागपूरला ऐकली. माझ्या घरातील सर्व मोठे लोक प्रवचनांना जात असत म्हणून उत्सुकतेपोटी मी पण जाऊ लागले आणि त्यानंतर मी प्रवचनांना जातच राहिले आणि चिन्मय मिशनच्या कार्यात अधिकाधिक गुरफटत गेले. लहानपणी गीता पाठ केल्यामुळे श्लोक म्हणता यायचे पण अर्थ खास समजत नसे. पूज्य गुरूदेवांचा प्रभाव जबरदस्त होता. भाषा ओघवती होती आणि शैली सामान्यांनासुद्धा समजेल अशी विनोदी पण गंभीर आशय सांगणारी होती. नागपूरचे पूज्य गुरूदेवांचे स्नेही दिवंगत प्रज्ञाभारती वर्णेकर म्हणायचे, स्वातंत्र्यवीर सावरकरांनंतर 'वक्तृत्वाची देणगी' मी पूज्य गुरूदेवांजवळ पाहिली, ऐकली.

२. चिन्मय मिशनकडे आकृष्ट व्हायचे एक प्रमुख कारण म्हणजे शिस्त, स्वच्छता, विचारांची स्पष्टता, कार्यक्रमाची आणि वेळेची काटेकोर आखणी या गोष्टी होत्या आणि या सर्वांवर कळस म्हणजे सर्व स्वामी-स्वामिनी यांची जनमानसांत ज्ञानाचा प्रसार करण्याची तळमळ ! १९८८ साली पूज्य गुरूदेवांचे विवेक चूडामणि या आद्य शंकराचार्यांच्या प्रकरण ग्रंथावर पाच आठवड्याचे अध्यात्मिक शिबीर सिद्धवाडीला होते. तेव्हा पूज्य गुरूदेवांना खोकला झाला होता व तापही येत होता. पण एकटे सकाळी ५ पासून रात्री १० पर्यंत वर्ग घेत. भक्तांचे त्यांच्यावर आणि त्यांचे भक्तांवर अलोट प्रेम होते. एक वर्ग फक्त १५ मिनिटे वेळेच्या आधी सोडला. पूज्य गुरूदेव यांच्या कुटीयात जाईपर्यंत त्यांचे टेबल औषधांनी पूर्ण भरून गेले होते.

३. १९८९ साली सिद्धवाडीच्या शिबिरातच पूज्य गुरूदेवांच्या कुटीयाच्या सरस्वती हॉलमध्ये पुस्तके व त्यांचा खप कसा वाढवायचा यावर चर्चा चालू होती. पूज्य गुरूदेव सूचना देत होते. काही भाषांतील भाषांतरे बरोबर येत नाहीत असे मी म्हटले. पूज्य गुरूदेव म्हणाले, 'You are correct them, you can also write a book.' तेव्हा मला त्यांचे ते वाक्य अशक्य कोटीतले वाटले. पण २००३ मध्ये मी त्यांचेच चरित्र लिहिले. हे पुस्तक लिहिताना मला पुष्कळदा योग्य शब्द सुचत नसत. त्यावेळी मी गुरूदेवांनाच म्हणायची, 'मला मदत करा' आणि शब्द सुचायचे. त्या पूर्ण वर्षभर मी पूज्य गुरूदेवांच्या अगदी निकट सहवासात आहे असे वाटायचे. सद्गुरू म्हणतात, ते शिष्याकडून करवून घेतात हा अनुभव आला.

४. १९९३ च्या जून महिन्यात नागपूर केंद्राच्या आचार्या स्वामिनी गयानंदा यांचे उत्तरकाशीला अध्यात्मिक शिबीर झाले. त्यानंतर नागपूरला पावसाळा सुरू झाला. त्यावर्षी खूपच पाऊस पडला. साधारण जुलैच्या महिन्यात पूज्य गुरूदेव अमेरिकेला गेले. त्यावर्षी ज्या व्यासपीठावरून १०० वर्षांपूर्वी स्वामी विवेकानंदांनी भारतीय तत्त्वज्ञानाच्या प्रसाराला सुरुवात केली होती त्याच जागतिक धर्म परिषदेचे अध्यक्ष म्हणून पूज्य गुरूदेवांची निवड झाली होती. हा बहुमान त्यांना मिळाला होता. हा बहुमान स्वीकारण्यास जाताना वाटेत सॅडियागो अमेरिका येथे त्यांची प्रकृती अचानक अस्वस्थ झाली. त्यांना हॉस्पिटलमध्ये नेण्यात आले. दुर्दैवाने डॉक्टरांच्या प्रयत्नांना यश आले नाही. ज्या दिवशी पूज्य गुरूदेव कोमात गेले त्या दिवशी मला स्वप्नांत त्यांचे दर्शन झाले. ध्यानी, मनी नसता पूज्य गुरूदेवांना घराच्या दाराशी उभे पाहून मन भांबावले. त्यांचे स्वागत कसे करू असे वाटले. स्वप्न संपले आणि मी नकळत हात जोडले. त्यांची प्रकृती इतकी सिरीयस आहे, हे माहीत नव्हते.

५. १९९५ साली माझे breast cancer चे ऑपरेशन ठरले होते. कॅन्सरचे अगदी १०० टक्के निदान झाले नव्हते पण स्वत: डॉक्टर असल्यामुळे आणि सर्जन व माझा डॉक्टर मुलगा यांच्या चेहऱ्याकडे पाहून मला निदान समजले होते. गीता उपनिषदांचे पारायण करणाऱ्या मला स्वत:चे शारीरिक दु:ख, मृत्यू यांनी घाबरवलं. माझे अश्रू थांबत नव्हते. मी गुरूदेवांचे स्मरण केले. त्यांचे घणाघाती पण प्रेमळ शब्द कानांवर आले. 'विजया तू दांभिक आहेस. गीता वाचतेस म्हणून सांगतेस माहीत नाही कां - जातस्य हि ध्रुवो मृत्यु: । ध्रुवंजन्म मृतस्यच तस्मादपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसी ' क्षणात माझी भीती पळाली. ऑपरेशन थिएटरमध्ये मी हसत गेले. मीच सर्व नातलगांना सांगितले, घाबरू नका मी आत्ता परत येते. आज १२ वर्षे मी cancer मुक्त जीवन जगत आहे. आनंदात ! सद्गुरूच आपली शक्ती असतात, तारक असतात याचा अनुभव घेतला.

---

## डॉ. विमल पोतनीस

जगाच्या कल्याणा... संतांच्या विभूती...

अशा विभूतींची महती - गावी कुणी आणि किती....

खूप गायला पाहिजे. ज्यांना ज्यांना त्यांचं 'विभूतीमत्त्व' जाणवलं, अनुभवायला मिळालं अशा सर्वांनीच जितक्या प्रकारे गाता येईल तितकी गायला पाहिजे... जगाला सांगायला पाहिजे...कदाचित 'पुनरुक्ती' झाली तरी 'प्रत्यवाय नाही... विभूतींच्या संतांच्या महतीनेही 'कल्याण' साधणार आहे.

अशीच एक 'महान विभूती' - स्वा. चिन्मयानंदजी. श्रीमद्भगवद् गीतेत वर्णिलेली 'सर्व प्रज्ञावंताची लक्षणे त्यांच्या ठिकाणी पाहायला, अनुभवायला मिळतात व पुन: पुन: प्रत्यय येतो. त्यांच्या 'श्रेष्ठत्वाचा'', साक्षात्कारीत्वाचा, बाह्य 'व्यक्तिमत्त्व' तर - योगीजनांचं वर्णन आहे त्याप्रमाणेच 'वपु: कृशत्वम्' बांधेसूद सडपातळपणा - तरी 'तरतरी' अगदी शेवटपर्यंत वदने प्रसन्नता - सततच चेहरा स्मित विलसणारा.

नयने सुनिल डोळे... म्हणजे - आरसाच - समोरच्या व्यक्तिच्या अंतरंगाला आरपार भेदणारी - तरीही आश्वासन देणारी दृष्टी... त्याचवेळी कुणाचीही गैरशिस्त नियमबाह्य कृतीवर, तितक्याच 'कठोरपणानेच' नापसंती दर्शवित 'अचूक शब्दांत' तेथेच मार्गदर्शनपर 'कानउघडणी'

किती घटना सांगाव्या - १० व्या अध्यायात म्हटल्याप्रमाणे विभूतीमत्त्वाचा सागरच असतात ही संतमंडळी.

१९९२ च्या सुमाराची घटना असावी -

मुंबईला - आझाद मैदानात स्वामीजींचा ज्ञानयज्ञ आयोजिलेला कळला. त्याच वेळेला मुंबईला येण्याची संधी. बऱ्याच कालावधीनंतर (कदाचित २-३ वर्षांनंतर) मिळाली होती. मधल्या काळातील घटना-घडामोडी-काहीच माहीत नव्हत्या.

ज्ञानयज्ञ सुरू होण्याची वेळ आली 'की घड्याळाचा ठोका' चिन्मय मिशनचे कार्यक्रम फक्त घड्याळाला मानतात. कुणाच्या न झालेल्या आगमनाची वगैरे 'वाट' पहाणे नसतेच. आपणही प्रत्येक शब्द कानांत साठवायचा म्हणजे वेळेच्या आधीच आपल्या जागेवर असणे जरूर - व्याख्यान-प्रवचन सुरू झाल्यावर लोकांच्या समाधीचा भंग करत... पुढे पुढे जाऊन बसण्याचा कुणाचा प्रयत्न... नाहीच चालायचा...खुद्द स्वामीजी (व इतरही चिन्मय मिशनचे कार्यकर्ते) जाहीर केलेल्या वेळेला 'व्यासपीठा'ला 'वंदन' करताना दिसणारच.

त्या दिवशीही वेळेवरच आले स्वामीजी. आले म्हणण्यापेक्षा 'आणले गेले'. नेहमीप्रमाणे तडतड पावले टाकत येणारी ती तेजस्वीमूर्ती - व्यासपीठावर आल्या आल्या कुठल्या उपचारांची वाट न पाहता तडक विषयाला भिडणारी - पहिल्याच शब्दांत - वाक्यात श्रोतृसमुदायांत 'विलक्षण शांततेची - एकाग्रतेची मोहिनी टाकणारे स्वामीजी - त्या दिवशीही 'व्हिल चेअर' मधून आणलेले दिसले आणि ह्रदयाचा एक ठोका चुकलाच... मधल्या काळातील त्यांच्या वेगवेगळ्या प्रकृती अस्वास्थ्याची अनभिज्ञता'.

पण - तरीही ... चेहेऱ्यावरचं 'तेज' तेच पाहून कुठेसं बरं वाटलं - स्वामीजी त्यांच्या त्यांच्या आसनी स्थिरावले व सर्व कार्यक्रम, उद्‌घाटन वगैरे सुरू झाले. काही पुस्तकांच्या प्रकाशनाचीही योजना होती. त्यातल्या एका पुस्तिकेचे प्रकाशन आयत्या वेळी ठरले वाटते... स्वामीजींना त्या पुस्तिकेबद्दल समारंभापूर्वी सांगणे जमले नव्हते. तरीही इतर पुस्तकातल्या यादीत त्या पुस्तिकेचा उल्लेख केला गेल्याबरोबर तत्क्षणी स्वामीजी अक्षरशः गरजले - This was not included why do you mention without informing me ! सारी स्तब्धता - क्षणभर मग स्पष्टीकरण - क्षमायाचना व नेहमीप्रमाणेच तत्क्षणीच उतरणारा पारा.

चकितच व्हायला झाले ! किती अवधान.. कुठलीही छोटी गोष्ट सुद्धा नजरेतून सुटणार नाही. स्मृतीतून निसटणार नाही. इतक्या पुस्तकांच्या यादीत नेमकं - 'नवीन नाव' लक्षात आले ! कुणी काही 'घुसडून' देऊ म्हणेल. त्यांच्या शिस्तीत बसणार नाही.

'गैर-चूक' निदर्शन तत्काळच.. क्रोधाची उंचीही तत्काळच आणि पुनः पूर्ववत् सौम्यपणा व चाललेल्या विषयाची संगती-संगतवार-क्रोधावरही विजयच... अशा कितीतरी घटनांतून लहान-मोठ्या घटनांतून त्यांचं 'मोठेपण' कॅलेडिस्कोपसारखं... नवीन नवीन विविध मनोज्ञ दर्शनच होतं.

पुणे येथे फर्ग्युसन कॉलेजमध्ये गुरूदेवांचे युवक-युवतींसाठी व्याख्यान होते. बाकी मोठ्यांनी जागा असेल तरच मागील बाजूस बसावे किंवा उभे रहावे अशा गुरूदेवांच्या सूचना होत्या. वेळेच्या आधी १० मिनिटे पोहचावे म्हणून मी माझा कॉलेजमधील मुलगा नचिकेत यास मला पोहोचविण्यास सांगितले. तो मला व्याख्यानाच्या जागी सोडून परत जाणार होता. त्याला काय वाटले माहीत नाही, तो मला म्हणाला, मी ५ मिनिटे थांबेन व मग जाईन व म्हणून तो पुढे दाराजवळ उभा राहिला. ठीक ठरलेल्या वेळी गुरूदेव व्यासपीठावर आले व म्हणाले, 'Well friends there are so many proficient but few are efficient.' त्यांच्या सुरुवातीच्या या शब्दानेच माझा मुलगा नचिकेत होता तेथेच उभा राहिला. त्याने कोणाकडून कागद मागून घेतला, कोणाकडून पेन मागून घेतले व त्यात गुरूदेवांच्या व्याख्यानाची टिपणे लिहिली. व्याख्यान संपताच तो धावतच माझ्याकडे आला व म्हणाला, 'आई मला गुरूदेवांना भेटावयाचे आहे.' मी त्यास सांगितले, 'तूच जाऊन भेट. मी तुझ्याबरोबर येणार नाही.' त्याने गर्दीत जाऊन गुरूदेवांचे दर्शन घेतले. त्यांना लिहिलेले टिपण दाखविले. गुरूदेवांनी त्याच्या पाठीवर थाप मारली. १९६५ सालच्या आसपास घडलेली ही घटना. गुरूदेवांच्या प्रथम भेटीतच माझा मुलगा गुरूदेवांचा निःस्सीम भक्त झाला व गेली अनेक वर्षे तो आफ्रिकेमध्ये असून आजही चिन्मय मिशनचा एक कार्यकर्ता म्हणून काम करतो. गुरूदेवांच्या सहवासात कोणीही येवो - त्यांच्या सहवासात आलेली प्रत्येक व्यक्ती ही मरेपर्यंत त्यांचा ध्यास-त्यांचे तत्त्वज्ञान सोडत नाही.

माझा मुलगा नचिकेत हा मुंबईला शिक्षणासाठी रहात होता. कॉलेजमधील त्याच्या ८/१० मित्रांना त्याने सांगितले, आज मी तुम्हाला पार्टी देणार आहे. सर्वांना घेऊन तो बाहेर पडला. सर्वांना वाटले एखाद्या हॉटेलमध्ये नेत असेल. त्याने सर्वांना आझाद मैदानात नेले. तेथे गुरूदेवांचे व्याख्यान होते. नचिकेतच्या मित्रांमध्ये पुणे-कोल्हापूर व खेड्यातील युवक होते. गुरूदेवांचे व्याख्यान देश व देशासाठी तरुणांनी काय केले पाहिजे हा विषय होता. देशातील सर्वच्या सर्व तरुण पिढीने सर्वस्वाचा त्याग केला पाहिजे. बलीदान केले पाहिजे. क्रान्ती केली पाहिजे व देश खऱ्या अर्थाने सुजलाम् सुफलाम् केला पाहिजे. सन १९७०-७१ च्या आसपास केलेले स्वातंत्र्यानंतर २२/२४ वर्षांनंतरही गुरूदेवांनी मांडलेले विचार इतके प्रभावी होते की, माझ्या नचिकेतच्या सर्व मित्रांच्या डोळ्यांतून अश्रूंच्या धारा ओघळल्या व आम्ही हे करूच, असा निर्धार त्यांनी केला. गुरूदेवांच्या प्रथमच व्याख्यानात नचिकेतचे सर्व मित्र गुरूदेवांचे चाहते झाले व त्यांनी खरोखरच या अभूतपूर्व व अमृतमय मेजवानीबद्दल त्याचे आभार मानले.

पुढे १९८२ साली माझा मुलगा नचिकेत (वय वर्षे -) याने गुरूदेवांच्या एका पुस्तकाचा (गीतेचा) अभ्यास सुरू केला व त्या पुस्तकावर गुरूदेवांची स्वाक्षरी मागितली. त्यांनी त्याच्या पाठीवर आनंदाने शाबासकी देऊन पुस्तकावर एक संदेश दिला, तो त्याने आजन्म पाळण्याची मनोमन शपथ घेतली व आजही तो त्याच संदेशाचे पालन करीत आहे. आता माझी नात-नातू हे देखील गुरूदेवांच्या संस्काराने आशीर्वादाने आपलं जीवन घडवत आहेत - फुलवत आहेत.

गुरूदेवांचा संदेश व त्यांची सही मी मोरपिसाप्रमाणे जपून ठेवली आहे व त्यांच्या संदेशाची स्वाक्षरीसह झेरॉक्स प्रत मी व माझ्या चिरंजीवांनी शेकडो / हजारो व्यक्तींना गुरूदेवांचा प्रसाद म्हणून दिलेली आहे व त्यामुळे शेकडो / हजारो तरुण तरुणी 'चिन्मय कार्यकर्त्या' झालेल्या आहेत. अशा असंख्य आठवणींनी मनात गर्दी केलेली असून मर्यादित शब्दसंख्येमुळे गुरुदेवांचा संदेश लिहून मी लेखन समाप्ती करते.

हरि ॐ प्रणाम.

The new year start now. Read daily 2-3 verses. Thus

revise whole of Geeta. Some 25 times. Daily read change
By changing yourself change your entire destiny.

LOVE LOVE
Om Chinmaya 1982

**डॉ. विमल पोतनीस**
डी-४, परमहंस नगर, गजानन हौसिंग सोसायटी, गल्ली नं. १४, पौड रोड,
पुणे ३८. दूरध्वनी : २५३८५६७६

## श्री. वसंत थिटे / सौ. सुवासिनी थिटे आणि सर्व परिवार

एका रंगावली कलाकाराच्या हृदय मंदिरात वसलेले 'प. पू. गुरूदेव स्वामी चिन्मयानन्दजी महाराज' गीता ज्ञानयज्ञाच्या माध्यमातून साऱ्या विश्वाला ज्यांनी आपल्या अमृत वाणीने 'मोहून टाकलेले, हिमालया एवढी उंची असलेले, अत्यंत शिस्तबद्ध असलेले गुरूदेव. अत्यंत प्रेमळ असलेले गुरूदेव बालांपासून, युवकांपासून ते मोठ्या साधकांपर्यंत सर्वांनाच हवेहवेसे भावणारे गुरूदेव आजही पूजनीय, वंदनीय, परमादरणीय गुरूदेव माझ्या जीवन पटलावर अविस्मरणीय ठसा उमटवून गेले. आज मी त्यांच्या गुरूकृपेने माझ्या रंगावली कलेच्या द्वारे यशाच्या शिखरावर जाऊन पोहोचलो. हे त्यांचे चिरस्मरणीय कृपाशिर्वाद आजही मला माझ्या जीवनात उपयोगी पडतात.

प्रथम - हे सर्व कुणामुळे घडले किंवा कुणामुळे योग आला ते म्हणजे प. पू. आचार्य स्वामी पुरुषोत्तमानन्दजी व प. पू. आचार्य स्वामी तेजोमयानंदजी यांच्या गीता ज्ञान यज्ञाचे माध्यमातून... १९७८ पासून ते आजपर्यंत सतत ३० वर्षे चिन्मय मिशनच्या कार्यसेवेत आहोत. पवई येथील सांदीपनी साधनालयात दरवर्षी महाशिवरात्रीला खूप मोठा उत्सव साजरा केला जातो. त्यावेळी तेथे प. पू. गुरूदेवांचा निवास असायचा. तेव्हा पुण्याहून मी त्या आश्रमात रांगोळी काढण्यासाठी व इतरही सेवेसाठी जायचो. पहिल्याच वेळी संपूर्ण गुरूदेवांना आश्रम परिसरात मुख्य प्रवेशद्वारापासून ते मंदिर परिसराच्या अवतीभवती काढलेली रंगावली पाहून गुरूदेव अतिशय आनंदीत झाले व मला त्यांनी जवळ बोलावून प्रेमाने जवळ घेऊन पाठीवरून कृपाशिर्वादाचा हात फिरवला. तो आनंदाचा क्षण मी आजही विसरू शकत नाही. (सन १९७८) तेव्हापासून ते आजपर्यंत प. पू. गुरूदेवांचे तथा प. पू. आचार्य स्वामी तेजोमयानन्दजी, प. पू. आचार्य स्वामी पुरुषोत्तमानंदजी यांचे संपूर्ण भारतात जिथे जिथे गीता ज्ञान यज्ञ व्हायचे किंवा शिबीरे व्हायची तिथे तिथे मी माझ्या स्वखर्चाने जाऊन मोठ्या भक्तीने, श्रद्धेने, प्रेमाने रांगोळी काढत असे. आजही ती सेवा सुरू आहे. गुरूदेवांचे आणखीनही अविस्मरणीय अनुभव आले ते थोडक्यात पुढे नमूद करीत आहे.

१९८२ साली बंगलोर चिन्मय मिशनच्या वतीने अखिल भारतीय गीता ज्ञानयज्ञ शिबीर भरले होते. तिथे आम्ही पुण्याहून काही साधकांसह गेलो. शिबिराच्या पहिल्याच दिवशी प्रमुख व्यासपीठासमोर एक सुंदर रांगोळीचा गालीचा काढला होता. सकाळची ध्यानधारणेची वेळ होती. ध्यानाची वेळ संपली. सगळे दिवे प्रकाशित झाले व त्या प्रकाशात गुरुदेवांनी ती समोरच काढलेली रांगोळी गालीचा पाहिला. प्रसन्न होऊन त्यांनी मला जवळ बोलावले व स्वत: मला घेऊन दोन पायऱ्या उतरून त्या रांगोळी जवळ येऊन पाहू लागले. तसे सर्व सभागृहातील साधकही मोठ्या कुतूहलाने जमा झाले. तेवढ्यात एक फोटोग्राफर तिथे आले व गुरूदेवांनी माझ्या खांद्यावर हात ठेवून पोझ दिली. तेव्हा फोटोग्राफरला बराच वेळ प्रयत्न करून फोटो घेता येईना. ते गुरूदेवांनी ओळखले व चटकन आहे त्या पोजमध्ये बसले व आता म्हणाले, काढ फोटो. याचे कारण काय होते बरं. गुरूदेवांची उंची व रांगोळीचा आकार हे दोन्ही बसत नव्हते. त्यावेळी गुरुदेवांचे या कलेवर किती प्रेम होते. सर्वांसमोर मला त्यांनी आलिंगन दिले. हाच माझा खरा गौरव.

अशा रीतीने चिन्मय मिशनच्या सर्वच स्वामीजींनी माझ्या रंगावली कलेचे सहर्ष कौतुक केले.

दुसरी आठवण म्हणजे पुणे येथे माझ्या रंगावली शतक महोत्सवी प्रदर्शनाचे उद्घाटन त्यांचे शुभहस्ते झाले (१९८२). ते प्रदर्शन पाहताना त्यांनी आनंद व्यक्त केला. मला व्यासपीठावर बोलावून सर्व साधकांसमोर गौरव केला.

अत्यंत महत्त्वाची, संस्मरणीय आठवण म्हणजे गुरूदेवांची तब्येत बरी नव्हती. त्यांचेवर परदेशात फार मोठी शस्त्रक्रिया झाली. त्यानंतर गुरूदेव जेव्हा बरे होऊन पवईच्या सांदीपनी साधनालयात आले, तेव्हा असंख्य साधक त्यांचे दर्शनार्थ भेटीस आले होते. त्यांची गाडी मंदिराजवळ थांबली. गुरूदेव प्रथम उतरले तेव्हा मी पुण्याहून एक तुळशीचा मोठा हार (गुरूदेवांचे उंची एवढा) नेला होता. तो मोठ्या प्रेमाने पुढे जाऊन त्यांना तो घातला. त्यावेळी त्यांच्या नयनांत अश्रू उभे राहिले. एक सेकंदात त्यांनी माझ्या खांद्यावर हात ठेवून संपूर्ण मंदिराच्या पायऱ्या चढले. मंदिरात जाऊन दर्शन घेऊन त्यांच्या आसनावर ते विराजमान झाले. तोपर्यंत त्यांनी मला सोडले नाही. तो तुळसीचा हार त्यांनी काढला. सर्व साधकांना तो प्रसाद (मला म्हणले) सर्वांना दे. अंगावर शहारे आणणारा व मी माझ्या सेवेमध्ये कृतकृतार्थ झालो याचा मला आजही आनंद होतो. सद्गुरुंची कृपा कशी असते हे मी आत्मीयतेने अनुभवले आहे.

त्यानंतर प. पू. गुरूदेवांनी स्थापन केलेल्या चिन्मय मिशनला ५० वर्षे पूर्ण झाली. २००१ साली तेव्हा गुरुदेवांबद्दल कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी म्हणून मी व माझ्या पत्नी सौ. सुवासिनी यांच्यासह स्कूटरवरून रंगावलीचेद्वारे 'विश्वशान्तिचा' संदेश घेऊन 'चिन्मय सद्भावना' यात्रा संपूर्ण महाराष्ट्र, गोवा, गुजरात, कर्नाटक, ५०,००० किलोमीटरचा प्रवास करून छोट्या-मोठ्या शहरातून शाळा-महाविद्यालयात जाऊन दोन वर्षांत ५०,००० मुलामुलींना रांगोळीचे प्रशिक्षण दिले. प्रदर्शन भरविणे व त्यातून जमा झालेली धनराशी १ लाख रु. गुरूदेवांचे चरणी समर्पण केले. त्यावेळी प. पू. आचार्य स्वामी तेजोमयानन्दजी व प. पू. आचार्य पुरुषोत्तमानंदजी यांनी माझ्या रंगावली कलेचा 'चिन्मय रंगावली' सम्राट म्हणून महान पदवी देऊन गौरव केला व आजही मी मोठ्या अभिमानाने 'चिन्मय रंगावली'चे सेवारूपी कार्य करीत आहे. अशा अनेक संस्मरणीय आठवणी फोटोसहीत मजकडे आहेत. खूप मोठा संग्रह गुरूदेवांचे फोटोसहीत मजकडे आहे.

प. पू. स्वामी आचार्य पुरुषोत्तमानन्दजी तथा प. पू. आचार्य स्वामी तेजोमयानन्दजी यांच्याविषयी आदराने, श्रद्धेने व भक्तिपूर्वक कृतज्ञता व्यक्त करतो.

'कर्मयोग' ३ रा अध्याय गीत -

*कर्मण्येवाधिकारस्ते । मा फलेषु कदाचन ॥*

प्रत्यक्ष व्यवहारात कुठलीही अपेक्षा न ठेवता केलेले कार्य हाच खरा मोक्ष मिळाल्याचा आनंद.

धन्य धन्य ते गुरूदेव स्वामी चिन्मयानन्द.

**श्री. वसंत थिटे / सौ. सुवासिनी थिटे आणि सर्व परिवार**

## ॥ ब्रह्मरूप काया होतसे कीर्तनी ॥

### डॉ. उषा गुणे

पूज्य गुरूदेव स्वामी चिन्मयानंद ! विसाव्या शतकातील एक अलौकिक तेजस्वी व्यक्तिमत्त्व ! त्यांची महती वर्णन करावयाची म्हणजे जमिनीवरच्या काजव्याने सूर्याच्या तेजाचे वर्णन करणे किंवा टिटवीने आपल्या चोचीने समुद्राची खोली मोजण्यासारखे होईल ! सर्वच हास्यास्पद आणि अशक्यप्राय. परंतु लहान मूलही आपल्या बोबड्या बोलाने काहीतरी सांगायचा प्रयत्न करतच रहाते तसाच हा एक वाकुडा-विचुका प्रयत्न !

सांगलीला चिन्मय मिशन केंद्राची स्थापना १९६८ साली खुद्द स्वामी चिन्मयानंदांच्या हस्तेच झाली व त्यानंतर २-३ वेळा सांगलीला आले व त्यांचे ज्ञानयज्ञ अत्यंत यशस्वी होवून भरघोस प्रतिसाद मिळवून गेले. त्याचे मुख्य कारण म्हणजे त्यांचा भारतीय तत्त्वज्ञानाचा प्रगाढ अभ्यास आणि ते तत्त्वज्ञान सामान्य माणसांपर्यंत पोहोचविण्याची अगाध प्रबोधन शक्ती व तीव्र तळमळ ! अमूर्त तत्त्वज्ञानाचे मूर्त स्वरूपच असलेले असे त्यांचे स्वतःचे व्यक्तिमत्त्व फार प्रभावी होत असे. तसेच त्यांचे भाषाप्रभुत्व फार दांडगे होते. शब्दयोजना अगदी अचूक असे. शब्दांचा केवळ शब्दार्थच नव्हे तर संदर्भासहित सर्व आशय व त्याचे असंख्य पैलू त्यांच्या जाणिवेत खोल रुजलेले असत. त्यांनी वापरलेला एखादा विशिष्ट शब्द आपण समजावून घ्यायला लागतो, तेव्हा त्यांच्या बुद्धी सामर्थ्याने व प्रज्ञेने अचंबित होवून जातो.

ज्ञानयज्ञामध्ये सकाळी एखादे उपनिषद व संध्याकाळच्या प्रवचनांत त्याला पूरक असा गीतेचा अध्याय विवेचनाकरता घ्यावयाचा असा परिपाठ असे. पहिल्या ज्ञानयज्ञात स्वामीजींनी पहिले उपनिषद ईशावास्योपनिषद् घेतले होते. त्या उपनिषदाची महती, त्याचे आजच्या मानवाच्या जीवनातले स्थान व ते आपल्या जीवनात उतरविण्याकरता साधकाने करावयाचे आटोकाट प्रयत्न याचे प्रत्ययकारी विवेचन स्वामीजी करत असत. सर्व साधना अंतःकरणपूर्वक करून झाली आहे. अशा वेळी परमेश्वराजवळ कृपाप्रसाद मागावयाचा आहे. साधक म्हणतो -

*हिरण्मयेन पात्रेण सत्यस्यापिहितं मुखम् ।*
*तत्त्वं पूषन् अपावृणु सत्यधर्माय दृष्टये ॥*

सत्यधर्माचे आकलन व्हावे म्हणून लौकिक जगतातले सर्व मूल्यवान् आकर्षक, चमकदार प्रलोभनांचे विषय दूर सारायला सिद्ध झालेला साधक प्रत्यक्ष भगवान् नारायणालच साकडे घालतो की, हे पूषन् ! हे आवरण तूं दूर कर ! मला सत्य स्वरूपाचे दर्शन घडव !

स्वामीजी आपले दोन्ही बाहू उंचावून, आपल्या तेजस्वी नेत्रांनी उगवत्या सूर्याकडे पाहून उच्च स्वरात जेव्हा आवाहन करीत असत तेव्हा आपल्यासमोर खरोखरीच ईशावास्याचे जनक ऋषि अवतरले आहेत, असा भास होई. सर्व वर्ग मंत्रमुग्ध होवून ते अपूर्व दर्शन पहात राहत असे !

आपली साधना पूर्णावस्थेला गेल्यानंतर सार्थकतेची आलेली भावना साधक जेव्हा उत्स्फूर्तपणे व्यक्त करू पहातो तेव्हा त्याच्या मुखातून मंत्र बाहेर पडतात -

*ॐ क्रतो स्मर कृतं स्मर ।*
*ॐ क्रतो स्मर कृतं स्मर ॥*

अशा वेळी साधक जणू पूर्ण समाधी अवस्थेतच गेलेला असतो आणि आश्चर्य म्हणजे त्या भावनेशी एकरूप झालेले स्वामीजी विवेचन करता करता त्यांच्या आणि आपल्याही नकळत गाढ समाधीत गेलेले असायचे ! स्तब्ध पद्मासन, नेत्र मिटलेले, प्रफुल्लीत मुद्रा, तरीही पूर्ण शांत भाव बघता बघता तो शांत भाव सर्व श्रोत्यांच्या अंतःकरणात झिरपत असे आणि सर्व त्या शांततेमध्ये बुडून जात असत !

*आता शांत रसाचे भरिते । ओसंडित आहे पात्राते ।*
*जे बोलणे बोलापरौते । ते बोलविले ॥*

असा अद्‌भुत अनुभव श्रोत्यांना हमखास येत असे आणि त्यांचेही अंतःकरण भरून येत असे.

असाच एक विस्मयजनक अनुभव. संध्याकाळच्या प्रवचनात दुसऱ्या अध्यायावर विवेचन करताना होत असे. वास्तविक गीतेच्या सुरुवातीलाच आलेले हे आत्मस्वरूपाचे वर्णन अनभिज्ञ लोकांनाच काय अभ्यासू साधकांनाही खूप अगम्य वाटते. परंतु स्वामीजींची कमाल अशी की, असा अवघड विषयही ते वेगवेगळ्या उदाहरणांशी, विनोदी पद्धतींनी व कचित् अभिनयानेही पटवून देण्याचा प्रयत्न करीत ! सामान्यतः अभिनेत्याला त्या त्या प्रसंगातील विषयाचा जितका खोल अनुभव असेल तितका त्याचा अभिनयही जिवंत होवून जातो. इथे तर काय केवळ अभिनय नसून प्रत्यक्ष अनुभूतीच आहे ! विवेचन होते गीतेतील दुसऱ्या अध्यायातील २९ व्या श्लोकाचे -

*आश्चर्यवत् पश्यति कश्चिदेनम् ।*
*आश्चर्यवत् वदति तथैवचान्यः ।*
*आश्चर्यवत्‌श्चैनमन्यः शृणोति ।*
*श्रुत्वाप्येनम् वेद न चैव कश्चित् ॥*

आता आत्मसाक्षात्कार झाल्यानंतर होणाऱ्या आश्चर्याचे शब्दांत वर्णन कसे करणार ? व्यक्ताव्यक्तापलीकडील आत्मस्वरूप डोळ्यांनी थोडेच दिसणार आहे ? परंतु डोळे, कान, मन, वाणी, बुद्धी कशी विस्मयामध्ये बुडून जाते त्याचे साक्षात् चित्र स्वामीजी आपल्या डोळ्यांपुढे उभे करतात ! बघता बघता त्यांचे नेत्र विस्फारित होवून एका अमूर्त लक्ष्याकडे एकटक पाहू लागतात. मुखही विस्फारित होवून एका अपूर्व तेजाने उजळून निघते, शरीर स्तब्ध उंचावलेले बाहूही तिथेच स्तब्ध ! वाणीही स्तब्ध ! पूर्ण आत्ममग्न स्थिती ! अशा स्थितीत किती वेळ जातो कोण जाणे ? कारण काळही स्तब्ध झालेला असतो. श्रोतृवर्गही निस्तब्ध झालेला असतो ! काही काळाने स्वामीजी देहभानावर येतात आणि हास्यमुद्रेने पुन्हा विवेचन सुरू करतात. आत्मस्वरूपाचा प्रत्यय श्रोत्यांना प्रत्यक्षपणे आला नाही तरी स्वामीजी मात्र त्या क्षणांमध्ये आपले नव्हतेच इतके तरी नक्कीच जाणवते. असा अपूर्व व आश्चर्यकारक अनुभव प्रत्ययाला आणून दिल्याबद्दल आपण स्वामीजींचे अगदी जन्माचे ऋणी होतो.

*तेथ ताटस्था ताटस्थ्य पडिले । टकासि टकचि लागले*
*जैसे मोहनास्त्र घातले । विचार जातां ॥ ज्ञा. ११.९२*

प्रवचनांमध्ये अशी ब्रह्मरूप स्थिती झालेली आपल्याला प्रत्यक्ष जाणवत असे. त्याची प्रसन्नता, आनंद आपल्यापर्यंत नक्कीच येवून पोहोचतो आणि मनाला एक वेगळेच समाधान प्राप्त होते. त्या समाधानाचे वर्णन तरी कसे करता येईल ? आपण इतकेच म्हणू शकतो की -

*काय वानं आतां संतांचे उपकार ।*
*मज निरंतर जागविती ॥ हरिः ॐ ॥*

**डॉ. उषा गुणे**

# श्री. मधुकर वीरास्वामी नायडू

पुण्यातील रास्ता पेठेत हरिहर भजन समाजाचे गणपती मंदिर आहे. त्यास मद्रासी गणपती असेही म्हणतात. दररोज सायंकाळी तेथे प्रसाद वाटला जायचा. माझा मोठा भाऊ व मी तेथे प्रसादाकरिता जात असू. एके दिवशी तेथे भगव्या वस्त्रातील एक शिडशिडीत तरुण दिसला. प्रफुल्लीत चेहरा, स्वच्छ, तेजस्वी, पाणीदार डोळे आकर्षून घेणारे होते. श्रोते मोजकेच परंतु शब्दांशी लीलया खेळत, ओघवत्या इंग्रजीतून आपल्या भावणाने त्या तरुण संन्याशाने सर्वांना मंत्रमुग्ध केले होते.

'आपल्या देशातील अनेकांना आपल्या संस्कृतीचा, आपल्या धर्माचा विसर पडला आहे. त्यामुळे त्यांचेच धर्मांतर करणे गरजेचे आहे. हिंदूंना हिंदू बनविण्यासाठी मी आलो आहे.

I want to convert a Hindu into a Hindu'

असे अत्यंत प्रभावीपणे व कळकळीने सांगणारा हा तडफदार संन्यासी म्हणजेच स्वामी चिन्मयानंद ! आणि ३१ डिसेंबर १९५१ हा तो ऐतिहासिक दिवस !

मी नुकतेच दहावी-अकरावीच्या उंबरठ्यावर आलो होतो. एखादे गारूड झाल्याप्रमाणे, मी भारावून जाऊन दररोज ती प्रवचने ऐकायला जायचो. भाषा आणि वक्तृत्वाच्या कौतुकाकडून आता त्यांच्या विषयाकडे, विचारांकडे लक्ष जायला लागले. माझ्या संपूर्ण आयुष्याकरिता हा अलौकिक अक्षय प्रेरणास्रोतच ठरला.

स्वामी चिन्मयानंदांचा हा पहिलाच ज्ञानयज्ञ. शंभर दिवस सलग कठोपनिषद व केनोपनिषद या दोन विषयांवर त्यांची प्रवचने झाली. मंदिर श्रोत्यांनी ओथंबून गेले, बाहेरील रस्त्यांवर गर्दी पसरली आणि बाहेर कर्णे लावावे लागले. घोरपडी भागातून सैन्यातील पदाधिकारी सायकलवर येऊ लागले आणि उच्चशिक्षित लोकांचीसुद्धा वेळेअगोदर येऊन पुढे जागा पकडण्यासाठी धडपड असे.

पुणे शहर, चिन्मय ज्ञान गंगेची गंगोत्री ठरली. भविष्यातील एका जगव्यापी प्रचंड अभियानाची, अध्यात्मिक कार्याची ती मुहूर्तमेढ होती. एका युगप्रवर्तकाच्या वाणीची जनमानसासमोर ती पहिली अभिव्यक्ती होती !

रास्ता पेठेतील दत्त क्लबच्या जवळ एका घरात स्वामीजी उतरले होते. खडावा घालून भर उन्हात ते पायी जाताना दिसत.

ज्ञानयज्ञा दरम्यानची 'संकीर्तन फेरी' गाजली होती. गणपती मंदिर ते पॉवर हाऊस चौक व पुढे महात्मा गांधी रोड, गणेश पेठ मार्गे परत गणपती मंदिर अशा मार्गाने स्वामीजी स्वत: व काही भक्तगण भजने म्हणत, नामजप करीत चालत गेले. निरनिराळ्या जाती-धर्मांच्या वस्तीतून ही मिरवणूक गेली. लष्कर भागात तर त्यांच्यावर उंच टांगलेल्या टोपल्यांतून फुलांचा वर्षाव करण्यात आला होता.

होमहवन प्रत्यक्ष करून त्याचेही महत्त्व त्यांनी श्रोत्यांना त्या दरम्यान सांगितले.

गणपती मंदिरापासून जवळच आनंदाम्मा मद्रासी धर्मशाळा होती. तेथे एक ग्रंथालयही होते. माझी मोठी आत्या कुप्पम्मा नायडू व तिचे यजमान रामस्वामी नायडू या उभयतांकडे धर्मशाळेची व्यवस्था पाहण्याची जबाबदारी होती. मागील बाजूस वरच्या मजल्यावर स्वामीजींनी 'अखंड नाम जप' हा कार्यक्रम आखला होता.

'हरे रामा हरे रामा रामा रामा हरे हरे

हरे कृष्णा हरे कृष्णा कृष्णा कृष्णा हरे हरे'

हा जप अखंडितपणे व्हावा याकरिता साधकांचे व्यवस्थित वेळापत्रक केले होते. रात्री दोन ते चार ही वेळ सहसा कुणी घेत नसे. तेव्हा स्वामीजी स्वत: येऊन दोन तास बसत. प्रवचनापूर्वी व नंतरसुद्धा स्वामीजी जपाच्या ठिकाणी पाहणी करून जायचे. स्वामीजींना वाकून नमस्कार करण्यासाठी माझी आत्या व काका आधीच पायऱ्यांवर बसून रहायचे. वयाने ज्येष्ठ असलेल्या या जोडप्याला स्वामीजींनी कधीच वाकून दिले नाही. या दोघांचे हात आपल्या हातात धरायचे, पटकन् उडी मारायचे आणि जिना चढायचे.

साधं पांढरे कापड घेऊन एका फुटक्या बादलीत काव मिसळून, त्यात ते कापड बुडवून 'गेरुआ' (भगवे) वस्त्र करताना मी पाहिले आहे. कोपरापर्यंत त्यांच्या हाताला तो रंग लागलेला असे. हेच वस्त्र ते परिधान करीत.

नवीन लोकांशी परिचय होताच, स्वामीजी जाड कागदावर त्यांचे पत्ते लिहून घ्यायचे व हे सर्व पत्ते आद्याक्षरानुसार काटेकोरपणे लावून ठेवायचे.

एखादा विचार श्रोत्यांच्या मनी रुजविण्याची त्यांची कला अतुलनीयच होती - अगदी पहिल्या यज्ञापासून.

''तुम्हाला पिण्याचे व्यसन असेल तर अवश्य प्या. अजिबात ते व्यसन सोडू नका. घोड्यांच्या शर्यतीवर पैसे लावायचे, उधळून टाका, ते ही बंद करू नका. कोणत्याच वाईट सवयींचा त्याग करू नका.'' - हे ऐकताच आम्ही सर्व श्रोते क्षणभर थक्क झालो. स्वामीजी पुढे म्हणाले -

''चांगल्या सवयी अंगिकारा. चांगल्या सवयी जोपासा. त्या वृद्धिंगत करा. वाईट सवयी आपोआप जातील. तुम्ही प्रयत्नपूर्वक वाईट सवयी सोडण्याची आवश्यकता नाही.''

हात आत घालून कुणी पान थुंकण्याची पिकदाणी साफ करीत नाही. वाहत्या पाण्याखाली ठेवली की, पिकदाणी आपोआप स्वच्छ होते. सुरुवातीला त्यांतून घाण बाहेर पडते नंतर निर्मल पाणी ओसंडताना दिसते. तसेच चांगल्या संस्कारांनी, शुद्ध विचारांनी मन सहज स्वच्छ होऊन जाते.''

ज्ञानयज्ञाच्या शेवटच्या दिवशी स्वामीजींनी सर्व श्रोत्यांवर गंगेचे पाणी शिंपडले. डोक्याला कापड बांधून, श्रोत्यांमधून झपझप चालत जाणारे राजबिंडे स्वामीजी अजूनही डोळ्यांसमोर तरळतात. हिमालयाच्या कुशीतून गंगा नव्हे, ज्ञानगंगाच या युवा भगीरथाने पुण्यनगरीत आणली होती !

पुणे शहर सोडल्यावर, भारतातील विविध शहरांतून स्वामीजींचे ज्ञानयज्ञ झाले. असंख्य अडचणी, प्रखर विरोध याला न जुमानता त्यांची मार्गक्रमणा अविरत चालू राहिली. प्रत्येक यज्ञानंतर 'यज्ञप्रसाद पुस्तिका' माझ्या नावावर, धर्मशाळेच्या पत्त्यावर पाठवायचे किंबहुना ज्या साधकांचे पत्ते त्यांच्याकडे होते, त्या सर्वांनाच हा 'ज्ञानप्रसाद' मिळत असे.

कालांतराने स्वामीजी जगविख्यात झाले. पुणे शहरास येण्याचे त्यांचे प्रमाण कमी झाले. ज्ञानयज्ञाचा कालावधीसुद्धा घटत घटत सहा-सात दिवसांवर आला. अगदी सुरुवातीच्या काळात प्रसिद्ध उद्योजक व समाजसेवक श्री. अतुर संगतानी यांच्याकडे स्वामीजी उतरत. बाल्कनीत पत्रलेखनात गढलेले स्वामीजी अनेक वेळा दृष्टीस पडत.

सकाळी उपनिषदांवर प्रवचने व सायंकाळी गीतेच्या एखाद्या अध्यायावरील त्यांचे विवेचन असे. या व्यतिरिक्त महाविद्यालयात जाऊन ते युवकांशी संवाद साधीत. चार-पाच ठिकाणी व्याख्याने झाल्यावर, एखाद्या रविवारी युवा-परिसंवाद (Youth Symposium) आयोजित केला जाई. युवकांना आपली मते मोकळेपणाने मांडण्यास संधी दिली जाई. समारोप प्रसंगी स्वामीजी त्या

विषयाची सर्वंकष मांडणी करीत. इतकेच नव्हे तर युवकांना त्यांच्या विषयांच्या मांडणीबद्दल, वक्तृत्वाच्या त्रुटींबद्दल सूचना देऊन, अत्यंत मोलाचे मार्गदर्शन करीत.

वाडिया कॉलेजमध्ये एकदा त्यांचे भाषण होते. शिट्ट्या, आरोळ्या, गोंधळ अशा वातावरणात स्वामीजींचे भाषण सुरू झाले. दोन-तीन वाक्यात सर्वजण शांत झाले. त्या तरुणांच्या भाषेत एक संन्यासी बोलत होता. त्यातील काहीजण तर इतके प्रभावित झाले की, सायकलीवरून ते शिवाजीनगर येथील स्वामीजींच्या भाषणाकरिता, त्यांच्या पाठोपाठच निघाले !

"I am for the University educated illiterates" 'उच्चविद्याविभूषित अशिक्षितांकरिता माझे कार्य आहे.' असे ते नेहमी म्हणत.

पुणे येथील पहिल्या यज्ञादरम्यान स्वामीजी एकदा म्हणाले -

"If you can't live Geeta in a market place, than throw that book in a dust bin - दैनंदिन व्यवहारात भगवद् गीतेच्या शिकवणीचा काही उपयोग होत नसेल तर, सरळ तो ग्रंथ कचऱ्यात फेकून द्या." श्रोत्यांवर त्यांनी आपली मते कधीच लादली नाहीत. श्रोत्यांना ते विचार करण्यास प्रवृत्त करीत. त्यांचा यज्ञ म्हणजे एक 'खुले व्यासपीठ' असे आणि त्यांच्याच शब्दात सांगायचे तर त्यांची प्रवचने म्हणजे एक 'प्रकट चिंतन' असे.

पाच दशकांहून अधिक काळ स्वामीजींनी देशोदेशी जाऊन लाखो लोकांपर्यंत गीतेचा संदेश पोहचविला. जीवन जगण्याची कला गीतेत सांगितली आहे, हे त्यांनी सर्व स्तरांतील श्रोत्यांना पटवून दिले. उपनिषदांतील उच्चतम अशा विचारांचा, तत्त्वज्ञानाचा सामान्य माणसाला परिचय करून दिला. कर्मयोग, भक्तियोग व ज्ञानयोग या तिन्ही मार्गांचा उत्कृष्ट संगम म्हणजे स्वामी चिन्मयानंद.

चिन्मय मिशन करिता जे ध्येयवाक्य त्यांनी दिले, तसेच ते स्वतः जगले. **'अधिकाधिक लोकांना, *अधिकाधिक काळ अधिकाधिक आनंद देणे*'** हे चिन्मय मिशनचे ब्रीदवाक्य. १९५१ साली सुरू झालेले चिन्मय कार्याचे रोपटे आज जणू एक प्रचंड वृक्ष झाला आहे. त्याची पाळंमुळं जगभर पसरली आहेत. अनेकांना त्यातून एक वेगळीच जीवनदृष्टी प्राप्त झाली आहे. अनेकांच्या जीवनात आमूलाग्र परिवर्तन घडून आले आहे.

संपूर्ण जग बदलण्याची महत्त्वकांक्षा ठेवण्यापेक्षा एक-एक व्यक्ती उत्क्रांत व्हायला हवी. व्यक्ती सुधारली तर समाज सुधारेल. राष्ट्राची उन्नती होईल व आपोआपच जग सुंदर होईल. 'मनुष्य निर्माण' करण्याचे कार्य स्वामीजींनी हाती घेतले. तो प्रेरणास्रोत अजूनही जिवंत आहे. 'स्वतःपासून परिवर्तनास सुरुवात करा.' हा स्वामीजींचा मंत्र आजही अनेकांना प्रेरणादायीच नव्हे तर मार्गदर्शकही ठरतो आहे !

---

## श्रीमती उषा दातार

माझे नाव उषा त्र्यंबक दातार. माझा विवाह श्री. त्र्यंबक भार्गव दातार या रिझर्व बँक ऑफ इंडियातील अधिकाऱ्याशी झाला. १९५२ ते १९६३ मी कोर्टामध्ये नोकरी करीत होते. माझे पती श्री. त्र्यंबक भार्गव दातार यांचा व गुरूदेव चिन्मयानंदांशी संपर्क झाला तो १९७४/७५ साली. त्यानंतर त्यांनी १९८४ पर्यंत गुरूदेवांचे मुंबईतील सर्व ज्ञानयज्ञात व होणाऱ्या प्रवचनांना हजर राहण्याची सुरुवात केली. गुरूदेवांच्या संदेशाप्रमाणे त्यांनी गीता व उपनिषदांचा अखंड अभ्यास केला व १९८४ साली निवृत्त झाल्यावर ठाणे येथे चिन्मय मिशनच्या अभ्यास वर्गांना जाण्यास सुरुवात केली. या अभ्यासवर्गात न्यायमूर्ती राम केशव रानडे मार्गदर्शन करीत. गुरूदेवांच्या १८ महिन्यांतील १८ गीतेवरील ज्ञानयज्ञात मी व माझे पती हजर राहिलो व मी घरातच बालविहार सुरू केला. १९९३ पर्यंत आमचे वास्तव्य ठाण्यातच होते व ठाण्यातील चिन्मय मिशनच्या केंद्रात आम्ही पती-पत्नी दोघेही तन-मन-धन समर्पित करून सेवक म्हणून काम पहात होतो. सुरुवातीच्या काळात बालविहार म्हणजे मुलांना नुसते संस्कृत शिकवून भटजी करावयाचे अशीच आजूबाजूच्या महिलांची कल्पना असल्याने मला खूप त्रास झाला. पण नंतर गुरूदेवांच्या मार्गदर्शनाप्रमाणे बालविहारची संकल्पना इतकी रुजली की त्याच्या अनेक शाखा निघू लागल्या. पुढे मी देवी ग्रुपमध्ये काम करणे सुरू केले व चिन्मय मिशनची कार्यकर्ती म्हणून मला सर्वांचे खूप सहकार्य लाभले. माझा मुलगा विनय उच्चशिक्षित होऊन तो ८५ च्या सुमारास अमेरिकेत स्थायिक झाला व माझी मुलगी मेधा हिचा विवाह १९८२ साली अरविंद भागवत या उच्च शिक्षित तरुणाशी होऊन तीही ८८ ला परदेशात मेरीलँडी येथे स्थायिक झाली व गुरूदेवांच्या परदेशातील अनेक ज्ञानयज्ञात हजर रहाण्याची संधी आम्हा पती-पत्नींना आमच्या मुलामुळे मिळाली. गुरूदेव चिन्मयानंद यांच्या १९८२ ते १९९३ अशा अकरा वर्षांतील अनंत आठवणी माझ्या डोळ्यांपुढे चित्र रूपाने दिसतात. गुरूदेवांचे आम्हा पती-पत्नीवरील एवढेच नव्हे तर माझी मुलगी-जावई-नातू विनीत यांच्यावरील प्रेमाच्या अनेक आठवणीने मी नेहमीच व्याकुळ होते.

माझी मुलगी मेधा व जावई अरविंदराव भागवत यांच्या मेरीलॅन्ड येथील निवासस्थानी गुरूदेवांची भिक्षा म्हणजे आम्हा सर्वांच्या जीवनातील अतीव आनंदाचा जणू दिवाळीचा दिवस. माझा नातु विनीत भागवत याने वयाच्या चौथ्या वर्षी एका नाटिकेत बाळ शंकराचार्य यांचे काम केले. त्या समारंभास गुरुदेव स्वतः व त्यांचे शिष्यांपैकी स्वामीजी शारदा प्रियनंदा हजर होत्या. बाळ शंकराचार्य याला गुरूदेव म्हणाले, 'अरे, तू शंकराचार्य आहेस' असे म्हणून त्याला नमस्कार केला व नंतर विनोदाने म्हणाले, 'अरे, हसू नकोस आमच्या शंकराचार्यांचे पडके दात फोटोत यायला नकोत.' नाटिकेचा कार्यक्रम संपताच हा नील गुरूदेवांच्या शेजारील रिकाम्या खुर्चीवर जाऊन बसला व गुरूदेव त्याच्याशी खेळू लागले. त्याच्या शेजारी स्वामींनी शारदा प्रियनंदा होत्या. त्या लगेच म्हणाल्या, 'अम्मा' तुमची तिसरी पिढी गुरूदेवांच्या सहवासात रमली आहे. ह्या सुखद क्षणाची आठवण मी मरेपर्यंत विसरणार नाही. आज हा विनीत २३ वर्षांचा असून २/३ वर्षांपूर्वी त्याने एका नाटिकेत 'चिन्मयानंदांचे' काम केले आहे. चिन्मयानंदांचे अत्यंत लाडके शिष्य तेजोमयानंद व पुरुषोत्तमानंद यांचा तर तो खूपच आवडता आहे. माझी मुलगी मेधा हिच्यावर तर ते तिच्या लहानपणापासून इतके प्रेम करतात की, आमचे जावई हे नेहमीच दातारांनी जे 'चिन्मयधन' दिले आहे त्याची तुलनाच व किंमतही करता येणार नाही, असे म्हणत असतात. परदेशातील गुरूदेवांचे वास्तव्यात माझी मुलगी मेधा त्यांना आवडणारे 'डोसे' ते जेथे असतील तेथे जाऊन करून घालीत असे व गुरूदेव ते स्वतःही आवडीने खात व सर्व निमंत्रितांनाही खिलवत.

माझा मुलगा विजय व त्याची पत्नी क्षमा यांच्यावरही गुरूदेवांचे खूप प्रेम

त्याचा मुलगा नील हा अगदी छोटा असल्याने व गुरूदेवांचे निधन लवकर झाल्याने त्यास गुरूदेवांचा सहवास लाभला नाही, तरी आम्हा सर्व परिवारातील गुरूदेवांचा फोटो पाहून तो नेहमी हसे व म्हणत असे मला यात का घेतले नाही.

आम्ही पुढे पुणे येथे १९९३ साली स्थलांतर केले व श्री. दातार १९९६ साली वारले. मुलगा व मुलगी दोघेही परदेशी स्थायिक झाले व त्यामुळे माझे दर वर्षी परदेशी जाणे होत असे. माझी एक मुलगी पुण्यात स्थायिक झालेली असून ती ही खूप मेहनती-सुसंस्कृत माझ्या जावयासह सुखाने संसार करीत आहे.

गुरूदेवांनी ११-४-१९८५ रोजी सिद्धबारी येथे मला एक संदेश दिला.
'Study & Teach others'
Om Chinmaya

त्यांच्या या संदेशाप्रमाणे मी २००० पर्यंत काम केले व माझे घरात मी एकटीच रहात असूनही गुरूदेवांच्या तत्त्वज्ञानाच्या गीतेच्या अभ्यासात व प्रत्यक्ष जीवनाचा सदुपयोग करण्यास माझा वेळ छान जातो. मी निर्भयपणे एकटी पण एकाकी नव्हे असे आनंदमय-सुखमय-समृद्धीमय जीवन जगत आहे. ते फक्त आमचे गुरूदेव स्वामी चिन्मयानंद यांच्यामुळेच.

जीवनात करावयाचे ते केले - मिळवावयाचे ते मिळवले, अशी तृप्ती वाटते ती गुरूदेव चिन्मयानंदांमुळेच.

हरि ॐ ।

श्रीमती उषा त्र्यंबक दातार
फ्लॅट नं. ३०, अमित अपार्टमेंट,
नारायण पेठ, चिमण्या गणपतीसमोरील बोळ, पुणे ३०.

---

स्मृतीगंध

## स्वामिनी गयानंदा

अध्यात्माची व वाचनाची आवड मला लहानपणापासूनच होती. आई बरोबर मी नेहमी प्रवचनांना जायची. नागपूरातील गीता मंदिराचे संस्थापक स्वामी विद्यानंद यांची प्रवचने मी गीता मंदिराच्या प्रांगणात ऐकली होती. त्यांचे शिष्य त्यांचे प्रवचन सुरू होण्यापूर्वी भजन म्हणत असत. त्यातील एक भजन तर अजूनही माझ्या चांगले स्मरणात आहे. हरिद्वारच्या एक संत महिला दरवर्षी नागपूरला येत असत. त्यांचा मुक्काम आमच्या घराजवळ आईच्या मैत्रिणीकडे असे. त्यांची प्रवचने व प्रत्यक्ष सत्संग यांचा लाभ मला लहानपणापासून मिळाला.

१९६४ साली २९ ऑक्टोबर ते ८ नोव्हेंबरपर्यंत परमपूज्य गुरूदेवांचा गीता ज्ञानयज्ञ नागपुरात University Convocation Ground वर झाला. त्या ज्ञानयज्ञाला माझ्या मावशीने मला नेले. त्यावेळी मी गुरूदेवांना प्रथम पाहिले व ऐकले. प्रथमच ऐकलेल्या त्यांच्या प्रवचनांनी मी इतकी प्रभावित झाले की, मग रोज सकाळ-संध्याकाळच्या प्रवचनांना जात राहिले. यज्ञ सुरू होता ते भर दिवाळीचे दिवस होते. तरीही त्यांच्या प्रवचनांना खूप गर्दी असायची. अगदी लक्ष्मी पूजनाच्या दिवशी देखील यज्ञमंडप पूर्ण भरलेला होता. त्या ज्ञानयज्ञात ज्यांनी ५ रु. किंवा अधिक गुरुदक्षिणा दिली त्या सर्वांना एक वर्षभर तपोवन प्रसादचा अंक गुरूदेवांतर्फे पाठविण्यात आला. मलाही तो येत असे. त्यावरून मिशनच्या कार्याची माहिती मला मिळत होती.

गुरूदेवांची प्रवचने प्रथम ऐकली त्यावेळी मी नागपूरच्या शासकीय महाविद्यालयात सांख्यिकी विभागामध्ये प्राध्यापिका होते. प्रवचनांचा माझ्यावर इतका परिणाम झाला की माझे मन मग कॉलेजमध्ये शिकविण्यात लागेना. ते सतत अध्यात्मिक चिंतनात राहू लागले. माझी ही मन:स्थिती मी गुरूदेवांना पत्राने कळविली तेव्हा गुरूदेवांनी मला लगेच उत्तर पाठविले. 'Do not get overwhelmed. Do your duties to the best of your ability. He will do the needful.' गुरूदेवांच्या आदेशाप्रमाणे व त्यांच्याच प्रेरणेने कॉलेजमध्ये शिकवणे व उरलेल्या वेळात अध्यात्मिक ग्रंथांचे अध्ययन करणे, देवळात किंवा इतर ठिकाणी प्रवचनें, सत्संग असतील त्यांना आवर्जुन जाणे अशी माझी साधना सुरू झाली. अनेकदा या साधनेत खंड पडायचा. १९७१ सालच्या उन्हाळ्यात मी पवईच्या सांदीपनी साधनालय आश्रमात परमपूज्य गुरूदेवांच्या दर्शनासाठी गेले होते. परंतु गुरूदेव त्यावेळी उत्तर काशीला गेलेले असल्यामुळे त्यांची भेट झाली नाही. १९७२ नंतर माझा पीएच.डी. चा प्रबंध पूर्ण झाल्यानंतर साधना अधिक तीव्रतेने होऊ लागली. परमपूज्य गुरूदेवांनी माझ्या साधनेला दिशा दिली. श्री. पाध्ये यांचेकडे चिन्मय मिशनचा अभ्यास वर्ग होत असे. त्यांचेकडून पत्ता घेऊन मी १९७५ सालच्या उन्हाळ्यात सुटीत आईबरोबर उत्तर काशीच्या तपोवन कुटी आश्रमात १५ दिवस जाऊन राहिले होते. परमगुरू तपोवन महाराज यांच्या तप:पूत वास्तव्याने पुनित झालेला परिसर व समोरच निरंतर 'हर हर महादेव' असा जयघोष करीत वाहणारी पावन गंगामाई ! आश्रमाच्या गच्चीत बसून गंगामाईकडे पाहता पाहता मन सहज भगवत् चिंतनात एकाग्र होत असे. या वास्तव्यात जवळच असलेल्या कैलास आश्रमात परमपूज्य स्वामी विद्यानंद गिरी यांची प्रवचने ऐकण्याची संधी मिळाली. तपोवन कुटीतील या वास्तव्याचा मला माझ्या साधनेत खूपच लाभ झाला.

१९७६ साली परमपूज्य गुरूदेवांचा गीता ज्ञानयज्ञ नागपुरात आयोजित करण्यात आला. कोणाला प्रश्न विचारायचे असल्यास त्यांनी ते लिहून द्यावे, परंतु त्याबरोबरच नांव व पत्ता अवश्य लिहावा असे गुरूदेवांनी जाहीर केले. अनेकांनी प्रश्न लिहून दिले, मी देखील दोन प्रश्न लिहून दिले होते. ते प्रश्न व गुरूदेवांनी त्याचे पाठविलेले उत्तर खाली देत आहे.

(माझे दि. २ मार्च ७६ रोजीचे गुरूदेवांना लिहिलेले पत्र व त्यानंतर गुरूदेवांनी दि. २५ मार्च ७६ रोजी दिलेले उत्तर)

Q. 1 : What are the definitions of 'कर्म' and 'फल'? Eating is a 'कर्म' or 'फल' ?

Q. 2 : Is there really anything called "free will"?

Every desire that rises in my intellect is a result of my vasnas i.e. of my entire past. The discretion with which I decide whether to fulfill the desire or not is also a product of my entire past. This gives me an impression that the past determines the future completely and that there is nothing like "free will".

Nagpur
2-3-1976

Yours faithfully,

Dr. Miss. Vijaya Hege

Dr. (Miss.) Vijaya Hege
"Prasanna Chhaya"
NAGPUR - 10.

Blessed One,

Harih om ! Harih om ! Harih om ! Salutations !

I must aplogise to you for not having replied you so long. It is not my fault. It is almost impossible to sit on the table and get the necessary time to think and reply your questions. I am now in the midst of the Bombay National Yagna and hence this delay.

1. Responses from our BMI to the stimuli reaching us from OET are called "Actions" and the residual mental impression left over in us as a result of this transaction between BMI and OET are called "fruits-of-action". Your question is exactly like the famous question : whether the tree or the fruit which is earlier. In fact cause and effect are interchangeable. One can be the son of his father and also the father of the son. The fruit can be both cause and effect - from the stand point of the tree the fruit is the cause. From the stand point of the fruit the tree is the cause.

When a colourless crystal glass is looked against a yellow curtain, the glass will look yellow. Against blue curtain the glass will look blue. The glass by itself has no colour. Similarly you, looked at against the past (father), you (present) is the effect. But you (present) when looked against your child (future) play as the cause. You yourself becomes effect with reference to the past and you yourself is the cause with reference to the future.

Cause and effect relationship exists only in the realm of "time". When time is transcended, in OM state, there is neither cause nor effect : both fuse together to become the one essence.

2. But for our intellect there would not have been a "free will".

A log of wood floating on the surface of the water has no free will. It is entirely at the mercy of the stream. When it is mounted with a motor and an intelligent one to run it, the log of wood becomes a Boat. It can go down the stream or up the stream. Remember, in either case the speed of the stream will function on the boat but it has developed a 'free will' of its own - in spite of the stream functioning on it, down the stream in plus quantity and up the stream in minus quantity... Think.

With Prema and Om,
The Own Self
Chinmayananda

श्री. पाध्ये यांच्या धंतोली येथील राहत्या घरी दर रविवारी सकाळी श्री. राधाकृष्ण अभ्यास वर्ग घेत असत. १९७६ च्या ज्ञानयज्ञानंतर त्यांनी रोज सकाळी ७ ते ८ वेदान्ताचे वर्ग घ्यायला सुरुवात केली. हे वर्ग श्री. पाध्ये यांच्या घरासमोरील थिऑसॉफिकल लॉजमध्ये होत असत. या वर्गांना मी नियमितपणे जात असे. अनेक वेदान्त ग्रंथांचे अध्ययन या वर्गात झाले. १९७७ च्या उन्हाळ्यात श्री. राधाकृष्ण यांच्यासह त्यांच्या वर्गाला नियमित जाणारे डॉ. जी. टी. खरे, श्री. साने, श्री. करंदीकर व मी असे आम्ही पाच साधक उत्तर काशीच्या तपोवन कुटी आश्रमात २० दिवस साधना करण्यासाठी जाऊन राहिलो. त्या दरम्यान कैलास आश्रमात पूज्य स्वामी विद्यानंद गिरी यांची मांडुक्य उपनिषदावरील प्रवचने ऐकण्याचे भाग्य लाभले. उत्तरकाशीहून परत नागपूरला येण्याची इच्छा होत नव्हती. परंतु सर्व सोडून या मार्गात येण्याची मनाची तयारीही झाली नव्हती. म्हणून अनिच्छेने का होईना पण परत येवून नोकरीवर रुजू झाले. परत आल्यावर एक महिन्याच्या आतच माझी प्रमोशनवर असोसिएट प्रोफेसर म्हणून औरंगाबादला बदली झाली. मी औरंगाबादला गेले खरी परंतु रोजचे वेदान्त वर्ग तिथे नसल्यामुळे मला तिथे राहणे जवळ जवळ अशक्य झाले व एक वर्षातच म्हणजे १९७८ साली मी पुनः नागपूरला विनंती बदलीवर लेक्चरर म्हणून परत आले. गुरूदेवांच्या कृपेनेच ही बदली मला इतक्या लवकर मिळाली. नागपूरला परत आले तेव्हा विशुद्ध चैतन्य यांची नियुक्ती नागपूर चिन्मय मिशनला झालेली होती. ते योगाभ्यासी मंडळात वेदान्त वर्ग घेत असत. त्या वर्गांना व श्री. पाध्ये यांच्या घरी होणाऱ्या अभ्यास वर्गांना मी नियमित जात असे. १९७९ पासून टिळक नगरमध्ये घरी मी बाल विहार घेऊ लागले. परमपूज्य गुरूदेवांशी मधून-मधून पत्र व्यवहार होत असे व त्यांचे मार्गदर्शन प्राप्त होत असे.

१९८० साली प. पू. गुरूदेवांचा ज्ञानयज्ञ नागपूरात ठरला होता. परंतु त्यांचे हार्ट-ऑपरेशन त्या वर्षी झाल्यामुळे तो १९८१ फेब्रुवारीमध्ये झाला. १९८१ च्या जानेवारी महिन्यात इन्स्टिट्यूट ऑफ सायन्सच्या सांख्यिकी विभागाची सिल्वर जुबिली होती. ती मोठ्या प्रमाणावर साजरी करण्याचे ठरले. मी त्या कार्यक्रमाची Secretary Academic नियुक्त झाले. प. पू. गुरूदेवांचे आशीर्वाद प्राप्त करण्यासाठी त्या कार्यक्रमाची निमंत्रण पत्रिका मी त्यांना पाठविली. त्यांचे त्यांनी ताबडतोब उत्तर पाठविले.

गुरूदेवांचे पत्र - दि. २७ जानेवारी १९८१

Phone : 2302
T.T.D. PADMAVATHI GUEST HOUSE
TIRUPATI - 517502

January 27, 1981

Blessed One,
Jai Jai Jagadeeswara ! Salutations !
Your kind letter of the 21st January 1981 and the invitation to the Silver Jubliee Celebrations on the 24th January has reached me today. I am sure the functions has gone all very well.

I too am looking forward to the chance of meeting you all in Nagpur after such a long time. I will meet the Balvihar Children when I come there.

With Prem and Om,
Thy Own Self,
Chinmayananda
Dr. (Kum.) Vijaya Hege
Secretary Acadamic

Statistics Silver Jubilee Committee
Institute of Science,
NAGPUR.

प. पू. गुरूदेव कामात सतत व्यस्त असत. परंतु त्यांना आलेल्या प्रत्येक पत्राचे ते ताबडतोब उत्तर पाठवित. त्यांचे उत्तर वाचून मला अतिशय आनंद झाला. कारण मी घेत असलेल्या बालविहाराला ते लवकरच भेट देणार होते.

१९८१ च्या फेब्रुवारी महिन्यात नागपुरला झालेल्या प. पू. गुरूदेवांच्या ज्ञानयज्ञात त्यांच्या अधिक जवळ जाण्याची संधी मिळाली. संध्याकाळच्या गीता प्रवचनांत मी गीतेचे श्लोक म्हणत असे. बाल विहारचा कार्यक्रम रामनगरच्या श्रीराम मंदिरात गुरूदेवांच्या उपस्थितीत यशस्वी रितीने संपन्न झाला. ज्ञानयज्ञात गुरूदेवांनी आम्हाला माहिती दिली की, हिमाचल प्रदेश मधील सिद्धबाडी गावात 'सांदीपनी हिमालय' या आश्रमाची उभारणी सुरू असून २४ व २५ एप्रिल १९८१ रोजी आश्रमाचे उद्घाटन आहे. त्या कार्यक्रमास येण्याचे निमंत्रण त्यांनी सर्वांना जाहीररीत्या दिले. ते ऐकून या कार्यक्रमाला जायचे असा मी संकल्प केला.

हा ज्ञानयज्ञ समाप्त झाल्यानंतर प. पू. गुरूदेवांचे अनपेक्षितपणे मला आलेले पत्र पाहून मला आनंदाश्चर्याचा धक्का बसला.

---

**गुरूदेवांचे पत्र – दि. २६ फेब्रुवारी १९८१**

1-10-233/B, Ashoknagar,
HYDERABAD - 500 020.

February 26, 1981

Blessed One,

Jai Jai Jagadeeswara ! Salutations !

You have charmed me. Your chanting was of great help. I don't know how to thank you.

In your spiritual enthusiasm, don't give up your professional perfection. Try to be on the top through brilliant contribution and work.

To keep the mind there the hands are working in Yoga, योगः कर्मसु कौशलम् ।

With Prem and Om,
Thy Own Self,
Chinmayananda

Dr. (Kum.) V. S. Hege
Institute of Science (Statistics), Nagpur.

परमपूज्य गुरूदेवांची महानता, त्यांची सहृदयता, कोणी थोडेसेही केल्याची जाणीव ठेवून प्रेमाने त्याबद्दल अभिव्यक्त केलेली कृतज्ञता व केलेला उपदेश हे सर्व पाहून मन भरून आले. मी त्यांच्या चरणी नतमस्तक झाले.

परमपूज्य गुरूदेवांनी आमंत्रण दिल्याप्रमाणे ज्या दिवशी कॉलेजला उन्हाळ्याची सुट्टी लागली, त्याच दिवशी मी सिद्धबाडीला जायला निघाले. सिद्धबाडीच्या आश्रमाचे उद्घाटन डॉ. करणसिंग यांच्या हस्ते झाले. त्यानंतर लगेचच हिंदीतून वेदान्त कोर्सचा शुभारंभ झाला. परमपूज्य ब्र. विवेक चैतन्य (आताचे स्वामी तेजोमयानंद) हे वेदान्त कोर्सचे आचार्य होते. उन्हाळ्याची सुट्टी संपेपर्यंत या वेदान्त वर्गांचा मला लाभ घेता आला. सुटी संपली तशी मी नागपूरला परत आले. कॉलेज सुरू झाले. आता तर इकडे मन मुळीच लागेना. म्हणून दीर्घ रजा घेऊन मी ऑगस्ट महिन्यातच सिद्धबाडीला गेले व या दीर्घ रजेनंतर मला नोकरीतून relieve करण्यासंबंधी विनंती पत्र मी ऑफिसला पाठविले व एका बंधनातून मुक्त झाले. माझ्या या निर्णयाला अनेकांनी विरोध व्यक्त [illegible]ला. मला खरा पाठिंबा व आधार मिळाला तो माझ्या आईकडून. आता एकाग्र मनाने, स्थिरतेने व क्रमशः परमपूज्य गुरूजींच्या मातृवत् मार्गदर्शनाखाली वेदान्ताचे अध्ययन सुरू झाले. वेदान्त कोर्सच्या दरम्यान परमपूज्य गुरूदेवांचे कँपस् सतत सिद्धबाडी आश्रमात होत असत. तेव्हा त्यांची प्रवचन ऐकण्याची संधी वारंवार मिळत असे. गुरूदेवांना हा आश्रम अतिशय आवडायचा. या वेदान्त कोर्सच्या सुरुवातीला पाण्याने भरलेली बादली उचलण्याचे निमित्त होऊन Slip disc चा विकार जडला व काही दिवस मला सतत अंथरुणावर पडून रहावे लागले. ही व्याधी असताना देखील गुरूदेवांच्या व गुरूजींच्या प्रेमळ आधारानेच मी वेदान्त कोर्स पूर्ण करू शकले. एकदा सिद्धबाडीहून मी गुरूदेवांना पत्र लिहिले. त्यांचे त्यांनी पाठविलेले उत्तर मला नेहमी दिलासा देत असे.

---

**गुरूदेवांचे पत्र – दि. २६ नोव्हेंबर १९८१**

319th Geeta Gnana Yagna
CALCUTTA
(22.11.1981 to 1.12.1981)

| | |
|---|---|
| Swami Chinmayananda | CHINMAYA MISSION |
| | Sarat Bose Road, |
| Geeta Ch. - VII | 180-B, Calcutta-700 029 |
| Mundakopanishad | (INDIA) |

November 26, 1981

Vijaya Hege
Sandeepany (him)
Sidhabari, Himachal

Bleesed Self,

Jai Jai Jagadeeswara ! Salutations !!

Your kind letter of 18th has just arrived. You have got the right spirit. That is what is wanted. Make your life rich by serving others. In order to serve others, we must have the knowledge. The knowledge cannot be from the books, we must learn to live it. For that, you are in the most conducive environment. Don't over-emphasize mere intellectual appreciation, practise it intensely. Once you go down into the world, it'l not be so conductive to maintain the mind consistently in its sattwic mood.

With Prem and Om,

Thy Own Self,
Chinmayanand

सिद्धबाडी आश्रमातील हा अडीच वर्षांचा काळ माझ्या जीवनातील सर्वात अधिक आनंदाचा काळ होता. वेदान्त कोर्स समाप्त झाल्यावर तिथून निघताना खूप वाईट वाटले. ब्रह्मचारी दीक्षा दिल्यानंतर गुरूदेवांनी डिसेंबर १९८३ मध्ये मला वेदान्त प्रचारासाठी नागपूरलाच पाठवले. सर्वांना हे थोडे अनपेक्षित वाटले.

परंतु गुरूदेव मला म्हणाले, "तू नागपूरची आहेस, तिथे नोकरी करीत होतीस, तिथले लोक तुला ओळखतात. त्यामुळे तुला तिथे काम करणे सोपे जाईल." आणि त्यांचे हे शब्द अक्षरश: खरे ठरले. इथे सर्वांनी मला प्रचार कार्यात अतिशय प्रेमाने सहाय्य केले व करीत आहेत. माझ्या पहिल्या ज्ञानयज्ञाचे उद्‌घाटन सुभेदार मामांच्या घरी माझ्या आईने दीप प्रज्वलीत करून केले. आईने प्रज्वलीत केलेली ही ज्योत तिच्या आशीर्वादाने आजही तेवत आहे. ११ मे १९८७ साली तिला देवाज्ञा झाली. त्यावेळी खोपोलीला माझा ज्ञानयज्ञ सुरू होता. त्यामुळे भेट होऊ शकली नाही. आई गेल्यानंतर गुरूदेवांचे आलेले सांत्वनपर पत्र मला आजही दिलासा देत आहे.

गुरूदेवांच्या आशीर्वादाने प्रचार कार्य सुरू झाले. वेळोवेळी त्यांच्याकडून व गुरूजींकडून प्रेरणा व मार्गदर्शन प्राप्त होत असे. दि. २ मार्च १९९२ महाशिवरात्रीच्या दिवशी सिद्धबाडीच्या आश्रमात परमपूज्य गुरूदेवांनी मला संन्यास दीक्षा दिली.

ज्यांनी माझ्या जीवनाला योग्य वळण लावले व या मुक्कामापर्यंत पोचवले व पुढेही अंतिम मुक्कामाला पोचवतील याबद्दल खात्री आहे, त्या परमपूज्य गुरूदेवांच्या चरणी माझे शतश: प्रणाम !

## डॉ. उषा केळकर

प. पू. स्वामी चिन्मयानंदजी यांच्या विषयी काही लिहायची वेळ आली तेव्हा मनात त्यांच्याबद्दल खूप काही होते. पण प्रत्यक्षात कागदावर ते उतरवायला शब्द काही मदतीला येईनात. त्यासाठी आपण कमी पडतो हे जाणवले आणि रागही आला. मनात येवढे असूनही शब्द सुचू नयेत याचा. मग प्रयत्न तरी करूया म्हणून सुरुवात केली. त्याचं ह्या त्यांच्याबद्दलच्या आठवणी.

पू. स्वामीजी तसे जरा गंभीरच वाटायचे. त्यांची नजरही भेदक आणि शोधकही होती. समोरचा माणूस त्यांच्या दृष्टीपुढे जणू पारदर्शक बनत असावा असे मला सारखे वाटे. लहान मुलांशी मात्र ते लहान मुलांप्रमाणे बोलत, वागत. ह्याचे कारण माझ्या मते साधूसंतांना नितळ, स्वच्छ मनाशी संवाद करायला आवडत असावे.

पू. स्वामीजींची अंगकाठी तशी कृश वाटत असली तरी पण ते भरपूर उंचनींच आणि ताकदीचे वाटत असत. त्यांच्या दृष्टीत जशी जरब होती तशी कधी कधी सामान्य माणसांबद्दल कीव किंवा कणव जाणवायची. कुठेही त्यांचे आगमन झाले की, तिथल्या वातावरणात आणि व्यक्तिमधेसुद्धा त्यांच्यातले चैतन्य, जोश, प्रसन्नता बहुधा संक्रमित होत असावी असे मला नेहमी जाणवायचे. प्रत्येकालाच काही प्रसाद मिळाल्यासारखे वाटायचे. त्यांच्यामधला चैतन्याचा झरा झुळूझुळू वहाणारा नव्हता, तर ते चैतन्य एखाद्या प्रतापासारखे तुमच्यावर कोसळायचे.

प्रत्येक जण स्वामीजी आता काय बोलतात, सांगतात ते कानामनात साठवून ठेवण्यासाठी सावध होऊन बसायचा. ते एकदा बोलू लागले की, निरनिराळे शब्द, अर्थाच्या वेगवेगळ्या असंख्य छटा दाखवण्यासाठी अधीर होऊन त्यांच्यापुढे हजर होत असावे. अस्खलित, भारदस्त अशा इंग्लीशमधले त्यांचे वक्तृत्व इंग्लिश कळणाऱ्याला किंवा न कळणाऱ्यालासुद्धा त्या विषयाशी बांधून ठेवी. वक्तृत्वाच्या जोडीला ते कधी कधी अभिनयही करीत. त्यामुळे अवघड विषयही समजायला सोपा होई, याचा मला चांगला अनुभव आला. अध्यात्मासारखा अवघड विषयही मला त्यांच्या प्रवचनांतून समजतो आहे अशी सुखद जाणीव मी अनेकदा अनुभवली आहे. भगवद् गीतेचा सहावा अध्याय मी त्यांच्याकडून दोनदा ऐकला आहे.

पहिल्यांदा त्यांच्याकडून सहावा अध्याय ऐकला, त्यावेळचा अनुभव. पहिले दोन श्लोक झाले आणि तिसरा श्लोक - 'आरुरुक्षोर्मुनेर्योगं कर्म कारणमुच्यते । योगारुढस्य तस्यैव शम: कारणमुच्यते ॥३॥' सुरू झाला. तत्क्षणीच स्वामीजी जणू घोड्यावर स्वार होण्यासाठी आपला पाय रिकिबीत ठेवून घोड्यावर चढून बसत. आपली मांड ठोकत आहेत आणि आता घोड्याला टाच देतील आणि घोडा दौडू लागेल, असा जिवंत अभिनय त्यांनी आमच्यापुढे केला की, सर्व श्रोते स्तब्ध झाले होते. नंतर एक क्षणभर ते स्तब्ध बसले. मग थोडेसे हसून पुढे सांगायला सुरुवात केली. साधकाला (कर्मयोग रूपी) घोड्यावर आरूढ होताना किती व्यवधाने संभाळावी लागतात (निष्काम कर्म, समता, शम, यज्ञरूप कर्म करणे) ह्याचे प्रात्यक्षिकच त्यांनी आमच्या पुढे ठेवले. पुढे त्याचे विवरणही केले. सायकल चालवायला शिकताना एकाच वेळी तोल सांभाळणे, हॅण्डल सरळ ठेवणे, दृष्टी समोर रस्त्यावर ठेवणे, दोन्ही पायांनी व्यवस्थित पॅडल मारणे, घंटा वाजवणे ह्या गोष्टी करताना आपण हे सर्व घाबरत, कसेतरी करत असतो. त्यातच बरेच वेळा आपला तोल जाऊन आपण धराशायी होऊन, तिला शरण जातो. एकदा सायकल चालवायला येऊ लागली की, ह्या सर्व क्रिया अगदी सहज होऊन जातात. मुद्दाम काही करावे लागत नाही. ह्याचा सराव करणे म्हणजेच अभ्यास होय. हेच त्यांनी कर्मयोग (निष्काम यज्ञरूप कर्म) आचरताना कसे सावध असावे लागते हे 'आरूढ' ह्या शब्दाचा 'आधार' घेऊन घोड्यावर बसण्याचा अभिनय करून दाखवले. श्रोते, प्रेक्षक ह्या कृतीने एकदम सुखावले. कर्मयोगावर प्रभुत्व कसे मिळवावे ह्याची कल्पना माझ्या मनात अगदी ठीक बसली. त्यांची विवरण करण्याची पद्धत म्हणजे विषयाचे शब्दरूपाने चित्रच आपल्यापुढे उभे करणे. हा प्रसंग मी कधीच विसरणार नाही.

त्यांना आत एक, बाहेर एक असे वागणारी किंवा ढोंगी, मतलबी माणसांचा मनस्वी राग येत असे. या संदर्भात त्यांनी त्यांच्याचकडे शिकून बाहेर पडलेल्या, काम केलेल्या एका संन्याशाला - मतलब्याला असे काही फैलावर घेतलेले मी पाहिले आहे. त्यांचा तो रूद्रावतार पाहून जरा दूर उभे असलेल्या मला घाम फुटला होता. प्रत्यक्षात त्यांनी त्याच्या पेकाटात लाथ घातली नव्हती एवढंच. तो माणूस बाहेर गेल्यावर जणू काहीच झाले नाही, असे दाखवत दुसऱ्या व्यक्तीशी बोलायला सुरुवात केली.

ज्ञानयज्ञ मंडपात एकदा शिरल्यावर प्रवचन सुरू होण्यापूर्वी, प्रवचन चालू असताना किंवा संपल्यावर १० मिनिटे सर्वांनी मौन पाळावे असे त्यांनी दोनतीनदा सांगून पाहिले. पण लोकांनी तिकडे दुर्लक्ष केले. शेवटच्या दिवशी प्रवचन संपल्यावर त्यांनी अत्यंत कडक शब्दात सांगितले की, मी इथेच, शेवटचा साधक प्रसाद घेऊन बाहेर पडेपर्यंत 'ॐ नम: शिवाय' हा जप करत बसणार आहे. तुम्ही कुणीही एक शब्दही बोलायचा नाही. ही मात्रा बरोबर लागू पडली.

मी एकदा त्यांना नमस्कार केला, तेव्हा ते म्हणाले, 'तुझे काम हीच देवाची सेवा समजून कर मग पुढे यश आणि यशच आहे.'

प. पू. स्वामी चिन्मयानंदजी म्हणजे अखंड, चैतन्य सर्वांना वाटणारे, सळसळते, उत्साहाने भरलेले असे कर्मयोगी संन्यासी.

हरि ॐ

**डॉ. उषा केळकर**
५, हरिप्रसाद सोसायटी, १४६० सदाशिव पेठ, पुणे ३०.
दूरभाष क्र. २४४७८४०७